॥ श्रीः ॥

# रंगनाथी योगवासिष्ठ.

हा ग्रंथ

गोविंद नारायण शास्त्री दातार

यांनीं

शोधून, विपुल व सुबोध टीपा आणि प्रस्तावना यांसह

तयार केला.



तेव विश्वामित्र ह्मणे धन्य । यया दोघांचें गुरुशिष्यपण ।
मानलें परस्परें आपणां आपण । दोघां दोनीपण उरेचिना ॥१०२१॥
शिष्यत्वें रघुनाथ जाला वरिष्ठ । गुरुत्वें श्रीवसिष्ठ श्रेष्ठ ।
दोघां जालें ऐक्य उत्कट । ब्रह्म स्पष्ट पूर्णानंदु ॥ १०२२ ॥
दोघांचें जाऊनि दोनीपण । ब्रह्मरूप जाले परिपूर्ण ।
धन्य माझें आगमन । फळला यज्ञ ब्रह्मफळेंसीं ॥ १०२३ ॥

निर्वाणप्रकरण.



प्रकाशक,

## गजानन चिंतामण शास्त्री देव

बुकसेलर—मुंबई व पुणें.

शके १८२७, सन १९०५.

किंमत ३॥ रुपये.

मुंबई:-इंदुप्रकाश जाइंट स्टॉक कंपनीच्या छापखान्यांत छापिलें.

याच ग्रंथाच्या सफेत गुळगुळीत व मजबूद कागदावर कांहीं प्रती काढल्या असून बांधणी कापडी मजबूद व सोनेरी अक्ष-रांची केली आहे. त्या प्रतीची किंमत ५ रुपये ठेविली आहे.

# प्रस्तावना.

भगवान् श्री रामचंद्र सोळा वर्षांच्या वयाचे असतां, ते एकदा पित्याची आज्ञा घेऊन देशपर्यटनास व तीर्थयात्रेस गेले होते. त्यांनी अनेक तीर्थे, आश्रम, वनें, उपवनें वगैरे पाहिलीं. अनेक सृष्टिचमत्कार व अनेक प्रकारची लोकस्थिति पाहिल्यामुळें, हा सर्व संसार असार आहे, त्रासदायक आहे, बंधक आहे, असें त्यांच्या मनास वाटलें. वास्तविक पाहिलें असतां, त्या लीलाविग्रही परमात्म्याला अशा प्रकारच्या प्रसंगानें उद्विग्नता यावी ही गोष्ट अशक्यच होय. परंतु मानवी देह धारण केला असल्यामुळें लोकसंग्रहार्थ—ते उद्विग्न झाले. त्यांनीं आहारविहारादि नित्यकर्में टाकून दिलीं, व ते एकांतांत जाऊन राहूं लागले. हें वर्तमान सेवकांनीं दशरथ राजास कळविलें; त्यावरून राजानें रामचंद्रास बोलावून मोठ्या ममतेनें, 'तुला काय होतें ?' असें विचारलें. रामचंद्रानें आपल्या खिन्नावस्थेचें कारण सांगून, मला हा प्रपंच अगदीं आवडत नाहीं, एकांतवास करावासें वाटतें असें सांगितलें. हें ऐकून दशरथास फार दुःख झालें व त्यांनीं वसिष्ठांस पुढें काय करावें याबद्दल विचार विचारिला. इतक्यांत यज्ञाला राक्षस विघ्न करितात म्हणून यज्ञरक्षणार्थ रामचंद्रास नेण्यासाठीं विश्वामित्र दशरथाकडे आला व त्यानें 'रामास आपल्याकडे पाठीव' अशी दशरथापाशीं मागणी केली. दशरथानें तें ऐकून प्रथम थोडीशी कुरकुर केली, पण विश्वामित्राचा अत्याग्रह पाहून तो रामचंद्रास यज्ञरक्षणार्थ पाठविण्यास कबूल झाला. त्यानें विश्वामित्रास सांगितलें कीं रामचंद्राच्या मनाला उद्विग्नता आली आहे, त्याला संसारविचाराचा कंटाळा आला आहे, तर आपण त्यास कांहीं तरी उपदेश करा. हें ऐकून विश्वामित्र म्हणाला, वसिष्ठ आपले कुलगुरु असून वृद्ध व ज्ञाते आहेत त्यांनींच त्याला उपदेश करावा हें योग्य. वसिष्ठांनीं हा रामचंद्रासारखा ज्ञानाला अधिकारी दुसरा सांपडणार नाहीं असें पाहून रामचंद्रास उपदेश केला, तो उपदेश प्रस्तुत ग्रंथाचा विषय होय. वाल्मीकिकृत रामायणाचाच हा एक भाग आहे. याला उत्तररामायण अथवा **योगवासिष्ठ** असें म्हणतात. मूळ ग्रंथाचे ३२००० श्लोक आहेत. व त्याचीं सहा प्रकरणें असून त्यांत अनेक आख्यानें व उपाख्यानें आहेत.

या बत्तीस हजार श्लोकांपैकीं २२९ श्लोक निवडून काढून त्यांस **योगवासिष्ठसार** असें नांव दिलेलें आहे. हे सवादोनशें श्लोक मूलभूत धरून त्यावर प्रस्तुत ग्रंथ ही ओवीबद्ध टीका आहे. बत्तीस हजारी योगवासिष्ठाचीं, (१) वैराग्य, (२) मुमुक्षुव्यवहार, (३) जगदुत्पत्ति (४) जगत्स्थिति, (५) जगल्लय, आणि (६) निर्वाण अशीं सहाच प्रकरणें आहेत. परंतु प्रस्तुत ग्रंथाचीं, (१) वैराग्य, (२) जगन्मिथ्यात्व, (३) जीवन्मुक्ति, (४) मनोलय, (५) वासनोपशम (६) आत्ममनन, (७) आत्मशुद्धि (८) आत्मार्चन, (९) आत्मनिरूपण (१०) आणि निर्वाण (शून्याशून्ययोग) अशीं दहा प्रकरणें आहेत. प्रस्तुत ग्रंथ ही निवडक श्लोकांवरील टीका असल्यामुळें उपाख्यानें व आख्यानें हीं अर्थातच यांत नाहींत.

श्री योगवासिष्ठाच्या महत्वाविषयीं, किंवा उत्तमत्वाविषयीं माझ्यासारख्या प्रपंचग्रस्त मूढानें लिहिणें म्हणजे जवळ जवळ अव्यापारेषु व्यापारच होय. अशा प्रकारचे प्रयत्न ज्यांनीं खरोखर करावयास पाहिजे आहेत, असे पुरुष या आर्यावर्तांत पुष्कळ आहेत, परंतु त्यांचे व्यवसाय इतर कार्यासंबंधानें होत असल्यामुळें त्यांनीं या विषयाकडे फारसें लक्ष दिलेलें आढळत नाहीं; वेदांत विषयासंबंधानें जरी सध्या

---

१ या योगवासिष्ठसारावर व्यंकटकवीकृत समश्लोकी टीका आहे. व ती 'काव्यसंग्रह अंक १२८, १२९, व १३० यांत सटीप प्रसिद्ध झाली आहे.

२ **लघुयोगवासिष्ठ** या नांवाचा एक संस्कृत ग्रंथ आहे तोही या ग्रंथाचा संक्षेप असून त्यांतील सहाही प्रकरणांचीं हींच नांवें आहेत. मुळांतील आख्यानें व उपाख्यानें हीं यांत आहेत. यावर रामानंद नामक यतीची संस्कृत टीका आहे.

३ माधवदास नामक कवीनें ही या **योगवासिष्ठसारावर** प्राकृत ओवीबद्ध टीका केलेली आहे तिचींही प्रस्तुत टीकेप्रमाणें दहा प्रकरणें आहेत. उपाख्यानें नाहींतच. टीका संक्षिप्तच आहे असें म्हटलें तरी चालेल. सहाचीं दहा प्रकरणें करण्याचा हेतु समजत नाहीं.

बरीच जागृति झालेली आहे तथापि, या विषयाकडे सर्वजनसमूहाचें लक्ष्य वेध[illegible] लेलें नाहीं. यास कारणें अनेक आहेत. कित्येकांस वेदान्त समजत नाहीं, त्यामुळे त्यांचे व्य[illegible] चमत्कारिक होऊं लागतात, ते सारासार विचार न करितां मनःपूत आचरण करूं लागतात, तें आचरण लौकिक व धार्मिक दृष्ट्या विलक्षण दिसतें, तेव्हां जर कोणीं अशा वर्तनाचें कारण विचारलें, तर ते एकादें वेदान्त विषयक प्रतीक अगर एकादा गीतेंतील श्लोक ह्मणून दाखवून आपल्या कृतींचें मंडन करूं पहातात। अशा लोकांच्या आचरणानें विषाद उत्पन्न होऊन 'कलौ वेदान्तिनो भांति फाल्गुने बालका इव' असें सुभाषित ग्रंथांमधून खेदोद्गार काढलेले दृष्टीस पडतात. दुसरें एक कारण असें कीं, हा विषय दुर्ज्ञेय आहे असें समजून लोक तिकडे दुर्लक्ष करितात. व तिसरें कित्येक लोकांचा असा विपरीत ग्रह झाला आहे कीं, सध्याच्या स्थितींत वेदान्ताचा कांहीं उपयोग नाहीं. त्यानें मनुष्य कर्तव्यशून्य होतो, व त्याचा जगास अगर स्वतःस कांहीं उपयोग होत नाहीं. अशा अनेक कारणांमुळें वेदान्ताकडे जनसमूहाची सरसहा प्रवृत्ति होत नाहीं. वर सांगितलेल्या तीन कारणांपैकीं, पहिलीं दोन कारणें केवळ मूर्खपणाचीं असल्यामुळें विचारार्ह नाहींत. परंतु तिसरें कारण कित्येक विद्वन्मन्यांकडून अथवा विधर्मी लोकांकडून पुढें करण्यांत येत असतें.

पृथ्वीवर अनेक धर्म असून, त्यांपैकीं प्रत्येक धर्मांत निरनिराळीं मतें प्रचलित असतात, व त्या मतांच्या मंडणांचे व खंडनांचे प्रकारही ठराविकच असतात. अशा मतवाद्यांपैकीं प्रत्येक जण दुराग्रहानें आपलें तेवढें मत खरें इतरांचें त्याज्य असें ठासून प्रतिपादन करीत असतो, व पूर्वी ज्या प्रमाणांवर अनेक वेळां युक्तिवाद झालेले असतात, तींच प्रमाणें पुनः पुढें करीत असतो. प्रतिपक्षीही आपल्या पक्षांतील पूर्वाचार्यांच्या पांडित्याच्या मोठ्या जोरावर वादाचें खंडन करण्याकरितां अनेक वेळ चर्चा झालेलींच प्रमाणें पुनः पुनः मोठ्या जोरानें प्रतिपादितो. अशा प्रकारचे शुष्कवाद, शब्दछल, प्रत्येक धर्मांत, प्रत्येक पंथांत चालूच असतात. अशा विवादांनीं फायदा तर होत नाहींच, पण उलट द्वेषभाव वाढून एकच धर्माच्या पोटविभागांत वैर उत्पन्न होतें, व तें केव्हां तरी सर्वनाशास कारण झाल्यावांचून रहात नाहीं. प्रत्येक मनुष्य ज्या धर्मांत अगर धर्मपंथांत उत्पन्न झाला असेल, त्यानें त्या धर्मांत अगर पंथांत सांगितल्याप्रमाणें आपलें आचरण ठेवावें हा उत्तम पक्ष. त्यानें इतर धर्मांची किंवा पंथांची अवहेलना किंवा निंदा करणें हें फार वाईट आहे. वादविवाद करणें हें जर सदिच्छेनें—तत्वजिज्ञासेनें—होईल तरच उत्तम; पण जर अहंपणानें अगर द्वेषानें होईल, तर त्यासारखी शोचनीय गोष्ट दुसरी नाहीं, असें ह्मणण्यास प्रत्यवाय नाहीं. वेदान्तासंबंधानें अप्रिय उद्गार जेव्हां जेव्हां ऐकूं येतात, तेव्हां तेव्हां बहुधा तत्वजिज्ञासेपेक्षां द्वेषभाव प्रखर असलेला दृष्टीस पडतो, व त्या द्वेषभावाचेंच फल वेदान्त हा देशहितास विघातक आहे, असें प्रतिपादन हें होय. द्वेषबुद्धीनें दोषारोप करणारांस उत्तर देण्याच्या भरीस पडण्यांत अर्थ नाहीं. कारण, द्वेषबुद्धीचा अभाव झाल्याखेरीज, कोणतेंही विचारपूर्वक दिलेलें उत्तर प्रतिपक्षास पटण्याचा संभवच नाहीं. परंतु जे तत्वजिज्ञासेनें असें ह्मणत असतील त्यांस जागृत करण्याचा एवढाच मार्ग आहे कीं, वेदान्तशास्त्रावरील उत्तम ग्रंथांचें त्यांनीं एकान्तीं बसून अध्ययन करावें, पूर्वाचार्यांनीं जो कांहीं विचारपूर्वक निश्चय केला असेल त्याचें निदिध्यासन करावें, ह्मणजे कार्य होईल.

वेदान्ती हे श्रुति, युक्ति व अनुभव यांनीं सिद्ध झाल्याशिवाय कोणताही सिद्धान्त ग्रहण करीत नाहींत, अशी त्यांची प्रतिज्ञा असते. ह्मणजे वेदान्तशास्त्र हें या तीहींच्या आधारावर अवलंबून आहे. यांपैकीं युक्ति व अनुभव यांच्या प्रामाण्याविषयीं मतभेद होण्याचा केव्हांही संभव नसल्यामुळें तीं सर्व मान्य होतीलच. परंतु श्रुतिसंबंधाचा विचार याहून भिन्न आहे. कित्येक बुद्धिवाद करणारे असें ह्मणतात कीं, केवळ आपला धर्म ह्मणूनच पाहिजे तर श्रुतीवर आम्ही विश्वास ठेवूं. परंतु अर्थात् हा विश्वास अंध होय. अशा प्रकारच्या अंधविश्वासानें मनाची तळमळ शांत होणार नाहीं. यावर वेदान्ती असें विचारतात कीं, जर युक्ति आणि अनुभव यांनीं श्रुति प्रतिपादित पक्ष सिद्ध झाला, तर ती श्रुतिप्रमाण मानण्यास काय हरकत आहे? आम्ही युक्तीनें व अनुभवानें भिन्न भासणाऱ्या श्रुतींची एकवाक्यता करून देतो. आमचें ह्मणणें

पटलें तर खरें माना नाहींतर सोडून द्या. तुम्ही ज्यास अंधविश्वास ह्मणतां तशा प्रकारचें कांहीं मानण्याची जरूरचें नाहीं, अर्थात् श्रुतिप्रमाणही युक्ति व अनुभव यांच्या इतकेंच महत्त्वाचें आहे, असें वेदांती समजतात.

जगांत आल्यानंतर प्राणिमात्रास अनेक प्रकारचीं दुःखें सहन करावीं लागतात, तीं नाहींशी कशानें होतील? आपण कोण? आलों कोठून? जावयाचें कोठें? आपल्या भोंवतीं आहे हें काय? तें कसें उत्पन्न झालें? व याचा शेवट काय होणार? इत्यादि अनेक प्रश्न संसारदुःखानें त्रस्त झालेल्या विचारी पुरुषांच्या मनांत सर्वदा घोळत असतात. आपापल्या बुद्धिमर्यादेप्रमाणें अनेकांनीं अनेक प्रकारांनीं हे प्रश्न सोडविले आहेत. प्रत्येक धर्माचा हाच मुख्य हेतु आहे. याच प्रश्नांचीं उत्तरें समर्पक देणाऱ्यांपैकीं वेदान्ती हे होत. वेदान्त ह्मणजे जें जाणलें असतां दुसरें कांहीं जाणावयाचें रहात नाहीं तें ज्ञान; अथवा वेदांचा–श्रुतींचा, अन्त–शेवटचा भाग–शिरोभाग–उपनिषदा, त्यांत सांगितलेलें ज्ञान. दोन्ही अर्थ. वेदान्त्यांस मान्य आहेत. कारण दोहींचें पर्यवसान ज्ञानांतच आहे. श्रीमच्छंकराचार्य हे या मताचे प्रवर्तक व श्रीमद्व्यासादि महर्षि उत्पादक होत. श्रीमद्व्यासकृत सनत्सुजातीय पर्वावर भाष्य करतांना आचार्यांनीं प्रारंभीं वेदान्तमर्यादा सांगितली आहे, ती येणेंप्रमाणें:—

स्वतश्चिदानंदाद्वितीयब्रह्मात्मस्वरूपोप्यात्मा स्वाश्रयया स्वविषयया ऽविद्यया स्वानुभवगम्यया स्वाभासया स्वाभाविकचित्सदानंदाद्वितीयब्रह्मात्मभावात्प्रच्युतोऽनात्मनि देहादावात्मभावमापन्नोऽप्राप्ताशेषपुरुषार्थः प्राप्ताशेषानर्थोऽविद्याकामकर्मपरिकल्पितैरेव साधनैरिष्टप्राप्तिमनिष्टपरिहारं चाकांक्षन् लौकिकवैदिकसाधनैरनुष्ठितैरपि परमपुरुषार्थं स्वार्थं मोक्षाख्यमलभमानो मकरादिभिरिव रागद्वेषादिभिरितस्ततः आकृष्यमाणः सुरनरतिर्यगादिप्रभेदभिन्नासु नानायोनिषु परिवर्तमानो मोमुह्यमानः संसरन् कथंचित् पुण्यवशात् वेदोदितेनेश्वरार्थकर्मानुष्ठानेनापगतरागादिमलोऽनित्यादिदोषदर्शनोत्पन्नेहामुत्रफलभोगविरागो वेदान्तेभ्यः प्रतीयमानं ब्रह्मात्मभावं बुभुत्सुर्वेदोदितशमदमादिसाधनसंपन्नो ब्रह्मविदमाचार्यमुपेत्याचार्यानुसारेण वेदान्तश्रवणादिनाऽहं ब्रह्मास्मीति ब्रह्मात्मतत्त्वमवगम्य निवृत्ताज्ञानतत्कार्यो ब्रह्मरूपोऽवतिष्ठते। इतीयं वेदान्तमर्यादा।

जीवात्मा हा चिदानंदाद्वितीय अशा ब्रह्मापासून वेगळा नसून ही, स्वतःच्या आश्रयानें रहाणारी, स्वविषय, स्वानुभवानेंच जाणता येणारी, स्वतः आभास पावणारी अशी जी अविद्या तिच्या योगानें सच्चिदानंद ब्रह्मस्वरूपापासून भ्रष्ट होतो. तो देहादिकांच्या ठिकाणीं आत्मत्व मानूं लागतो. त्यामुळें त्याला पुरुषार्थाची प्राप्ति होत नाहीं. सर्व अनर्थ मात्र पदरीं पडतो. अविद्या आणि इच्छा यांनीं प्रेरित होऊन केलेल्या कर्मांमुळेंच इष्टप्राप्ति व अनिष्टाचा परिहार होईल असें मानून लौकिक आणि वैदिक कर्मे करूनही, त्याला परमपुरुषार्थ असा मोक्ष नामक स्वार्थ साधत नाहीं. रागद्वेषादिकांची मगरमिठी पडल्यामुळें ते त्या जीवात्म्याला इकडेतिकडे ओढून नेतात. देव, मनुष्य, पशु, इत्यादि अनेक प्रकारच्या योनींत मोहानें पुनःपुनः तो जन्म घेतो. त्याच्या पदरीं पुण्य असल्यास वेदांनीं सांगितलेलें कर्म ईश्वरसमर्पण करून तो ते रागादिदोष नाहींसे करितो. या लोकींचे व परलोकींचे सर्व विषयोपभोग अनित्यादि दोषांनीं भरलेले आहेत असें त्यास समजतें व त्याची त्यांवरील प्रीति नाहींशी होते. वेदान्तामुळें ज्याचा प्रत्यय येतो अशा ब्रम्हात्मभावाची तो इच्छा करूं लागतो. वेदांनीं प्रतिपादित शमदमादि साधनें तो प्राप्त करून घेतो; नंतर तो ब्रम्हवेत्त्या गुरुपाशीं जाऊन त्याच्या मुखानें वेदान्त श्रवण करतो; त्यामुळें त्याला ब्रम्ह हें मीच आहे असें ज्ञान होतें, अज्ञान व त्याचें कार्य यांचा नाश होतो आणि तो जीवात्मा ब्रम्हरूपच होऊन राहतो. हीच वेदान्त मर्यादा होय.

आत्मज्ञान होण्यास श्रवण, मनन आणि निदिध्यासन हीं तीन आवश्यक आहेत. हीं उत्तरोत्तर श्रेष्ठ आहेत. निदिध्यासन हें सर्वांस श्रेष्ठ असल्यामुळें, तद्विषयक चर्चा अर्थातच सर्व ग्रंथांत दिसून येते. 'घटपटादि खटपट' ती सर्व याचकरितां. 'एकमेवाद्वितीयं' हें तत्त्व मनांत सर्वदा कायम रहाण्यासाठीं दृश्य पदार्थांसंबंधें विचार करून ते आत्मतत्त्वापासून वेगळे नाहींत, अशी जी मनाची खात्री करून घ्यावयाची तीही त्याकरितांच. ही खात्री एकदा पटली, जगांतील सर्व वस्तुजात आपणाहून भिन्न नाहीं, असें एकदा ज्ञान झालें, अभेदबुद्धि जागी झाली, वासनेचा क्षय झाला, सर्वत्र आत्मस्वरूपच दिसूं लागलें, ह्मणजे तो मुक्त झाला. बंध आणि मोक्ष हे दोन्ही काल्पनिक आहेत, मनाचे खेळ आहेत. मनानें जो बद्ध झाला त्याचा

मोक्षही मनाचेंच होईल. जेथें सांडलें तेथें शोधावयाचें. एकदा सबाह्याभ्यंतर निघोट एकच ब्रह्मस्वरूप दिसूं लागलें, दुजाभावच राहिला नाहीं, ह्मणजे बाकी काय राहिलें? गीतेंत सांगितलेली 'ब्राह्मी' स्थिति ती हीच.

हेंच सर्व वेन्दांत ग्रंथांचें तात्पर्य, अर्थात् योगवासिष्ठाचाही विषय हाच. मूळ योगवासिष्टग्रंथ ३२०००, श्लोकांचा आहे. अशा मोठ्या ग्रंथाचें समग्र वाचन प्रापंचिकास सहज होणार नाहीं, याकरितां त्यांतील सारभूत श्लोक निवडून लघु योगवासिष्ठ ह्मणून एक लहान ग्रंथ संस्कृतांत तयार केलेला आहे, त्याचा प्रत्येक श्लोक आधारभूत धरून रंगनाथांनीं ही टीका प्राकृत भाषेंत मुमुक्षुजनांकरितां केलेली आहे. ही वेदान्त शास्त्राला धरून केलेली आहे, ह्मणून भाषाही शास्त्रीय आहे; संस्कृतभाषेशीं दृढ परिचय असल्याशिवाय ही टीका एकाएकीं कळावयाची नाहीं. ग्रंथाचें कोणतेंही पृष्ठ उघडून पाहिल्यास त्यांत संस्कृत शब्दांचा व पारिभाषिक शब्दांचा भरणा मोठ्या प्रमाणानें दिसेल. यामुळें जरी भाषेस काठिण्य आलें अहे खरें, तथापि त्यामुळेंच विषयप्रतिपादनासही मोठी मदत झाली आहे. मराठी भाषेच्या बाल्यावस्थेंत ही रचना झाली असल्यानें असें होणें साहजिक आहे. ज्या ज्या वेळीं कठीण अशा परिभाषिक शब्दांचा अगर इतर अप्रसिद्ध शब्दांचा आपण उपयोग केला आहे, असें ग्रंथकारासच वाटलें त्या त्या वेळीं त्यानेंच त्या पदांचा अर्थ स्पष्ट करून दाखविला आहे. या वरून आपलें विवेचन कठीण शब्दांनीं करणें भाग आहे, असें त्यास वाटलें असावें. रंगनाथानें वेदांतविषयक नवीन परिभाषिक शब्द मराठमध्यें उत्पन्न करून त्यांची योजना करण्याचा प्रयत्न केलेला दिसत नाहीं, यावरून पारिभाषिक शब्द संस्कृत भाषेचेच ठेवणें त्याच्या मताप्रमाणें इष्ट होतें, असें दिसतें.

रामदासपंचायतनांतील निगडीकर रंगनाथ व मोगरेकर रंगनाथ असे रंगनाथ या नांवानें दोन कवि प्रसिद्ध आहेत. त्यांपैकीं कोणत्या रंगनाथानें ही टीका केली हें ठरविणें बरेंच कठीण आहे. कारण प्रस्तुत ग्रंथ दोघांच्याही नांवावर प्रसिद्ध आहे. मुख्य प्रतिपाद्य विषय दोन्हीं ग्रंथांतील अक्षरशः एकच आहे; क्वचित् पाठभेदही आहेत, ते या आवृत्तींतील टीपेंत दाखविले आहेत. फक्त स्वनामनिर्देश जेथें झाला व गुरुपरंपरेचा संबंध आला तथाल ओव्या प्रत्येकाच्या निराळ्या आहेत. प्रत्येक प्रकरणाच्या आयंतीं हा फरक स्पष्ट दिसून येतो. दोघेही वेदान्त मतानुयायीच असल्यामुळें प्रत्येकाच्या ग्रंथाच्या अंतरंगावरून ग्रंथकर्तृत्व कोणाकडे येईल हें ठरविणें दुरापास्त आहे. तेव्हां जो काय विचार करावयाचा तो बाह्यांगावरून करावयाचा; दोघेही कवित्वसंबंधानें प्रसिद्ध आहेत, व उभयतांचें काव्यही आज उपलब्ध आहे. त्यांतील भाषासरणीवरून विचार केला असतां, या ग्रंथाचें कर्तृत्व मोगरेकर रंगनाथांकडे जाऊं पहातें. मोगरेकर रंगनाथांची 'चित्सदानंदलहरी' अथवा 'सदानंदलहरी' या नांवाची श्रीमद्भगवद्गीतेवरील टीका उपलब्ध आहे. या टीकेंतील भाषासरणी व प्रस्तुत ग्रंथांतील सरणी या अगदीं सारख्या आहेत. निगडीकराचें ओवीबद्ध काव्य पहाण्यांत नाहीं. तथापि त्यांचीं पद्यें व श्लोक यांवरून पहातां प्रस्तुत योगवासिष्ठाची भाषा त्यांची दिसत नाहीं. असा तर्क आहे कीं, मोगरेकर रंगनाथकृत योगवासिष्ट निगडी येथील मठांत वाचण्याचा तेथील शिष्यवर्गानें ज्या वेळीं उपक्रम केला, त्या वेळीं, तें आपल्या गुरूचेंच आहे असें भासविण्याकरितां त्यांनीं ओव्या बदलण्याचा खटाटोप केला असावा, याशिवाय दुसरें योग्य कारण दिसत नाहीं. काहींही असो, ग्रंथकर्तृत्व कोणाकडे ही जावो, त्याच्या उत्तमत्वांत अणुमात्र कमतरता येत नाहीं. एकाच ग्रंथाचें कर्तृत्व निरनिराळ्या दोन एकाच नांवाच्या व्यक्तींकडे असावें, हो फार आश्चर्याची गोष्ट आहे. असा प्रकार क्वचितच पाहण्यांत येईल. वस्तुस्थिति अशी असल्यामुळें येथें ग्रंथकाराचें चरित्र दिलें नाहीं. हा ग्रंथ मुमुक्षूंच्या उपयोगी पडून श्रमाचें सार्थक होवो, अशी त्या जगन्नायकाजवळ मनोभावानें प्रार्थना करितों.

# अनुक्रमणिका.

:0:





---

## ग्रंथासंबंधी माहितीच्या [illegible]

मोगरेकर [illegible] ग्रंथ समाप्तीचा शक, स्थान [illegible] माहिती दिली आहे ती [illegible]

[illegible] नृप शालिवाहन। सर्व शकांमाजी शकगुरु। वर्ष पंच[illegible] [illegible]गुण। [illegible] [illegible] संवत्सराचें॥ षड्ऋतु माजी श्रेष्ठपणें । श्रीशरदऋतुनामें येथें । [illegible]मास अतिशुद्धपणें । [illegible] अष्टमी ॥ गुरुवासर सद्गुरुपणें । निर्जरानुमहे देख्यां उणें । आणि [illegible] नाम येथें । सुंदरपणें विराजत ॥ सुकर्मा योगकाळीं । संपूर्ण ग्रंथाची समाप्ति झाली । श्रीसद्गुरायें पुरविली आळी । परमानंद दिवाळी भाविकां केली ॥ तेंचि तें निरूपण सुख समाधानीं । श्रवणें करी परमानंदखाणी । म्हणोनि परिसावें अनुदिनि । करी विनवणी श्रीकृष्णदास ॥ आतां ग्रंथ समाप्तीचें स्थान । जेकां सर्व अलंकरण । तेंहि परिसावें सांगेन । अतिउत्तम जाण सर्वां क्षत्रीं ॥ जैसे सर्व अवयवांमाजी एक । आपुलिया शोभा शोभे नासिक । तैसें उत्तम क्षेत्रांमाजी नासिक । उत्तम देव उत्तमांचें जें ॥ सर्व अवयव अतिसुंदर । सुकोमळ सुभग शरीर । त्याहीवरी लेइले अलंकार । शोभा प्रचुर अनुपम्य ॥ तेथें एक नासिकचि नसतां । सर्वही सुंदरता जाय वृथा । तैसें एक नासिकेंविण असतां । काश्यादि तीर्थां शोभा कैशी ॥ म्हणोनि सर्व क्षेत्रांचें अलंकार । तेंचि नासिक नाम महाक्षेत्र । तें चतुर्युगांचें नगर । दक्षिण तीर गोदावरीचें ॥ श्लोक ॥ कृते तु पद्मनगरं त्रेतायां च त्रिकंटकम् । द्वापारे तु जनस्थानं कलौ नासिकमुच्यते ॥ ऐसें हें चतुर्युगाचें नगर । पवित्र आणि महाक्षेत्र । यावरी श्रीमद्गोदावरी तीर । ब्रह्मरूप नीर जयेचें ॥ क्षेत्र स्वामी श्री सुंदरनारायण । जेथें विरिंचीचें झालें कपाळ मोक्षण । म्हणोनि कपालेश्वर नामें श्रीभवजाण । ब्रह्म निर्गुण शंकर जेथें । हा देवोनि देवसमाज । आणि क्षेत्रामाजीक्षेत्रराज । तीर्थांमाजी गंगा विराज । म्हणोनी श्री रघुराज आले स्वयें । पंचवटिकेसी करूनि वस्ती । असतां सीता लक्ष्मणेंसी विश्वमूर्ति । करूनि सर्व राक्षसांची शांति । जेथें विश्रांति निजानंदें ॥ अरुणासंगमातीरीं । पूर्वाभिमुख सरस्वती संगमकरी । स्मरणमात्रें ब्रह्महत्या निवारी । स्नानें करी भवरोगावेगळें ॥ ऐसा हा क्षेत्राचा महिमा । बोलों न शके स्वयें ब्रह्मा । तेथें समाप्ति पावावया ग्रंथोत्तमा । जेथें श्रीरामा वस्ति नित्य ॥ क्षेत्रीं श्रीरामाचें अधिष्ठान । ग्रंथीं श्री रघुनाथ पूर्ण । एवं नाहीं श्रीरामावांचुन । सर्वत्र संपूर्ण श्रीरघुनाथ ॥ श्रोता वक्ता श्री रघुनाथ । श्री रघुनाथची ग्रंथ ग्रंथार्थ । क्षेत्र क्षेत्रज्ञ श्री रघुनाथ । परिपूर्णार्थ श्रीरघुनाथा ॥ आजन्ममरणावधवरी । निवास केलिया काशीपुरीं । जें फळ होतसे मुक्तीवरी । तेंचि म्हणावें करी पंचवटीसी ॥ अर्धयाम परिमाण । केलिया पंचवटीसी निवासन । काशीवासाचें फळ पूर्ण । पावे निर्वाण निश्चयेंसी ॥ संमति ॥ आजन्ममरणान्यासाद्वाराणस्यां निवासिनाम् । तत्फलं अर्धयामेण पंचवट्यां तु राघव । जन्मांतर सहस्रेषु काशीवासस्य यत्फलम् । तत्फलं अर्धयामेण पंचवट्यां तु राघव ॥ गोदावरीतीरमाश्रित्य वसतु प्राणिनि मुंचति । व्याचष्टे तारकं ब्रह्म साक्षाद्देवो महेश्वरः ॥ टीका ॥ म्हणोनि श्री रघुनाथ आपण । पंचवटिये करी निवासन । तया क्षेत्राचा महिमा वदेल कोण । ब्रह्मनिर्वाण मांदि तेथें ॥ तें क्षेत्रचि ब्रह्मरूप [illegible] । हें आगें केलें निर्वचन । ग्रंथग्रंथार्थें व्याख्यान । ब्रह्मपरिपूर्ण पूर्णत्वें ॥

### श्री रंगनाथस्वामीकृत

# योगवासिष्ठ ।

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीमत्सद्गुरुनिजानंदाय नमः ॥ जयजय श्रीसहजानंद । परात्पर परम बोध । सच्चिदानंदैक अगाध । श्रीगुरुवर्या ॥ १ ॥ जयजय नित्य निर्मळ । स्वप्रकाशाखिलमंगळ । जयजय पूर्णानंद सोज्वळ । श्रीगुरुवर्या ॥ २ ॥ जयजय पूर्णानंदघन । विहितद्रष्टादृश्यदर्शन । चित्सुखाब्धि जगदेकभान । श्रीगुरुवर्या ॥ ३ ॥ जयजय स्वसंवेद्य । जयजय परात्परैकवंद्य । सर्वातीत सर्वाद्य । श्रीगुरुवर्या ॥ ४ ॥ जयजय निजानंद निरंतर । जयजय प्रकाशाकर । जयजय नित्यानंदभास्कर । श्रीगुरुवर्या ॥ ५ ॥ जयजय गुणत्रयविरहित । जयजय सर्व सर्वातीत । ज्ञातृज्ञेयज्ञानविरहित । श्रीगुरुवर्या ॥ ६ ॥ जयजय सर्वोत्तम । पंचविंशतितत्त्वोत्तम । सर्वसाक्षी परम । श्रीगुरुवर्या ॥ ७ ॥ जयजय जगद्गुरो । पूर्णानंदैककल्पतरो । निरतिशयानंदप्रवरो । श्रीगुरुवर्या ॥ ८ ॥ जयजय अकल कलाशून्य । सच्चिदानंदैकचैतन्यघन । सर्वत्रैकसर्वविहीन । श्रीगुरुवर्या ॥ ९ ॥ जयजय श्रीनिजानंदमूर्ते । मूर्तामूर्तैक अमूर्ते । नित्यनिरंजन विश्वपते । श्रीगुरुवर्या ॥ १० ॥ ऐसें दश श्लोकींचें स्तवन । प्राकृती वाणी केलें जाण । तोषावया तुजलागून । श्रीगुरुवर्या ॥ ११ ॥ ह्मणो तूं बाप तूं माये । येणें तुझी स्तुति नोहे । तुझें रूप सर्वथा स्तव्य नव्हे । अरूपपणें ॥ १२ ॥ यालागीं मौन तुझें स्तवन । अक्रियता तेंचि पूजन । न चिंतन हेंचि ध्यान । ध्येयविहीन ॥१३॥ ययापरी तुझें भजन । तूं सर्व इंद्रियां अग्राह्य जाण । स्वसंवेद्यत्व संपूर्ण । ययालागीं तुज ॥१४॥ करितांचि जी नमन । स्वयें ब्रह्मचि होइजे संपूर्ण । तेथ इतरा सिद्धींचा कोण । गणनाकरी ॥ १५ ॥ ऐसिया जी गुरुमूर्ति । तुज वंदूनि पुढतपुढती । करीतसें जी आर्तमति । सामरस्यें तुज ॥ १६ ॥ यालागीं माझी वाक्यर्द्धि । करी कृपारसायनसिद्धि । जेणें ऐश्वर्य तुझें बोधी । ग्रंथव्याजें ॥ १७ ॥ हे ऐकोनियां विनवणी । प्रसन्न श्रीगुरु चिंतामणि । प्रकाश करिता जाला वाणी । निजानंद ॥ १८ ॥ वरदकर ठेवूनि शिरीं । ग्रंथ निर्माणीं आज्ञा करी । तोचि प्रसादु अंगिकारी । महाप्रसाद हे ॥ १९ ॥ तुझी व्यक्ति तोचि गणेशु । करी सकळ विघ्नांचा नाशु । तुझी वाचा तोचि प्रकाशु । शारदेचा ॥२०॥ यालागीं तुज वाणी सर्व लाभे । परी सर्व लाभें तूं न लाभे । यालागीं तुझ्या वंदनीं शोभे । सर्वां वंदन ॥ २१ ॥ जैसें वृक्षमूलसिंचनीं । शाखोपशाखा पावे पाणी । शाखा सिंपितां निर्वाणी । कोरडें मूळ ॥ २२ ॥ यालागीं सर्वपणें तूं येकु । हा पूर्वींच बोलिलों विवेकु । कोणी करील कुतर्कु । ह्मणऊनियां ॥२३॥ ( सद्गुरूस दृष्टान्तालागून । पदार्थमात्र न दिसे पूर्ण । सर्वांभूतीं एक चैतन्य । बाह्यांतरीं व्यापक ॥ १ ॥ ) ह्मणोनि केलें तुज नमन । तेणें सर्व देवां सर्व सिद्धि वंदन । जाहलेंचि असेल परिपूर्ण । श्रीगुरुराया ॥ २४ ॥ येणें वचनें श्रीगुरुरावो । संतोषोनि दिधला पसावो । ह्मणती ग्रंथ बोलें साभिप्रावो । अति गोडपणें ॥ २५ ॥ तूं जें जें प्रमेय बोलसी । तें तें वेदार्थूचि परियेसी । सुख होय सज्जनांसी । तैंचि करीं निरूपण ॥ २६ ॥ तो महा प्रसादु घेवोनी शिरीं । प्रेमें चरणद्वय नमस्कारी । जी जी महा प्रसादु संसारीं । लाधलों आजी ॥ २७ ॥ तरी तुह्मी होतांच प्रसन्नता । सिद्धपणचि यया ग्रंथा । तेथें तूंचि होवोनि श्रोता । वदवीं मज करुनी ॥ २८ ॥ ऐसी करी विनंति इतुकी । तंव वरदहस्त ठेवी मस्तकीं । तेणें मी होऊनि परम सुखी । बोलें ग्रंथु ॥ २९ ॥ आतां साधुजनांसि करूं नमन । जयां दीनोद्धारीं सामर्थ्य पूर्ण । ज्यांसि जालिया अनन्यशरण । ब्रह्म पूर्ण पैं लाभे ॥ ३० ॥ तयां योग्य निरूपण । करावया सामर्थ्य धरी कोण । परी ते भावाचे भोक्ते जाण । कृपाळुत्वें ॥ ३१ ॥ जैसें नेणतें जें बाळ । पितृमुखीं घाली कवळ । स्वयें करूनि अळुमाळ । मुखचि पसरी ॥ ३२ ॥ ऐसिया स्नेहाची जाति । नेणे युक्तायुक्त प्रतीति । बाळकें दिधलें तें अति प्रीति । अंगिकारितू ॥ ३३ ॥ तैसा मीही संतांचा पढियंता । ते अंगिकारिती भलता नेणता । तेणेंचि होईन

---

१ प्रयत्न न करितां आनंदरूप असलेला. २ आत्मज्ञानामुळें सर्वत्र मंगलरूप भासणारा. ३ सत्व, रज, तम या गुणांशिवाय. ४ पंचवीस तत्त्वांहून उत्तम. ५ कांहीं न करणें. ६ याप्रमाणें. ७ एकत्वाने. ८ वाणीची समृद्धि. ९ मिषानें. १० प्रसाद.

सरता । तिहीं लोकीं ॥ ३४ ॥ यालागीं बोबडी बोली । बोलेन ग्रंथ नवाळी । श्रोता वक्ता ज्ञानांशु माळी । श्रीगुरुस्वामी ॥ ३५ ॥ सहजें पूर्ण निज रंगाचा । ग्रंथ बोलेन रसाळ वाचा । जो संवाद श्री वसिष्ठाचा । परब्रह्मेंसी ॥ ३६ ॥ परब्रह्म जें कां निर्वाण । तेंचि लीलाविग्रही जालें जाण । ताराव्या भक्तजन । साकाररूपें ॥ ३७ ॥ जरी धरिलें रूप साकार । तरी ब्रह्म तें निर्विकार । अज्ञानभ्रमें विकार । मानिती मूढजन ॥ ३८ ॥ यालागीं भक्तानुग्रहार्थ जाण । श्रीरघुनाथावतार पूर्ण । पूर्णानंदैक-चिद्धन । साकारत्वेंही ॥ ३९ ॥ धरूनि तनु अति श्यामल । राजीवलोचन सकोमल । पूर्ण गात्र वेल्हाळ । मायिकपणें ॥ ४० ॥ स्वयें निष्प्रपंच आपण । करी प्रपंचाचें विडंबन । आणि शरणागता जाण । आनंदकारी ॥४१॥ जरी रूप धरिलें साकार । तरी सच्चिदानंद निर्विकार । न लोपोनियां अति सुंदर । मिरवी रूपा ॥ ४२ ॥ नूतन जलधरु जयापरी । अति श्यामता बाणे शरीरीं । नाना अतस पुष्पांचियापरी । अंगकांति आंगीं ॥ ४३ ॥ अरुणवर्ण चरणतळें । जैसें नभ सिंदुरें डवरिलें । तैसें पादतल मिरवलें । अति सुरंग ॥ ४४ ॥ तया ध्वज वज्र उर्ध्व रेखांकित । पद्मद्वयें शोभा दावित । पदप्रदेश सुनीलशोभत । तोडर युक्त ॥ ४५ ॥ वांकी नूपुरें चरणीं । त्यांचा नादु तोचि वेदध्वनि । उरुपोटरियांची मिरवणी । अलोलिकपणें ॥ ४६ ॥ कटितटीं कासिलें पीतवसन । पीतांबरु केला परिधान । विद्युल्लता वेढी सजलघन । तैसा शोभे ॥ ४७ ॥ वरी साडेपंधरयाची मेखला ॥ रत्नखचित दीप्तिमेळा । तेज न समाये नभ मंडळा । सतेजपणें ॥ ४८ ॥ तळीं मोतियांच्या झल्लरी । क्षुद्रघंटिका वाजती नानापरी । मनोहर दोंदावरी । दक्षिणावर्तनाभी ॥ ४९ ॥ जें कां ब्रह्मयाचें जन्मस्थान । चराचरांचें विश्रांतिभुवन । तेथूनि रोमराजि सकोमलपण । हृदयावरी ॥ ५० ॥ हृदय अति विशाळ । जैसें चिदाकाश अति निर्मळ । दक्षिणांगीं सकोमळ । श्रीवत्सपद ॥ ५१ ॥ वामभागीं श्रीविराजित । ते शोभा न बोलवे ईषत । कंठीं कौस्तुभ झळाळित । तेणें लोपत दिनमणि ॥ ५२ ॥ चौभुजांचा अंत-र्भाव । दोंचि भुजीं केला गौरव । चौं भुजांची बरव । दावी दों भुजीं ॥ ५३ ॥ अभय वरद हस्त दोनी । उभारले भक्तांलागुनी । कार्यसमयीं धनुष्यबाण घेउनी । मिरवी शोभा ॥ ५४ ॥ दशांगुळें वीरकंकणें । अंगदादि मिरवती भूषणें । मुखशोभा धरिती चंद्रकिरणें । अति सुढाळत्वें ॥ ५५ ॥ मकराकारें रत्नजडित । कर्णीं कुंडलें तळपत । ते दीप्ति असे पडत । गंडस्थळावरी ॥ ५६ ॥ हनुवटी शुद्ध पातळ । श्मश्रु बाणताती कोमळ । अधर सुंदर वेल्हाळ । वोष्ठद्वय ॥ ५७ ॥ स्मितहास्य मिरवे वदनीं । तेथें पुरे भक्तांची धणी । स्थिरावले सर्व विसरोनी ॥ अवयवसमूह ॥ ५८ ॥ जैसें दाळिंबफळ विकासत । अंतरीं बीज झळाळित । तैसी ओष्ठामाजी शोभत । दंतपंक्ति ॥ ५९ ॥ बोलतां चौकीचे दंत झळाळिती । तेणें लोपे सूर्याची दीप्ति । नासिक मनोहर सरळ स्थिति । सुंदरपणें ॥ ६० ॥ वायु हिंडतां सैराट । विसरला आत्मसुखाची वाट । मग राहिला निकट । नासापुटीं ॥ ६१ ॥ प्राणरूपीं करी अवस्थान । रामाच्या नासापुटीं विश्रमोन । राहिला आनंदेंकरून । घ्राणरूपें ॥ ६२ ॥ राजीव-नयन अति सुरेख । नयनप्रांत आरक्त पीयूख । वर्षत अवलोकन संतोख । भक्त परम सुख पावती ॥ ६३ ॥ भोंवयारेखा धनुष्याकार । व्यंकटा सुनीळमनोहर । मदनासीच करिती मार । लावण्यपणें ॥ ६४ ॥ जैसें ब्रह्मसुख निश्चळ । तैसें मनोहर विशाळ कपाळ । वरी कुंकुमकेशरांकित निर्मळ । चंदन शोभे ॥ ६५ ॥ आकर्ण रेखिला टिळा । मध्यें रत्नाक्षतांचा टिळकु भला ॥ ते शोभा बोलतां पांगुळा । वाचा होती ॥ ६६ ॥ रत्नखचित मुकुट शिरीं । खणोखणीं हिरियांची हारी । नीळ शोभे शिखरावरी । अनर्घ्यपणें ॥ ६७ ॥ जैसा षोडशकळीं पुरला । शरत्काळीं पौर्णिमे उगवला । वर्तुळ सोज्वळ शोभला । गगनीं इंदु ॥ ६८ ॥ तैसी मुखशोभा निरुपम । पूर्ण चंद्रही उपमेसि विषम । देखोनि भक्तोत्तम । उल्हासती ॥ ६९ ॥ देखोनियां रघुनाथासी । परमानंदु संसारियांसि । मा समाधि होय विरक्तांसी । अपूर्व काय ॥ ७० ॥ यालागीं सच्चिदानंदघन ॥ साकारत्वें रघुनाथ आपण । अवलंबोनि अज्ञानपण । मनुष्यत्व मिरवी ॥ ७१ ॥ तो स्वयें जऱ्ही ज्ञानमूर्ति । तऱ्ही लौकिकीं न प्रगटी व्यक्ति । जन ताराव्या प्रश्नोक्ति । करी नेणता ऐसी ॥ ७२ ॥ याचिया प्रश्नाचें उत्तर । देता श्रीवसिष्ठ चतुर । यया नाम ग्रंथ पूर्वापर । वासिष्ठ बोलिजे ॥ ७३ ॥ परमगुरुत्वें जो वरिष्ठ । ज्ञानविज्ञानें अति श्रेष्ठ । म्हणोनि बोलिजे वसिष्ठ । ज्ञानगुरु ॥ ७४ ॥ तो बोलिला श्रीरामाप्रति । तया संवादाची परम ख्याति । ओगि

१ ही रंगनाथांची गुरुपरंपरा होय. २ लीलेनें शरीर धारण करणारें. ३ भक्तांवर कृपा करण्यासाठीं. ४ काळ्या रंगाचा. ५ उत्तम सुवर्णाचा. ६ शोभेमुळें. ७ माशाच्या आकाराची. ८ तेज. ९ इच्छा; हौस. १० इकडे तिकडे. ११ राहणें.

तारी विमलमति । योगेश्वर जे ॥ ७५ ॥ आतां रामपदाचें व्याख्यान । यथामति करूं निरूपण । राम बोलिजे कोण्या गुणें । तेंही सांगों ॥ ७६ ॥ यदर्थी स्वयें श्रुति । रामपदातें वाखाणिती । तेंचि कृपा करूनि संतीं । सारार्थ ऐकावें ॥ ७७ ॥

श्रुति ॥ रमंते योगिनोऽनंते सत्यानंदे चिदात्मनि । इति रामपदेनासौ परंब्रह्माभिधीयते ॥

शमदमादिसाधनीं संपन्न ॥ जे योगीश्वर परम पावन । ते निरंतर रमती तें स्थान । परब्रह्म बोलिजे ॥ ७८ ॥ तेंचि रामरूपें असे वर्त्तत । त्यासिच परब्रह्म बोलिजेत । जें कीं सत्यज्ञानानंद अनंत । प्रियत्वें आत्मा ॥ ७९ ॥ सत्य शब्दें सत्ता बोलिजे । अस्तित्वें जें सर्वत्र सुंभे । घटःसन् पटःसन् ह्मणिजे । तेचि सत्ता ॥ ८० ॥ आहे शब्दें जें जें बोलती । ते ते जाण सत्तेची व्यक्ति । सत्ता अनुस्यूत अबाधिती । वर्ते सर्वत्र ॥ ८१ ॥ आहेपणें जें जें भासे । तें तें वस्तु जाण विश्वासें । तेथेंचि ज्ञान आनंदु वसे । केवळीं पाहतां ॥ ८२ ॥ सर्वांचें निरसणें । केवळ उरे जें सत्तारूपपणें । तेथेंचि आनंद कोंदलेपणें । स्वतःसिद्ध ॥ ८३ ॥ सत्ता जेथें जेथें भासे । तेथील विशिष्ट येकसरिसें । प्रत्यक्ष जो पदार्थ दिसे । तो सांडावा कीं ॥ ८४ ॥ दृश्य तें तंव मिथ्याभूत । ह्मणऊन टाकावें समस्त । केवळ सत्तांचि सुनिश्चित । निवडोनि घ्यावी ॥ ८५ ॥ तेहि सत्ता जे जड नव्हे । केवळ ज्ञानरूपचि आहे । ज्ञानविहीन केवीं राहे । सत्ता सत्तारूपें ॥ ८६ ॥ तें सकळांचें प्रकाशक ॥ ज्ञानमात्रचि जें येक । सत्तामिश्रित सम्यक् । नाहीं अनेक जिये ठायीं ॥ ८७ ॥ ज्ञानावेगळी जे सत्ता । ते जडत्वें पाषाणतुल्यता । ह्मणोनि युक्त ते तत्वता । चित्कला पूर्ण ॥ ८८ ॥ सत्ता आणि प्रकाश । आतुडे जेथ सुख असोस । आहेचि पैं निराभास । स्वतःसिद्ध ॥ ८९ ॥ दुसरें मिश्रित नसतां । केवळ सुख प्रकाशतां । पाविजेचि कीं ब्रह्मवेत्ता । योगीश्वरीं ॥ ९० ॥ ऐसें असोनियांही अनंत । त्रिविध परिच्छेद विरहित । देश काळ वस्तु हे निश्चित । परिच्छेद तिन्ही ॥ ९१ ॥

+ संमति श्लोक+ दिक्कालाद्यनवच्छिन्नानंतचिन्मात्रमूर्तये । स्वानुभूत्यैकसाराय नमः शांताय तेजसे ॥ १ ॥

आतां परिच्छेदत्रयाचें लक्षण । तेंही सांग सांगेन । श्रोतां होऊनि सावधान । परिसावें जी ॥ ९२ ॥ ग्राम येक येकला असे । त्या सभोंवतें अरण्य वसे । परी सर्वत्र व्यापक ग्राम नसे । ह्मणोनि परिच्छिन्नता ॥ ९३ ॥ ह्मणोनि ग्राम एकदेशी जाला । सर्वत्र नाहीं तोचि देखिला । ह्मणोनि देशपरिच्छेद त्या आला । नश्वर भला याचिलागीं ॥ ९४ ॥ जें देशें करूनि परिच्छेदलें । तें नश्वर सहजें जालें । तैसें ब्रह्म नव्हे तें व्यापलें । सर्वत्र देशीं ॥ ९५ ॥ ब्रह्म तें तंव सदोदित । सर्व देशीं सर्वत्र असत । ग्राम तो भूमिचवरि दिसत । नाहीं वर्त्तत सर्वलोकीं ॥ ९६ ॥ ब्रह्म तें स्वर्गमृत्युपाताळभुवनीं । पुरोनि उरलेंसे निर्वाणीं । सर्वत्र सर्व देशीं भरोनि । कोंदलेंसे ॥९७॥ आतां काळपरिच्छेद तो ऐसा । पदार्थमात्रीं दिसे सहसा । क्षणें दिसे क्षणें नाश । पावतु जाये ॥ ९८ ॥ येके काळीं घट दिसे । तोचि कल्पांतुवरी नसे । मध्येंचि अल्प काळें नाशे । ह्मणोनि नसे सर्वदा ॥ ९९ ॥ पुष्पादि पदार्थ देखिजेती । क्षण येका नाहींच होती । वस्त्र नूतन षण्मासांतीं । असेचिना ॥ १०० ॥ तैसें दिवसाचें रात्रीं नाहीं । रात्रीचें दिवसा न भेटे कांहीं । स्वप्नीं तरी तियें दोन्हीही । असतीचना ॥ १ ॥ एके काळीं वर्त्तमान । आणि दुसरे काळीं जें क्षीण । तो काळपरिच्छेद संपूर्ण । सर्व पदार्थीं ॥ २ ॥ हेंचि नश्वरपणाचें लक्षण । जें क्षणें उदयो क्षणें क्षीण । ह्मणोनि तो अनात्मा जाण । नेतिमुखें निरसे ॥ ३ ॥ तैसें नव्हे परब्रह्म । सर्वकाळीं सर्वदा सम । अवस्थात्रयीं नव्हे विषम । येक रूपत्वें ॥ ४ ॥ ह्मणोनि काळें नाहीं परिच्छेदलें । ह्मणोनि अनंत नामासि आलें । अंतु नाहीं कोणत्या बोलें । तिहीं प्रकारें जया ॥५॥ तैसाचि वस्तुपरिच्छेद नसे । दुसरें तयाहूनि जेथें न दिसे । तें वस्तु अपरिच्छेद ऐसें । जाणावें कीं ॥ ६ ॥ आकाश सर्वत्र सर्व देशीं । आहे हे प्रतीति जगासी । आणि काळें नाशु नाहीं तयासी । हेंहीं देखिलें ॥ ७ ॥ स्वर्गमृत्युपाताळीं । नानाब्रह्मांडांच्या मेळीं । असे आकाशपोकळी । सर्व देशीं ॥ ८ ॥ आकाशेंवीण ठावो रिता । नाहींच जाणिजे सर्वथा । तैसें सर्वकाळीं तिनी अवस्थां । आकाश असे ॥ ९ ॥ ह्मणोनि देशकाळपरिच्छेद । आकाशास नाहीं बाध । तेचि तें देश काळ निर्विवाद । वर्त्तत असे ॥ ११० ॥ परी पृथ्व्यादिकें महाभूतें । दुजेपणें असती वर्त्ततें । घटपटादि व्यक्तें । नाना भासती ॥ ११ ॥ येणें वस्तुपरिच्छेद आला

---

१ शुद्ध अंतःकरण झालेले. २ 'राम' या शब्दाचें. ३ विचार करून काढलेला अर्थ. ४ राहतें. ५ एकसारखी भरलेली. ६ स्वतःच उत्पन्न झालेला. ७ अस्तित्व, खरेपणा. ८ चांगली. ९ मोठें. १० ज्ञाता जाणतेपणा. ११ विभाग. १२ नेमका.

त्यासी । ह्मणोनि दृश्य नश्वर सर्वांसी । आत्मा निरंश आनंदराशि । अपरिच्छेद्य ॥ १२ ॥ ह्मणोनि दुजें नाहीं तैसें । जगडवाळ तो अध्यारोप भासे । तें मिथ्यापणेंचि नाहीं ऐसें । येणें विचारें ॥ १३ ॥ ह्मणोनि देशकाळवस्तुविचारें । परिच्छेद नाहीं सर्व प्रकारें । अंतु न पवे कोणे निर्धारें । ह्मणोनि अनंतु बोलिजे ॥ १४ ॥ यालागीं सत्ता सुखरूप प्रकाश । अनंत अपरिच्छेद्य निरंश । आत्मा प्रिय उदास । ब्रह्मऐसें ॥ १५ ॥ ( एवं त्रिकालाद्यनवच्छिन्न । अनंत तथा चिद्घन । स्वानुभूत्येक रस जाण । शांत आणि तेजोरूप ॥ १ ॥ ) येणें तिनी भेद निरसले । जे स्वजातीय विजातीय स्वगत बोलिले । तेही आतां सांगों भले । प्रसंगेंचि ॥ १६ ॥ देहादिप्रपंच तितुका विजाति । भेदु नाहीं तयाप्रति । ते नश्वरपणें मिथ्या भासती । सत्य त्रिजगतीं परब्रह्म ॥ १७ ॥ सत्य दुसरें जरी असे । तरी वस्तूसि परिच्छेद दिसे । दुजें नसतां तेंचि वसे परिपूर्णत्वें ॥ १८ ॥ विजातीय जरी साच असतें । तरी ब्रह्मासि भेदु दाविते । तें सत्य नसतां येकुलतें । येकत्वें ब्रह्म ॥ १९ ॥ शुक्तिकेच्या ठायीं रजत । भासलेपणें कायि भेदु दावित । कीं रज्जुसर्पैसि भेदु भासत । दुजेपणें ॥ १२० ॥ भासतां न भासतां भेदु नाहीं । जरी मृगजळ रश्मीच्या ठायीं । नाना स्वप्नपुरुषासि कांहीं । भेदु करी ॥ २१ ॥ तैसें भासतांही जगडंवाळ । मिथ्यापणें ब्रह्मचि केवळ । भेदु नसोनि नित्य निर्मळ । अद्वयपणें ॥ २२ ॥ आणि कारणाचें जें कार्यजात । तितुकें कारणचि जाण निश्चित । नाहीं भेदु तया असत । येकरूपत्वें ॥ २३ ॥ तैसी जगाची उत्पत्तिलयस्थिति । ब्रह्मावेगळी कोठें वर्तती । ह्मणोनि तेचि तें सुनिश्चिती । भेदु तो मिथ्या ॥ २४ ॥ सुवर्णाचें कार्य अळंकार । तें सुवर्णचि मनोहर । नाहीं तेथ भेदांतर । तयापरी हें ॥ २५ ॥ तैसेपरी सजाति । ईश्वरब्रह्मादित्रय भासती । ते तंव स्वतः चिद्घनमूर्ति । भेदु तो औपाधिक ॥ २६ ॥ माया अविद्येचिया प्रतीति । जीवेश्वरासि भेद भासती । तेही अनेक स्फुरती । अज्ञानदशें ॥ २७ ॥ तऱ्हीं मुळीं अविद्या नव्हे विद्यमान । मिथ्यापणेंचि व्यर्थ भान । लटिकेनि साचासि भिन्नपण । तें तंव न घडे ॥ २८ ॥ मुखापुढें अनेक दर्पण । दावितां मुखा आलें अनेकपण । तऱ्ही मुख काय आलें भिन्न भिन्न । विचारितां ॥ २९ ॥ नाना घटांच्या अनेकपणीं । भासतांही नव्हे अनेक तरणि । तो येकला येक स्वस्थानीं । भेदुकाहाणी असत्य ॥ १३० ॥ शर्करेचा परिवारु केला । तो शर्करेसि भिन्न नाहीं जाला । साकरपणेंचि संचला । येकरूपत्वें ॥ ३१ ॥ तैसे जीवेश्वर भिन्न भासती । हे तंव समूळ मिथ्या भ्रांति । ह्मणोनि येकत्वा नये क्षति । येकपणेंचि ॥ ३२ ॥ ह्मणोनि भेद सजाति । ब्रह्मासि नाहीं सर्वार्थी । येकत्वें अभेदमूर्ति । निघोटपणें ॥ ३३ ॥ आतां भेदु बोलिजे स्वगत । सत्य ज्ञान सुखादि येथ । तऱ्हीं तें एकस्वरूपचि निश्चित । भेदु तदंगत राहेना ॥ ३४ ॥ सत्ता ज्ञानाहूनि भिन्न नसे । ज्ञानहीन तें जड असे । जड तें अनात्मा सर्वांशें । मिथ्याभूत ॥ ३५ ॥ अथवा ज्ञान सत्तेहूनि वेगळें । ह्मणतांचि तें कल्पित जालें । कल्पितासि सत्यत्व कोणे बोलें । विचारिजे ॥ ३६ ॥ ह्मणोनि सत्ता आणि ज्ञान । परस्परें नव्हती भिन्न । तैसेंचि सुखही तन्नपण जाण । अभिन्नपणेंसीं ॥ ३७ ॥ सुख सत्तेहूनि वेगळें करितां । तरी तें सुख कल्पित तत्वता । विषयसुखाचे परी नश्वरता । येईल तया ॥ ३८ ॥ सत्ता सुखावेगळी जाण । असतां येथें प्रवर्तलें कोण । सुखेंविण पाषाण । सेवी कोण्ही ॥ ३९ ॥ आतां सुखावेगळें ज्ञान । तेंही तें ऐसेंचि जाण । सुखही ज्ञानेंविण । तेंही जड ॥ १४० ॥ एवं सत्ता प्रकाश सुख । परस्परें येकत्वें येक । स्वगतभेद निःशेख । नाहींच ब्रह्मीं ॥ ४१ ॥ ह्मणोनि ब्रह्म तें अद्वयानंद । सच्चिदानंद अगाध । नाहीं तया देशकाळविच्छेद । अनंतपणें ॥ ४२ ॥ ऐसें जें ब्रह्म बोलिजे । तेंचि राम शब्दें जाणिजे । राम तो सच्चिदानंद सहजें । बोले स्वयें श्रुति ॥ ४३ ॥ येणें रामपदाचें व्याख्यान । वाखाणिलें सच्चिदानंद जाण । इत्यादि शब्द ब्रह्म निर्वाण । बोलिजे रामु ॥ ४४ ॥ हें महावाक्याचें रहस्य । जीवब्रह्माचें सामरस्य । ब्रह्मस्वरूप सावकाश । बोलिलें होय ॥ ४५ ॥ सच्चिदानंदपद वाखाणिलें । सर्व ग्रंथाचें सार बोलिलें । तें रामपदें सिद्ध जालें । शब्द ब्रह्म सर्व ॥ ४६ ॥ असो अनुभवी जाणती मातु । येरां नकळे हा वृत्तांतु । परी अनुभवियांलागीं हा ग्रंथु । आरंभिलासे ॥ ४७ ॥ असो एवंभूत हा रघुनाथ । रामपदें ब्रह्म सदोदित । तो श्रोता वसिष्ठाचा येथ । जगदुद्धारक ॥ ४८ ॥ या रामवसिष्ठांचा संवाद । तें वासिष्ठ बोलिजे विशद । शतकोटि रामायण अनुवाद । श्रीवाल्मीकीनें केला ॥ ४९ ॥ त्यामाजी गोड निरूपण । सर्वांसि विश्रां-

१ नाश. २ उपायानें. ३ ज्याचे विभाग होत नाहीं असा. ४ त्रयस्थ. ५ स्वर्ग, मृत्यु, पाताळ या तीन्ही लोकांत ६ खरें. ७ एकटें. ८ मोतशिंपीच्या. ९ दृष्टें. १० दोरी व साप असा भेद. ११ किरणांच्या. १२ फार मोठें. १३ प्रत्येक काम

तीचें स्थान । तें हें वासिष्ठसार जाण । ग्रंथराचो ॥ १५० ॥ जिहीं देखिलें नाहीं वासिष्ठ । तयां न चुकती संसारकष्ट । अज्ञानें जाले निकृष्ट । ज्ञानाभावें ॥५१॥ संसृति चुकवायाचें मूळ । येक ब्रह्मज्ञानचि निर्मळ । येर उपाय तो केवळ । काळक्षेप करणें ॥ ५२ ॥ व्रत तप दान तीर्थाटन । यज्ञादिसाधन गहन. । तें संसृतीसिच कारण । आत्मज्ञानेंविरहित ॥ ५३ ॥ तया आत्मज्ञानाचें निजमंदिर । कीं ज्ञानरूपचि मनोहर । तेंचि तें वासिष्ठसार । ग्रंथरूपें ॥ ५४ ॥

संमति श्लोक ॥ यावन्नानुग्रहः साक्षाज्जायते परमेश्वरात् । तावन्न सद्गुरुः कश्चित्सच्छास्त्रमपि नो लभेत् ॥ १ ॥
जया नाहीं सद्गुरूसि भेटी । तया प्रवेशु कैंचा वासिष्ठीं । यालागीं अध्यात्मशास्त्राच्या मुकुटीं । वासिष्ठरत्न शोभे ॥५५॥ यालागीं सर्व प्रकारें । वासिष्ठीं प्रवेशु करा बारे । अर्थु कळलिया निर्धारें । ब्रह्मचि तुह्मी ॥५६॥ परब्रह्मचि वसिष्ठ राम । या दोघांचा संवाद निरूपम । तो ग्रंथव्याजें परम । ब्रह्मरूप ॥५७॥ त्याही मधील प्रकरणांतरीं । श्लोक निवडूनियां चतुरीं । वासिष्ठसारकुसरी । नवनीत ॥५८॥ प्रकरणानुक्रमें विशेषें । श्लोकसंबंध प्रकरण मिषें । वासिष्ठाचें सर्वांशें । प्रतिबिंब ॥ ५९ ॥ सर्व वासिष्ठाचा अर्थसार । तेंचि बोलिजे वासिष्ठसार । भाग्यें उत्कंठ जो चतुर । तयासिचि लाभे ॥ ६० ॥ वासिष्ठसाराचा श्लोकचरण । त्याचे अर्थी होतां श्रवण । समाधिसुख आपण । बाणे स्वयें ॥ ६१ ॥ समाधिचि वरी तयासी । जे निर्वाण तुर्यग परियेसीं । कृतकृत्यता अनायासीं । समाधि त्या लाभे ॥ ६२ ॥ तेंचि करावया निरूपण । वंदुनि श्रीगुरूचे चरण । करूनि संतांसि नमन । अवधानें मागें ॥ ६३ ॥ तुह्मीं दिधलिया अवधान । मुकया वक्तृत्व संपूर्ण । सार वक्ताचि मुकावे जाण । अनवसरें तुमचेनी ॥ ६४ ॥ यालागीं मायबाप जे तुह्मी संत । त्यांप्रति विनवितसे आर्त । अवधानाचें दान दत्त । करावें ह्मणोनि ॥ ६५ ॥ तुमचेनि ऐश्वर्य बोलता । साशंक तुह्मी अवधान नेदितां । तुमच्या कृपाकटाक्षें पूर्णता । बाणे सर्वोपरी ॥ ६६ ॥ यालागीं पूर्ण द्यावें अवधान । तुह्मी बोलविल्या मी बोलेन । ऐसा पढविजे आपण । स्वसंतोषाचिलागीं ॥ ६७ ॥ ऐसिये विनवणीसाठीं । संतीं पाहिलें कृपादृष्टि । आतां ग्रंथु उठाउठी । बोलेन मी ॥६८॥ तंव संत ह्मणती भलाभला । तुवां थोर उपकार केला । ब्रह्मानंदाचा सोहळा । भोगविसी आह्मां ॥६९॥ आतां झडकरि कथन करीं । विलंबु न करीं क्षणभरी । तोचि प्रसादु वंदूनि शिरीं । ग्रंथु वैखरी बोले माझी ॥ १७० ॥ अहो वासिष्ठसाराचें व्याख्यान । महाराष्ट्रवाणी करणें जाण । हें तों अपार अघटमान । सर्वोपरी ॥ ७१ ॥ समुद्र तरायालागीं । होडगें मेळविजे आशेलागीं । तैसें हें सर्वांगीं । अपार असे ॥७२॥ परी येथ इतुकाचि धिवसा । जे कर्णधार सद्गुरू ऐसा । आणि तुमचे कृपेचा सहसा । सुवांयो साह्य ॥ ७३ ॥ इतुकी सामग्री करितां । ग्रंथाब्धि हेळा तरतां । प्रयास नाहींत सर्वथा । ह्मणोनि प्रवर्तलों ॥ ७४ ॥ जो वाचादिकांचा प्रकाशकु । तो वदविता श्रीगुरुनायकु । आणि तुमचा पूर्ण कृपावलोकु । तेणें सकळ सिद्धी ॥ ७५ ॥ आतां ग्रंथार्थुचि बोलेन । श्रोतीं द्यावें अवधान । श्रीरघुनाथ वैराग्य पूर्ण । असतांचि दावी ॥ ७६ ॥ तो स्वयें परब्रह्म निर्गुण । वैराग्यसाधनीं साध्य जाण । ते वस्तूसि वैराग्य पूर्ण । हा लौकिकार्थ ॥ ७७ ॥ लोकसंग्रहार्थ आपण । दावी आपणा अज्ञानपण । वैराग्य आणि गुरुभजन । लोकसंग्रहार्थ ॥ ७८ ॥ जो परब्रह्मपुतळा । त्यासि कैंची अज्ञानकळा । वैराग्यादिसाधनमेळा । तोही तैसाची ॥ ७९ ॥ बाप कृपाळू जगजेठी । जगदुद्धार सूनि दृष्टि । गुरुशिष्यसंवादु प्रकटी । नेण होउनी ॥ ८० ॥ स्वयेंचि परब्रह्म आपण । वरी नटोनियां रामपण । नेण होऊनि वैराग्य पूर्ण । शोभवी आंगीं ॥८१॥ पृथ्वीचीं तीर्थें करावया । श्रीराम पुसती दशरथरायां । राजा श्रीरामासी आज्ञा द्यावया । प्राणांत मानी ॥ ८२ ॥ ह्मणे रघुनाथाचे वियोगेंकरून । तत्काळ जाती माझे प्राण । ह्मणऊनि राहिला आलिंगून । श्रीरघुनाथासी ॥ ८३ ॥ कोण्हेपरी न सोडि रामासी । ह्मणे तूं जाऊं नको तीर्थयात्रेसी । तुझेनि वियोगें प्राणासि । मुकेन जाण मी ॥ ८४ ॥ पुढील देखोनि कार्यार्था । वसिष्ठ ह्मणती राया दशरथा । आज्ञा देईं श्रीरघुनाथा । तीर्थाटणासी ॥ ८५ ॥ तंव रघुनाथ ह्मणती रायासी । मी शीघ्र येईन तुह्मांपासीं । माझें मन तुमचे पायांसीं । लीन असे निरंतर ॥८६॥ मग अतिप्रयासें दशरथ । श्रीरघुनाथासि आज्ञा देत । रघुनाथवियोगें माता समस्त । व्याकुळ जाल्या ॥ ८७ ॥ असो आज्ञा घेऊनि रघुपति । सारे वंदूनि गुरु माता भूपति । अल्प सेनेसिपृथ्वीपति प्रस्थान करी ॥ ८८ ॥ पुष्करादितीर्थें समस्तें । प्रयाग वाराणसी कुरुक्षेत्र जेथें । द्वारका श्रीशैल्य

१ वेळ घालविणें. २ मोठें. ३ ग्रंथमिषानें. ४ कौशल्ययुक्त. ५ श्लोकाचा चवथा भाग. ६ ठसतें. ७ लक्ष. ८ बोलकेपणा. ९ पीडित. १० लवकर. ११ चांगलें, वाहवा ! १२ कठीण. १३ न होणारें. १४ धैर्य. १५ सुकाणूं धरणारा. १६ वारा.

सेतूतें । गेले श्रीराम ॥ ८९ ॥ इत्यादि तीर्थें सांगों किति । तीर्थें पवित्र करावया श्रीरघुपति । आपु- लेनि चरणस्पर्शें विश्वमूर्ति । पवित्र करी ॥१९०॥ (मुळ ग्रंथीं तीर्थ विस्तार । केला असे अपरंपार । येथें तात्पर्यें ज्ञान मात्र । संक्षप्त वर्णिलीं ॥ १ ॥ ) ऐसीं सकळ पृथ्वीसीं तीर्थें । जाण पवित्र केलीं श्रीरघुनाथें । जैसी मंत्रविद्या ग्रहणातें । शुद्ध कीजे ॥ ९१ ॥ ऐसें पवित्र करूनि सर्व तीर्थांसी [२]रघु- नाथ आले अयोध्येसी । हें ऐकोनि राजा स्वमानसीं । संतोष मानी ॥९२॥ नगर शृंगारिलें नानापरी । राजा पुढारला सैन्यसंभारीं । रामदेखोनियां जिव्हारीं । हर्षबळला ॥ ९३ ॥ आनंद न समाये सृष्टीं । श्रीरामकंठीं घाली मिठी । येरें चरण वंदूनि [३]पोटीं । लीन जाला ॥ ९४ ॥ परस्पर सुखें सुखावले । परमानंदें निवाले । तें सुख न बोलवे बोलें । वैखरी वाचा ॥ ९५॥ एवं गुरुपूर्वक माता तिन्हीं । रघुराज वंदी प्रेमेंकरूनी । अयोध्येच्या सकळ जनीं । महोत्सव सर्वीं थोर केला ॥ ९६ ॥ देशोदेशींचे प्रजा लोक । राजेही आले मांडलीक । रघुनाथदर्शनीं सकळीक । परमानंद पावले ॥ ९७ ॥ नगरांत आ- आणूनि रघुनाथासी । सोहळा केला अति उल्हासेंसी । सुखें राहिले स्वर्गवासी । आनंदभरित ॥ ९८॥ ऐसा सकळांसि उत्साह जाला । परी रघुनाथ न मनी राज्यसोहळा । स्वगृहीं राहे उद्वेगला । [४]भंगव र्जित ॥ ९९ ॥ राजदर्शना कदापि न जाती । नाहीं बाळक्रीडेची आसाक्ति । नसे राजोपचाराची प्रीति । उद्विग्न चित्तीं सर्वदा ॥ २०० ॥ राजा कळवळोनि भेटीसी । बोलावूं धाडी रघुनाथासी । तरी पितृ- वचनार्थ सभेसी । क्षण येक येती ॥ १ ॥ तेथही उद्विग्न होऊनि बैसे । सर्वांगीं कोमाइला दिसे । तें राजा देखोनि निजमानसें । दुःख मानी ॥ २ ॥ आदरें पुसे रघुनाथासी । बारे तुज कोण चिंता मा- नसीं । वर्ते तें सांग आह्मांसी । यथार्थ रामा ॥ ३ ॥ तुज उद्विग्न वोसावलें देखोन । मज दुःख होतसे दारुण । कारण न सांगतां प्राण । जातील माझे ॥४॥ तुज जें असेल अपेक्षित । तें मी देईन निश्चित । परी चिंताग्रस्त । राहों नको बापा ॥ ५ ॥ तुझेनि सुखें सुख आह्मांसी । तुझेनि दुःखें प्राणांत परियेसीं । तरी सांग व्यथा कोण मानसीं । [५]आधि कीं [६]व्याधि ॥ ६ ॥ तंव राम ह्मणे भूपाळा । तुमचेनि आह्मां नित्य सोहळा । आधिव्याधींचा मेळा । तेथ कैंचा ॥ ७ ॥ इत्यादि गौरववचनीं । परिहार देतसे [७]कोदंडपाणी । ऐसे [८]क्रमले स्वभुवनीं । कित्येक दिवस ॥ ८ ॥ रघुनाथासि उद्विग्न असतां । राजा राणी यांसि व्याकुलता । राज्य गोड न वाटे चित्ता । राजा मुख्य सकळांसी ॥ ९ ॥ ऐसे क्रमले दिवस किती । तंव अपूर्व वर्तलें अयोध्येप्रति । तें आयिकावें एकाग्र चित्तीं । कथासंगति सांगेन ॥ २१० ॥ वि- श्वामित्र महाऋषि । तेणें [१०]यागु आरंभिला [११]संभ्रमेंसी । बोलवूनि समस्तां ऋषींसी । [९]आपुल्या आश्रमीं ॥ ११ ॥ आचार्य होते पोते उद्गाते । मिळोनि महोत्साहें बहुते । अवदान देती अग्नीतें । स्वाहाकारमंत्रें ॥ १२ ॥ तेथ येऊनियां राक्षसीं । यागु विध्वंसिला क्षणार्धेंसीं । ऋषि दुःखी आला मानसीं । पुनः यागासी आरंभिलें ॥ १३ ॥ तोही पूर्णाहूति पावतां । यागु विध्वंसिला चरणघाता । ऋषि आरंभी मागुता । तोही विध्वंसिला ॥ १४ ॥ ऐसा जो जो याग आरंभी ऋषि । तो तो विध्वंसिजे राक्षसीं । विश्वामित्र दुखवला मानसीं । ह्मणे कोणासि सांगावें ॥ १५ ॥ जें जें निवारण करी आपण । त्याचें राक्षस करिती विध्वंसन । न चले मंत्राचें सामर्थ्य जाण । ह्मणोनि दुःखी ॥ १६ ॥ ह्मणे मी कोणासि आऊं शरण । कोण करील माझें समाधान । रावण बळें राक्षस दारुण । [१२]अनिर्वार्य देवां ॥१७॥( मारीच सुबाहु माजले थोर । सवें असंख्य रजनीचर । साह्य असती दुष्ट समग्र । दुःख अपार मज देती ॥१॥) इंद्रासि सांगों गान्ह्याणें । तरी तो लपाला असे भेणें । आतां पारिपत्य माझें कोणें । करिजेल येथें ॥१८॥ चंद्रसूर्यादि जे देव । तेही पराभविले सर्व । ते सांडूनि आपुलें वैभव । कार्य मात्र चालविती ॥१९॥ आतां भूमंडळींचे भूपति । तेही रावणाभेणें पळती । त्यांचें काय या राक्षसांप्रति । सामर्थ्य चाले ॥२२०॥ ऐसा आकुळव्याकुल मनीं । होऊनि लोटला मेदिनी । श्वासोच्छ्वास टाकी मुनि । अति दुःख करी ॥ २१ ॥ ह्मणे महाविष्णु विमुख आह्मांसी । ह्मणोनि उपेक्षिलें यागासी । यज्ञरक्षक सर्वांसी । त्यावीण नाहीं ॥ २२ ॥ ऐसें मुहूर्त दोनी दुःख करितां । तंव अकस्मात स्मृति जाली चित्ता । ह्मणे भगवंत तत्वता । अवतरला असे ॥ २३ ॥ राजा दशरथाचे उदरीं । श्री रघुनाथ रावणारि । अवतरला असे महामारी । राक्षसघातक ॥ २४ ॥ तो स्वतःसिद्ध असतां श्रीरघुपति । कासया यागचिंता मज चित्तीं । जाऊनि दशरथाप्रति । रामलक्ष्मण मागतों ॥ २५ ॥ ऐसें विचारूनियां मनीं । ह्मणे बाप भाग्य माझें ये जनीं ।

१ तीर्थजातें असा पाठ आहे. २ करी श्री रघुनाथ असा पाठ. ३ रायाच्या पोटीं असा पाठ. ४ उदास झालेला. ५ मानसिक दुःख. ६ शारिरिक दुःख. ७ धनुर्धारी. ८ गेले. ९ आपल्या घरांत. १० यज्ञ. ११ हौसेनें. १२ अजिंक्य.

आणि रघुनाथ डोळे भरूनी । झडकरी पाहों ॥ २६ ॥ तो आणोनियां यागासीं । समस्तां निर्दळील राक्षसांसी । यज्ञ समर्पूं रघुनाथासी । प्रत्यक्ष सिद्ध ॥ २७ ॥ ज्याचेनि उद्देशें यागु कीजे । त्यासि प्रत्यक्ष जरी समर्पिजे । तरी कृतकृत्य होइजे । आणि कीर्ति जगीं ॥ २८ ॥ ऐसा निश्चय करूनी । प्रस्थानें केलें तत्क्षणीं । बहुत शिष्य परिवारूनी । अयोध्येसि आला ॥ २९ ॥ तंव रायें आयिकिली मातु । सामोरा आला धांवतु । प्रेमें चरणांसि लागतु । सभेसि बैसविला ॥ २३० ॥ पूजा करोनि षोडशोपचारीं । कर जोडोनि विज्ञप्ति करीं । ह्मणे आज्ञा कार्य ते झडकरी । देईं महंतां ॥ ३१ ॥ येक ह्मणे राया अजसुता । आह्मां अपेक्षा नाहीं तुज राज्य करितां । सकळ सिद्धि असती प्राप्ता । तुझेनि सामर्थ्यें ॥ ३२ ॥ परी इतुकें माझें मनोगत । आरंभिला यागु करीं समाप्त । त्यासि राक्षस आति उपद्रवित । विध्वंसिती यज्ञ ॥ ३३ ॥ यासि करितां उपाय कोटी । परी नव्हे यज्ञसिद्धीसि भेटी । ह्मणोनि आठवली बुद्धि पोटीं । ते तूं आयिक राया ॥ ३४ ॥ जरी हें तुज सांगों कार्यांतर । तरी राक्षस असती अति थोर । तुझेनि न करवे संहार । बहुता काळें ॥ ३५ ॥ यालागीं मागेन तेंचि देईं । तूं सत्य[4]सत्वधीर वीर पाहीं । राक्षस निर्दळिसी सर्वेही । परी बहुत दिवस लागती ॥ ३६ ॥ तुझी कीर्ति महाथोर । तूं शूरा माजी महाशूर । शुक्रासि केला महामार । हें तंव मी जाणतु ॥ ३७ ॥ परी आतां येकचि करीं । मागेन तें देईं झडकरीं । रामलक्ष्मणा यज्ञरक्षणावरी । देईं मज ॥ ३८ ॥ आणीक न मागें गा तुज देईं । लक्ष्मणासहित रघुराज । इतुकेनि माझा कार्यसमाज । सिद्धि पावेल ॥ ३९ ॥ इतुकें आइकतांचि वचन । राजा जाला मूर्च्छा[5]पन्न । भूमी पडला आसनाहून । विस्मरण पावला ॥ २४० ॥ मुहूर्त येक जाला सावध । दुःखें दाटला अगाध । वाचा न फुटे जाला सद्गद । ह्मणे हें काये सांगितलें ॥ ४१ ॥ जरी राज्य मागतासि मुनिराया । अथवा प्राण देतों तुज लागोनियां । स्त्रिया भांडार स्वामिया । न वंचीं मी ॥ ४२ ॥ परी रामलक्ष्मणासि मागितलें । हें थोर अनुचित केलें । जें कां मज न वचे दिधलें । प्राण गेलिया ॥ ४३ ॥ अगा रघुनाथाविण राज्य सकळ । ते व्यर्थ शरीर तळमळ । स्त्रियादिभोग अमंगळ । मानितों मी ॥ ४४ ॥ किंबहुना शरीर प्राण । रघुनाथेंविण शवतुल्य जाण । रामेंविण पाळी कवण । अतिकुत्सित ॥ ४५ ॥ तेथ देश दुर्ग भांडारें । हे तंव अतिशयेंसि नश्वर । रघुनाथेंविण संसार । वांतान्न मानीं ॥ ४६ ॥ याकारणें गा सुमुनि । रघुनाथ नेदी अरंवसेनी । लटिकी जाली जरी वाणी । त्रिप्रकारें माझी ॥ ४७ ॥ जन्हीं जाती माझे प्राण । तन्हीं नेदीं श्रीरामलक्ष्मण । इतुकें आयकूनि ब्राह्मण । अति उद्विग्न जाला ॥ ४८ ॥ ह्मणे याचक गेलिया पराङ्मुख । तो गृहस्थासि महादोख । नको आग्रह करूं देख । पराङ्मुख मी जातों ॥ ४९ ॥ राजा ह्मणे ऋषिराया । मज रघुनाथेंविण धर्म कर्म कां क्रिया । तपादिसाधनें सर्व माया । अंतवंत मानीं ॥ २५० ॥ नाना वर्णाश्रमाचार । ते तोंपर्यंत साचार । जंव प्राप्त नव्हे रघुवीर । तंवचि वरी ॥ ५१ ॥ वर्णाश्रम नानाधर्म । तपादिसाधन नित्यकर्म । यांचा तोंचिवरी संभ्रम । जंव रामु न भेटे ॥ ५२ ॥ श्रीराम जालिया प्राप्त । सर्व वर्णाश्रमाचार व्यर्थ । तो जाण दुःखमूळ समस्त । संसारदायक ॥ ५३ ॥ ह्मणोनि जन्हीं वर्णाश्रमधर्मजाति । मिथ्या जाली माझी भारती । तन्हीं मी नेदीं श्रीरघुपति । सत्य जाण ॥ ५४ ॥ ऐसें वचन ऐकोनी । क्रोधाविष्ट जाला मुनि । मग चालिला कोपोनी । द्वाराबाहेरी ॥ ५५ ॥ तंव वसिष्ठ ह्मणती रायासी । नको विन्मुख धाडूं विश्वामित्रासी । तो जाण स्वयें तपोराशि । शापील तुज ॥ ५६ ॥ आणि जे जे सूर्यवंशींचे भूपति । ते याचकासि विन्मुख न होती । त्यासि देती देहादिसंपत्ति । हें तुह्मांसि विदित ॥ ५७ ॥ यालागीं गा राया दशरथा । बोलावूनि आणीं महंता । त्यासि समर्पीं श्रीरघुनाथा । भय सर्वथा त्या नाहीं ॥ ५८ ॥ राम शूरांमाजी जगजेठी । सकळां राक्षसां करील आटी । यज्ञसिद्धि उठाउठी । करील जाण ॥ ५९ ॥ रघुनाथ पराभवेल ह्मणोनी । सर्वथा भय न धरीं मनीं । राम शूरांचा मुकुट[10]मणि । जाण निर्धारें ॥ २६० ॥ यावरी बोलावूनि विश्वामित्रासी । रायें नमस्कारिला संभ्रमेंसी । ह्मणे तूं रघुनाथासी । मागतोसि मज ॥ ६१ ॥ राक्षस जुनाट झुंझारें । बहु समुदाय आणि महावीर । श्रीराम अति सकुमार । पंचदश[13] वर्षांचा ॥ ६२ ॥ विद्याभ्यास तरी अपूर्व केला । परी संग्रामीं नाहीं निवडला । आणि याचा मज वियोग जाला । क्षणमात्र न साहे ॥ ६३ ॥ तंव विश्वामित्र ह्मणे रायासी ।

---

१ जाणें, गमन. २ हे श्रेष्ठा. ३ दशरथा. ४ सत्य, सत्व, धैर्य व शौर्य हीं अंगीं असलेला. ५ मूर्च्छित. ६ देतां येत नाहीं. ७ प्रेतासारखें. ८ खजिना. ९ उदास. १० श्रेष्ठ. ११ योद्धे. १२ पंधरा. १३ युद्धांत. १४ कसलेला.

तूं अद्यापि श्रीराम नेणेसी । परब्रह्म अवतरलें तुझे वंशीं । धन्य कूस मातेची ॥ ६४ ॥ वैकुंठनाथ आला पोटा । तुज काय वानूं रे भाग्योत्कटा । तूं अज्ञानें नेणसी वैकुंठा । श्रीरघुनाथासी ॥ ६५ ॥ सकळ दैत्यांसि निर्दळण । करावें साधुजनांचें पाळण । ह्मणोनि रामरूपें अवतरण । महाविष्णूनें केलें ॥ ६६ ॥ हा निर्दळील दैत्यांसी । तारील तुझिया वंशासी । अयोध्या हे वैकुंठासी । नेईल राया ॥ ६७ ॥ राया कोण तूं तप तपलासी । कां करवतीं फोडिलें सर्व देहासी । तेणें पोटा आला हृषीकेशी । श्रीरामरूपें ॥ ६८ ॥ ह्मणोनि चिंता न करीं श्रीरामाची । हा तंव शांति करील राक्षसांची । सिद्धि करील माझिया यज्ञाची ॥ आणि कीर्ति करील ॥ ६९ ॥ हा योगियाचें समाधान ॥ आणि सकळ तीर्थांसि परम पावन । हा चित्सुखाब्धि निरंजन । पुत्र तुझा ॥ २७० ॥ श्रीराम आमुची विश्रांति । श्रीराम शांतीची परम शांति । श्रीराम कीर्तीची परम कीर्ति । मंगळमूर्त्ति श्रीरामु ॥ ७१ ॥ श्रीराम ब्रह्मादिकांचा नियंता । श्रीराम विश्वस्थितिसंहारकर्त्ता । श्रीराम जगातें उद्धरिता । स्वज्ञानेंकरूनी ॥ ७२ ॥ श्रीराम मंगळाचें मंगळ । श्रीराम परब्रह्म निष्कळ । श्रीराम नित्य निर्मळ । चिद्घनैकरूप ॥ ७३ ॥ ऐसें ऐकोनि ऋषिवचन । राजादशरथ सुखसंपन्न । वसिष्ठासि समाधि पूर्ण । समाधान सभेसी ॥ ७४ ॥ आनंदु रायाचे मनीं । लागला विश्वामित्राचे चरणीं । ह्मणे निवालों तुझिया वचनीं । लोटांगणीं साष्टांग ॥ ७५ ॥ मग बोलाऊं धाडिलें रघुनाथासी । ह्मणे राम देईन गा तुजपासीं । भय नाहीं मानसीं । तुझेनि वचनें ॥ ७६ ॥ तंव हेर धाडी श्रीरामगृहासी । ह्मणती रावो बोलाविती तुह्मांसी । राम वचनमात्रें सभेसी । येता जाला ॥ ७७ ॥ साष्टांग नमस्कार केला वसिष्ठांसी । तैसाचि विश्वामित्रा आणि रायासी । रायें आलिंगुनि रामासी । बैसविला पुढें ॥ ७८ ॥ शिरावघ्राण करूनि दिधलें चुंबन । वेळोवेळां करी मुखावलोकन । ह्मणे कोमाइलें दिसे तुझें वदन । कोणा काजा सांग पां ॥ ७९ ॥ तीर्थाटण करूनि आलियावरी । कांहीं भोग न भावती शरीरीं । वैराग्य उपजतसे भारी । तें कारण सांगिजे ॥ २८० ॥ रघुनाथ चिंताक्रांत मानसीं । विनविता जाला विश्वामित्रासी । ह्मणे मनोगत सांगेन तुह्मांपासीं । तें आयिकें ऋषिवर्या ॥ ८१ ॥ नावडती तरुणस्त्रियांचे भोग । भोग तितुका क्षयरोग । स्त्रीसंगें दुःख अभंग । कीती सांगों ॥ ८२ ॥ स्त्रीसंगें दुःख कोटि । स्त्रीसंगें विपरीत सृष्टि । स्त्रीसंगें रौरवेंसी भेटि । होये देखा ॥ ८३ ॥ आणीकही आयिकें ऋषिराया । मन उठिलें विषयावरूनियां । नावडती भोगक्रिया । कोणेंही विषयीं ॥ ८४ ॥ अतिप्रीति साधुचरणीं । उपजताहे प्रतिदिनीं । इतर पदार्थ कोणही । नावडती मज ॥ ८५ ॥ नावडे देह सौभाग्य । नावडे वैभव राजयोग्य । नावडे स्त्रियांचे कटाक्ष भोग्य । विरक्तत्वें ॥ ८६ ॥ नावडे बंधु मित्र संपत्ति । नावडे खेलनें कर्माकृति । स्वधर्माचरणीं उदास वृत्ति । नावडोनियां ॥ ८७ ॥ नावडे देहादि उपचार । नावडे ज्ञाति गोत्र कुळाचार । सुगंधादि अष्ट प्रकार । भोगाचे जे ॥ ८८ ॥ सुगंध परिमळादि चंदन । पुष्पें शृंगारादि वनिता जाण । वस्त्रें नाना परींचीं परिधान । पितांबराचें ॥ ८९ ॥ गीत गायन नृत्यांगना । तो संभ्रम नावडे कांहीं मना । तांबूल खाद्य आणि भोजना । मन न रिघे ॥ २९० ॥ तैसेंचि शयनाचे अवसरीं । नावडे पर्यंक सुमनसेजारि । भूषणेंही नानापरी । कटककुंडलादिकें ॥ ९१ ॥ ऐसें इत्यादि सांगों किती । नावडे देहादि इंद्रियसंपत्ति । वासना शरीरीं नाना उठती । तेणें निर्बुजे बहु ॥ ९२ ॥ तसें मनही महा वोढाळ । क्षणभरी न राहे निश्चळ । करी संसारीं तळमळ । व्याकुळपणें ॥ ९३ ॥ स्थिर करितांही क्षणभरी । धांवोनि जाय विषयांवरी ॥ अहोरात्र वणवण करी । तेणें भारी क्षोभ होत ॥ ९४ ॥ यया मनावासनेच्या संगें । अतिशयें मी अहाळूं लागें । तें दुःख कायसें सांगें । स्वामीप्रति ॥ ९५ ॥ मन हें अखंड श्वानाचेपरी । विषयांलागीं वणवण करी । तेणें दुःख होतसे भारी । किती सांगों ॥ ९६ ॥

+ संमतिश्लोक + इतश्चेतश्च सुव्यग्रं व्यर्थमेवाभिधावति । दूराद्दूरतरं दीनं ग्रामे कौलेयको यथा ॥

या मनाचें वोढाळपण । किती सांगो तुजलागोन । इतस्ततः धांवे विषयाकारण । उडी घाली अकलेयें ॥९७॥ प्राप्तविषयीं आसक्ति धरी । अप्राप्ताची अतिशयें चाड करी । अविद्यमानालागीं नानापरी । मनोरथ भावी ॥९८॥ प्राप्तविषयींही व्यग्रता । तथही नाहीं स्थिरता । व्यर्थचि धांवे इतस्तता । असतां प्राप्त ॥ ९९ ॥ देखीलें आयिकिलें देशांतर अतिदूर बहु दुर्धर । तेथही उडी घाली सत्वर ।

---

१ तपश्चर्या केलीस. २ मरिणें. ३ ताब्यांत ठेवणारा. ४ जगाची उत्पत्ति, स्थिति व लय करणारा. ५ मस्तक हुंगणें. ६ आवडतात. ७ आनंदकारक करें. ८ शोभविणें. ९ खेळणें. १० स्त्रिया. ११ कलावंतिणी. १२ विडा. १३ पलंग. १४ दगडग.

अत्यंभिलाषें ॥ ३०० ॥ सप्तपाताळें मृत्युलोक । सप्तस्वर्गादि ब्रह्मलोक । क्षणार्धें हिंडे जैसें रंक । दीन होऊनियां ॥ १ ॥ जैसें थोरा ग्रामाच्या ठायीं । श्वान हिंडे दिवसरात्रींही । बहु भक्ष्य मिळालिया इतरही । पाहतुचि असे ॥ २ ॥ गजाचें कलेवरही प्राप्त असतां । गुरगुरूं लागे दुसरें देखतां । थोडें मानूनि इतरार्था । अभिलाषित ॥ ३ ॥

संमतिश्लोक । श्रीरा० । न प्राप्नोति क्वचित्किंचित्प्राप्तैरपि महाधनैः । नांतः संपूर्णतामेति करंडक इवांबुभिः ।

ऐसे नानामनोरथ करितां । प्राप्त्यर्थ नाहीं सर्वथा । तऱ्ही न राहे हिंडतां । नानास्थानें ॥ ४ ॥ येसेन महाप्रयासेंकरून । भाग्योदयें लाधल्या महाधन । अथवा सार्वभौम इंद्रस्थान । लाधलें जऱ्ही ॥ ५ ॥ तऱ्ही ते संपूर्णता न मानी । वणवण करी अनुदिनीं । तृष्णाकुलित त्रिभुवनीं । हिंडे सदा ॥६॥ भरिलेंसि न भरे सर्वथा । तृप्तचि न पवे तृप्तता । भरिजे तंव तंव होय रीता । अतृप्तपणें ॥ ७ ॥

संमतिश्लोक । न जातु कामः कामानामुपभोगेन शाम्यति । हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्द्धते ।

जंव जंव भोगी विषयजात । तंव तंव वणवण करी बहुत । तिळाज्यहुतीनें पूरित । वैश्वानरु जैसा ॥८॥ शमवावयालागुनी । घृतधारा विझविती महा अग्नि । अधिकचि लागे गगनीं । थोरावलेपणें ॥९॥ नाना वणवणेचे विषयीं । प्राप्तविषयें रिता सर्वही । भरिजे तंव रिता पाही । मनःकोशं हा ॥ ३१० ॥ जैसा वेणुकरंडक । जों जों भरिजे त्यांत उदक । तंव रिताचि अधिक । जैसा तैसा ॥ ११ ॥ जंव जंव तो भरिजे नीरें । तंव तंव सर्वही रितीं द्वारें । कांहीं केलियाही न भरे । कल्पांतवरी ॥ १२ ॥ तैसें मन हें मुनिराया । पूर्णता नपवे कांहीं केलिया । यासि काय करावें जी स्वामिया । उपाय सांगा ॥ १३ ॥

संमतिश्लोक । श्रीराम० । क्रूरेण जडतां यातस्तृष्णाभार्यानुगामिना । शवः कौलेयकेनेव ब्रह्मन्भुक्तोस्मि चेतसा ।

अगा अतिक्रूर हें मन जाण । यासि तृष्णा भार्या सहाय पूर्ण । तियेमागें जाय धांवोन । स्त्रीसंग जन हें ॥ १४ ॥ तृष्णा धांवे जे जे पदार्थीं । तेथ मन उडी घाली अवचितीं । ऐसें त्रैलोक्य जऱ्ही हिंडती । तऱ्ही तृप्ति नाहीं ॥ १५ ॥ ते तृष्णा भार्येचेनि संगें । मन हें सैरा धांवों लागे । अतिक्रूरता पावे वेगें । आणि महाजडता ॥ १६ ॥ या मनाचेनि संगें मजलागून । देहीं जडता बाणली पूर्ण । आपण आपणातें विसरोन । हे दशा प्राप्त ॥ १७ ॥ ऐसा जालिया मनाधीन । हें फाडफाडोन खाये तृष्णेंकरून । जैसें शवातें तोडी फाडी श्वान । तयाचिपरी ॥ १८ ॥ तैसें ब्रह्मस्वरूप ऋषीश्वरा । फाडफाडूं खादलें गा या मनें सैरा । याचा मज लागला भेदरा । कासावीस होतसें ॥ १९ ॥ रात्रंदिवस माझ्या अंगीं । लागलीसे गा तृष्णाधगी । अग्नि लागला शिरमार्गीं । निववीं मज ॥ ३२० ॥ या मनतृष्णेचेनि संगति । कामक्रोधलोभादि उठती । तें दुःख सांगों कोणाप्रति । मुनिराया ॥ २१ ॥ यापासूनि सोडवीं मजलागून । ह्मणोनि घातलें लोटांगण । त्राहें त्राहें ह्मणोन । करूणा बोलें ॥ २२ ॥ लघुवासिष्ठीं श्रीरघुनाथ । वैराग्य बोले जें अद्भुत । तितुकें लिहितां विस्तृत । ग्रंथ वाढेल ॥ २३ ॥ यालागीं अल्प निरूपणें । ग्रंथ संपादिला वैराग्य येणें । देहो कुश्चित रघुनाथ ह्मणे । नावडे मज ॥ २४ ॥ शरीर हें दुर्गंधीचें घर । सकळ रोगांचें बिढार । वात पित्त श्लेष्मा निरंतर । वर्ते तेथें ॥ २५ ॥ याचेनि संगें दुःख भारी । उपचारितां नानाउपचारीं । परी हें नश्वर सर्वांही प्रकारीं । काये सांगों ॥ २६ ॥ ऐसें येक बोलों किती । बोलतां दुःखचि आठवे चित्तीं । चिळसि येतसे पुढतपुढती । या संसारिकाची ॥ २७ ॥ यालागीं आयिकें ऋषिराया । सोडवीं पासावें भवभया । जेणें सुखरूप होऊनियां । वर्ते मी जैसा ॥ २८ ॥ ऐसें वैराग्य बोलतां श्रीरामासी । विस्मय सकळां सुरवरांसी । वसिष्ठविश्वामित्र राजासी । आणि ऋषी सकळां ॥ २९ ॥ तेथ मिळाले सुरवर किन्नर । पन्नग गंधर्व विद्याधर । तितुकियांसि चमत्कार थोर । सकळ सभा विस्मित ॥ ३३० ॥ श्रीरामाची अल्प वयसा । वैराग्य पूर्ण बाणलें सहसा । सद्गुरु भेटावया ऐसा । मनोभाव दिसे ॥ ३१ ॥ सकळ नावडोनियां चित्तीं । येक साधुचरणीं अतिप्रीति । हेचि आणावी शुद्धमति । ज्ञानभूमिका ॥ ३२ ॥ हें देखोनि विश्वामित्रासी । आनंदु न समाये मानसीं । ह्मणे धन्य या सूर्यवंशासी । पाहिलें आजी ॥ ३३ ॥ ह्मणे धन्य धन्य हा दशरथ । जयासि पुत्र हा रघुनाथ । धन्य हा वसिष्ठ पुरोहित । इये वंशीं ॥ ३४ ॥ श्रीराम परब्रह्म आपण । तोही वैराग्य दावी पूर्ण ॥ वसिष्ठा तुझें ज्ञान संपूर्ण ॥ उपदेशीं रामा ॥ ३५ ॥ आजी तुजसारिखा सद्गुरु ॥ आणि

१ मोठ्या इच्छेनें. २ मढें. ३ पुष्कळ द्रव्य. ४ अनेक विषय. ५ तीळ व तूप यांच्या आहुतीनें. ६ अग्नि. ७ मनरूप खजिना. ८ वेळवाचें नळकांडें. ९ तिच्या मागें. १० भीति. ११ तृष्णेचि आग. १२ फार मोठें. १३ बिऱ्हाड. १४ पासून.

श्रीराम वैराग्याचें पूर्ण तारूं ॥ कासिया लाविसी उशीरु ॥ ज्ञानदाना ॥ ३६ ॥ वसिष्ठ ह्मणे विश्वामित्रासी ॥ ज्ञानोपदेश करीं रघुनाथासी ॥ येरु ह्मणे तुमचे शिष्यासी ॥ मज सांगों नये ॥ ३७ ॥ आणिकांचा शिष्य शुद्धीं ॥ आपण बोधूं नये स्वार्थबुद्धि ॥ चाळवितां निरयाब्धीं ॥ पडिजे जाण ॥ ३८ ॥ यालागीं सूर्यवंशीं तूं कुलगुरु ॥ ज्ञानोपदेष्टा वक्ता चतुरु ॥ श्रीराम वैराग्यें उदारु ॥ उशीरु येथ न लावीं ॥ ३९ ॥ वैराग्य बाणलें असतां शिष्यासी ॥ विलंबु करूं नये ज्ञानोपदेशीं ॥ आत्मविद्या सच्छिष्यासी ॥ द्यावी तत्काळ ॥ ३४० ॥ मग वसिष्ठ ह्मणती परियेसा ॥ शिष्यासि वैराग्य आलें सहसा ॥ परी गुरु न प्रार्थितां तैसा ॥ उपदेशा पात्र नव्हे ॥ ४१ ॥ गुरूसि शरण येऊनि प्रश्न ॥ शिष्य न करी जंव आर्त होऊन ॥ तंव उपदेश करणें हें दूषण ॥ गुरुत्वासि ये ॥ ४२ ॥ अभिलाषेंकरूनि बलात्कारें ॥ शिष्यासि उपदेशिजे सादरें ॥ तेथ गुरुत्व वोस पडे खरें ॥ संप्रदायही ॥ ४३ ॥ ऐसें बोलिले जंव वसिष्ठऋषि ॥ तंव श्रीराम लागे चरणासी ॥ ह्मणे शरण आलों स्वामीसी ॥ उद्धरा मज ॥ ४४ ॥ वंशीं स्वामी असतां कुलगुरु ॥ आणि आह्मांसि बाधी संसारु ॥ हा तंव विस्मयो थोरु ॥ सद्गुरुराया ॥ ४५ ॥ तुझें जालिया दर्शन ॥ अविद्येचें भस्म पूर्ण ॥ कृपाकटाक्षें संपूर्ण ॥ ब्रह्मत्व लाभे ॥ ४६ ॥ यालागीं जी कृपासमुद्रा ॥ स्नेहपूर्वक जी ऋषिवरा ॥ मेरद्याचिया महापूरा। तारीं मज ॥ ४७ ॥ ऐसें प्रार्थितां ऋषीश्वरासी ॥ कृपा उपजली वसिष्ठासी ॥ ह्मणे बारे रामा परियेसीं ॥ सांगेन तूज ॥ ४८ ॥ वैराग्यपूर्वक ज्ञानविज्ञान[4] ॥ तुजलागीं सांगों संपूर्ण ॥ जेणें तूं ब्रह्म पूर्ण ॥ होसी स्वानुभवें ॥ ४९ ॥ ऐसी प्रतिज्ञा स्वीकारुनी ॥ श्रीरामासि सन्मुख बैसउनी ॥ सांगेन तें आतां निजश्रवणीं ॥ आयका श्रोते हो ॥ ॥ ३५० ॥ आधींच श्रीराम ज्ञाता वरिष्ठ ॥ वरि उपदेशकर्त्ता श्रीवसिष्ठ ॥ तें ज्ञान अतिश्रेष्ठ ॥ उपनिषदार्थु ॥ ५१ ॥ दशधा निरूपण दशप्रकरणीं ॥ 'दोन शतें एकविंशति' श्लोक वाखाणीं ॥ श्लोकरूपें श्रुति कोडिसंवाणी । दृढ संतजनीं सेवावी ॥ ५२ ॥ वैराग्यादिनिर्वाणांत । दशप्रकरणीं यथोचित । वासिष्ठसाराचा विस्तार येथ । ज्ञानरूपें ॥ ५३ ॥ त्यामाजी प्रथम वैराग्यप्रकरण । स्वयें बोले वसिष्ठ आपण । त्यांतही दिसे ब्रह्मज्ञान । अनुष्ठितांची ॥ ५४ ॥ प्रकरणाहूनि प्रकरण सार । अर्थगांभीर्यें गंभीर । एकापरीस एक थोर । अर्थपुष्टीकरूनी ॥ ५५ ॥ श्लोक श्लोकातें विये । अर्थु अर्थातें प्रसवे । अभिप्राय अभिप्रायें । प्रकट करिजे ॥ ५६ ॥ ऐसा हा ग्रंथ सज्जनीं । आयिकावा आर्त्तीं श्रवणीं । श्रवणमात्रेंचि तत्क्षणीं । कृतकृत्यता होये ॥ ५७ ॥ इये ग्रंथीं अधिकारी । ज्यासि श्रवणीं आवडी अंतरीं । आणि ब्रह्मत्वाची प्राप्ति पुरी । इच्छा जया असे ॥ ५८ ॥ तेंचि श्लोकाचेनि मिसें । प्रकटिजेल अपैसें । जें कीं बोलिले असे ऐसें । श्रीवसिष्ठऋषि ॥ ५९ ॥ श्रीरघुनाथ सनिर्वाणि होऊन । श्रीगुरूसि प्रदक्षिणा करून । साष्टांग करी वंदन । शिष्यसंप्रदायें ॥ ६० ॥ प्रार्थना करूनि नानापरी । वैराग्य निरूपिलें पूर्विल्यापरी । ह्मणे तारीं ये संसारीं । बुडालों स्वामी ॥ ३६१ ॥ तंव कळवळोनियां वसिष्ठमुनि । शिरीं हस्त ठेवूनि तत्क्षणीं । ह्मणे बारे आयिक तुजलागुनी । करीन भवावेगळें ॥ ६२ ॥ तेंचि आयिक निरूपण । जें कीं स्वयें वाल्मीक बोलोन । शतकोटि ग्रंथ रामायण । निर्मिलें स्वयें ॥ ६३ ॥ त्यामाजी कांहीं उक्ति जे तुजप्रति । त्यालागीं वसिष्ठ ऐसें ह्मणती । वदली वाल्मिकाची भारती । भविष्य पुढील ॥ ६४ ॥ नवामधील निरूपण । सांगेन आधीं वैराग्यप्रकरण । या ग्रंथाचा अधिकारी पूर्ण । बोलिजेल ऐसा ॥ ६५ ॥ तेंचि आतां एकाग्र होऊन । सर्वांगाचे करीं श्रवण । सांगेन त्याचें मनन । निदिध्यासन करावें ॥ ६६ ॥ तरी अधिकारी तो येथ ऐसा । आतां आयिक वाग्विलासा । त्यासीच उचित उपदेशा । सर्वथा जाण ॥ ६७ ॥ ऐसें वाल्मीकीचें वचन । बोले अधिकारियाचें लक्षण । तें ऐकें एकाग्र मन । करूनि रामा ॥ ६८ ॥

वा० ॥ अहं बद्धो विमुक्तः स्यामिति यस्यास्ति निश्चयः ।
नात्यंतमज्ञो नो तज्ज्ञः सोऽस्मिञ्शास्त्रेऽधिकारवान् ॥ १ ॥

जो कीं अत्यंत अज्ञान । जड मूढ मळिन जाण । देहोचि हा आपण । बोध जया ॥ ६९ ॥ मीपण तें देहाचे माथां । देहापरतें नेणे सर्वथा । देहसंबंधी आप्तता । ममकारेंकरूनी ॥ ३७० ॥ अहं देहासिचि बोले । स्त्रीपुत्रादि ममकारा आले । इतर कांहींच नकळे । तो अति अज्ञानी ॥ ७१ ॥ मी कोण काइ येथ आहें । कोणाचा कोठून आलों हें । बद्ध कीं मुक्त असे पाहे । हें

---

१ नरकांत. २ ज्ञानशिकविणारा. ३ प्रथम वैराग्य, ४ मग ज्ञान व नंतर विज्ञान. ५ दहा प्रकारचें. ६ दोनशें एकवीस. ७ स्पष्ट असलेली. ८ उत्पन्न करितो. ९ आपोआप. १० हातीं समिधा घेऊन. ११ वाणी. १२ एकसारखा विचार.

कांहीं नेणे ॥ ७२ ॥ केवळ शिश्नोदरपरायण । व्यवहारीं अतिदक्ष पूर्ण । देवत्वें मानी येक पाषाण । संपूर्ण भावें ॥ ७३ ॥ तोचि अति अज्ञान जाण । तो अधिकारी नव्हे पूर्ण । जया देह कोण मी कवण । उमजेचिना ॥ ७४ ॥ जैसें सिनीवालीचें निशीथ । वरी जळदें आलें अंबर युक्त । तैसें जयाचें अंतस्थ । गडद्पणें ॥ ७५ ॥ तयासि काइसें श्रवण । नेणे कदा जाणे ब्रह्मज्ञान । बद्ध अथवा मुक्तपण । न सरे दोन्ही ॥ ७६ ॥ आपण येकु देहावेगळा । बांधला अज्ञानशृंखळा । इतुकीही स्मरणवेळा । नाहींच जयासी ॥ ७७ ॥ ऐसा जो अज्ञान अति । तो अधिकारी नव्हे इयें ग्रंथीं । जो स्वयें उदास श्रवणार्थी । मळिनपणें ॥ ७८ ॥ तो वाळिला अंत्यजाचेपरी । नाहीं श्रवणाधिकारी गा रावणारी । अत्यंत ज्ञानी तोही सर्वांपरी । अधिकारी नव्हे ॥ ७९ ॥ 'तज्ज्ञ' शब्दें परोक्षज्ञानी । ऐसा तर्क करील कोणही । यालागीं अत्यंत पदसूचनीं । दोनी पदांसी ॥ ३८० ॥ अत्यंत तज्ज्ञ ह्मणिजे आण । जयासि असे अपरोक्षज्ञान । तो येथ काय करील श्रवण । समाधान जयासी असे ॥ ८१ ॥ तो ब्रह्मानंदें डुल्लतु । देहीं देहाची नेणे मातु । नेणे तुजें विश्वभ्रांतु । आपणाविण ॥८२॥ ऐसा जो का ब्रह्मज्ञाता । तो नव्हे अधिकारी तत्वता । सर्व ब्रह्मानंदें तृप्तता । बाणली जया ॥ ८३ ॥ पूर्णाचें बोलतां लक्षण । तरी पुढां असे जीवन्मुक्तिप्रकरण । तेथ कोंवळ निरूपण । ह्मणोनि अल्प केलें ॥८४॥ ह्मणोनि तो नव्हे अधिकारी । जो पूर्णपणें जगान्नाझारी । श्रवण साधन तो काय करी । धालेपणें ॥ ८५ ॥ जो भोजन करूनि बैसला । त्यासि पाकव्यापार काय बोलिला । ग्रामपावोनि सुखावला । त्यासि मार्गु काय ॥ ८६ ॥ यालागीं जया पूर्ण ज्ञान । तोही अधिकारी नव्हे जाण । सांगेन अधिकारियांचें चिन्ह । तेंचि आयिका ॥ ८७ ॥ जो का अत्यंत नव्हे ज्ञानी । अपरोक्षानुभव नेणे स्वप्नीं । ना जो अत्यंत अज्ञानी । जडमूढपणें ॥८८॥ आतां दोहींहूनि जो मध्यस्थ । तोचि येथ अधिकारी प्रस्तुत । त्याचा सांगेन वृत्तांत । आतांचि तुज ॥ ८९ ॥ जयासी आपणु कळला अर्थ । जाणे कोण मी देहातीत । परी अज्ञानें असे आवृत । कळलेंपणें ॥ ३९० ॥ जो साधनचतुष्टयसंपन्न । तोचि येथ अधिकारी जाण । जो नव्हे ज्ञानी ना अज्ञान । तोचि अधिकारी ॥ ९१ ॥ आतां साधनचतुष्टय तें कोण । त्याचें संक्षेपें करूं विवरण । करूनि येकाग्र मन । आयिकें रघुनाथा ॥ ९२ ॥ प्रथम नित्यानित्यवस्तुविवेक । नित्य तें आत्मस्वरूप येक । ऐसें अपरोक्ष कळलें देख । येर अनित्य सर्वही ॥ ९३ ॥ देहादिप्रपंच सर्व । तो अनित्य नश्वर साधेव । हा जयासि विवेकभाव । जागती आंगीं ॥ ९४ ॥ दुसरें साधन रघुपति । इहामुत्रादिफलभोगविरक्ति । इहलोकींचे भोग नावडती । जरी प्राप्त स्वाराज्य ॥ ९५ ॥ तैसेंचि परलोकस्वर्गादिसुख । तें नावडे वांतीऐसें देख । ऐसें जें वैराग्य चोख । बाणे जया ॥ ९६ ॥ यदर्थीं वेदसंमति । येकाग्र आयिकें विश्वमूर्ति । वैराग्याची स्वरूपस्थिति । सांगेन तुज ॥ ९७ ॥

श्रुति श्लोक । ब्रह्मलोकतृणीकारो वैराग्यस्यावधिर्मतः ॥

अगा ब्रह्मलोकपर्यंत । तृणतुल्य भोग जया समस्त । तोचि तो वैराग्य युक्त । इहामुत्रादिविरागु ॥ ९८ ॥ तिसरें शमादिषट्कसाधन । याचेंही सांगेन विवरण । करूनि सावधान मन । आयिकें रामा ॥ ९९ ॥ मन बुद्धि विषयांवरून आवरिजे । तया नांव अंतरिंद्रियनिग्रह बोलिजे । तोचि शम ऐसा ह्मणिजे । षट्काचें प्रथम ॥ ४०० ॥ दुसरा तो दम रघुनाथा । बाह्येंद्रियवृत्तिनिरोध सर्वथा । स्वस्वव्यापारीं विमुखता । करावी त्यांकरवीं ॥ १ ॥ तिसरें साधन उपरति । तयाची ऐसी स्वरूपगति । दमिलीं इंद्रियें मागुतीं । करूं नेदावीं ॥ २ ॥ आवरिलीं इंद्रियें मागुती । प्रवर्तों नेदावीं विषयांलागीं । हेचि उपरति भरंवसेनी । जाण रघुपति ॥ ३ ॥ आतां चौथी तितिक्षा ऐसी । सर्व सहावें द्वंद्वांसी । आपुलिया जे आचारासी । शीतोष्णें होतीं ॥ ४ ॥ संध्यास्नानादिकर्म करितां । शीतोष्मा बाधी गा रघुनाथा । तीं तीं साहावीं सर्वदा । तैसेंचि सुख दुःख ॥ ५ ॥ प्रारब्धाचेनियोगें । दुःखें जे होती भोगें । ते ते साहावे जाणूनि वेगें । तेचि तितिक्षा ॥ ६ ॥ सद्गुरु आणि सद्वचनाचे ठायीं । विश्वासु उपजे अनपायी । तेचि शुद्ध श्रद्धा जाण येथही । पांचवें साधन ॥ ७ ॥ आतां समाधान ऐसें जाण । सर्व विषयीं उपरम पूर्ण । परी श्रवणादि समाधान । सुख जें होये ॥ ८ ॥ हेंचि शमदमादिषट्क जाण । चौंहीमाजी तिसरें साधन । चौथें मुमुक्षुता पूर्ण । उपजे जया ॥ ९ ॥ देहेंद्रियांहूनि व्यतिरिक्त । आपण जाणे निश्चित । बंध जाण अज्ञानकृत

१ विषयांच्या मागें लागलेला. २ अमावास्येचा. ३ अंधकार. ४ मेघांनीं. ५ कालक्रमभंगामुळें हें विशेषण चिन्त्य आहे. ६ साक्षात् ज्ञान. ७ केलें जाईल. ८ स्वयंपाकाचा उद्योग. ९ सुखी झाला. १० ओकून पडलेलें अन्न. ११ दृढ.

तेणें तळमळी ॥ ४१० ॥ अपरोक्षबोध तऱ्ही नाहीं जाला । परमानंदें नसे धाला । परी विषयसंगासि कंटाळला । यालागीं न प्रवर्त्ते ॥ ११ ॥ सामान्याकारें जाणे आपणासी । परकीयत्व देखे देहेंद्रियासी । ह्मणोनि अत्यंत अज्ञानी तयासी । ह्मणों नये ॥ १२ ॥ आतां अत्यंत ज्ञानी ह्मणिजे । तऱ्ही अपरोक्षानुभव तेणें नेणिजे । दोन्ही नाहीं ह्मणतां सुझे । बद्धता आपुली ॥ १३ ॥ ह्मणोनि तो नव्हे अत्यंत ज्ञानी । ना तो नव्हे अत्यंत अज्ञानी । सामान्य ज्ञान वर्से त्यालागुनी । ह्मणोनि मध्यस्थ तो ॥ १४ ॥ ऐसा साधनचतुष्टयसंपन्न । आपली बद्धता जाणे पूर्ण । तोचि येथ अधिकारी जाण । श्रीरघुराया ॥१५॥ अनादि अज्ञानें भ्रमला । परी ह्मणे मज बंध जाला । या उपाय पाहिजे केला । सुटिकेलागीं ॥१६॥ बद्धासि सुटिका आहे । ऐसेंही पूर्णता जाणताहे । सेविल्या सद्गुरूचे पाये । मोक्ष सिद्धचि ॥ १७ ॥ आतां ऐसा उपाय करीन । सद्गुरूसि जाईन शरण । तेणें उपदेशिल्या ज्ञान । मोक्ष सिद्ध होये ॥ १८ ॥ ऐसा निश्चयो जयासी । सर्वदा उदास विषयांसी । तोचि यया शास्त्रासी । अधिकारी जाण ॥ १९ ॥ यया शास्त्राचे ठायीं । तोचि येकु अधिकारी पाहीं । इतर ते नव्हती हेंही । निरूपिलें मागें ॥ ४२० ॥ ऐसा जो अधिकारी । वैराग्यविषयव्यापारी । आणि साधुभजनीं पुरी । आवडी जया ॥ २१ ॥ साधुभजनीं आवडी । नावडे विषयांची गोडी । ययासि अनुग्रह निरवडी । पाहिजे ईश्वराचा ॥ २२ ॥ ईश्वरानुग्रहाविण । हें अर्थद्वय न घडे जाण । आतां ईश्वरानुग्रह कैसेन । होईल तें सांगें ॥ २३ ॥ जें कीं कर्म नित्यनैमित्तिक । जें कीं वर्णाश्रमनियामक । तें करूनियां सम्यक । ईश्वरीं अर्पावें ॥ २४ ॥ संध्यास्नानादि प्रतिदिनीं । अग्निहोत्रादि यजनीं । तें नित्यकर्म केलियावांचुनी । प्रत्यवार्य करी ॥ २५ ॥ तें जाणावें नित्यकर्म । नैमित्तिकाचें सांगेन वर्म । राहुप्रयागादिपितृधर्म । वर्षादि जाण ॥ २६ ॥ नित्यकर्माहूनि जें उंचावे । तें तें नैमित्तिक जाणावें । तें भक्तीकरूनि अनुष्ठावें । अत्यादरें ॥ २७ ॥ तें ईश्वरा निष्कामबुद्धि अर्पण । विनियोगपूर्वक जाण । करणें तें ईश्वरभजन । अनन्यपणें ॥ २८ ॥ तेणें होय अंतःकरणशुद्धि । क्षयातें पावे पापसमृद्धि । ईश्वरीं प्रेमा निरवधि । भक्ति उपजे ॥ २९ ॥ ईश्वरीं जे अनन्य प्रीति । तेचि जाण विमल भक्ति । तेणें आभारे विश्वमूर्ति । सर्वेश्वरु तो ॥ ४३० ॥ ईश्वर आभारलेपणें । भक्तासि अनुग्रह करणें । तेणें वैराग्य तीव्रपणें । उपजे देहीं ॥३१॥ ईश्वरानुग्रहें साधुसंगति । करणें हें उपजे सर्वदा चित्तीं । साधु सेवेची परम आर्ति । नित्य तृप्ति साधुसंगें ॥ ३२ ॥ जो परम भाग्यें आथिला असेल । त्यासिची अनुग्रह ईश्वराचा होईल । अनुग्रहाची खूण सकळ । ऐक सांगों ॥ ३३ ॥ ईश्वरानुग्रहें विषयविरक्ति । ईश्वरानुग्रहें शमदमप्राप्ति । ईश्वरानुग्रहें विमल भक्ति । साधुसंगति ईश्वरानुग्रहें ॥ ३४ ॥ ईश्वरानुग्रहें साधु भेटावा । ऐसी आवडी उपजे जीवा । ईश्वरानुग्रहें दयेचा ओलावा । हा जाणावा ईश्वरानुग्रह ॥ ३५ ॥ अगा ईश्वरानुग्रहाविण । नुपजे करावें साधुसेवन । त्याचेनि मुखें शास्त्र श्रवण । नुपजे पूर्ण वसिष्ठ बोले ॥ ३६ ॥ तया श्लोकाची व्युत्पत्ति । येकाग्र आयिकावी संविंत्ति । श्रीवसिष्ट महामति । अतिप्रीति अनुवादे ॥ ३७ ॥

॥ व०उ० ॥ यावन्नानुग्रहः साक्षाज्जायते परमेश्वरात् ॥ तावन्न सद्गुरुं कश्चित्सच्छास्त्रमपि नो लभेत् ॥ २ ॥

जोंपर्यंत रघुनाथा । ईश्वरानुग्रह नव्हे तत्वता । तों गुरुप्राप्तीची आवडी ताता । कदा कल्पांता उपजेना ॥ ३८ ॥ येक ह्मणती अनुग्रह तोचि । जे सर्वदा संपन्नता संपत्तीची । परलोकीं स्वर्गभोगाची । प्राप्ति साची जेणें होये ॥ ३९ ॥ हा तंव अनुग्रह सामान्य । ह्मणऊन 'साक्षात्' पद घेतलें जाण । जें उभय सुखांचें वैरस्यपण । ईश्वरानुग्रहें ॥ ४४० ॥ साक्षात् ईश्वरानुग्रहेंविण । न घडे सद्गुरूसि दर्शन । भेटल्या सद्गुरु जाण । भावार्थ पूर्ण तेथ उपजे ॥ ४१ ॥ उपजलाही सद्भावो । प्रसन्न जाला सद्गुरुरावो । परी प्रश्नाचा प्रस्तावो । करणें हा भाव उपजेना ॥ ४२ ॥ न करितां सद्गुरूसि प्रश्न । न करितां सच्छास्त्रकथन । शिष्यासि न घडे श्रवण । चित्तीं वणवण अपूर्णतेची ॥ ४३ ॥ मुख्य शास्त्र तें महावाक्य । जें सद्गुरुमुखींचें बीजभूतक । श्रवणमात्रेंचि अज्ञानपूर्वक । विश्वावलोक मावळे ॥ ४४ ॥ जेणें समूळ तुटे संसार । तेंचि सशास्त्रअक्षर । सकळां शास्त्रांचें सार । गुह्यतर सकळ विद्या ॥ ४५ ॥ महावाक्य तें सूत्रभूत जाण । इतर वेदांत ते वृत्तिस्थान । वाक्यश्रवणेंही असंभावन । जालिया श्रवण वेदांताचें ॥ ४६ ॥ महावाक्येंचि साक्षात्कार जाला । तरी वेदांतश्रवण कासयाला । तो नव्हतां संभावना जयाला । वेदांता आयिकावें ॥ ४७ ॥ ह्मणोनि महावाक्य तें सूत्र होये । सर्व वेदांत

---

१ स्पष्ट होते. २ चार प्रकारच्या साधनांनीं युक्त. ३ वैराग्य प्राप्तीचीं साधनें प्राप्त करून घेणारा. ४ खरोखरा. ५ हे दोन अर्थ. ६ वर्ण ( ब्राह्मणादिक ) व आश्रम ( ब्रह्मचर्यादि ) यांचें नियमन करणारें. ७ यज्ञकर्मांत. ८ दोष. ९ अतिशय.

तें वृत्तिरूपें अंग पाहें । ह्मणोनि सच्छास्त्र तें आन नव्हे[1] । बोलिला पाहे ह्मणउनी ॥ ४८ ॥ यालागीं त्याचें गुरुमुखें श्रवण । ईश्वरानुग्रहावांचून । कल्पांतीं न घडे जाण । करितांही प्रयत्न सहस्रावधि ॥ ४९ ॥ यालागीं परब्रह्म तो सद्गुरु । ज्याचेनि शब्दमात्रें तुटे संसारु । होय प्रपंच मृगजळपूरु । साक्षात्कारु स्वरूपेंसी ॥ ४५० ॥ अथवा ईश्वराचे अनुग्रहेंविण । न घडे सद्गुरूचें दर्शन । जेथें न घडे सद्गुरुसेवन । तेथें शास्त्रश्रवण तें कैंचें ॥ ५१ ॥ शास्त्राचार[2] हें ज्ञानाप्रति । अंतरंगसाधन गा रघुपति । ईश्वरानुग्रहेंविण नव्हे प्राप्ति । जाण सर्वार्थी दोहींची ॥ ५२ ॥ आतां संसारार्णवलंघनीं[3] । नाहीं सद्गुरुवांचुनी । शब्दमात्र सांगतां श्रवणीं । संसार स्वप्नीं दिसेना ॥ ५३ ॥

महानुभावसंपर्कात्संसारार्णवलंघने । युक्तिः संप्राप्यते राम दृढा नौरिव नाविकात् ॥ ३ ॥

संसाराब्धि महाथोर । तेथ अज्ञानजळ अपार । कामक्रोधांच्या लहरी[4] फार । तेणें परपार न पाविजे ॥ ५४ ॥ लहरींचें महाथोर भांडण । तेणें ज्ञानतारूं बुडविती संपूर्ण । काम क्रोध हे वैरी जाण । निपटूनि ज्ञान निर्दळिती ॥ ५५ ॥ कामक्रोधांचिया वळसां । ज्ञानतारूं बुडतां सहसा । तें नाहींचि करिती गा वीरेशा । अपभ्रंशा मूळ हेंचि ॥ ५६ ॥ यदर्थी भगवंत आपण । पार्थासि[5] बोले वचन । सर्व शास्त्रांसि प्रमाण । प्रकाशमान भगवद्गीता ॥ ५७ ॥

संमति श्लोक ॥ काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः । महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम् ॥

यालागीं वैरी हे अज्ञानाकाम क्रोध सबळ जाण।त्या लहरी संपूर्ण निबिडघन। अज्ञानजळीं ॥५८॥ रजोगुणाचा महावात[6] । तेणें कामक्रोधलहरी उसळत।ज्ञानतारूं अकस्मात । सामग्रीसहित[7] बुडोनि जाये ॥५९॥ तेथ गुणात्रयवृत्तींचें[8] भरितें । भरिती वासना खारियातें[9] । तेणें जळें सभोंवतें । मार्गु तेथें दिसेना ॥ ४६० ॥ नानाभोगेच्छा तेंचि क्षारपण । तेंणें तें सेवितां नये जाण । सेविलें तरी निर्धारें मरण । अकारण प्राप्त होये ॥ ६१ ॥ तेथें बुद्धिनेत्र उघडूनि पाहतां । तेणें नेत्रीं भरे क्षारता । मग निर्बुजूं लागे तत्वतां । मार्गु आतां कोण देखे ॥ ६२ ॥ तेथ प्रमोदाचे[10] वळसे । विपरीतज्ञानें उठती कैसे । आपण विसरोनि अनारिसें । देखे पिसें जयापरी ॥ ६३ ॥ स्वर्ग नरक हे मर्यादा । त्याहूनि वरतें न चढे कदा । तेथ कामक्रोधाची बाधा । उसंत[11] कदा न पाविजे ॥ ६४ ॥ त्या जळामाजी नाना जळचर । मीन मद मत्सर मगर । तयांचा अतिमार थोर । सगळा नर गिळिती ॥ ६५ ॥ मदमीनाचे तोंडीं पडिले । ते तेणेंचि चघळूनि टाकिले । मत्सरमगरमिठीं सांपडले । ते गेले न येतीचि ॥ ६६ ॥ दंभ नक्र महाथोर । भयंकर अतिप्रचुर । ते ज्ञानतारूं चकचूर । अतिसत्वर करिताती ॥ ६७ ॥ ऐसिया महासमुद्रा आंत । कोण पां तरेल अकस्मात । स्वभुजा तरावया उद्यत । येक आर्त निघाले ॥ ६८ ॥ ते नेणपणाच्या वळसां । बुडोनि गेले गा सहसा । येक कर्ममार्गाचे धारवसां । पडिले जन्ममृत्यूच्या ॥ ६९ ॥ विधिनिषेधाच्या कुमार्गी । पडती नरकीं चढती स्वर्गी । ते बुडाले आशेलागीं । कर्ममार्गी चालतां ॥ ४७० ॥ येकीं नाना विद्यागुरु सेविले । ते तयांचे कांसे लागले । ते मदमीनें गिळिले । नाहीं निघाले दोघेजण ॥ ७१ ॥ येकीं देहवयसेची पेटी । बांधली अभिमानप्रवृत्तिपोटीं । ते कामलहरीचे कपाटीं । थावरां शेवटीं घातले ॥ ७२ ॥ येक शब्दज्ञानाचे होडगां । बैसले भरंवसा धरूनि पैं गा । ते भरले अनेका मार्गां । बुडाले वेगां शुद्धि नाहीं । ॥ ७३ ॥ येक तपाचा धरूनि भरंवसा । भवसमुद्र तरावयाच्या आशा । रिघाले ते गर्ववळसां । पडले सहसा न निघतीच ॥ ७४ ॥ ऐसे नानाउपाय करूनी । नानासाधनें साधुनी । प्रवर्तले भवार्णवलंघनीं। परी गेले बुडोनि रघुवर्या ॥ ७५ ॥ यालागीं गा रघुनाथा । भवार्णवलंघनासि ताता । येकुचि उपावो तत्वतां । सांगेन आतां परियेसीं ॥ ७६ ॥ तरी संपर्कें महानुभावाचेनी । अपरोक्ष ज्ञान पावोनी । तेणेंचि तरिजे भरंवसेनी । अतिनिर्वाणीं भवार्णवु ॥ ७७ ॥ अगा महानुभाव शब्दें सद्गुरु । याचा परिस पां विचारु । थोर सामर्थ्याचा सागरु । अतिगंभीर पूर्णत्वें ॥ ७८ ॥ सर्वही विद्या कौशल्यनिष्ठ । अज्ञानछेदनीं अतिवरिष्ठ । ह्मणऊनियां सकळां श्रेष्ठ । सामर्थ्य उत्कट गुरुत्वें ॥ ७९ ॥ येव्हडें सामर्थ्य जयापाशीं । तें महानुभावत्व बोलिजे गुरूसी । त्यापासाव युक्ति पाविजे ऐसी । जे अज्ञानासि निर्दळी ॥ ४८० ॥ सद्गुरूचेनि चरणस्पर्शें । ज्ञान पाविजे आपैसें । तेंचि भवाब्धि तरावया ऐसें ।

१ संसाररूपी मृगजळाचा पूर. २ शास्त्रप्रमाणें वागणें ३ संसार समुद्र तरून जाण्यास. ४ लाटा. ५ अर्जुनास. ६ मोठा वायु. ७ आंतील पदार्थांसह. ८ सत्व, रज, तम यांचें. ९ खारटपणा. १० मोहांचे. ११ विश्रान्ति. १२ मासा.

सावकाश दृढ तारूं ॥ ८१ ॥ दृढ शब्दें बोलिजे अविनाश । ज्यासि नाहीं असंभावनादिकीं नाश । तें ज्ञानतारूं सावकाश । सद्गुरु परेश भेटवी ॥ ८२ ॥ महारण्यामध्यें नदी । पुरें दाटली जैसा जलधि । ते तरावयाचिया संधीं । नानाउपायीं तरवेना ॥ ८३ ॥ तेथें नावाडी अकस्मात । दृढ नाव घेऊनि आला प्राप्त । ते लाहोनियां त्वरित । संकट तेथ तरिजेचि कीं ॥ ८४ ॥ तैसें सद्गुरुपासूनि ज्ञानतारूं । लाधलें ते पावले पैल पारु । इतरां भवार्णवीं अपाय थोरु । तो सविस्तरु सांगितला ॥ ८५ ॥ यालागीं गा रघुपति । जाणतीं नेणतीं सद्गुरुमूर्ति । उपासावी अनन्यगति । परम प्राप्ति पावावया ॥ ८६ ॥ अथवा गुरु न करितां साधुसंगति । तत्संगें वासनादि मळ जाती । सद्गुरु सेवावा हे उपजे भ्रांति । यालागीं सेविती महानुभाव ॥ ८७ ॥ ह्मणोनि महानुभावसंपर्कें । ज्ञान पाविजे निकें । भवार्णवलंघनीं कौतुकें । तारूंचि निकें ऐसें असे ॥ ८८ ॥ यालागीं जेथ नसती महानुभाव । तो देश अथवा नगर गांव । सांडावा गा सर्वथैव । श्लोकभाव परियेसीं ॥ ८९ ॥

यस्मिन्देशे हि तत्वज्ञो नास्ति सज्जनपादपः । सफलः शीतलच्छायो न तत्र दिवसं वसेत् ॥ ४ ॥

जे देशीं नाहीं सज्जन । तो देश नव्हे महारण्य । जे ग्रामीं नाहीं सज्जन । तें स्मशान गा रघुराया ॥ ४९० ॥ जो महारण्यांत पडला । अतिसंतापें तापला । क्षुधातृषा असे पिडला । अति दगदगला चालतां ॥ ९१ ॥ तया कल्पवृक्ष भेटला सफळ । करिलें पुरवी आणि शीतळ । तो तापादि सकळमेळ । शमवी सकळ सेविलिया ॥ ९२ ॥ तैसा जो संसारतापें तापे । तया विश्रांविजे सज्जनपादपें । जो वाणला असेल अनुतापें । संसारें जो ॥ ९३ ॥ वृक्ष अनेकही भेटती । परी ते पुरऊं न शकती आर्ति । खैरआदी बोरी जाति । वृक्ष ह्मणती आपजया ॥ ९४ ॥ ऐसे वृक्षादि ताड बाभूळ । सांवरी सादोडे इत्यादि सकळ । हे जातीकरूनि वृक्षकुळ । परी तळमळ शमवितीना ॥ ९५ ॥ तैसे भेटती अनेक सज्जन । जपी तपी व्रती जाण । याज्ञिककर्मी शब्दज्ञान । अतिनिर्वाण जयांपासीं ॥ ९६ ॥ येक बहूदक कुटीचक वनचर । येक पर्वतवासी कंथाधर । येक भगवे येक दिगंबर । नानावेषधर जे असती ॥ ९७ ॥ येक माळ मुद्रा धरिती । येक ते जटाजूट वाढविती । येक जटी द्विजटी त्रिजटी असती । बहु देखिजती उदासपणें ॥ ९८ ॥ येक कक्षोपस्थीं जटा वाढविती । दीर्घजटी बोलिजती । येक ते नखें वाढविती । मौनवृत्ति सदाचार ॥ ९९ ॥ येक ते परिव्राजक सन्यासी । एक ते बोलिजती कर्मसंन्यासी । येक दंडी त्रिदंडी ऐसी । नानावेषीं शोभती ॥ ५०० ॥ येक ते करपात्र करिती । येक ते गोमुखें जेविती । येक ते यत्नेंहि भक्षिती । भिक्षा करिती येक मेळें ॥ १ ॥ येक ते अघ घुवोनि जेविती । येक सर्वत्र येकत्र करिती । येक ते परहस्तें जेविती । येक विदळु करिती नानाविध ॥ २ ॥ येका पंचगृहीं नेम । येकासि मौनाचा अतिसंभ्रम । येक ते लिंब छिरडे भक्षून । इंद्रियें दमन करिताती ॥ ३ ॥ येक शिश्नाचा भंगा घेती । येक वृषण नाभिस्थाना नेती । हेचि उपायें इंद्रियदमनाप्रति । येक करितां स्वस्वधर्म ॥ ४ ॥ स्तुतियांतें लोक भावना । सज्जन ह्मणती गा सज्ञाना । ते भेटलिया भवभावना । छेदु अज्ञाना काय होय ॥ ५ ॥ यालागीं अन्य वृक्षांची सरी । या सज्जनांसि दिधली पुरी । संतापु क्षुधा तृषा निवारी । येर वृक्षीं ते तरी शक्ति नाहीं ॥ ६ ॥ ऐसिया सज्जनांचेनि दर्शनें । कैसें जाइल अज्ञान तेणें । अज्ञान निरासेंविण निवणें । कोण्हेही गुणें घडेचिना ॥ ७ ॥ तत्त्वज्ञ आणि सज्जन । हें एकार्थ पदद्वय जाण । पुनरुक्त कोण्ही आशंकन । करी त्यावचन निवारण हें ॥ ८ ॥ सज्जन शब्दें तैसा तर्क करिती । जरी हे महानुभाव बोलिजती । ह्मणोनि तत्त्वज्ञ पद महामति । वसिष्ठ सर्वार्थीं बोलिले ॥ ९ ॥ अथवा सज्जन शब्दें जाण । सत्कर्मानुष्ठाता शास्त्रज्ञ । आणि तत्त्वज्ञ उत्तम । तेचि संपूर्ण कल्पवृक्ष ॥ ५१० ॥ तत्त्व शब्दें बोलिजे परब्रह्म । तें जाणे तो तत्त्वज्ञ । तत्त्वज्ञ होत्साता सज्जनोत्तम । निरुपम सर्वार्थीं ॥ ११ ॥ ऐसा वृक्ष जो कीं तत्त्वज्ञ । त्यासिच बोलिजे सज्जन । तो जे देशीं नाहीं जाण । तेथें दिवस क्षण न बसावें ॥ १२ ॥ तो देशु नव्हे परदेशु । ग्राम नव्हे तो नरकवासु । गृह नव्हे तो कारागृहनिवासु । जेथें शुद्धांशु सज्जन नाहीं ॥ १३ ॥ ते देशीं एक क्षण । सर्वथा राहों नये गा जाण । रघुनाथा तूं सर्वज्ञ । हेचि खुण जाणावी ॥ १४ ॥ असत्संगें नरक होती । ह्मणोनि न करावी ते संगति । सत्संगें होये मुक्तिप्राप्ति । ह्मणोनि सत्संगति

---

१ इच्छा. २ खरें. ३ साधुरूपी वृक्षानें. ४ आपणाला. ५ रुईवगैरे. ६ हात हेंच भांडें. ७ पांच घरीं भिक्षेस जाण्याचा नियम. ८ मोठा आनंद. ९ इंद्रियें ताब्यांत ठेविण्यास. १० एकाच अर्थाचीं. ११ दोन पदें. १२ बंदिखान्यामध्यें राहणें.

सर्वदा करीं ॥ १५ ॥ जे कीं आपणातें नेणोन । स्त्रैणजन स्त्रिये आधीन । नरक त्यांचे संगतीकरून ऐसें श्रीभगवान स्वयें बोले ॥ १६ ॥

संमतिश्लोक । महत्सेवां द्वारमाहुर्विमुक्तेस्तमोद्वारं योषितां संगिसंगम् । महांतस्ते समचित्ताः प्रशांता विमन्यवः सुहृदः साधवो ये । रहूगणैतत्तपसा न याति न चेज्यया निर्वपणाद्गृहाद्वा । न छंदसा नैव जलाग्निसूर्यैर्विना महत्पादरजोऽभिषेचनम् । नैषां मतिस्तावदुरुक्रमांघ्रिं स्पृशत्यनर्थापगमो यदर्थः । महीयसां पादरजोभिषेकं निष्किंचनानां न वृणीत यावत् । संसारेऽस्मिन्क्षणार्धोऽपि सत्संगः शेवधिर्नृणाम् ।

इत्यादि वचनें व्याहावीं किती । सत्संगें होये मुक्तिप्राप्ति । असत्संगें नरक होती । ऐसें श्रीपति स्वयें बोले ॥ १७ ॥ सत्सेवा तें मोक्षाचें द्वार । स्त्रीसंगियांच्या संगें नरक घोर । यालागींच सत्संग निरंतर । दृढतर करावा कीं ॥ १८ ॥ ब्रह्मीं ज्यांचें सर्वदाचित्त । समब्रह्मत्व विश्व हें देखत । अधमोत्तम सर्वथा नेणत । सदोदित ब्रह्मपणें ॥ १९ ॥ अतएव ते अतिशयेंसि शांत । विश्वोपाधि न स्फुरे किंचित । सर्व देखती ब्रह्म निश्चित । ह्मणोनि गलित क्रोध ज्यांचा ॥ ५२० ॥ दुसरेपणें दुसरें स्फुरावें । तेंही प्रतिकूळत्वें जन्हीं भासावें । तन्हींच क्रोध तेथें संभवे । येन्हवीं नव्हे ब्रह्मदृष्टया ॥ २१ ॥ प्रतिकूळ कोणहा न देखती । ह्मणोनि सर्वांचे सुहृदयस्थ होती । उपकार नापेक्षून उपकार करिती । सोडविती भवबंधा ॥ २२ ॥ ययालागीं ते कृपाळू । संसारें गांजिल्या दीनाचे दयाळू । आपपर नेणोनि स्नेहाळू । अति कनवाळ सदयपणें ॥ २३ ॥ ऐसीं साधुलक्षणें बोलावीं किती । पारु नाहीं गा साधुकीर्ति । जे लक्षणें ब्रह्मीं वर्तती । तेचि स्थिती सज्जनांची ॥ २४ ॥ ते सदाचारें निर्मळ । कामक्रोधादि त्यां नाहीं आडळ । राहाटी वाचा जयांची सरळ । तृप्त केवळ परमानंदें ॥ २५ ॥ ऐसेंचि जडभरत रहूगणाप्रति । ह्मणे साधूविण नव्हे ब्रह्मप्राप्ति । यज्ञ तप दान संन्यासगति । नव्हे प्राप्ति वेदाध्ययनें ॥ २६ ॥ जळअग्निसूर्यउपासना । कोलिया ब्रह्मप्राप्ति नव्हे जाणा । न सेवितां येक सज्जना । न करितां स्नाना तत्पादरजें ॥ २७ ॥ शास्त्राभ्यासें जालेंही जें ज्ञान । परी अपरोक्षता नव्हेचि जाण । न सेवितां संतपादरजःकण । बुद्धीसि स्पर्शन स्वरूपीं न घडे ॥ २८ ॥ जैसें निधिलाभें अतिसुख आहे । तैसें क्षणार्धें सत्संगें होय । परी विषयसुख नश्वर आहे । सत्संगें पाहें ब्रह्मसुख ॥ २९ ॥ आणीकही गा रघुनाथा । साधुसंगेंविण साधन ताता । केलियाही होती वृथा । सत्संग न करितां जाण तूं ॥ ५३० ॥ ऐसें षड्गुणैश्वर्यसंपन्न । स्वयें बोले श्रीकृष्ण । उद्धवाप्रति जिवींची खूण । बाहे उभऊन बोलती ॥ ३१ ॥

संमतिश्लोक । न रोधयति मां योगो न सांख्यं धर्म एव च ॥ न स्वाध्यायस्तपस्त्यागो इष्टापूर्तं न दक्षिणा ॥ १ ॥ व्रतानि यज्ञश्छंदांसि तीर्थानि नियमा यमाः ॥ यथावरुंधे सत्संगः सर्वसंगापहो हि माम् ॥ २ ॥

ह्मणे अरे उद्धवा परियेसीं । अष्टांगयोग अतिप्रयासीं । केलिया जाण सर्वस्वेंसीं । मज हृदयस्थासि नेणती ते ॥ ३२ ॥ तैसें आत्मानात्मविवेक । बोलिलें सांख्यशास्त्र सांख्य । तेंही मज वश करी देख । ध्यानासि सम्यक् नागवें मी ॥ ३३ ॥ तरी सत्संगें पावले कोण । तेंही आतां तुज सांगेन । आइक येकाग्र करूनि मन । ह्मणे श्रीकृष्ण उद्धवासि ॥ ३४ ॥ जेहीं जेहीं सत्संग केला । तयांसिचि मी प्राप्त जाला । येरां संसारचि उरला । अन्यसाधनांला प्रवर्त्तले जे ॥ ३५ ॥

संमतिश्लोक । सत्संगेन हि दैतेया यातुधाना मृगाः खगाः । गंधर्वाप्सरसो नागाः सिद्धाश्चारणगुह्यकाः ।
विद्याधरा मनुष्येषु वैश्याः शूद्राः स्त्रियोऽत्यजाः । रजस्तमःप्रकृतयस्तस्मिंस्तस्मिन्युगे युगे ।
बहवो मत्पदं प्राप्तास्त्वाष्ट्रका यादवादयः । वृषपर्वा बलिर्बाणो मयश्चाऽथ बिभीषणः ।
सुग्रीवो हनुमानृक्षो गजो गृध्रो वणिक्पथः । व्याधः कुब्जा व्रजे गोप्यो यज्ञपत्न्यस्तथा परे ।
ते नाधीतश्रुतिगणा नोपासितमहत्तमाः । अव्रतातप्ततपसः सत्संगान्मामुपागताः ।
केवलेन हि भावेन गोप्यो गावो नगा मृगाः । येऽन्ये मूढधियो नागाः सिद्धामामीयुरंजसा ।
यं न योगेन सांख्येन दानव्रततपोऽध्वरैः । व्याख्यास्वाध्यायसंन्यासैः प्राप्नुयाद्यत्नवानपि ।

ह्मणोनि सत्संगें दैत्यांसि मुक्ती । राक्षसां सत्संगें माझी प्राप्ति । मृग पक्षी यांसि सत्संगति । माझी प्राप्ति जाली असे ॥ ३६ ॥ गंधर्व अप्सरा नाग देख । सिद्ध चारण आणि गुह्यक ।

---

१ स्त्रियांच्या नादीं लागणारे २ दुर्जनांच्या संगतीनें. ३ जगाचा अडथळा. ४ स्पर्श. ५ उदक, अग्नि व सूर्य यांची भक्ति. ६ हात वर करून. ७ आत्मा व अनात्मा या संबंधीं विचार. ८ सांपडत नाहीं. ९ झालों. १० पर्यंत.

विद्याधर आणि मनुष्यप्रमुख । सत्संगें मत्सुख पावले ॥ ३७ ॥ मनुष्यांमाजी हीनयाति । वैश्य शूद्र स्त्रिया कुमति । अतिचांडाळ अंत्यजाति । तेही मत्प्राप्ति सत्संगें ॥ ३८ ॥ अगा रजतमप्रधाना । जयांच्या प्रकृति असती हीना । तेही पावले मज जाणा । सेवितां सज्जनां भक्तिभावें ॥ ३९ ॥ ऐसे सांगिजे किती । माझें स्वरूप पावले साधुसंगति । वृत्रासुर प्रल्हादप्रभृति । नेणों किती पावले मज ॥ ५४० ॥ वृषपर्वा बळि आणि बाण । मयदैत्य आणि बिभीषण । वानरांमाजी सुग्रीव हनुमान । ऋक्षराज जाण पावले ॥ ४१ ॥ जटायु आणि तुळाधार । वाणि गज गृध्र पापसार । तोही पावला माझें घर । थोर बडिवार सत्संगाचा ॥ ४२ ॥ धर्मव्याध पापमूर्ति । त्यासिही सत्संगें माझी प्राप्ति । कुब्जा तीं ठायींचि वक्र होती । तीसि सत्संगति मीचि प्राप्त ॥ ४३ ॥ अगा वृंदावनींच्या गौळणी । कोण ज्ञान तयांलागुनी । स्त्रीजाति आणि वसति वनीं । आचारकरणी काय त्यांची ॥ ४४ ॥ आणखी याज्ञिकांचिया स्त्रिया । यज्ञपत्न्या बोलिलिया । मूढ जाति अज्ञानाचिया । असती घडलिया ब्रह्मेनी ॥ ४५ ॥ तिहीं वेदशास्त्र नाहीं पढिन्नले । तिहीं गुरु नाहीं सेविले । व्रततपादी नाहीं केलें । सत्संगेंचि पावले स्वरूप माझें ॥ ४६ ॥ अगा जें कीं माझें स्वरूप । न पाविजे साधन करितां अमूप । योग सांख्य दान व्रत तप । याग अमूप जरी केले ॥ ४७ ॥ सकळ शास्त्रासि अभ्यासिलें । कां नित्य वेदाध्ययन केलें । संन्यासी विधीनें जाले । प्रयत्न केले नानाविध ॥ ४८ ॥ तऱ्ही सत्संगेंविण जाण । मी प्राप्त नव्हे संपूर्ण । सत्संगें सर्व साधन । मत्प्राप्तीकारणें साधुसंग ॥ ४९ ॥ साधुसंगें सर्व प्राप्ति । साधुसेवनें साधनसंपत्ति । करणें न लगे गा सर्वार्थी । सत्संगें तृप्ति स्वानंदाची ॥ ५५० ॥

संमतिश्लोक । यथोपश्रयमाणस्य भगवंतं विभावसुम् । शीतं भयं तमश्चेति साधून्संसेवतस्तथा । निमज्योन्मज्जतां घोरे भवाब्धौ परमायनम् । संतो ब्रह्मविदः शांता नौर्दृढेवाप्सु मज्जताम् । अन्नं हि प्राणिनां प्राण आर्त्तानां शरणं त्वहम् । धर्मो वित्तं नृणां प्रेत्य संतोऽर्वाग्बिभ्यतोरणम् । संतो दिशंति चक्षूंषि बहिरर्कः समुत्थितः । देवता बांधवाः संतः संत आत्माऽहमेव च ।

येका अग्नीचें केलिया सेवन । शीतभय जाय संपूर्ण । अंधकारु जाय नाशोन । समाधान जैसें होये ॥ ५१ ॥ तैसें येक सत्संगें करूनि । कर्मादिजाड्य जाय नासोनी । आगामी जे संसारश्रेणि । त्याचें मनीं जें भय वाटत होतें ॥ ५२ ॥ अथवा यमपुरींच्या यातना । भय जें उपजवी मना । कांपों लागे जन्ममरणा । तें अर्धक्षणामाजी जाये ॥ ५३ ॥ कर्मजाड्य आणि भयाचें मूळ । तें येक अज्ञानचि केवळ । तें सत्संगें जाय तत्काळ । सुखकल्लोळ साधुसंगें ॥ ५४ ॥ ह्मणोनि संत ते अग्निरूप जाण । सत्संगें होय अज्ञानछेदन । पळोनि जाय संसारदैन्य । सुखसंपन्न ब्रह्मानंदें ॥ ५५ ॥ अथवा संसारसमुद्रामाझारीं । परम दुःखाच्या महाघोरीं । बुडतां निघतां योनिद्वारीं । कुत्सित भारी उखनींचा ॥ ५६ ॥ श्वानसूकरादिका योनि । तेथें बुडे निघे मागुतेनी । उसंतु नाहीं अर्ध क्षणीं । भोगितां योनि नानाविधा ॥ ५७ ॥ तें चुकवावयाकारणें । किजेती नाना साधनें । तेणें कायचि होये योनिभोगणें । बैसे धरणें फलभोगाचें ॥ ५८ ॥ तया भवार्णवाच्या महापुरीं । ब्रह्मनिष्ठसाधु भेटे जरी । तरी क्षणार्धें बुडतां निवारी । पैलपारीं पाववी ॥ ५९ ॥ जैसी दृढ नाव पावे समुद्रीं बुडतां । तरीचि तो तरे अपाया बहुतां । तेथें अन्य साधनें नाना करितां । बुडे सर्वथा नावेविण ॥ ५६० ॥ तैसें सत्समागमेंविण । योनीमाजीं बुडणें जाण । न चुकेचि गहन । दुःख दारुण न चुकेचि ॥ ६१ ॥ जैसें प्राणियासि अन्नचि प्राण । पीडितासि मीचि येक शरण्य । तैसें संसारियासि संरक्षण । साधु जाण सर्वस्वेंसीं ॥ ६२ ॥ कां परलोकीं प्राणियासी । धर्मचि वित्त परियेसीं । तैसे संत हे बुडतयासी भयभीतासी रक्षक ॥ ६३ ॥ अगा साधूचें निजमहिमान । सरी न पवे सूर्यनारायण । तो डोळ्यां बाह्य प्रकाशी जाण । अंतरज्ञान न प्रकटी ॥ ६४ ॥ तैसा नव्हे तो सद्गुरुनाथ । सबाह्य अंतरा प्रकाश करित । कृपाकटाक्षें क्षणांत । करी भस्मांत संसार हा ॥ ६५ ॥ यालागीं सर्व देवता संत जाण । संत बंधु मित्र सुहृद सज्जन । संत प्रियत्वें आत्मा पूर्ण । संत चिद्घन ब्रह्मरूप ॥ ६६ ॥ संत माता संत पिता । संत सर्वस्वीं कुलदेवता । संत भवार्णवीं तारूं तत्वता । होय कृतार्थता सत्संगें ॥६७॥ ह्मणोनि सज्जनवृक्ष सेविल्या । त्यांचें दर्शन तें शीतळ छाया । जेणें पाप ताप हारोनियां । जिज्ञासा तया

१ रजोगुण व तमोगुण ह्यांनीं युक्त. २ जांववंत. ३ तागडी हातीं घेणारा ४ परब्रह्म स्वरूपाच्या योगानें. ५ कर्म केल्यापासून प्राप्त झालेलें अज्ञान. ६ पुढें येनारी. ७ जन्म मृत्युची माळा. ८ संसारसमुद्राच्या. ९ रक्षण करणारा.

खरी वेगें ॥ ६८ ॥ कीं तयांसि जाल्या शरण । अविद्येचें भस्मपूर्ण । फळ तेंचि पावे ब्रह्मपण । आर्तिहरण सर्वार्थी ॥ ६९ ॥ ऐसा सज्जन पादप निर्मळ । सफळ सीतळ प्रांजळ । संसारीक जे तळमळ । हरी सकळ कृपामार्गे ॥ ५७० ॥ ऐसे संत जेथें नसती । क्षणही तेथें नसावें सीतापति । संतमहिमा उद्धवाप्रति । बोलिले श्रीपति तें सांगितलें ॥ ७१ ॥ यालागीं सर्वदा सेव्य संत । जे संसारार्णवलंघनीं समर्थ । ते जेथें असती सर्वदा तेथ । वसावें नित्य रघुनाथा ॥ ७२ ॥

सदा संतोऽभिगंतव्या यद्यप्युपदिशंति न । या हि स्वैरकथास्तेषामुपदेशा भवंति ताः ॥ ५ ॥

यालागीं सर्वदा भक्तिभावें । संतांपासीं गा रामा जावें । गेलिया संत स्वभावें । उपदेश भावें करितील ॥ ७३ ॥ ते मेघाचेपरी उदार । उपदेश करिती वेदांतसार । जेणें अज्ञानपूर्वकसंसार । भस्मसार होऊनि ठाके ॥ ७४ ॥ यद्यपि जन्हीं उपदेश न करिती । तन्हीं प्राप्ति न चुके गा रघुपति । ते ज्या स्वैरकथा करिती । त्याचि होती उपदेशा ॥ ७५ ॥ संतांचें जें सहज बोलणें । तें महावाक्यासि करी ठेंगणें । उठवी संसाराचें धरणें । कर्म करणें तोचि विधि ॥ ७६ ॥ यालागीं संतांजवळि गेलिया । समूळ तुटोनि जाये माया । न साधितां पावे आपणया । जाय विलया भवभय ॥ ७७ ॥ संत सेविलिया भावें । काय काय वा लभ्य नव्हे । तें चित्त देऊनि परिसावें । सांगेन स्वभावें श्लोकार्थे ॥ ७८ ॥

शून्यमापूर्णतामेति मृतिरप्यमृतायते । आपत्संपदिवाभाति विद्वज्जनसमागमात् ॥ ६ ॥

तोचि श्लोकार्थ ऐसा । एकाग्र आयिकें गा वीरेशा । ज्ञानेंविण दशादिशा । सदा वोसा अनात्मपणें ॥ ७९ रिती बुद्धि आत्मेनविण । अनात्मपणें रितें अंतःकरण । इंद्रियें वोसें आत्मयावांचून । देह तो जाण अवघा रिता ॥ ५८० ॥ सकळांसि जालें शून्यपण । देश ग्राम शून्य जाण । शून्य चंद्र सूर्यतारागण । विश्व शून्य अनात्मत्वें ॥ ८१ ॥ शून्य तीर्थ क्षेत्र जाण । तेथ देवता उदक पाषाण । शून्य अग्नि आणि ब्राह्मण । कर्माचरण शून्यत्वें ॥८२॥ शून्य दशदिशा अंतराळ । शून्य अवघे कुळाचळ । शून्य सप्तही पाताळ । शून्य भूगोल अनात्मपणें ॥ ८३ ॥ जेणें देखे तेंही शून्य । जेणें चाले तें शून्य जाण । जेणें बोधे तेंही शून्य । जाण शून्यें प्रकाशकु ॥ ८४ ॥ एवं अंतर्बाह्य सकळ शून्यता । देश विदेश अवघी शून्यता । आत्मेनविण अवघा रिता । पोकळ सर्वथा अनात्मपणें ॥ ८५ ॥ तेंचि अवघें सत्समागमकरून । शून्यचि पावे पूर्णपण । ज्ञान पाविजे सत्संगेंकरून । अनात्मपण नाहींच होये ॥८६॥ तें अवघें सत्समागमास्तव । ज्ञान पाविजे गा अपूर्व । तेणें शून्य तेंचि पूर्ण सर्व । 'खल्विदंब्रह्म' होऊनि ठाये ॥ ८७ ॥ जो हारपला होता आत्मा । सर्व भासत होता अनात्मा । त्याची लोपली सर्व गरिमा । सर्व आत्मा होऊनि ठेला ॥८८॥ जैसे रज्जुच्या ठायीं नानाभ्रम । रज्जु लोपोनि अनेक परम । धारा माळा भुजंगोत्तम । अज्ञानकर्म इयापरी ॥ ८९ ॥ तेंचि सम्यक् ज्ञानेंकरूनी । जरी पाहिजे न्याहाळुनी । तरी तेंचि देहीं नानात्व जाउनी । रज्जु निर्वाणीं उरे येक ॥ ५९० ॥ तैसें सद्गुरुकृपेकरून । समूळ तुटलिया अज्ञान । हारपोनि जाये विश्वस्वप्न । उरे परिपूर्ण ब्रह्म येक ॥ ९१ ॥ तव्हां शून्य तें जालें अशून्य । नाहीं तें जाळें परिपूर्ण । सद्गुरुकृपेचें फळलेपण । ब्रह्म निर्वाण उरे येक ॥ ९२ ॥ तेणें दाहाही दिशा परिपूर्ण । दिशा विदिशा परिपूर्ण । बुद्धींद्रिय अंतःकरण । तेंहि परिपूर्ण ब्रह्मत्वें ॥ ९३ ॥ देह तोचि आत्मा पूर्ण । देश ग्राम चंद्र तपन । विश्वचि आत्मा परिपूर्ण । तीर्थ क्षेत्र पूर्ण पूर्णत्वें ॥ ९४ ॥ उदक पाषाण पंचभूतें । चराचर कर्माकर्म तें । अंतराळ कुलाचल रितें । ब्रह्मापरतें असेचिना ॥ ९५ ॥ देखणें देखावें तत्वतां । चालतां बोलतां आयिकतां । बुद्धि बोध बोधकता । सर्वा परिपूर्णता पूर्णपणें ॥ ९६ ॥ बाह्य आणि अभ्यंतर । आरतें परतें परावर । सर्वही सर्व प्रकार । ब्रह्म निरंतर ब्रह्मत्वें ॥९७॥ आतां येक येक किती बोलावें । सर्व परिपूर्णचि स्वभावें । शून्य तें परिपूर्णता पावे । संतांचे सेवेकरूनियां ॥ ९८ ॥ ऐसेनिही जो जाला मृत्यु । तो मोक्षरूपें अमृतु । कोण्ही प्राकृत मृत्यु ह्मणतु । तोही अमृत्यु धन्यपणें ॥ ९९ ॥ सत्संगें जो जाला मृत्यु । तोचि ह्मणतां अति अमृत्यु । हेंही होय ऐसा अर्थु । परि सिद्धांतपूर्वक ॥ ६०० ॥ आपत्ति तेचि संपत्ति । सत्संगें विपत्ति ते नव्हे आपत्ति । ऐसेंही येक ह्मणती । दुःख चित्तीं न वाटे ह्मणोनी ॥ १ ॥ तरी मुख्य अर्थाचें लक्षण । येकाग्र आइक सांगेन । ज्ञानी तो तंव अकिंचन । परिग्रहशून्य सर्वार्थी ॥ २ ॥ ते बाह्यदृष्टि दिसे आपत्ति । परि

---

१ संकटे नाहींशीं करणारे. २ वृक्ष. ३ फळें आलेला. ४ सेवा करावयास योग्य. ५ संसाररूपी समुद्रच्या पलीकडे जाण्यास. ६ स्वच्छंदानें बोललेल्या गोष्टी. ७ मेरु वगैरे कुल पर्वत. ८ आत्म्याविषयींचें अज्ञान. ९ मोठेपणा. १० सूर्य.

स्वानंदें सुखसंपत्ति । ऐश्वर्यें पूर्ण त्रिजगती । स्वाराज्य प्राप्ति स्वाराज्यें ॥३॥ समागमें ब्रह्मविदाचेनी । सर्वही तया पूर्णपणीं । यालागीं दुर्लभ त्रिभुवनीं । जनतारणीं ब्रह्मवेत्ता ॥ ४ ॥ ब्रह्मवेत्ता नसता अवनीवरी । तरी सकलही जन बुडते संसारीं । या महामोहाच्या पुरीं । कोण पां तारी साधूविण ॥ ५ ॥ अथवा असतांही ब्रह्मज्ञानी । ते राहते निरंतर समाधानीं । निर्विकल्पसमाधि अवलंबुनी । जरी निर्वाणीं राहते ॥ ६ ॥ तरी उपदेशव्यवहार कैसा होता । कोण या मुमुक्षांसि तारिता । तरी अज्ञानपुरें लोक दाटता । दुःखें बुडता भवार्णवीं ॥ ७ ॥

ज्ञानिनामपि चित्तं चेत्केवलात्मसुखोदितम् । सत्वाः संसारदुःखार्त्ताः कं यांति शरणं तदा ॥ ७ ॥

यालागीं ऋषिनायक । वसिष्ठ बोलिला आनंदें श्लोक । तयाचा हा अर्थ विशेष । आयिका सकल श्रोते हो ॥ ८ ॥ अथवा ज्ञानीही असती मिळत । ते दर्शना स्पर्शनासि फावत । तेणेंचि लोक तरत । जे भाग्यवंत सभाग्यपणें ॥ ९ ॥ ज्ञानी दुर्लभ संसारीं । सुलभाही आर्ति नुपजे पुरी । आर्ति जालियाही सहस्रांतरीं । येखादाचि वरी साधूसी ॥ ६१० ॥ ऐसिया साधूचें चित्त । केवळ आत्मसुखीं उद्यत । जालिया संसारपीडित । सत्वर शरणागत कोणा जाणें ॥ ११ ॥ ज्ञानियाचें जरी चित्त । सर्वदा होतें वस्तुगत । बाह्य पदार्थ नेणत । सुखसंवलित आत्मत्वें ॥ १२ ॥ तो निर्विकल्प समाधि । साधूंसि असतां निरवधि । केवल आत्मसुखैकाब्धीं । मनःशुद्धि विसरोनि जाये ॥ १३ ॥ तेथ चालणें ना बोलणें । नाहीं व्युत्थान पाहणें । नाहीं कर्माचें करणें । आपणेंविण न देखे ॥ १४ ॥ ऐसे सर्वदा समाधिस्थ । निरंतर राहाते जरी संत । तरी लोक जे अज्ञानावृत्त । शरणागत कोणासी जाते ॥१५॥ संतांसि शरण जावया । जो संसारें पिडिला प्राणिया । अति दुःखें दाटला निघावया । मार्गु न दिसे अथा तो अधिकारी ॥ १६ ॥ येणें अतिवैराग्य सूचलें । तें अखंड जया बाणलें । त्यासिच डोहळे उपजले । जाय वहिलें शरण संतां ॥ १७ ॥ यालागीं संसारदुःखें करूनी । अत्यंत पिडिला जो प्राणी । त्यासि विश्रांति संतचरणीं । सुख अनुदिनीं सत्संगें ॥ १८ ॥ अगा सत्संगेंचि वैराग्यज्ञान । सत्संगें कर्मानुष्ठान । सत्संगें भक्ति उपजे पूर्ण । आणि विज्ञान सत्संगें ॥ १९ ॥ सत्संगें जप तप ध्यान । सत्संगें अष्टांगयोगसाधन । सत्संगें जया योगनिर्वाण । सत्संगें जाण शमदमादि होती ॥ ६२० ॥ सत्संगें भाव उपजे देहीं । सत्संगें सद्गुरुभेटि पाहीं । सत्संगेंचि देहीं विदेहीं । ब्रह्मत्व पाहीं सत्संगें ॥ २१ ॥ सत्संगें संसारा नाशु । सत्संगें अज्ञानाचा ध्वंसु । सत्संगें प्राप्त परेशु । स्वरूपीं वासु सत्संगें ॥ २२ ॥ सत्संगें अष्टमासिद्धि । सत्संगें प्राप्त महारिद्धि । सत्संगें तरिजे भवाब्धि । आधि व्याधि दुरी सकळ ॥ २३ ॥ सत्संगें होय स्वाराज्य-प्राप्ति । सत्संगें बाणे निजशांति । सत्संगें स्वस्वरूपप्राप्ति । सत्संगें पाविजे सर्वांतें ॥२४॥ सत्संगें अंतःकरण निर्मळ । सत्संगें तुटे वासनाजाळ । सत्संगें सुखाचा सुकाळ । सत्संगें मेळ सत्वशुद्धीचा ॥ २५॥ अगा सत्संगापरतें कांहीं । या त्रैलोक्यांत बरवें नाहीं । यालागीं सर्वदा भलतेनही । सत्संग सर्वदा करावा ॥ २६ ॥ यालागीं सत्संगावांचून । कोणेही साधनेंकरून । अज्ञान हें तुटे जाण । कल्पांतीं पूर्ण रघुनाथा ॥ २७ ॥ अज्ञाननिरासावांचून । कदा नुपजे ब्रह्मज्ञान । ब्रह्मज्ञानेंविण समाधान । नव्हे जाण रघुवर्या ॥ २८ ॥ समाधान जालियावांचून । अज्ञता न वाणे गा पूर्ण । ब्रह्मतेविण गा जन्ममरण। विश्वभानभ्रम न चुके ॥ २९ ॥ यालागीं कृपेनें जाणोनि संत । राहिले संप्रज्ञातसमाधिस्थ । जन तारावया उद्यत । कृपावंत कळवळोनी ॥६३०॥ जें आर्त्तासि सांगावें ज्ञान । तेणें तोडावें संसारबंधन । जन मुक्त करावे जाण । स्वयें आपण विसरोनि ॥ ३१ ॥ जे दुसरियासि नये उपकारा । त्यां काय वाहोनि ज्ञानभारा । न पुसतां सांगणें तो पसारा । सैरा बोलों नये ॥ ३२ ॥ जो संसारदुःखें अति आर्त्त । श्रीगुरूसि होय शरणागत । तयासि सांगिजे तोचि सार्थकार्थ । ज्ञान निश्चित रघुनाथा ॥ ३३ ॥

तज्ज्ञानं स च शास्त्रार्थस्तद्विज्ञानमखंडितम् । सच्छिष्याय विरक्ताय साधो यदुपदिश्यते ॥ २८ ॥

तेंचि ज्ञान तोचि शास्त्रार्थ । तेंचि विज्ञान अखंडित । जें सच्छिष्य आणि विरक्त । त्यालागीं निश्चित उपदेशिजे ॥ ३४ ॥ हें श्लोक पदव्याख्यान । याचें सांगिजेल विवरण । तेचि भावार्थटीका जाण । परिपूर्ण परियेसा ॥ ३५ ॥ ज्या शिष्यासि उपदेशिजे ज्ञान । त्याचें रघुनाथा ऐक चिन्ह

१ ब्रह्म जाणणाराचे. २ लोकांचा उद्धार करावयास. ३ अज्ञानामध्यें गुरफटलेले. ४ कर्में करणें. ५ यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा, व समाधि हीं योगाचीं आठ अंगें ६ आत्मस्वरूपाची, ब्रह्माची, ७ कसेंही करून.

संक्षेपें तुज सांगेन । जाणसी खूण ज्ञानमूर्ति ॥ ३६ ॥ सच्छिष्य शब्दें सर्व सूचिलें । तेथें विरक्त पदें बोलिलें । पुनरुक्त नव्हे येणें बोलें । तरी काय बोलिलें आयिका ॥ ३७ ॥ जेणें निषिद्ध कर्म टाकुनी । काम्य कर्म सांडी वोलांडुनी । कर्मफल तें अंतवंत ह्मणोनी । उपेक्षुनि टाकी जो कां ॥ ३८ ॥ करी सत्कर्मानुष्ठान । नित्य नैमित्तिक अहेतुकपण । तेंही ईश्वरार्पण करून । जालें अंतःकरण शुद्ध ज्याचें ॥ ३९ ॥ जें निष्काम कर्म करणें । तें समूल कामनेतें उपडणें । तेंही जरी ईश्वरार्पण करणें । घररिघवणें चित्तशुद्धीतें ॥ ६४० ॥ ऐसी चित्तशुद्धि निर्मळ । बोलणें पाहणें ज्याचें प्रांजल । कदा कल्पांतीं नव्हे कुटिल । वर्त्तती सरल इंद्रियें ज्याचीं ॥ ४१ ॥ सदा पवित्र गंगा जैसी । निर्मळ जल यमुना तैसी । अकर्मवासनेचिया लेशीं । नव्हे सहसा समोर जो ॥ ४२ ॥ पाणी जेणें जेउतें नेलें । तेउतें आग्रहेंविण चालिलें । तैसें जयाचें वर्त्तणें जालें । आग्रह गेले जयापासुनि ॥ ४३ ॥ नवल अवगुणरहितवाचा । शुभेच्छासंकल्पु जयाचा । शुभेच्छा या बोलाचा । भाव साचा परियेसा ॥ ४४ ॥ जें नश्वरपणें अमंगल । जयाचा परिणाम कुश्चळ । तें विषयसुख सकळ । अतिकुटिळ इंद्रादिकभोग ॥ ४५ ॥ अमंगळ नश्वर जें जाण । ज्याचा परिणाम दुःखनिर्वाण ॥ तें अशुभ बोलिजे विषयाचरण । सत्प्रपंचपूर्ण रघुनाथा ॥ ४६ ॥ या सर्वांच्या निरासीं जें उर्वरित । ज्याचेनि प्रकाशें सर्व प्रकाशत । जें कीं अविनाशी पूर्ण भासित । अबाधित कालत्रयीं ॥ ४७ ॥ तेंचि शुभ गा रघुपति । जया ब्रह्म बोलिजे त्रिजगतीं । त्याची व्हावी मज प्राप्ति । दृढ आर्ति ते शुभेच्छा ॥ ४८ ॥ हे शुभेच्छा गा जयासी । तो सच्छिष्य रामा परियेसीं । कुसंग नावडे जयासी । मनोमानसीं गुरुभजन ॥ ४९ ॥ गुरु देव गुरु तीर्थ । गुरु तप दान गुरुव्रत । सद्गुरु जाण कुलदैवत । मंत्रतंत्रार्थ श्रीगुरु जया ॥ ६५० ॥ गुरु जननी गुरु पिता । गुरु सर्वेश्वरु गुरु ज्ञाता । सकळ शास्त्रार्थवक्ता । गुरुपरता देव नेणे ॥ ५१ ॥ गुरु कुलधर्म कुलाचार । गुरु सत्क्रिया सदाचार । गुरु ज्ञानदातेनवें उदार । विष्णु ब्रह्मा हर गुरुमूर्ति ॥ ५२ ॥ ऐसा अनन्यपणें गुरुवांचुनि । कांहीं नेणे जागृति स्वप्नीं । गुरुरूपें मनीं नयनीं । न विसंबे ह्मणी मन अवधानपणें ॥ ५३ ॥ हें जाण सच्छिष्याचें लक्षण । अतिशुद्ध आणि मन । शास्त्रश्रवणीं मेधा पूर्ण । अतिप्रज्ञा सुबुद्धि ॥ ५४ ॥ जयासि सप्रेम ईश्वरीं भक्ति । पापवासना नुपजे चित्तीं । बसावें आवडे येकांतीं । अंतरस्थिति बाह्य फांवे ॥ ५५ ॥ जे उदार मनाचे । जे अविकल्प भावाचे । जे अलंकार सद्बुद्धीचे । परम भाग्याचे सभाग्यपणें ॥ ५६ ॥ हें सच्छिष्याचें लक्षण । सांगितलें तुज संपूर्ण । आतां वैराग्यवंत तो कोण । परिसें खूण रघुनाथा ॥ ५७ ॥ जया नावडे इंद्रियवर्ग । जया नावडे देहसंग । देहा[illegible] नाहीं उमंग । सर्वार्थीचा संगु देहयोगें ॥ ५८ देह नावडावयाचें कारण । रघुनाथा तुज सांगेन । याचें एकेक [illegible] । कुश्चळ जाण सर्वार्थी ॥ ५९ ॥ देह केवळ अस्थीचें घर । देहीं मांस मज्जा रुधिर । देहीं पूय पंक कृमि थोर । विष्ठा मूत्र देह विकारी ॥ ६६० ॥ देहासि असती षड्विकार । अस्ति जायते विवर्धते प्रकार । विपरिणमते अपक्षीयते हे थोर । विनश्यति मार मरणाचा ॥ ६१ ॥ या एक विकाराचें दुःख । सांगतां अतिअटक । मन कंटाळे सम्यक । तथापिही एक सांगों रामा ॥ ६२ ॥ मातेचिये ऋतुकाळीं । पितियाचा संयोगमेळीं । प्राणापानाचिये उसाळीं । रेत कमळीं अनुमात्र पडे ॥ ६३ ॥ येथें मातेचें [illegible] । त्यामाजी पितृरेत असे पडत । एकत्र जालिया होत । [illegible] ॥ ६४ ॥ हें अस्तिविकाराचें लक्षण । तें दुःख मूळकारण । गर्भवास दारुण । [illegible] नरककुंडी ॥ ६५ ॥ मलमूत्राचे क्षाथरीं । उकडत नव मासवरी । अधोमुख बांधोनि योनिद्वारीं । चरफड करी अति दुःखें ॥ ६६ ॥ तें अतिदुर्गंधीचें स्थान । तेथही तोडिती जंतु दारुण । तया क्षतांसी फणफण । कटुम्ललवण अक्षरसलागे ॥ ६७ ॥ तया गर्भाची अतिव्यथा । कवणा सांगावी रघुनाथा । नाहीं श्रोता नाहीं परिहारकर्ता । येकयेकुलता आपणचि ॥ ६८ ॥ नकरी कोण्ही संबोखन । नेदी माता स्तनपान । येकला भोगी निर्वाण । नाहीं समाधान या विवेकाचें ॥ ६९ ॥ असो हें सांगतां अति विस्तार । जायते आयिकें दुसरा विकार । उत्पत्ति होतां योनिद्वार । सांकडें थोर निर्गमीं ॥ ६७० ॥ तेथ अतिप्रयासें करुनी । बाहेर पडे मूर्च्छा येउनी । दुःखें सोहंकार विसरोनी । कोहंध्वनि थोर करी ॥ ७१ ॥ आक्रंदोनि बाहेरी पडे । कोहंस्वरें दीर्घ रडे । कांहीं केलिया न सुरवाडे । करी चरफड नेणोनी ॥ ७२ ॥ तें दुःख अतिदारुण ।

---

१ पुनः सांगितलेलें. २ नाश होणारे ३ विशेष कारणामुळें केलेलें. ४ वाईट. ५ अतिदुःख ६ इच्छा. ७ शास्त्राचा अर्थ सांगणारा. ८ गुरुहून श्रेष्ठ. ९ दान देण्यामुळें. १० लक्ष्य दिल्यामुळें. ११ बुद्धि. १२ प्राप्त होतें. १३ इंद्रियांचा समुदाय. १४ कंटाळा.

बोलतां असे गहन । करितां नालखंडन । दुःखें मन वेडावे ॥ ७३ ॥ अथवा उत्पत्ति ते जायते विकार । झाला असतां तो अस्तिप्रकार । विवर्द्धते तो तिसरा विकार । त्याचा विचार सांगेन ॥ ७४ ॥ विवर्द्धते हा विकार तिसरा । देह वाढिन्नला गा रघुवीरा । क्षुधा पिडी तयाचा उदरा । व्यथा थोरा त्यामध्यें ॥ ७५ ॥ दुग्ध बोळे पिळिती तोंडीं । तेणें न धाये त्याडी कुडी । उपवासी सदा चरफडी । मग स्तनीं गोडी लाविती ॥ ७६ ॥ अति मृदु त्याची त्वचा । खुरवाड नाहीं आस्तरणाचा । काठिण्यें पिडे परी सांगावयाचा । पवाड वाचा पावेना ॥ ७७ ॥ अखंड मळमूत्रीं लोळे । मुखीं पूर पडती लाळे । नरकयातना कळे । ते दुःखसोहळे देखोनी ॥ ७८ ॥ असो हें सांगणें किती । ऐक चतुर्थ विकाराची गति । विपरिणमते वित्पत्ति । आयिक रघुपति ऐसी असे ॥ ७९ ॥ जें विशेषीं परिणाम पावे । त्यासि विपरिणमते ह्मणावें । अथवा विविधा अवस्थीं परिणाम पावे । तेंचि जाणावें विपरिणाम ॥६८०॥ विविधरूपें तारुण्यवस्था । चारी असती गा रघुनाथा । ते संमति सांगेन आतां । त्या श्लोकार्था परिस पां ॥ ८१ ॥

संमति श्लोक । कौमारं पंचमाब्दं च पौगंडं दशमावधि । कैशोरमा पंचदशाद्यौवनं तु ततः परम् ।

येही चौं अवस्थीं परिणामला । देह परिणामवंत पावला । कौमारपणीं अतिपिडिला । इंद्रियबला न पवेचि ॥ ८२ ॥ रांगतां चालतां बैलहीन । पडत जाये मुरकुंडी खाऊन । मळमूत्राचें विलेपनें । सुखें भक्षण त्याचें करी ॥ ८३ ॥ हें पांचावरुषांभीतरीं । मग साहाव्यापासूनि दाहावरी । पौगंडदशा दुसरी । खेळे भारी बालकपणें ॥ ८४ ॥ दाहापासूनि पंधरांत । किशोरदशा अतिभ्रांत । नेणे आपुलें हिताहित । नाहीं पडत खेळे प्रीति ॥ ८५ ॥ गुरु पितर ताडणें करिती । नित्य विद्याभ्यासु करविती । तें न लागोनियां चित्तीं । खेळीं प्रीति आवडे ॥ ८६ ॥ तो अभ्यासाचा निर्बंधु । वरी क्षुधेतृषेचा पावे बाधु । पराधीनपणें उपरोधु । नाहीं बोधु आत्मविषयीं ॥ ८७ ॥ हें सरलियानंतरें । यौवनता पावे अतिभरें । आलें कामाचें भेउरें । योनिद्वारें धांडोळितु ॥ ८८ ॥ मग देखे आपली ना परावी । स्त्रीव्यक्ति डोळांदेखावी । मग अहंता हारवी । भुले सर्वां भावीं दर्शनमात्रें ॥ ८९ ॥ तेणें नावडे धर्माचरण । नावडे तप दान याग यजन । नावडे ईश्वराचें भजन । परावर्त्तन येथ कैंचें ॥ ६९० ॥ सर्व चिंतनीं स्त्रीमूर्ति । कांनीं ऐके योषितांची कीर्ति । सर्वदा स्त्रियेची उपास्ति । परावृत्ति असेचिना ॥ ९१ ॥ स्त्रीपुढें नावडे स्नान । स्त्रीपुढें नावडे भोजन । स्त्रीपुढें नावडे वर्तन । स्त्रीच पुण्य धर्म जया ॥ ९२ ॥ स्त्रीपुढें नावडे मातापिता । स्त्रीपुढें नावडे बंधुभ्राता । स्त्रीपुढें नावडे गुरु देवता । सर्व ताता नावडे ॥ ९३ ॥ स्त्रियेलागीं सर्वस्व देणें । स्त्रियेलागीं प्राण वेचणें । स्त्रियेलागीं जन्ममरणें । स्त्रिया कोण्हें न पाहावी ॥ ९४ ॥ स्त्रियेच्या ठायींच मन । परी स्त्रिया त्याच्याठायीं उदासीन । तें दुःख सांगतां अतिगहन । स्त्रीनिर्भर्त्सन किती सांगों ॥ ९५ ॥ जऱ्ही निर्भर्त्सिलिया स्त्रिया । तऱ्ही न निवर्ते गा रघुराया । जेवीं खरी टेकों नेदी खरा तया । परी तो तेथूनियां न परते ॥ ९६ ॥ स्त्रीसंगें जरी लज्जा । थोर जाली गा रघुराजा । तऱ्ही न निवर्त्ते आत्मकाजा । प्रवर्त्ते वोजा श्वान जैसा ॥ ९७ ॥ जऱ्ही पावे मृत्यूचा ठावो । तऱ्ही तुबगे ज्याचा मनोभावो । बळी या... नेला पहा हो । मैथुनभावो न संडी मैंढा ॥ ९८ ॥ ऐसेनि अपत्यें होती तियेसी । तोचि निगडु प...ला पायांसी । भरणपोषणीं वृद्ध पोसी । कासाविसी थोर होये ॥ ९९ ॥ तेणें अति थोरावला । ह्मणे मी आतां गृहस्थ जाला । तंव अकस्मात जरेनें व्यापिला । मोहें मोहिला सर्वांपरी ॥७००॥ अपक्षीयते पांचवा विकार । पावला दुःखाचा डोंगर । क्षुधेतृषेचा आटु थोर । वणवण पूर तृष्णेचा ॥ १ ॥ वली पलित येतां आंगासी । थोर होतसे कासाविसी । शुभ्र केश वेंचितां प्रतिदिवसीं । ह्मणे जनांसि कळेल ॥ २ ॥ वृद्ध ह्मणतां मरणभार । वाहे लज्जेचा डोंगर । वय चोरूनि मी चतुर । वयविचार थोडा मज ॥ ३ ॥ ऐसें ह्मणे परी न निवर्त्ते । आत्मविचारीं मन रितें । विषय वासनांचि अति आर्ते । रिघे तेथें बलात्कारें ॥ ४ ॥ तया वार्धक्याचा वारा । आंगीं बाणतांचि गा रघुवीरा । मोहाचेनि तो माजिरा । होये सैरा ममतेनी ॥ ५ ॥ सकळ इंद्रियां क्षीणपण । बळतेज जालें क्षीण जाण । परी चित्तीं अतिशय वणवण । काम पूर्ण कदा नव्हे ॥ ६ ॥ स्त्रीपुत्रादिक होती उदास । असतां द्रव्य नये हातास । तेणें चिंता वाहे बहुवस । चित्तीं हव्यास वासनेचा ॥ ७ ॥ हातपाय होती खुळे । सौंदर्य ठायींच पळे । इंद्रियें सांडिली बळें । कोणी कळवळे ऐसें नाहीं ॥ ८ सर्वांसिही उबग होये ।

१ वाढतो. २ वाढला. ३ तृप्त होत नाहीं. ४ पक्क होतो. ५ रूपांतर पावला. ६ पांच वर्षांचा होई पर्यंत. ७ आंगास लागणें. ८ शिक्षा. ९ भीति. १० जवळ राहणें. ११ मागें फिरणें १२ चांगली वागणूक. १३ गाढवी. १४ सवयीनें.

ह्मणती ह्मातारा वांचला आहे । हा मरे तरी बरवें पाहे । नवसिये पाहे नवसित ॥ ९ ॥ रात्रंदिवस खोकितां उजगरा । ह्मणती रात्रीं जागवी ह्मातारा । कंपु सुटला सर्व शरीरा । आयुष्य मातेरा सर्व केला॥७१०॥काठी टेंकणें धरितु आहे। तरी चालतां चाचरी जाये। ह्मणे देव कोठें गेला आहे। मृत्यु कां नये मजलागीं ॥ ११ ॥ ऐसा कष्ट नानापरी । अनेक व्याधि उठिती शरीरीं । अतिदुःखाच्या डोंगरीं । पडे भारी शोकयुक्त ॥ १२ ॥ तरी मोह न संडी स्त्रीपुत्रांचा । सुना नातू सोस पशूंचा । ह्मणे हा सर्व प्रपंचु आमुचा । परी उपरतीचा लेशु नाहीं ॥ १३ ॥ हें किती सांगावें गा रघुपति । या अनुभवाची सकळां प्राप्ति । येक स्वयें भोगिताती । तरुण देखती आणिकांचा ॥ १४ ॥ जें प्रगट जगामाझारी । तेंचि तें किती बोलावें वैखरी । अपूर्वार्थी बोलिजे तें तरी । सर्वांपरी उत्तमोत्तम ॥ १५ ॥ तरी अपूर्वार्थ तो ऐसा असे । जो कोण्हासि कळला नसे । तोचि उपदेशीं सर्वांशें । अनुभव नसे लोकां ज्याचा ॥ १६ ॥ तो परमार्थ अतिगुप्त । सर्व लोकांसि नाहीं प्राप्त । यालागीं न बोलणें हा पुरुषार्थ । येरु व्यर्थ शीण करणें॥ १७ ॥ जें लोकांमाजी प्रगट आहे । ज्याचा अनुभव सकळांसि होये । त्याचा अनुवाद करूनि काये । व्यर्थ वाचे इंद्रिय शिणवावें ॥ १८ ॥ परी याचें कारण रघुपति । इतुकेंचि आहे विश्वमूर्ति । ऐसें वैराग्य ज्या शिष्याप्रति । स्मरे चित्तीं संसारदुःख ॥१९॥ तोचि जाण वैराग्यवंत । त्यासि ज्ञानोपदेश कीजे त्वरित । हें न स्मरे जो किंचित । त्यालागीं हा अर्थ निरूपिला ॥७२०॥ जो कीं अत्यंत अज्ञानी जन । अनुभविलें दुःख नेणतो जाण । तयालागीं केलें कथन । आइक पूर्ण वैराग्य हें ॥ २१ ॥ तेंचि वैराग्य कैसें । हें सांगावयाचेनि मिसें । दुःखदर्शन आपैसें । अवस्थाविशेषें सांगावया ॥ २२ ॥ यालागीं प्रकटाचाचि अनुवाद । कोलिया सर्वथा नाहीं बाध । जे वैराग्यार्थ नेणती अतिमंद । त्यांसि विशद करणें लागे ॥ २३ ॥ जे स्वयेंचि वैराग्यवंत आपण । तयांप्रति नलगे हें निरूपण । षड्विकारीं दुःख दारुण । सांगा या खूण मंदांप्रति ॥ २४ ॥ अपक्षीयते पांचवा विकार । तें जाण वार्धक्य अति थोर । महादुःख अतिदुर्धर । नाहीं पार सांगतां ॥ २५ ॥ देहचि तंव दुःखाचा राशि । तेथ वार्धक्य तें पात्र चिळसी । येणें देणें सर्व दुःखासी । नाहीं पापासि मर्यादा ॥ २६ ॥ विनश्यति हा षड्विकारु । तेथें मरण तें दुःखाचा डोंगरु । तें सांगतां भय थोरु । नाहीं पारु ह्मणोनियां ॥ २७॥ जितुकें आपुलें होतें मानिलें । तें वृद्धपणीं सकळ राहिलें । मग मरणासि काय उरलें । उपेगा गेलें कवणासि ॥ २८ ॥ मरणायेवढें दुःखरासि । कोठें नाहीं गा परियेसीं । तें सांगतां वाचेसी । उरी कैसी उरेल ॥ २९ ॥ स्त्री पुत्र सकळ सोयरीं । तन धन तें राहिलें दुरी । तो वोढिजेतसे यमकिंकरीं । तें दुःख भारी काय सांगों ॥ ७३० ॥ तेणें दुःखें बोभाऊं जाये । तंव वाचा राहिली उपेगा नये । काकुळती आपुल्याकडे पाहे । ते चंद्री होये ह्मणती सकळ ॥ ३१ ॥ पाहतां बोलतां सांगतां । नये परी विकार इंद्रियां समस्तां । तेणें अतिबीभत्स दिसतां । भय समस्तां उपजत ॥ ३२ ॥ तो काकुलती सांगावया करी । येर ह्मणती लागली चंद्री । बोलावया मुख पसरी । ह्मणती खरी मरणवेळा ॥ ३३ ॥ दुःखें हातपाये खोडी । शरीर वळे मुरकंडी । मळमूत्रें करितु चरफडी । लाळ तोंडीं अनिवार ॥ ३४ ॥ मरणाचें दुःख ऐसें । तें सांगतां नये अतिसोसें । अल्पचि सांगितलें असे । जाणावया सकळांतें ॥ ३५ ॥ षड्विकारांचें दुःख ऐसें । तें सदा स्मरतुजाय मानसें । हेंचि वैराग्य विशेषें । सर्वदा असे जयासी ॥ ३६ ॥ ऐसें देहादिसर्व दृश्यजात । तें देखे दुःखभरित । तेणें उदास वृत्ति संतत । अनासक्त सर्वदा जो ॥ ३७ ॥ ऐसा जो वैराग्यवंत । आणि सच्छिष्य जो पूर्वोक्त । यालागीं सांगिजेल ज्ञानार्थ । तोचियथार्थ ज्ञानमहिमा ॥ ३८ ॥ ऐसिया सत्पात्र सच्छिष्यासी । न पुसतां ज्ञान सांगावें हृषीकेशी । तया बोलिजे ज्ञानशब्दासी । येरु उपदेशीं सदा रिता ॥ ३९ ॥ बीज तें बीज नव्हे जाण। जें असत्क्षेत्रीं पेरिलें जाण । फळ नये ऋतूविण । कोटि प्रयत्न करितांही ॥ ७४० ॥ ह्मणोनि बीजशब्दीं तें बोलिलें ज्ञान । त्यासि सत्क्षेत्र सच्छिष्य निपुण । तेथ वाहीं तें वैराग्य पूर्ण । श्रद्धा जाण ओलावा ॥ ४१ ॥ तिये भूमीसि जें पेरिलें । तेंचि बीजशब्दें बोलिलें । तेणें अद्भुत विस्तारिलें । अपरिमित फळें ॥ ४२ ॥ मग सद्बीज जरी जालें । उखरीं न वाहितां पेरिलें । तें बीजचि परी वायां गेलें । नाहीं फळलें ह्मणोनी ॥ ४३ ॥ यालागीं बीज तें बीज नव्हे । तें सत्क्षेत्रेंविण वायां जाये । तैसें असच्छिष्या दिधलें होये । तें विज्ञान नोहे सर्वार्थें ॥ ४४ ॥ नाहीं वैराग्य ज्या शिष्यासी । ज्ञान वायां जाय सांगितलें त्यासी । या

---

१ त्रास. २ नवीन अर्थानें युक्त. ३ पुनः सांगणें. ४ अज्ञानांला. ५ ह्मातारपण. ६ नाश पावतो. ७ दुःखाची रास. ८ मोठ्यानें ओरडूं लागतो. ९ डोळे फिरणें. १० दुःखानें भरलेलें. ११ ज्ञानाचें महत्व. १२ वाईट शेतांत

त्यालागीं ज्ञानशब्द विज्ञानासी । न घडे सर्वांशीं रघुराया ॥४५॥ सच्छिष्यवृक्षजरी असिला । परी वैराग्यऋतुभरें नाहीं मांडला । तरी कदा नये बोध फळा । जरी सिंचला शास्त्रजळें ॥ ४६ ॥ यालागीं सच्छिष्य आणि वैराग्यवंतु । सांगतांचि ज्ञान चढे त्याच्या हातु.। म्हणोनि तें विज्ञान हा फलितार्थु । निश्चितार्थु बोलिला ॥ ४७ ॥ तें वैराग्य नव्हे निश्चित । जें खंडन पावे अखंडित । दुःखकाळीं वैराग्यवंत । सुखीं आसक्त विषयांसी ॥ ४८ ॥ यालागीं तेंचि वैराग्य गा रघुनाथा । जें अवस्थात्रयीं न नाशे सर्वथा । पाठीच लागे गा दवडितां । ते अखंडता वैराग्याची ॥ ४९ ॥ प्राप्त जालियाही इंद्रियार्थ । शोभनाध्यासु न करी चित्त । नश्वरत्वें वैरस्य भासत । नव्हे उद्यत कोण्हे समयीं ॥ ७५० ॥ हेचि वैराग्याची अखंडता । शिष्याप्रति अखंड उपदेशितां । विमुख होये इंद्रियार्थां । जैसी पतिव्रता पुरपुरुषीं ॥ ५१ ॥ कां ज्ञाननिष्ठासि महासिद्धि । प्राप्त जालियाही नव्हे उच्च बुद्धि । वोसंडोनि त्रिशुद्धि । अखंड बोधीं बोधला जो ॥ ५२ ॥ कां विषें रांधिलीं षड्रसान्नें । तें जेवणार जरी बरवें जाणे । तो लोटोनि पळे माणें । न परते कोण्हें पायां पडतां ॥ ५३ ॥ परिणाम देखोनि दुःखांत । चिळस मानी ज्याचें चित्त । अवचटें पाय पडला कश्मलांत । चिळस जन्मांत विसरेना ॥ ५४ ॥ जरी मृत्तिका जळें धुतला । वरी चंदनादिकीं चर्चिला । परी विसरेना त्या कश्मलाला । अति कंटाळा स्मरतांची ॥ ५५ ॥ तैसे जरी विषय टाकिले । ज्ञानाचे मार्गीं लागले । तेही चिळस नाहीं विसरले । विषय देखिले रम्य जरी ॥ ५६ ॥ ऐसें तेंचि तें वैराग्य जाण । शिष्यचित्तीं बाणे संपूर्ण । अखंडशब्दें नव्हे क्षीण । भोग संपूर्ण दावितांही ॥५७॥ ऐसा तोचि तो शास्त्रार्थ । सच्छिष्यासि बोध यथार्थ । शास्त्राचा हा फलितार्थ । ज्ञान हस्तगत तत्काळ होये ॥५८॥ या श्लोकाचा मथितार्थ इतुका । परियेसीं गा रघुकुळतिलका । सार्थकता हेचि ज्ञानटिळका । सच्छिष्य निका प्रबोधिजे ॥५९॥ येथ येकाचें कारण गा रघुपति । जरी झाली शास्त्रव्युत्पत्ति । आणि गुरुही उपदेश करिती । परी नसतां शुद्ध मति न फळे शिष्या ॥७६०॥ शुद्ध मति नसतां । तो उपदेशु जाय रिता । परी गुरु शास्त्राचा बोधकर्त्ता । कदा कल्पांता घडेना कीं ॥ ६१ ॥ शिष्य असतां अशुद्धमति । तरी गुरु शास्त्रें काय करिती । जरी स्वयें आला लक्ष्मीपति । तरी स्वरूपप्राप्ति न करवे ॥ ६२ ॥ हेंचि करावया निरूपण । श्लोकद्वयें श्रीवसिष्ठ आपण । बोलती तें ऐकाग्र मन । संतीं करून आयिकावें ॥ ६३ ॥

उपदेशक्रमो राम व्यवस्थामात्रपालनम् ॥ ज्ञप्तेस्तु कारणं शुद्धा शिष्यप्रज्ञैव केवला ॥ ९ ॥

अगा एक शिष्य एक गुरु । गुरु शिष्याकरीं उपदेशाचारु । हा ईश्वरापासूनि व्यवहारु । उत्तरोत्तर चालिला असे ॥६४॥ प्रबुद्धें अबुद्ध बोधवावा । जागृतें प्रसुप्त चेतवावा । हा परंपराचारु पाळावा । परी आपुल्या भावा आपण येत ॥ ६५ ॥ येक निरंजनीं असे निजेला । त्यासि चेतवावया कोण गेला । चेता चेतविता स्वयेंचि जाला । नाहीं केला सावधु कोण्हें ॥ ६६ ॥ तैसा अज्ञानें जो दाटला । तोचि सामग्रीनें उवाइला । वैराग्यादि सकळ मेळा । करी येकवळा आपणचि ॥ ६७ ॥ तया सद्बुद्धि कवणें दिधली । शमदमादिसंपत्ति कैसी आली । सत्संगति कैसी लाधली । कोणें केली खांचाखोंची ॥ ६८ ॥ जेव्हां सद्गुरु नाहीं आला । नाहीं अंतरीं विवेक उपजला । विषयांचा कंटाळा । कोणें लिहिला त्याचे हृदयीं ॥ ६९ ॥ जरी सद्गुरु कारण यासी । तरी पितरचि गुरु बाळकासी । ते विद्यादि प्रवर्त्तविती संसारासी । तो तयासि उदास ॥ ७७० ॥ मारुनि स्वव्यापार शिकविती । तो तेंचि कांहीं नघे चित्तीं । शास्त्रश्रवणीं अतिआर्ति । साधुसंगति आवडे ॥ ७१ ॥ साधूपासूनि उठवूनि नेती । स्वउद्यमीं प्रवर्त्तविती । परी तें कांहींच न लगे चित्तीं । करी पुढती तेंचि स्वयें ॥ ७२ ॥ स्नानसंध्या करूं नेदिती । दर्भपाणि झाला पां म्हणती । जपतपादि सांडविती । परी त्याची मति परतेना ॥ ७३ ॥ अथवा सत्क्रियाकर्म शिकविता । विपरीतचि आचरे तत्वतां । नानाप्रयत्नही करितां । उच्छृंखलता अधिकचि ॥ ७४ ॥ ऐसा पूर्वकर्माचेनि संस्कारें । सत्कर्मींचि बुद्धि प्रसरे । तेथ कोण कोणें प्रकारें । सांग पुरे उपदेशिलें ॥ ७५ ॥ यालागीं सद्बुद्धीसि कारण । आपला आपणचि जाण । यदर्थीं श्रीभगवंत आपण । सांगे खूण अर्जुनासी ॥ ७६ ॥

संमति श्लोक ॥ आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः । बंधुरात्मात्मनस्तस्य येनात्मैवात्मनाजितः ।

---

१ संयोग पावला. २ शिंपणें केलें. ३ शास्त्ररूपी उदकानें. ४ चांगला उपभोग घेणें. ५ निरस पणत. ६ भांडीं. ७ घाणीमध्यें. ८ उटा लावली. ९ हातीं आलेलें. १० शास्त्रांचें ज्ञान. ११ दुष्टबुद्धीची. १२ दोन श्लोक १३ पुढें पुढें.

यालागीं गा रघुपति । मुख्य कारण गा ज्ञानाप्रति । अतिशुद्ध शिष्याची मति । स्वरूपस्थिति जेणें लाभे ॥ ७७ ॥ एवकारें ज्ञानाप्रति कारण । शिष्यप्रज्ञाचि सूचिली जाण । उपदेशक्रमु तो पाळण । विधिमात्र जाण रघुनाथा ॥ ७८ ॥ शिष्यासि नसतां शुद्ध प्रज्ञा । गुरुनें उपदेशिल्या ज्ञाना । तरी व्यर्थ शीणु गा ज्ञाना । न घडे सज्ञाना ज्ञानाची ॥ ७९ ॥ शिष्याची शुद्ध मति असतां । साधनचतुष्टय अतितीव्रता । येथें गुरूनें महावाक्य बोधितां । अपरोक्षता तात्काल होये ॥ ७८० ॥ तेथें गुरुसि न लगती आयास । करणें नलगे योगाभ्यास । आत्मा स्वयंभ प्रकाश । विश्वाभास परमानंदें ॥ ८१ ॥

न शास्त्रैर्नापि गुरुणा दृश्यते परमेश्वरः । दृश्यते स्वात्मनैवात्मा स्वया सत्वस्थया धिया ॥ १० ॥

नानाशास्त्र अथवा गुरूनें जाण । नव्हे कदा आत्मदर्शन । देखिजे आपणा आपण । साह्य पूर्ण सात्विक बुद्धि ॥ ८२ ॥ नव्हतां शिष्याची शुद्ध मति । जऱ्ही नानाशास्त्रें अभ्यासिजेती । अथवा सद्गुरु स्वयें उपदेशिती । परी स्वरूपप्राप्ति कदा नव्हे ॥ ८३ ॥ तेथें वरकड साधनांचा पाड काये । जे स्वरूपप्राप्तीकरितां पाहें । करितांही अनेक उपाये । हाता नये ब्रह्मज्ञान ॥ ८४ ॥ तेथें रघुनाथ ह्मणती श्रीगुरुमूर्ति । साधन अंतरंग शास्त्र व्युत्पत्ति । तेणेंही नव्हे ब्रह्मप्राप्ति । या बोलाची भीति बहु ॥ ८५ ॥ सद्गुरुदर्शनेंचि स्वरूपप्राप्ति । ते उपदेशितांही नव्हे हे विप्रतिपत्ति । हें ऐकोनि माझिया चित्तीं । संशयप्राप्ति जाली असे ॥ ८६ ॥ आत्मप्राप्तिचें मुख्य कारण । सद्गुरु आणि शास्त्रश्रवण । तेणेंही नव्हे संशय पूर्ण । उद्विग्न मन गुरुराया ॥ ८७ ॥ मुख्य साधनप्राप्ति असतां । स्वरूप कां नें प्रकाशे गुरुनाथा । शिष्यप्रज्ञेची शुद्धता । कां अपेक्षितां मुख्यत्वें ॥ ८८ ॥ आत्मा काय अप्रकाशक असे । येही साधनीं न प्रकाशे । शिष्यप्रज्ञेचें कारण कायिसें । मज सावकासें सांगावें ॥ ८९ ॥ तंव वसिष्ठ ह्मणती परियेसीं । सांगेन विवंचना तुजपासीं । आयिक येकाग्र मानसीं । जेणें तुजपासीं संशय तुटे ॥ ७९० ॥ आत्मा स्वयें स्वप्रकाश । साधनें प्रकाशती काय त्यास । तो आपणा आपण स्वप्रकाश । परप्रकाश कदा नव्हे ॥ ९१ ॥ तूं ह्मणसी आत्मा स्वयेंचि प्रकाशे । तरी सर्वां जना कां न दिसे । कायसें अज्ञानाचें पिसें । विश्व भ्रंशे कोणा अर्थी ॥ ९२ ॥ आत्मा स्वप्रकाश रघुनाथा । या बोला नाहीं गा अन्यथा । परी अज्ञान न तुटे गा सर्वथा । जाण तत्वता गुरुवाक्येंविण ॥ ९३ ॥ तें गुरुवाक्यही आलें हाता । परी साह्य बुद्धि पाहिजे सत्वस्था । बुद्धीसि वाक्याची व्यंजकता । तेणें तत्वता अज्ञान तुटे ॥ ९४ ॥ उपशमात्मक जो सत्वगुण । तेणें अति शुद्ध बुद्धि जे तीक्ष्ण । ते अंतर्मुख होतांचि समूळ अज्ञान । भस्मांत पूर्ण होऊनि जाये ॥ ९५ ॥ मंत्रौषधस्थानीं बुद्धिशास्त्र जाण । गुरुवाक्य अग्नीसि व्यंजकपण । अग्नि लागतांचि मंत्रपाषाण । करी कारज आपुलें ॥ ९६ ॥ मंत्रौषध नसतांचि तीक्ष्ण । काय करी गुरुवाक्य दीपन । तैसें दुसरें शास्त्रश्रवण । अकारण दोन्ही होती ॥ ९७ ॥ यालागीं सद्गुरु आणि शास्त्रश्रवण । हें आत्मप्राप्तीचें मुख्य कारण । परी शिष्यप्रज्ञा नव्हतां जाण । नव्हे ज्ञान यालागीं ॥ ९८ ॥ आणि प्रतिबंध जो होता अज्ञान । तें निरसलें न लगतां क्षण । उरे आत्मस्वरूप परिपूर्ण । स्वप्रकाशघन स्वप्रकाशें ॥ ९९ ॥ यालागीं शिष्यबुद्धीची कारणता । मुख्य बोलिली गा रघुनाथा । आत्मा स्वप्रकाश तत्वता । दोन्ही कथा निरूपिल्या ॥ ८०० ॥ ह्मणोनि आत्मदर्शनीं शुद्ध मति । शिष्यासि पाहिजे गा रघुपति । तेचि ज्ञानाची उत्पत्ति । झाल्या कल्पांतीं नासेना ॥ १ ॥ या ज्ञानाचें सामर्थ्य ऐक । एकवार जालिया सम्यक । न नासे गा येकायेक । वाढे अधिक सतेजपणें ॥ २ ॥

सर्वा बाह्यकला जंतोरनभ्यासेन नश्यति ॥ इयं ज्ञानकला त्वंतः सकृज्जाताभिवर्द्धते ॥ ११ ॥

प्राणियांच्या सर्व बहिःकला । त्या अनभ्यासें नासती सकळा । सकृत् जालिया ज्ञानकळा । वाढे सोज्वळा प्रकाशपणें ॥ ३ ॥ सकळ लोक अभ्यास करिती । चौदा विद्या चौसष्ट कळा शिकती । त्या अभ्यासेंविण नाशती । आइक रघुपति सांगेन ॥ ४ ॥ अगा सकळ विद्यांचें अधिष्ठान । सकळांची उत्पत्ति जेथून । सकळांचें मूळभूत कारण । सकळां प्रमाण हा वेदु ॥ ५ ॥ तो वेदु प्रयासेंकरूनी । अभ्यास करिती अनुदिनीं । तोही त्रिपक्ष अभ्यासेंवांचुनी । जाती विसरोनि क्षणमात्रें ॥ ६ ॥ तेथें इतर विद्या ज्या ज्या असती । ज्यांसि नानाप्रयास करिती । तें नाशे गा रघुपति । विस्मय चित्तीं काय होय ॥ ७ ॥ जेथ वेद विसरली ह्मणती । नाठवे शास्त्रांची व्युत्पत्ति । स्तोत्रें शिकलों त्यांची

---

१ सुचविली. २ बुद्धि. ३ प्रत्यक्ष ज्ञान. ४ ब्रह्मप्राप्ति. ५ शास्त्रें ऐकणें. ६ उदासीन झालेलें. ७ स्पष्ट होत नाहीं. ८ प्रकाश नसलेला. ९ विचार. १० शांतीनें भरलेला. ११ शिष्याची बुद्धि. १२ अभ्यास नसल्यास. १३ दररोज.

माते। न स्फुरती अनाभ्यासें ॥ ८ ॥ नानाभाषा शिकती बोलती। त्या अनाभ्यासें विसरलों ह्मणती। यथें किती बोलावी व्युत्पत्ति। सर्वही नाशती अनभ्यासें ॥ ९ ॥ बहिःकळा ह्मणिजती ते काय। अंतःशब्दें बोलिजे तें काय। बाह्यनाशें अंतराची वृद्धि होय। कारण काय गुरुवर्या ॥ ८१० ॥ येसिया आक्षेपासि उत्तर। देता जाला वसिष्ठ अतिचतुर। आइक याचाही विचार। सविस्तर सांगेन ॥ ११ ॥ तरी बाह्य जितुकें बोलिजे। तें तें दृश्यप्रपंच ह्मणिजे। अंतःशब्दें ब्रह्म सहजें। हे खूण जाणिजे रघुराज ॥ १२ ॥ मनबुध्यादिकांसि जें ज्ञेयज्ञान। तें तें दृश्यप्रपंच जाण। ह्मणोनि बाह्य हें अभिधान। बोले प्रमाण उपनिषदें ॥ १३ ॥ इंद्रियें जो ग्राह्य पदार्थ। तो बहिःशब्दें हा फलितार्थ। इंद्रियां नेघवे अंतरर्थ। ऐसा समर्थ वेदु बोले ॥ १४ ॥ तेंचि अतिनिदर्शन। रघुनाथा तुज सांगेन। जें वेदु बोलिला आपण। तेंचि निर्वाण श्रुति वाक्य ॥ १५ ॥

॥ संमतिश्रुति ॥ ॥ परांचि खानि व्यतृणत्स्वयंभूस्तस्मात्पराङ् पश्यति नांतरात्मा ॥

स्वयंभूशब्दें चतुरानन। तेणें बहिर्मुख केलिया इंद्रियें मन। ह्मणऊनि तीं बाह्य देखती जाण। अंतर्खूण नेणती ॥ १६ ॥ ह्मणऊनि इंद्रिय प्रकाशतें दृश्यजात। याचें अंतर तें ब्रह्म सदोदित। तें सर्वांचें प्रकाशक साक्षिभूत। अंतर ह्मणिजे तयालागीं ॥ १७ ॥ जें सकळांचें प्रकाशक। जया नाहीं सामान्य विशेख। ह्मणऊनि अंतःशब्दें सम्यक्। बोलती देख परब्रह्म ॥ १८ ॥ त्यासि विषयीं करिजे ज्ञान। तें तंव अंतर सर्वांहून। जया ब्रह्मेसि सांन्निध्यपण। तेचि खूण अंतराची ॥ १९ ॥ एकापरीस एक अंतर। ऐसा शास्त्रही करी निर्धार। अर्जुनासि सर्वेश्वर। यादववर बोलिला ॥ ८२० ॥

॥ संमति श्लोक ॥ ॥ इंद्रियाणि पराण्याहुरिंद्रियेभ्यः परं मनः ॥ मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः ॥

बाह्य प्रपंचाहून जाण। देह तो आंतर सर्वांहून। देहापरीस इंद्रियगण। याहूनि मन आंतर असे ॥ २१ ॥ मनाहूनि बुद्धि आंतर। बुद्धीहूनि ब्रह्म निर्विकार। यालागीं सर्वांचेंही आंतर। ब्रह्म साचार न चुके ॥ २२ ॥ शुद्ध बुद्धीची जे वृत्ति। तियेसिचि ज्ञान बोलती। तें ज्ञान आंतर सर्वार्थीं। जाण सीतापति रघुवर्या ॥ २३ ॥ यालागीं अंतरपणें श्रेष्ठ ज्ञान। बहिःकळा बाह्यत्वें हीन। अंतरासि सत्यत्वें वृद्धि जाण। बाह्य तें क्षीण असत्यत्वें ॥ २४ ॥ बाह्य असत्य सर्व कळा। अनाभ्यासें नाशती सकळा। अंतरसत्यत्वें वाढे ज्ञानकळा। येक वेळ जालिया ॥ २५ ॥ ऐसें ज्ञान तें गुरुविण। सर्वथा नुपजे गा जाण। केलियाही कोटि प्रयत्न। शास्त्रश्रवण जरी केलें ॥ २६ ॥ पूर्वश्लोकीं काय सूचिलें। जऱ्ही गुरु अथवा शास्त्र जालें। तऱ्ही शिष्यासि न वचे बोधिलें। कारण बोलिलें शिष्यप्रज्ञ ॥ २७ ॥ जऱ्ही परीस सगुण जाला। पूर्ण सामर्थ्यें आथिला। तो जरी पाषाणीं लाविला। तरी काय तयाला सुवर्ण करी ॥ २८ ॥ परिसाचें सामर्थ्य तों यथार्थु। परी पाहिजे तयासि स्पर्शधातु। तें लोह अथवा नीचांतु। तऱ्ही निर्भ्रांतु सुवर्ण करी ॥ २९ ॥ तैसा गुरु आणि शास्त्रमहिमा। ते तंव न चुके गा मेघश्यामा। परी शिष्य शुद्ध वीरोत्तमा। पाहिजे रामा शुद्धमति ॥ ८३० ॥ जऱ्ही गुरु अतिकुशल जाला। तऱ्ही बोधील मनुष्याला। परी पशु आणोनियां हेला। न वचे बोधिला नानायुक्ति ॥ ३१ ॥ शास्त्रव्युत्पत्ति प्राज्ञासी। परी केल्या नव्हती मूर्खासी। यालागीं कारण शिष्यप्रज्ञेसी। ज्ञानाभ्यासीं बोलिलें ॥ ३२ ॥ परी असे ज्ञानें शुद्ध जाला। शास्त्राभ्यासुही बरवा केला। तरी सद्गुरुवांचूनि बोधिला। नाहीं देखिला तिहीं लोकीं ॥३३॥ अज्ञानें अपरोक्षीं भ्रम जाला। तो अपरोक्षानुभव पाहिजे केला। ऐसा अपरोक्षानुभव गुरूवेगळा। नाहीं देखिला रघुनाथा ॥ ३४ ॥ गुरूवेगळें जरी होय ज्ञान। शिष्यप्रज्ञाचि कारण। तरी सद्गुरु सेवावा हें वचन। वेद प्रमाण काय बोले ॥ ३५ ॥ आणि मागें साधुमहिमान बोलिलें। तें सकळ गुरुसंगेंचि पावलें। परी गुरुविण ज्ञान जालें। ऐसें न बोले कोणीही ॥ ३६ ॥ यदर्थीं वचनें बोलावीं किती। स्वयें श्रुतिही असें बोलती। तेंचि आइकें एकाग्रमति। तुजप्रति कांहीं सांगों ॥ ३७ ॥

॥ संमतिश्रुति ॥ ॥ तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत्समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम् ॥ आचार्यवान्पुरुषो वेद ॥ नैषा तर्केण मतिरापनेया प्रोक्ताऽन्येनैव सुज्ञानाय प्रेष्ठा ॥

संमतिगुरुगीता ॥ यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ ॥ तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशंते महात्मनः ॥

---

१ जाणतां येतें असें. २ घेतां येण्या जोगा. ३ निष्पन्न झालेला अर्थ. ४ दृष्टीस पडणारे सर्व पदार्थ. ५ आंतलें. ६ विकार नसलेलें ७ शिष्याची बुद्धि. ८ निःशंकपणें. ९ बुद्धि चांगली असलेला. १० रेडा. ११ याच अर्थाचीं.

ऐसेंचि श्रीकृष्णनाथु। अर्जुनासि गीता सांगतु। चतुर्थाध्यायीं हे मातु। ह्मणे शरणांगतु गुरूसि होईं ॥ ३८ ॥

**संमतिश्लोक**। तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया। उपदेक्ष्यंति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्वदर्शिनः ॥

ऐसेंचि कृष्ण ब्रह्ममूर्त्ति। एकादशीं बोले उद्धवाप्रति। सद्गुरु तो माझीच मूर्ति। अनन्यगति भजावें ॥ ३९ ॥

**संमतिश्लोक** ॥ आचार्यं मां विजानीयान्नावमन्येत कर्हिचित् ॥ न मर्त्यबुद्ध्या सूयेत सर्वदेवमयो गुरुः ॥
तस्माद्गुरुं प्रपद्येत जिज्ञासुः श्रेय उत्तमम्। शाब्दे परे च निष्णातं ब्रह्मण्युपशमाश्रयम्। एतत्सर्वं गुरोर्भक्त्या
पुरुषोह्यंजसा जयेत्। यस्य साक्षाद्भगवति ज्ञानदीपप्रदे गुरौ। मर्त्यासद्धीः श्रुतं तस्य सर्वं कुंजरशौचवत् ॥

ऐसें अनेका शास्त्रीं निरूपण। अपरोक्ष ज्ञानासि गुरूचि कारण। गुरूवेगळें सर्वही अनुमान। न एवे खूण अनुभवाची ॥८४०॥ जऱ्ही सर्व शास्त्र मुखोद्गत जालें। तेणें परोक्ष ज्ञानही हाता आलें। परी स्वरूप न प्रकाशे कांहीं केलें। सद्गुरुबोलें वांचुनी ॥ ४१ ॥

**संमतिश्लोक**। नैषां मतिस्तावदुरुक्रमांघ्रिं स्पृशत्यनर्थापगमो यदर्थः।
महीयसां पादरजोभिषेकं निष्किंचनानां न वृणीत यावत् ॥

जऱ्ही जालें शास्त्रश्रवण। प्रज्ञा जाली तीव्र दारुण। तऱ्ही न कळे स्वरूपस्पर्शन। कल्पांतीं जाण रघुनाथा ॥ ४२ ॥ अगा सद्गुरूची चरणधुळि। तिणें न करी जंव आंघोळि। तंव बुद्धि स्वरूपाजवळि। कोण्हे काळीं न जाय रामा ॥ ४३ ॥ यालागीं सद्गुरूवांचून। अपरोक्षानुभव नव्हे जाण। न तुटे मिथ्या भ्रम अज्ञान। नव्हतां शरण अनन्य भावें ॥ ४४ ॥

स्वकंठेपि स्थितं वस्तु यथा न प्राप्यते भ्रमात्। भ्रमांते प्राप्यते तद्वदात्मापि गुरुवाक्यतः ॥ १२ ॥

जऱ्ही आपणचि आत्मा स्वयंप्रकाश। गुप्त नव्हे उघड उदास। ज्याचेनि भासें सर्व भास। इंद्रियें सावकाश वर्त्तती ॥ ४५ ॥ सकळ इंद्रियांचें वर्त्तन। नव्हे आत्मसत्तेविण। सर्वदा सर्वांचें करी भान। जो परिपूर्ण सर्वात्मकु ॥ ४६ ॥ तो आत्मा स्वयें आपण। सर्वसाक्षी अपरोक्ष जाण। त्यातेंचि नेणिजे हें विचित्रपण। नेणतां खूण सद्गुरूची ॥ ४७ ॥ यालागीं सद्गुरुवाक्यावांचुनी। अपरोक्षता नव्हे भरंवसेनी। जैसे दहा पुरुष असतां एकपणीं। आपणा न मनी भ्रमपणें ॥ ४८ ॥ दहा समागमीं ग्रामांतरा। एकत्र चालले गा रघुवीरा। मार्गीं मोजिती तंव नव लेखांचारा। दहावा खरा चुकलासे ॥४९॥ तो नवांजणांतेंचि गणी। आपण दहावा भ्रमें न गणी। चुकुर होय तये क्षणीं। न देखे नयनीं दहावा पुरुषु ॥ ८५० ॥ मग तो प्राणांत करी व्यथा। परी आपणा न गणी सर्वथा। तंव कोणीएक आला अवचिता। सांगती व्यथा तयाप्रति ॥ ५१ ॥ तो मागुता गणवी तयांसी ॥ तंव ते नवांसिचि मोजी परियेसी। येरु हातीं धरुनि दावी त्यासी। दशम 'त्वमसि' ह्मणोनियां ॥ ५२ ॥ तेव्हां तो भ्रमातें विसरला। आपण आपणा प्राप्त जाला। ह्मणे तूं उपकारी गा भला। मजचि मजला भेटविलें ॥ ५३ ॥ तेणें तुझिया उपकारा उत्तीर्ण। आतां मी कैसा होईन। अनादिभ्रम दूर करून। आपणा आपण भेटविलें ॥ ५४ ॥ मी असतां आपण। कोण भ्रम जाला पूर्ण। विसरलों माझें मीपण। शोक दारुण करित होतों ॥ ५५ ॥ त्या शोकाचें कारण भ्रमरूप जें अज्ञान। तें तुवां निरासिलें न लागतां क्षण। हातीं धरून मज दिधलें ॥ ५६ ॥ तैसा आत्माचि असतां आपण। अपरोक्ष सिद्ध जाण। परी प्राप्त नव्हे सद्गुरुविण। जाण ती खूण तोचि दावी ॥ ५७ ॥ जैसे आपुले स्वकंठींचें चामीकर। अथवा मणि वस्तु सुंदर हार। असतांचि भ्रम थोर। विस्मरण फार जैसें होये ॥ ५८ ॥ असोनि त्यालागीं चुकुर होती। इतस्ततः भ्रमें पाहती। येकें दाखविल्या भ्रमांतीं। वस्तु पावती स्वकंठींची ॥ ५९ ॥ तैसा हा जंव भ्रम आहे। तंव स्वस्वरूप प्राप्त नोहे। सद्गुरुवचनें भ्रम जाये। तरी सिद्धचि होये आपआपणा ॥ ८६० ॥ हें निरूपण केलें तुजप्रति। गुरूविण नाहीं स्वस्वरूपप्राप्ति। गुरुभजनें ज्या वस्तु प्राप्य संतीं। धन्य त्रिजगतीं ते पुरुष ॥ ६१ ॥ आतां नरदेह पावलियावरी। जे स्वस्वरूप नेणती ये शरीरीं। ते व्यर्थ जन्मले संसारीं। आइक रावणारि सांगेन ॥ ६२ ॥ त्याचें श्लोकद्वयें निरूपण। आइक रघुनाथा सांगेन। बोजे जावाचया अज्ञानजन। त्यांचें निंदनें करिजेत ॥ ६३ ॥

---

१ तोंडपाठ. २ आत्मस्वरूप हातीं येणें. ३ पायधूळ. ४ परगांवीं. ५ गणतांत. ६ आश्चर्यचकित. ७ तूं आहेस. ८ उतराई. ९ फार वेळपर्यंत असलेली भ्रांति. १० सोनें, सोन्याचा दागिना. ११ इकडे तिकडे. १२ मार्गास. १३ निंदा.

स्वस्वरूपमजानन्वै जनोऽयं दैववर्जितः । विषयेपि सुखं वेत्ति पश्चात्पाके विषान्नवत् ॥ १३ ॥

स्वस्वरूप नेणता जो जन । ज्या कारणास्तव तो दैवहीन । विषयींच सुख जाणे संपूर्ण । जैसें विषान्न परिपाकें ॥ ६४ ॥ जो दैवें सांडिला नरु । हीनभाग्य करंटा निष्ठुरु । त्यासीच स्वस्वरूपीं विसरु । विषयीं भरु सुखालागीं ॥ ६५ ॥ परी विषय तें अतिदुःख । हें कांहीं केलिया नेणती मूर्ख । पांघुरविलें अल्प सुख । तेणें ओलुक विषयीं सदा ॥ ६६ ॥ विषयीं सुख आहे ह्मणती । ते अतिमूर्ख गा रघुपति । जे दुग्धाची चवी नेणती । ते तृणें घाती पशु जैसे ॥ ६७ ॥ विषयांच्या ठायीं दुःख आहे । हें सांगितल्याही ठावें नोहे । जैसी विषें रांधिली रसोये । भुकेला खाये नेणोनी ॥ ६८ ॥ मग विष आपण करी । जेवणारातें जिवें मारी । तैसा विषय सेवी तो दुःखसागरीं । भ्रमाच्या पुरीं बुडोनि जाये ॥ ६९ ॥ मग तुमजे तेथूनि कोणेपरी । तळवटें घे स्थावरांतरीं । नानायोनि भोगी भारी । अज्ञानपुरीं पडलिया ॥ ८७० ॥

बुद्ध्वाप्यत्यंतवैरस्यं यः पदार्थेषु दुर्मतिः । बध्नाति वासनां भूयो नरो नासौ स गर्दभः ॥ १४ ॥

अगा हे विषय अतिविरस । सेवितां वासना वाढे असोस । इंद्रियें क्षीण तरी वाढविती सोस । सावकाश तृप्ति नव्हे ॥ ७१ ॥ विषय सेवितां वाटे सुख । क्षणेंचि अतिशय होय दुःख । परिणामीं तरी अतिविख । होय मारक अतिशय ॥ ७२ ॥ ऐसें जाणोनि अत्यंत वैरस्यता । दुःख पावे विषय सेवितां । मागुती वासना धांवे इंद्रियार्था । कदा कल्पांता परतेना ॥ ७३ ॥ तो अतिदुष्ट दुर्मति । पापाचारी निंद्य अति । तो नररूपें गर्दभमूर्ति । सांगों किती रघुनाथा ॥ ७४ ॥ गर्दभ धांवे गर्दभीपाठी । ते लागों नेदी पायें लोटी । तरी न सोडी तियेची पाठी । वासना लाठी मागुती करी ॥ ७५ ॥ दुःख अनुभवितसे शरीरीं । परी वासना तेथूनि दुरी न करी । पापी निर्लज्ज दुराचारी । अविचारी तैसा नर ॥ ७६ ॥ यालागीं गा रघुनाथा । सकळ दुःख वासनेनीच्या माथां । ह्मणोनि वासनालेश तत्वतां । उपजों चित्ता नेदावा ॥ ७७ ॥ भलतियेचि पदार्थीं । उपजली वासना घाली अनर्थीं । तें समूळ ऐकें गा रघुपति । सविस्तर तुजप्रति सांगेन ॥ ७८ ॥

यत्किंचिदपि संकल्पान्नरो दुःखे निमज्जति । न किंचिदपि संकल्पात् सुखमक्षय्यमश्नुते ॥ १५ ॥

तरी ऐकें गा रघुनाथा । दुःखसागरु वासनेच्या माथां । ते वासनेची जेथूनि प्रौढता । ऐकें तत्वतां सांगेन ॥ ७९ ॥ मुख्य अज्ञान तें द्विप्रकार । आवरण आणि विक्षेपाकार । सांगेन याचाही विचार । आवरणप्रकार तो ऐसा ॥ ८८० ॥ अज्ञानाचें जें आश्रयभूत । तें शुद्धब्रह्मचि गा निश्चित । ज्याचेनि तेथें प्रकाशत । तें तदाश्रितचि बोलावें ॥ ८१ ॥ तें आपल्या आश्रयातें आंवरी । नेण करी क्षणाभीतरी । हें अज्ञानरूप निर्धारीं । करी पूर्ण विस्मरणदशा ॥ ८२ ॥ आपुलें आपणासि नेणें । केलें पैं अज्ञानें येणें । जळोद्भव बावुलीचें होणें । आच्छादी पूर्ण निजाश्रयो ॥ ८३ ॥ हें आवरणात्मक अज्ञान । तेंचि आक्षेप करी निर्वाण । विस्मरण काय येक भान । न करी जाण रघुवर्या ॥ ८४ ॥ मुख्य आपुलें नेणणें तोचि अज्ञानार्थु । तेणें काय येक न घडे अनर्थु । विपरीतज्ञान भ्रमार्थु । स्वयें व्यर्थु उपजलें ॥८५॥ प्रथम अहं हा पूर्ण संकल्प । तोचि देहाकारें वाढला अमूप । जेणें वाढे वासनापादप । पापरूप दुःखमूळ ॥ ८६ ॥ मुख्य वासनेची वाढी । संकल्पापासाव होय तेवढी । वासनादार्ढ्यें अनर्थ कोडी । दुःखपरवडी उत्तरोत्तर ॥८७॥ हा संकल्प किंचित् कदाचितही । जरी उद्भवला लिंगदेहीं । तो प्रौढ वासनारूप होय पाहीं । बुडबुडे डोहीं दुःखाचे ॥८८॥ दुःखसागरीं बुडावयाचें कारण । अणुमात्रचि संकल्प जाण । प्राणी मरणाउपरी मरण । पावे निर्वाण कल्पकोटि ॥ ८९ ॥ आतां न पावावया दुःखमरण । उपायाचें सांगेन कारण । आयिक देवा चित्त देऊन । अतिनिर्वाण उपाय हा ॥ ८९० ॥ तरी स्वस्वरूपाचेनि विस्मरणें । जो संकल्प उठी देहपणें । तो उठों नेदावा सावधपणें । वासना जेणें प्रौढ नव्हे ॥ ९१ ॥ अतिवैराग्यें मुमुक्षुता । दृढ बाणली ज्याचे चित्ता । तेणें आणिका न करावें उपायार्था । गमन तीर्था न करावें ॥ ९२ ॥ नानासाधनें धर्माचरण । तीर्थ यज्ञ तपादिदान । हें सकळ दुःखासीच कारण । सुखा कारणें येकही नव्हे ॥ ९३ ॥ तेणें सर्वदा सावध होउनी । संकल्प उठों नेदावा कोणी । तेणें सुख भरे त्रिभुवनीं । दुःख स्वप्नीं न देखे ॥ ९४ ॥ सुखरूप तोचि आपण । दुःखस्वरूप तें विष-

१ न जाणणारा. २ प्रेम. ३ गवतानें. ४ अन्न. ५ दडपण. ६ मनुष्याच्या रूपानें ७ प्रत्यक्ष गाढव. ८ दोन प्रकारचें. ९ झांकणारें. १० भलतेंच भासविणारें. ११ शेवाळीचें. १२ इच्छारूपी झाड. १३ वासनेच्या मोठेपणाप्रमाणें. १४ देऊं नये.

रीत भान । संकल्पक्षयीं फावे आपण । सुखसंपन्न तेणेंकरुनी ॥ ९५ ॥ यालागीं अक्षय्यसुख जें नित्यानंद । परमानंदैक अगाध । तें तो पावे निर्बाध । निर्विवाद परमानंदें ॥ ९६ ॥ जें धर्मादितीर्थें करणें । तेणें अधिकचि वासनेतें वाढवणें । वासनावृद्धीनें दुःखचि जेणें । फार करणें आपणचि ॥ ९७ ॥ साधनें साधावीं सुखाकारणें । आणि दुःखचि जरी वाढे तेणें । तरी आपुल्या पायीं लेववणें । निगड करणें दुःखरूप ॥ ९८ ॥ जो अत्यंत असेल जडमूढ । त्यासिच साधनें अतिगोड । परी विचार न करिती दृढ । साधनें प्रौढ कां प्रवर्त्तली ॥ ९९ ॥ लौकिक परमार्थीचीं साधनें । तींहीं नित्य सुखदुःखासि कारणें । आणि विपरीतार्थ पाविजे तेणें । तरी कां करणें सायास ते ॥ १०० ॥ ययालागीं गा रघुपति । संकल्पक्षयींच सुखप्राप्ति । ह्मणोनि अणुमात्रही संकल्पाप्रति । चित्तवृत्ति वाढों नेदीं ॥ १ ॥ ऐसेनि संकल्पीं उठिला वासनांकुर । तरी निवर्त्तवावा धरोनि धीर । जो वार्तिककर्ता उदार । निवर्त्तनीं सुखसागर संमति परियेसा ॥ २ ॥ जो कीं भाग्यवंत सुरेश्वर । जो वार्तिककर्त्ता सादर । तेणें केला जो निर्धार । श्रुत्यनुसार परियेसा ॥ ३ ॥

॥ संमतिवार्तिक ॥ यतो यतो निवर्त्तेत विमुच्येत ततस्ततः । निवर्त्तनाद्धि सर्वत्र नवेत्ति दुःखमण्वपि ॥

वासना निवर्त्तविजे ज्याज्यापासुनी । मुक्त होइजे ते ते स्थानीं । जितुकी वासना काढिजे विषयांहुनी । सुख निर्वाणीं तितुकेंचि होये ॥ ४ ॥ जों जों पदार्थांहुनि मन काढिजे । तों तों सुखाची प्राप्ति पाविजे । जों जों वासना वाढविजे । दुःख लाहिजे तितुकेंचि ॥ ५ ॥ जरी सर्वत्र निवृत्ति जाली । तरी सुखाची संपत्ति हाता आली । अणुमात्रही दुःखबोली । कदाकाळीं नाइके तो ॥ ६ ॥ यालागीं सर्वदा तेंचि करावें । संकल्पातें उपजों नेदावें । वासनारूप जालियाही त्यजावें । विषय बरवे जऱ्ही जाले ॥ ७ ॥ ऐसेनि विषयीं वासना जरी धरिती । तेणें दुःखा वेरपड होती । शेवटीं विषयसुखाची प्राप्ति । व्यर्थ भ्रांति स्वप्न जैसें ॥ ८ ॥

यथा स्वप्ने मुहूर्तः स्यात् संवत्सरशतभ्रमः । तथा मायाविलासोऽयं जायते जाग्रतिभ्रमः ॥ १६ ॥

स्वप्नींचें राज्यादि सकळ । मुहूर्त येक भोग अमंगळ । परी भोगितां सरे तत्काळ । न लगतां वेळ रघुनाथा ॥ ९ ॥ तो भोग भ्रमेंकरुनी । शतसंवत्सर दीर्घ मानी । लटिकाचि परी हर्ष हानी । दावी दोन्ही अतिभ्रमें ॥ १० ॥ राज्यप्राप्तीनें अति आनंदु । तें गेलिया वाटे अतिखेदु । पुत्रादि मरणविषादु । अल्पचि विषादु बहु मानी ॥ ११ ॥ तेंचि स्वप्न सरोनि जाये । भ्रमें मानी बहुकाळ आहे । अल्पचि परी शतवर्षें पाहे । अक्षयी होये तयालागीं ॥ १२ ॥ त्या येकाचि क्षणामाझारीं । अपत्य उपजावलें जें करी । तें मेलिया शोक भारी । बुडे पुरीं मोहाच्या ॥ १३ ॥ पूर्वी स्वप्नीं सामान्य होता । मग अपूर्वराज्य आलें हाता । तें गेलिया मागुतीं रिता । करी चिंता अतिदुःखें ॥ १४ ॥ ऐसे हर्षविषाद स्वप्नीं । प्रत्यक्ष भोगी आपुल्या मनीं । विचारितां क्षणार्धीं करणी । बहु हर्ष मानी अतिभ्रमें ॥ १५ ॥ तैसे जागृतीच्या ठायीं । सकळ मायामय विलास पाहीं । त्याचि विलासास्तव पाहीं । भ्रमडोहीं बुडे रामा ॥ १६ ॥ हाही क्षण येकाचा भोगु । परी कल्पायवढा मानी व्यंगु । नव्हे सावधु न धरी उबगु । अति निःसंगु भ्रमेंकरुनी ॥ १७ ॥ आतां प्रपंचीं असोनियांही मुक्त । जो शुभाशुभासि अलिप्त । त्याची वसिष्ठ स्तुति करित । श्लोकद्वयांत परियेसा ॥ १८ ॥

अंतःशीतलया बुद्ध्या रागद्वेषविमुक्तया ॥ साक्षिवत्पश्यतीदं हि जीवितं तस्य शोभते ॥ १७ ॥

जो रागद्वेषविहीन । तेही अंतरशीतलबुद्धीकरून । जो साक्षित्वें करी विश्वभान । जीवित धन्य त्याचें राया ॥ १९ ॥ आतां येक गा रघुपति । जो प्रपंचीं अलिप्तगति । त्याची काळा सांगेन वर्त्तती । येकाग्रचित्तीं परियेसीं ॥ १२० ॥ ज्याची अंतरीं शीतळबुद्धि । जो रागद्वेषीं न जळे त्रिशुद्धि । तेचि शीतळ निरवधि । येक सुबुद्धी रघुवर्या ॥ २१ ॥ बुद्धीचें जें जळजळपण । ते रागद्वेष दोन्ही जाण । विषयीं प्रीति तो राग पूर्ण । द्वेषाची खूण परियेसीं ॥ २२ ॥ प्रीतिचा जो विषय असे । त्यासि घातक जो प्रतिकूल वसे । तेथें बुद्धि जे कुसमुसे । द्वेष ऐसें या नाम ॥ २३ ॥ या दोहींकरूनि विमुक्तता । तेचि बुद्धीची शीतळता । अंतःशब्दें सूक्ष्मता । अति शुद्धता बोलिली ॥ २४ ॥ ऐसीये बुद्धीकरून । स्वयें साक्षी होये जो आपण । साक्षित्वेंचि सर्व करी. वर्त्तन । अलिप्तपणें सर्वी-

१ वासना नष्ट झाल्यावर. २ दागिन्याप्रमाणें घालणें. ३ बेडी. ४ सुरेश्वराचार्य ( मंडनमिश्र ). ५ ताबेदार. ६ शंभर वर्षें. ७ मेल्याचें दुःख. ८ हलका मनुष्य. ९ आनंद व दुःख. १० प्रीति अथवा द्वेष हीं नसलेला. ११ उलटा. १२ कुरकुरते.

परी ॥ २५ ॥ जैसा दीप साक्षि भूतु । गृहव्यापारीं अनासक्तु । तो सकळां प्रकाशूनि वर्त्ततु । प्रकाशमंतु सूर्य जैसा ॥ २६ ॥ ऐसा वर्त्ततांही जगा आंत । साक्षित्वें देखे जग समस्त । तयाचें जीवित शोभत । धन्य निश्चित तो जगीं ॥ २७ ॥ तयाचें धन्य जालेपण । तोचि सर्वज्ञाचा सर्वज्ञ । जो वर्त्ततसे साक्षी होऊन । धन्य धन्य तोचि येकु ॥ २८ ॥

येन सम्यक्परिज्ञातं हेयोपादेयमुज्झता । चित्तस्यांतः स्थितं चित्तं जीवितं तस्य शोभते ॥ १८ ॥

अगा जेणें पुरुषें रघुनाथा । हेयोपादेय जाणोनि तत्वतां । त्यागु करिजे न विचारितां । आइकें कथा सांगेन ॥ २९ ॥ हेयशब्दें त्याज्य अर्थु । प्रतिकूळ विषय बोलिजेतु । उपादेय जो घेइजेतु । जो प्रियप्रियार्थु सानुकूळ ॥ १३० ॥ घेणें आणि टाकणें दोन्ही । निःशेष गेलीं जयापासुनी । चित्त चित्तीं स्थिरावोनी । राहे निर्वाणीं निजरूपें ॥ ३१ ॥ चित्तांत घालिजे चित्त । याचा कैसा निश्चितार्थ । तरीच होणें संकल्पातीत । राहे निश्चित स्वयें रूप ॥ ३२ ॥ चित्ताचें गेलिया चित्तपण । चित्त चित्तीं अचित्त होणें । सर्व संकल्पविहीन । राहे परिपूर्ण पूर्णत्वें ॥ ३३ ॥ चित्त राहिल्या चित्तीं पूर्ण । नुपजे संकल्प देहस्फुरण । देहस्फुर्त्तीविण प्रपंच भान । नव्हे म्हणून जाण रामा ॥ ३४॥ देहो हा संकल्प नुठी । म्हणजे चित्तीं चित्ता पडली मिठी । तेणे आनंदु न मोडे सृष्टीं । धन्य जगजेठी तो येक ॥ ३५ ॥ अथवा चित्ताचा अंत जेथें होत । चित्त निःशेष समाप्ति पावत । आत्मस्वरूपीं जें स्थिर चित्त । धन्य जीवित तयाचें ॥ ३६ ॥ तयाचें जिणें शोभिवंत । तोचि धन्य तिहीं लोकांत । ज्याचें समरसें चित्तीं चित्त । सुखें उन्नत सर्वदा ॥ ३७ ॥ सर्व यज्ञादिसाधनांचें फळ । तोचि पावला गा सकळ । देहीं असोनि देहावेगळ । सुखकल्लोळ सुखरूपें ॥ ३८ ॥ येरु जो संकल्पें गांजिला । देहबुद्धीचा अंकिला । तो वासनाजाळीं सांपडला । दुःखकल्लोळां बुडोनि जाये ॥ ३९ ॥ देहबुद्धीनें जें जें करी । तें तें दुःखासि भरोवरी । विश्रांति नाहीं ज्याच्या अंतरीं । बाह्यात्कारीं काय होय ॥ १४० ॥ अंतरीं असे ज्वरें पिडिला । बाह्य चंदन शीतळ चर्चिला । तो निवेल काय उपचारिला । जरी सिंचिला शीतळ नीरें ॥ ४१ ॥ किंवा येकु सुळीं घालया नेतां । कोटि तळमळ त्याचिया चित्ता । त्यासि नानाभोग उपचार करितां । शेंदुरें माथा शोभविती ॥ ४२ ॥ सर्वांगा लाविती चंदन । नानापुष्पें शृंगारभरण । वाद्यध्वनी गर्जे गगन । देती भक्षण अपूर्व वस्तु ॥ ४३ ॥ इतुका करोनि सोहळा सकळ । परी अणुमात्र क्षीण नव्हे जळजळ । तरी त्या समारंभा कोण फळ । नाहीं निश्चळ मन ज्याचें ॥ ४४ ॥ तैसें नाना यागादि करिती । लौकिकीं दीक्षितपणाची कीर्ति । समारंभें अवभृथा जाती । असो व्यक्ति किती करावी ॥ ४५ ॥ तेणें कोण सुख उपजेल । काये मन हें निश्चळ होईल । देखोनियां सुख केवळ । काये नवल तेथें जालें ॥ ४६ ॥ काये चित्ता जालें समाधान । कीं चुकलें तयाचें आयागमन । हें नव्हतां जें करी जाण । तो विटंब पूर्ण गा रघुनाथा ॥ ४७ ॥ अंतरीं अतिदुःखें असे भरला । बाह्य थोर समारंभ केला । कडू दुधिया गुळें माखिला । अंतरीं जाला गोड काय ॥ ४८ ॥ कांतहीनेसि सौभाग्यउपचार । केलिया वाढे दुःखचि फार । अंतरीं जळजळ अपार । काय करील उपचारा ॥ ४९ ॥ यालागीं राहे ज्याचें चित्तीं चित्त । त्याचेंच जिणें शोभिवंत । येरु शवरूपें जंत । वासनायुक्त चित्त ज्याचें ॥ १५० ॥ अगा वासनाक्षयाचें सुख । तिहीं लोकीं नाहीं देख । ऐसें भारतीं सम्यक । बोले आग्निक व्यासमुनि ॥ ५१ ॥

संमति श्लोक ॥ यच्च कामसुखं लोके यच्च दिव्यं महत्सुखम् । तृष्णाक्षयसुखस्यैते नार्हतः षोडशीं कलाम् ।

अगा इहलोकींचें जें कामसुख । परी तें सामान्य नव्हे देख । राजा चक्रवर्ती जो एक । नाहीं आणिक स्पर्धी जया ॥ ५२ ॥ इतरांसि भय दारुण । आणि कामसुखही अपूर्ण । शरीर रोगी भार्येसि कुरूपपण । स्वेच्छावर्तन जयासि नाहीं ॥ ५३ ॥ यालागीं बोलिला चक्रवर्ती । त्यासि स्पर्धा नाहीं पृथ्वीप्रति । सकळ काम पूर्ण असती । चित्तानुवर्त्ती पुत्र भार्या ॥ ५४ ॥ सकळही राज्य स्वाधीन । शरीरासि आरोग्यता दृढपण । स्त्रीही सुंदर परिपूर्ण । कांहीं अपूर्ण असेचिना ॥ ५५ ॥ त्याचें जें कीं कामसुख । कां स्वर्गीं जें कां इंद्रादिक । त्यासि उपमा नाहीं आणिक । शतमखीं सम्यक लभ्य जें कां ॥ ५६ ॥ इयें दोन्हीं सुखें ऐसीं असती । आणि तृष्णा वासना येकी बोलिजती । त्याचेनि क्षयें जे सुखप्राप्ति । खद्योत होती दोन्ही सुखें ॥ ५७ ॥ तृष्णाक्षयाची सोळावी कळा । ये दोन्ही न पावती गा

---

१ कांहीं न करणारा. २ त्याज्य व ग्राह्य. ३ परब्रह्माचे ठायीं. ४ कल्पनांच्या पलीकडील. ५ ताबेदार झाला. ६ दुःखाच्या लाटांत. ७ अलंकार घालणें. ८ यज्ञकर्तेपणाची. ९ अवभृथ स्नानाला. १० विषवेली. ११ इच्छेप्रमाणें वागणें.

वेल्हाळा[1] । तृष्णाक्षयसुखाचा सोहळा । क्षयमूळा अविनाशु सर्वांशें ॥ ५८ ॥ यालागीं संकल्पक्षयीं जे सुखप्राप्ति । तें सुख नाहीं गा त्रिजगतीं । इंद्रादिपदांची कोण गति । जळजळ चित्तीं सर्वदा ॥५९॥ जो साक्षी होऊनि वर्ते देहीं । त्या देहादि गेलिया नाठवे कांहीं । जया आत्मबुद्धि वर्ते देहीं । देहनाशें त्याही आत्मनाशु ॥ १६० ॥ आत्मा अविनाशी नित्य शुद्ध । देह तंव विनाशी प्रतिषिद्ध[2] । देहनाशें आत्मया बाध । अतिमंद मानिती ॥ ६१ ॥ हेंचि निरूपावया स्पष्टपणें । श्लोकां पांचांचें निरूपणें । आत्मा अनात्मा वेगळेपणें । जाणिजे मनें तैसें कीजेल ॥ ६२ ॥ यांचा वक्ता श्रीवसिष्ठमुनि । श्रोता स्वयें कोदंडपाणि । तया निरूपणाची श्रेणि[3] । चित्त देऊनि परियेसा ॥ ६३ ॥

हृदयाकाशमात्रस्य विनाशो देहनाशतः । व्यर्थं भूतानि शोचंति नष्ट आत्मेति शंकया ॥ १९ ॥

अगा देहाचेनि नाशें । हृदयाकाश नाशलें दिसे । तैसींच भूतें शोचिती देहनाशें । आत्मा नाशे ह्मणोनी ॥ ६४ ॥ तरी श्रीरघुनाथा आइक । आकाश असे सर्व व्यापक । त्यासि घटाकाश मठाकाश[4] येक । भिन्न सम्यक महाकाश ॥ ६५ ॥ तैसेंचि सकल देहीं भिन्न । आकाश मानिती आन आन । घटभंगें आकाश भिन्न । परिछिन्न नासलें ॥ ६६ ॥ तैसेंचि देहनाशें व्योमनाश । ऐसें मानिती सावकाश । नेणे जो व्यापक आकाश । अविनाश अपरिच्छिन्न ॥ ६७ ॥ तेथ देहाचेनि विनाशें । हृदयाकाश नासलें दिसे । तोही भ्रमु अज्ञानवशें । वेल्हर्वी जैसें तैसेंची ॥ ६८ ॥ देह नाशला पाहीं । आकाश तेथूनि गेलें नाहीं । गमनागमन दोन्हीही । कल्पी तया हीं अज्ञानतें ॥ ६९ ॥ तैसेंचि देहाचेनि नाशें । मानिती आत्मा नासला ऐसें । परी तो अविनाशु सर्वांशें । नाश पिसे मानिती ॥१७०॥ जया नाहीं शुद्ध दृष्टि । त्यासि परस्परें भेदसृष्टि । तेथ आत्मा परिच्छिन्न हे गोष्टी । भ्रमदृष्टि घडेचि कीं ॥ ७१ ॥ आत्मयाचें व्यापकपण । नाहीं जयासि पैं दर्शन । त्यासि देहचि आत्मा पूर्ण ज्ञान । मरणें मरण देहाचेनी ॥ ७२ ॥ देहनाशें आत्मा नाशे । ऐसें दृढ मानिती लोक पिसे । शोक करिती असोसें । व्यर्थचि ऐसे भ्रमजगीं ॥ ७३ ॥ सर्वत्र आत्मा असे येक । वस्तुमात्रीं जो व्यापक[5] । परी पदार्थनाशें सम्यक । येकायेक अविनाशु तो ॥ ७४ ॥ यदर्थी आइकें निदर्शन । विबुधवर्या[6] तुज सांगेन । जेणें दृष्टांतें बुझसी[7] पूर्ण । संशय क्षीण जेणें होये ॥ ७५ ॥

घटादिषु प्रणष्टेषु यथाकाशमखंडितम् । तथा देहेषु नष्टेषु देही नित्यमलेपकः ॥ २० ॥

तरी आयिकें दशरथनंदना । दशग्रीवविध्वंसना । तरी घट पट पदार्थ नाना । विश्वरचना विचित्र असे ॥ ७६ ॥ त्या त्या पदार्थाआंत । आकाश सर्वत्र वर्त्तत । अंतर्बाह्य अनुस्यूत[8] । असे सतत सर्वदा ॥ ७७ ॥ ते नासल्या घट पट पदार्थ । आकाश न नासे गा अखंडितार्थ । खंडलें मोडलें हा अर्थ । नाहीं यथार्थ लिंपेना ॥ ७८ ॥ पदार्थ जळाल्या तें न जळे । आतपें तपल्या न पोळे । उदकीं बुडाल्या न विरे जळें । नव्हे मैळें मळादिकीं ॥ ७९ ॥ पदार्थजन्में न पावे उत्पत्ति । पदार्थनाशें न पावे शांति । धूलिधूसरादि[9]वृत्ती । मैळस्थिति पावेना ॥ ८० ॥ तैसें देहादिप्रपंचजात । व्यापूनि आत्मा एक संतत । नाहीं आत्मयाविरहित । किंचित कदाचित कोणहीही ॥ ८१ ॥ परी त्याचेनि संगें नव्हे संगी । त्याचेनि भंगें नव्हे भंगी । त्याचेनि रंगें नव्हे रंगी । अतीव निःसंगी उदासपणें ॥ ८२ ॥ देहनाशें नव्हे नाशु । देहव्यापारें स्वयें उदासु । देहलोपें स्वयें शुद्धांशु । अविनाशु सर्वदा ॥ ८३ ॥

न जायते न म्रियते क्वचित्किंचित्कदाचन । जगद्भ्रमस्वरूपेण केवलं ब्रह्म जृंभते ॥ २१ ॥

अगा जया नाहीं उत्पत्ति । उत्पत्ति अभावें मृत्यूची अप्राप्ति । उपजती ते सर्व नाशती । विप्रतिपत्ति तेथ नाहीं ॥ ८४ ॥ जें उपजलें तें सर्वदा नासे । नासलें तें सर्वदा दिसे । तेथ पडिकार नासलाचि असे । अनायासें प्राप्तचि ॥ ८५ ॥ उत्पत्तीचेनि निरासें । पडिकार नासलाचि असे । तेथ नाहीं अनारिसें । नलगे पदांशें बोलावें ॥८६॥ 'क्वचित् किंचित् कदाचित्' । यया पदांचा ऐसा अर्थ । क्वचित्शब्दें स्थूळ बोलिजेत । किंचित् ईषत्[10] वस्तुत्वें ॥ ८७ ॥ कदाचित् काळ सूचिला । ऐसा पदत्रयार्थ[11] भासला । येणेंकरूनि नाहीं बोलिला । जन्मनाश भला आत्मयासी ॥ ८८ ॥ काळदेशवस्तुविशेषें । आत्मयासि परिच्छिन्नता दिसे । यालागीं पदत्रयविन्यासें । अविनाश ऐसें बोलिलें ॥ ८९ ॥ क्वचित् शब्दें कोणे ठायीं । येणें देशसूचिला पाहीं । देशीं उत्पत्ति नाशु नाहीं । आत्मा सर्वही

१ हे प्रियकरा. २ निषेध केलेला. ३ अनुक्रम. ४ मठामधील पोकळी. ५ सर्वत्र भरून असणें. ६ शहाण्यामध्यें श्रेष्ठाला. ७ समजशील. ८ एकसारखें भरलेलें. ९ धुरळ्यामुळें धुरकट रंगाचें. १० थोडेंसें. ११ तीन शब्दांचा अर्थ.

सर्वपणें ॥ ९९० ॥ आत्मा येकदेशीं असे । अन्य देशें काय पडलीं वोसें । आत्मेनविणें रितें नसे । उपजे नाशे भ्रांतिचि कीं ॥ ९१ ॥ कदाचित् ह्मणजे कोणे समयीं । येणें काळ सूचिला पाहीं । तरी काळें आत्म्यासि नाश नाहीं । काळत्रयीं अबाधित्वें ॥ ९२ ॥ उत्पत्ति स्थिति प्रलय । हा येकुचि काळ अनुमेय । यासि विभागुचि काळत्रय । व्यापारानुमेय बोलती ॥ ९३ ॥ काळाचें जें अस्तित्वपण । न घडे गा आत्मेनविण । आत्मेनविण भासकपण । काळज्ञान आत्मेन होये ॥ ९४ ॥ काळत्रयें जे काळविभाग । आत्मेनविण न घडे सांग । आत्मा नसतां उत्पत्तिभोग । कैसेनि सांग रघुनाथा ॥ ९५ ॥ आत्मा नसतां कोठें उत्पत्ति । तयाविण जगा कैंची स्थिति । स्थिति नसतां नाशाप्रति । कोण व्यक्ति येईल ॥ ९६ ॥ उत्पत्ति स्थिति आणि नाश । हे आत्मयाच्या ठायीं भ्रमांश । आत्मा सर्वदा अविनाश । नाहीं लेश जन्ममरणाचा ॥ ९७ ॥ रजताचें जन्ममरण । नाहीं देखिलें शुक्तिविण । शुक्तीसि तेणें असे वर्त्तन । शुक्तिभिन्न असेचिना ॥ ९८ ॥ भुजंगाचें जन्ममरण । नाहीं देखिलें रज्जूविण । स्थितिकाळींही जाण । नाहीं वर्त्तन कदाचित् ॥ ९९ ॥ तैसी जगाचि वर्त्तते स्थिति । वस्तुविण नाहीं नाश प्राप्ति । आत्मेनविण जागृति । सुषुप्ति स्वप्न असेचिना ॥ १००० ॥ आत्मेविण कोणीच स्थिति । आत्म्याच्या ठायीं अवस्थात्रय वर्त्तती । निमिषोन्मेषें[3] आत्मेन होती । दिवारात्रि अहीं वर्त्ते ॥ १ ॥ आत्मा काळें नव्हे परिच्छिन्न । काळें नव्हे जन्ममरण । वस्तु वस्तुत्वें परिपूर्ण । नव्हे क्षीण किंचित् पैं ॥ २ ॥ वस्तु वस्तुत्वें अखंड स्थिति । वस्तु वस्तुत्वें अखंड प्राप्ति । वस्तु वस्तुत्वें प्रकाशगति । वस्तु व्यक्तीविण स्वयें ॥ ३ ॥ वस्तु अखंडचिद्विलास[4] । वस्तु अखंड स्वप्रकाश । वस्तु कालत्रयीं अविनाश । सावकाश पूर्णत्वें ॥ ४ ॥ तया कैंचें जन्ममरण । अज अव्यय नित्यानंदघन । स्वप्रकाश चिद्गगन । अतिगहन अपार ॥ ५ ॥ अनात्मयाची जन्ममरणकथा । ते आरोपिती आत्मयाच्या माथां । ते समूळ भ्रांति गा रघुनाथा । नव्हे तत्वतां ज्ञानदृष्टि ॥ ६ ॥ जग हें वास्तव असावें । तरी उत्पत्ति नाश या मानावे । जग विवर्त्तरूप[5] आघवें । ब्रह्म स्वभावें विस्तारलें ॥ ७ ॥ जैसा शुक्तिकेचा विवर्त्त रजत । तेणें रूपें शुक्तीच भासत । परी रजत वस्तुत्वें सत्य । न घडे निश्चित रघुनाथा ॥ ८ ॥ दिनमणिरश्मीचा[6] विवर्त्त । तें हें मृगांभ बोलिजेत । परी तेणें रूपेंचि विजृंभत । रश्मींतचि भासत जळरूपें ॥ ९ ॥ तैसें जग विवर्त्तरूपें ब्रह्मचि येक । ब्रह्मचि शोभे गा सम्यक । ब्रह्मेविण दुजें नाहीं देख । एकींएक तेंचि तें ॥ १०१० ॥

आकाशादपि विस्तीर्णः शुद्धः सूक्ष्मोऽव्ययः शिवः । य आत्मा स कथं राम जायते म्रियतेऽथवा ॥ २२ ॥

अगा जें आकाशाहूनि विस्तीर्ण । जयासि मर्यादाचि नाहीं जाण । वस्तुता जें उपमेविण । पूर्णानंदघन पूर्णत्वें ॥ ११ ॥ आघवीं असती तीन परिमाणें । एक अणु परिमाण मध्यम परिमाण । तिसरें जाण महत्परिमाण । इतुकें गणन परिमाणांचें ॥ १२ ॥ त्यांमाजी आकाश हें महत्परिमाण । शास्त्रसिद्ध केलें जाण । आत्मा तो निःपरिमाण । उपमे[7] विहीन यालागीं ॥ १३ ॥ तैसीच शुद्धअशुद्धाची व्यावृत्ति । ह्मणोनि ब्रह्मासि शुद्ध ह्मणती । यालागून जयाचि व्याप्ति । नाहीं वर्त्तती जिये ठायीं ॥ १४ ॥ नेतिमुखें अनात्मानिरासु[8] । केलिया उरे जो शुद्धांशु । तोचि शुद्ध बोलिजे परेशु[9] । भ्रमनिरासु तेथ होये ॥ १५ ॥ तेंचि शुद्धशब्दें बोलिजे । शुद्धत्वें सूक्ष्म ह्मणिजे । जें जें शुद्ध सूक्ष्म वदिजे । आणोनि व्याजें रघुनाथा ॥ १६ ॥ जें जें अशुद्ध करणग्राह्य[10] । तें तें अशुद्ध अनात्म बाह्य । अतींद्रिय शुद्ध सबाह्य । अतिगुह्य सूक्ष्मपणें ॥ १७ ॥ जें जें शुद्ध आणि सूक्ष्म । तेंचि तें बोलिजे अव्यय परम । जया व्यय नाहीं तें सर्वोत्तम । परब्रह्म परात्पर ॥ १८ ॥ जें उत्पत्तिवंत षड्विकार । तेंचि तें व्यय पावतसे क्षर । ब्रह्म व्ययातीत अक्षर । निर्विकार सत्यत्वें ॥ ॥ १९ ॥ जया कालत्रयीं व्यथा नाहीं । तेंचि तें सर्वदा शिवरूप पाहीं । दुःखव्यावृत्ति केलियाही । कोणे समयीं दुःखरूप नव्हे ॥ १०२० ॥ जें कीं उत्पत्तिक्षयातें पावे । तें दुःखरूपचि स्वभावें । ब्रह्म तें षड्विकाररहित जाणावें । ह्मणोनि स्वभावें सुखरूप ॥ २१ ॥ यालागीं सर्वदा जें सुखरूप । तेंचि शिवत्व बोलिजे अमूप । जें कीं आनंदाचें पडप[11] । जें निर्लेप सर्वदा ॥ २२ ॥ एवंविध जो आत्मा । तो कैसा उपजे निमे गा रघूत्तमा । ऐसेनि बोलिजे तो रामा । मूळभ्रमा सत्य जाण ॥ २३ ॥

सर्वमेकमिदं शांतमादिमध्यांतवर्जितम् । भावाभाव विनिर्मुक्तमिति मत्वा सुखी भव ॥ २३ ॥

---

१ आत्म्यावांचून. २ उघडणारा. ३ डोळे उघडणें व झांकणें. ४ एक आणि ज्ञानानंदरूप. ५ भ्रमाप्रमाणें. ६ सूर्याच्या किरणांचा. ७ मोजतां न येणारा. ८ आत्म्याहून इतर पदार्थांचें निरसन. ९ परमात्मा. १० इंद्रियांनीं घेतलें जाणारें. ११ शोभा.

मुख्य भ्रम हाचि रघुपति । शुद्धब्रह्मीं विश्व आरोपिती । हे अविचारी संशुद्धि ह्मणती । विचाराप्रति असेचिना ॥ २४ ॥ स्थाणूच्या ठायीं चोरभ्रमु जाला । तो अविचारीं सिद्धी गेला । तेणें कार्यार्थ उपजला । विस्तारिला भयकंपु दोन्ही ॥ २५ ॥ तोचि विचारूनि पाहतां । तंव तो स्थाणुचि तत्वतां । चोर तेथें विचारितां । समूळ वृथा रघुवर्या ॥ २६ ॥ नाना रज्जूचे ठायीं जैसें । अहि धारा माळादिभ्रमु भासे । त्याचें मुख्य स्वरूप पाहतां दिसे । सावकाश रज्जूचि येकी ॥ २७ ॥ तैसें अज्ञानभ्रमेंकरुनी । ब्रह्म विश्वाभासें देखिजे नयनीं । हे अविचाराची करणी । विचारक्षणीं नाहींच होये ॥ २८ ॥ मृगांभाचें मूळ पाहतां । रश्मीवांचूनि नाहीं तत्वतां । तैसें प्रपंचस्वरूपीं विचारितां । वस्तु तत्वतां अढळपणें ॥ २९ ॥ तैसा विश्वाभास तो भ्रम । त्याचें निजरूप तें परब्रह्म । हे खूण जाण गुरुगम्य । अतिवर्म जाणतया ॥ १०३० ॥ हें चराचरविश्व सर्व । तें येक परब्रह्मचि स्वयमेव । येथें नाहीं गा आणीक भाव । करोनि अनुभव पाहें रामा ॥ ३१ ॥ अगा जयाविण जें नाहीं । तें वस्तुत्वेंचि पाहीं । येथ नाहीं आणि कांहीं । संशय देहीं उपजोंचि नेदी ॥ ३२ ॥ साचावेगळें लटकेंचि नाहीं । हें तंव अनुभवसिद्धचि पाहीं । रजतसिद्धि स्वतंत्र कांहीं । शुक्तीविण नाहीं देखिली ॥ ३३ ॥ दिसणें न दिसणें भुजंगासी । रज्जूविण असे कोणे देशीं । यालागीं तो तियेसी । भिन्नतेसि पावेना ॥ ॥ ३४ ॥ अभिन्न ह्मणतां वस्तु आन नव्हे । भिन्न तरी कोण पदार्थु आहे । भिन्नाभिन्न ते कोणाचि नव्हे । यालागीं होय रज्जुचि येकु ॥ ३५ ॥ तैसें विश्व हें सत ह्मणावें । तरी ब्रह्मावेगळें सिद्ध नव्हे । आणि स्वतंत्र वस्तुत्वें असावें । न संभवे अनात्मपणें ॥ ३६ ॥ जें जें इंद्रियांसि दृश्य होये । तें तें जाण अनात्माचि आहे । अनात्मा तें नाशिवंत पाहें । अनुमान आहे वेदशास्त्रीं ॥ ३७ ॥ प्रपंच मिथ्या दृश्यत्वांत । जें जें दृश्य मिथ्या भूत । जैसा घट दृश्यत्वें नाशिवंत । सर्वथा असत्य मिथ्यापणें ॥३८॥ ऐसीं अनुमानें अनंतें । वेदांतशास्त्रीं उपपादिते । करिती ग्रंथविस्तारातें । वाणी प्राकृतें किती बोलावें ॥ ३९ ॥ यालागीं सर्व विश्व ब्रह्म बोलिजे । ऐसेंचि वेदें निरूपिजे । 'सर्वं खल्विदं ब्रह्म' जें । तेथ बुझिजे हाचि अर्थु ॥ १०४० ॥ सर्व विश्व हे ब्रह्मस्थिति । ऐसें सर्वदा बोलती श्रुति । परिणाम नव्हे विश्वमूर्त्ति । संशय चित्तीं ह्मणी धरा ॥ ४१ ॥ विश्व हें ब्रह्माचा विवर्त्तु । ऐसें बोले वेदांतसिद्धांतु । याचा पूर्वींच दिधला दृष्टांतु । नव्हे मातु अनारिसी ॥ ४२ ॥ यालागीं सर्व विश्व हें येक । येक शब्दें ब्रह्मचि सम्यक । तेंचि तें परी नाहीं आणीक । शांत कौतुक परियेसा ॥ ४३ ॥ शांतशब्दें अविकारी । नाहीं विकार तिळभरी । क्षोभ नाहीं जयाभीतरी । तेंचि सर्वांपरी शांत जाण ॥ ४४ ॥ जें आदिमध्यांतवर्जित । तेंचि तें ब्रह्म सदोदित । नाहीं उपजलें देखिजेत । कोण ह्मणिजेत आदि यासी ॥ ४५ ॥ जे वस्तूसि आदि नाहीं । तें राहे वसे कोणे ठायीं । स्थितीविण नाश नाहीं । अविनाश पाहींययालागीं ॥ ४६ ॥ जयासि आदि मध्य अंत । ते वस्तु अपायी नाशिवंत । जैसा घट आदिमध्यांतवंत । नाशेचि निश्चित रघुनाथा ॥ ४७ ॥ पृथ्वीपासोनि जन्म घटासी । स्थिति आश्रयही तयासी । भूमिच निर्वाण लयासी । निश्चयेंसी न चुके ॥ ४८ ॥ जिये वस्तूसि आदि असे । ते सर्वथा शेवटीं नासे । या तिहींविरहित वस्तु असे । अखंड वर्ततसे अविनाशपणें ॥ ४९ ॥ या ब्रह्माचीं मातापिता । कोण तें सांगे जानकीकांता । यासि आश्रय कोण तो वसता । मा नाश तत्वतां कोणे ठायीं॥१०५०॥जयापासाव सर्व जालें । परी तें जैसें तैसेंचि संचलें । विश्वोत्पत्ती नाहीं वेंचलें । नाहीं नाशलें विश्वनाशें ॥ ५१ ॥ सर्वांचें जें आदिभूत । आदिमध्यअंतविवर्जित । तेंचि तें ब्रह्म सदोदित । विश्वभरित परिपूर्ण॥ ॥ ५२ ॥ जें कीं भावाभावविनिर्मुक्त । तेंच ब्रह्म जाण विविक्त । भावशब्दें अस्तित्व । अतिशून्यार्थ तो अभाव ॥५३॥ अस्तिशब्दें नव्हे दृश्य । अभावशब्दें नव्हे अदृश्य । दृश्यादृश्य सामरस्य । वस्तु अनिर्देश्य कांहींच नव्हे ॥५४॥ अथवा भावशब्दें कार्य जाण ॥ अभाव बोलिजे कारण । कार्यकारणविहीन॥ वस्तु पूर्ण पूर्णत्वें ॥ ५५ ॥ येक कार्यशब्दें वस्तु असावें । तरी कारण ब्रह्मचि बोलावें । ब्रह्मचि कार्य ह्मणावें । तरी कारण न संभवे ब्रह्मासि पैं॥५६॥यालागीं कार्यकारणविहीन । ब्रह्मचि येक परिपूर्ण । अथवा भावशब्दें स्थूळ जाण । सूक्ष्म पूर्ण अभाव तो ॥ ५७ ॥ स्थूलसूक्ष्मशब्दें विश्व बोलिजे । तें तंव अनात्मपणें ब्रह्म नोव्हिजे । ह्मणिजे तें अविनाश सहजें । भावाभाव नाहीं तेथ ॥ ५८ ॥ ऐसें ब्रह्म जाणोनी । सुखिया होईं सुखरूप होउनी । अल्पही दुःख स्वप्नीं । जनीं वनीं न देखसी ॥ ५९ ॥ हेंचि बोलिजे गा ज्ञान ।

१ आरोप करतात. २ शुद्धपणा. ३ गुरुपासून जाणण्याची ४ रुपें असा भासु. ५ खरें असलेलें. ६ सांगितलेली. ७ विकार. ८ प्रारंभ, मध्य व शेवट हे ज्यास आहेत असा. ९ विश्वाची उत्पत्ति झाल्यामुळें. १० विहीन = नसलेलें. ११ होत नाहीं.

येणेंचि होइजे गा सुखसंपन्न । हेंचि नेणिजे तेंचि अज्ञान । दुःखकारण सर्वार्थी ॥ १०६० ॥ शहाणा बोलिजे ज्ञानवंत । मूर्ख तो अज्ञानी ह्मणिजेत । मूर्खाचें मौर्ख्य हें तंव जीवित । अतिनिंदित सर्वार्थी ॥ ६१ ॥ मूर्खाचें जिणें तें व्यर्थ । तो नररूपें गाढव मूर्तिमंत । पापी निंद्य हतजीवित । निंदितार्थ परियेसीं ॥ ६२ ॥

वरं शरावहस्तस्य चांडालागारवीथिषु । भिक्षार्थमटनं राम न मौर्ख्यं हतजीवितम् ॥ २४ ॥

अगा हातीं घेऊनि खापर । चांडाळाच्या घरोघर । भिक्षार्थ हिंडणें तें थोर । अतिवीरश्रेष्ठपणें ॥ ६३ ॥ चांडाळगृहाचिया वीथीं । हिंडणें खापर घेऊनियां हातीं । भिक्षा मागणें दीनवृत्ती । श्रेष्ठत्ववृत्ति तातें ह्मणिजे ॥ ६४ ॥ परी मौर्ख्येंकरूनि उपहत । जें कीं अमंगळ जीवित । तयापरीस तेंचि हित । जें कीं पूर्वोक्त रघुनाथा ॥ ६५ ॥ अतिमूर्खता तेंचि अज्ञान । अज्ञानी याचें व्यर्थ जीवन । धिक् धिक् तें ज्ञातेपण । प्रपंचीं वर्त्तन जेणें होय ॥ ६६ ॥ परमानंदाची प्राप्ति । जया नाहीं गा विश्वमूर्ति । तयाचें जिणें त्रिजगतीं । जाण सर्वार्थी उपहत ॥ ६७ ॥ मुख्य ज्ञानावांचूनि जें वर्त्तन । तेंचि समूळ जाण मूर्खपण । त्याचें जीवित शवरूप जाण । आनंदघन प्राप्त नाहीं ॥ ६८ ॥ तयापरिस गा रघुपति । हिंडणें उत्तम चांडाळवीथीं । भिक्षा मागावी दीनवृत्ती । परी मूर्खस्थिति नसावें ॥ ६९ ॥ अथवा ज्ञानालागीं अंत्यजागृहीं । हातीं खापर घेऊनि प्रत्यहीं । भिक्षा मागोनि ज्ञान देहीं । साधावें पाहीं जाणतेनी ॥ १०७० ॥ परी मूर्खपणें नसावें सर्वथा । अज्ञानी मूर्खाचें जन्म वृथा । तें तंव तुच्छ गा रघुनाथा । सबाह्यरिता ज्ञानशून्य जो ॥ ७१ ॥ अगा मूर्खपणायेवढें दुःख । तिहीं लोकीं नाहीं गा देख । जरी उपजले दोष अनेक । दुःखदायक ते नव्हती ॥ ७२ ॥

न व्याधिर्न विषं वापि तथान्यद्वापि भूतले । दुःखाय स्वशरीरस्थं मौर्ख्यमेतद्यथा नृणाम् ॥ २५ ॥

ये शरीरीं नानाव्याधींकरून । शूळ[1] ताप क्षयरोग कुष्ट जाण । जलोदर अर्श दारुण । यियें नव्हती पूर्ण दुःखहेतु ॥ ७३ ॥ ऐसिया अनेक व्याधि । दुःखदायक नव्हती त्रिशुद्धि । तैसेंचि विषपानीं दुःखसमृद्धि । जालया क्षयव्याधि दुःख नव्हे ॥ ७४ ॥ उदकीं बुडतां महापुरीं । तसें दुःख नव्हे गा शरीरीं । गृहभंग पुत्रशोक भारी । दुःखसागरीं बुडविती ना ॥ ७५ ॥ तसेंच अवद्ध पाठ ह्मणतां । आपत्तिदुःख नेदी सर्वथा । दरिद्रदुःखें नानापरी पिडितां । नेदी आकांता इत्यादि दुःखें ॥ ७६ ॥ अनेक दुःखें ये भूतळीं । असंख्य आहेत पापमेळीं । परी ऐसिये दुःखजाळीं । मौर्ख्ये तळमळी ऐसी नाहीं ॥ ७७ ॥ इत्यादिकीं जें दुःख होय । तें कालेंकरूनि नाशोनि जाये । दीर्घ काळ परी ये देहीं होताहे । देहांतर पाहे नेदिती ॥ ७८ ॥ मूर्खपणाचें दुःख कैसें । त्यासि प्रतिकार औषध नसे । ज्ञानेंविण कोटि कल्पांशें । भोगविनसे दुःखसंपत्ति ॥ ७९ ॥ येरें दुःखें औषधें काळें । नाशोनि जाती गा सकळें । मौर्ख्य तें वाढतें इत्यादिमेळें । कोण्हे काळें शमेना कीं ॥ १०८० ॥ आतां मौर्ख्याचें दुःख कैसें । तेंही सांगों अल्पचि ऐसें । सावधान होऊनि विश्वेशें । सावकाशें परिसावें ॥ ८१ ॥ तरी स्वशरीरीं जे मूर्खता । तेचि मनुष्यासि दुःखरूपता । जेणें निज विसरोनि अनर्था । पडे सर्वथा कल्पकोटी ॥ ८२ ॥ तरी मूर्खतालें मुख्य अज्ञान । अज्ञानें देहबुद्धि होये पूर्ण । देहबुद्धीनें मीतूंपण । स्त्री पुत्र जाण देहबुद्धया ॥ ८३ ॥ 'इदं मम' पशु आणि संपत्ति । वैभव पुत्र सुना नातीं । इष्टमित्र सुहृद सांगातीं । सर्वही असती देहबुद्धीस्तव ॥ ८४ ॥ स्वामी सेवक इतर जन । त्याहूनि इतर वैरीगण हे देहबुद्धीस्तव संपूर्ण । नाहीं आन रघुनाथा ॥ ८५ ॥ त्यांचेनि [11]संयोगें सुखप्राप्ति । वियोगें करूनि दुःख अति । प्रियभाषणें सुख उन्नति । अप्रियें व्यक्ति दुःखाची ॥ ८६ ॥ स्वशरीरदुःखें करुनी । आरबळेतु जाय प्रतिक्षणीं । स्वकीयांचें दुःख त्याहुनि । दुःख मानी आपणया ॥ ८७ ॥ ह्मणे माझा प्राण जरी जाता । आणि या पशूची जरी बरी होती व्यथा । तरी थोर पावतों पुरुषार्था । ऐसें दुःख नसतां भावोनी ॥ ८८ ॥ इत्यादि नानादुःखें इहलोकीं । तो परलोकीं काय होईल सुखी । स्वकीयांचेनि संगें अनेकीं । होय नरकीं यातनाभोग ॥ ८९ ॥ इतुकियांचें मूळ मूर्खपण । मूर्खपणें दुःख दारुण । मूर्खपणें अधःपतन । योनिभोगणें जाण मूर्खत्वें होय ॥ १०९० ॥ मूर्खपणें दुःखाचे डोंगर । मूर्खपणें विपाचा सागर । मूर्खपणें नरक थोर । यातना फार

१ जिवंत असून मेल्यासारखा. २ गळीत. ३ दुःखयुक्त. ४ दुखणें. ५ मूळव्याध. ६ बरें करण्याचा उपाय. ७ मूर्खपणाचें. ८ फार वेळपर्यंत. ९ हें. १० माझें. ११ एकत्र असल्यामुळें. १२ क्षीण होत.

मूर्खपणें ॥ ९१ ॥ मूर्खपण योनिदायक । मूर्खपण ज्ञानछेदक । मूर्खपण अतिनरक । केवा सम्यक मूर्खपणें ॥ ९२ ॥ मूर्खपण तें अज्ञान गा रघुपति । हें पूर्वींच सांगितलें तुजप्रति । याची टाकावी संगति । हें सर्वार्थी भवदायक ॥ ९३ ॥ नाना व्याधि शोक दुःखें होती । तेंही अज्ञानकृतचि गा रघुपति । अज्ञानेंचि देहबुद्धि वाढती । दुःखप्राप्ति तेणेंचि होये ॥ ९४ ॥ तें आंगीं नसतां मूर्खपण । मी देह ऐसें ह्मणे कोण । देहबुद्धि नसतां दुःखानुसंधान । शोक दारुण कोणासी ॥ ९५ ॥ यालागीं दुःखाचें मुख्य कारण । तें हें मुख्य मूर्खता अज्ञान । तें नसतां सुखसंपन्न । दुःखभान स्वप्नीं नाहीं ॥ ९६ ॥ येथ संपलें वैराग्यप्रकरण । वैराग्याचा मथितार्थ इतुका पूर्ण । ज्ञानसाधनीं वैराग्य कारण । अन्य साधन असेचिना ॥ ९७ ॥ वैराग्येंविण न साधे ज्ञान । वैराग्येंविण इंद्रियें प्रत्यकप्रवीण । नव्हती साधितां साधन । सहस्र जाण कल्पकोटि ॥ ९८ ॥ वैराग्येंविण विवेक नाहीं । वैराग्येंविण निर्मूळ सर्वही । वैराग्येंविण न घडे कांहीं । भक्ति ज्ञान कहीं उपजेचिना ॥ ९९ ॥ यालागीं सर्व-स्वासि कारण । येक वैराग्य अकृत्रिम जाण । वैराग्य तेथेंचि स्थिरज्ञान । नाहीं आन रघुनाथा ॥११००॥ वैराग्येंविण नाहीं ज्ञान । ज्ञानेंविण कैंचें साधन । शांतिसुख जें संपूर्ण । वैराग्येंविण प्राप्त कैंचें ॥ ॥ १ ॥ यालागीं गा रघुनाथा । असावी वैराग्याची पूर्णता । तेणेंविण नये हाता । ज्ञान तत्वता परियेसीं ॥ २ ॥ नानासाधनें करिजेती । तरी वैराग्येंविण नव्हे प्राप्ति । यदर्थीं श्रुति असे बोलती । येक रघुपति सांगेन ॥ ३ ॥

संमतिश्रुति ॥ न कर्मणा न प्रजया धनेन त्यागेनैके अमृतत्वमानशुः ।

अगा कर्में करितां नव्हे ज्ञान । कर्म तें आविद्यक पूर्ण । परस्परें अविरोध जाण । अज्ञानछेदन कैसें होये ॥ ४ ॥

संमति श्लोक ॥ अविरोधितया कर्म नाविद्यां विनिवर्तयेत् ॥ विद्याविद्यां निहंत्येव तेजस्तिमिरसंघवत् ॥

ययालागीं गा रघुपति । अविद्या कर्माची जनिती । ययालागीं कर्म अविद्या न निवर्त्ती । आयिक व्यक्ति सांगेन ॥ ५ ॥ रश्मीपासाव जें मृगजळ । तें काय रश्मि नाशील सकळ । किंवा उद-काचे जे कल्लोळ । तेणें जळ वाढे कीं नाशे ॥ ६ ॥ यालागीं अज्ञानाचें विरोधी । तें ज्ञान अज्ञानासि बाधी । तेज नाशी अंधकारसंमृद्धि । परी तमासि तम बाधी हें न घडे ॥ ७ ॥ यालागीं कर्में अज्ञान न निरसे । पुत्रें अज्ञान नाशे कैसें । ह्मणती वेदें बोलिलें असे । तेंही कैसें सांगेन ॥ ८ ॥

संमतिश्रुति ॥ नापुत्रस्य लोकोस्तीति तत्सर्वे पशवो विदुः ।

ऐसें प्रत्यक्ष बोले श्रुति । पुत्रें मोक्ष होय ह्मणती । तरी पुत्रें होय स्वर्गप्राप्ति । अज्ञाननिवृत्ति कदा नव्हे ॥ ९ ॥ अथवा धनादिकांचेनि दानें । कैसेनि नाश पाविजे अज्ञानें । अधिकचि फार होइजे तेणें । फळ भोगणें नानायोनि ॥११०॥ ज्ञानोत्पत्तीचा उपावो ताता । मुख्य त्यागुचि बोलिजे गा रघु-नाथा । त्यागु तोचि वैराग्य सर्वथा । अनुभवाच्या माथां पाविजे तेणें ॥ ११ ॥ यालागीं ब्रह्मप्राप्ती-प्रति । येक वैराग्य कारण गा रघुपति । वैराग्येंविण ज्ञानाची उक्ति । व्यर्थ बोलती वाचाळपणें ॥ १२ ॥ येथ अष्टावक्रसंमति । कारण वैराग्य बोलिलें ज्ञानाप्रति । तेंचि येकें जानकीपति । संशय चित्तीं न राहे जेणें ॥ १३ ॥

संमतिश्लोक ॥ मुक्तिमिच्छसि चेत्तात विषयान्विषवत्त्यज । क्षमार्जवदयातोषं सत्यं पीयूषवद्भज ।

इत्यादिकी नानासंमति । येथें लेहाविया गा किती । येक वैराग्यचि ज्ञानाप्रति । स्वरूपप्राप्तीसि कारण ॥ १४ ॥ तंव रघुनाथ ह्मणती जी गुरुराया । थोर संशय मना माझिया । उपजला तो त्यजा-वया । समर्थ स्वामिया तूं येकु ॥ १५ ॥ अनेका शास्त्रीं वैराग्य बोलिलें । विषय निंद्यपणें सर्व दूषिले । विषयदुःखही स्वतः अनुभविलें । नश्वर देखिलें सर्वापरी ॥ १६ ॥ ऐसें असोनियां श्रीगुरुराया । वैराग्य नुपजे काय ह्मणोनियां । अधिक प्रीति विषयीं लागावया । कारण स्वामिया निरूपिजे ॥ १७ ॥ तंव वसिष्ठ ह्मणती गा रघुपति । तेथें हेंचि कारण गा महामति । विषय शाश्वत मानूनि भुलती । मिथ्यात्व चित्तीं बाणेना ॥ १८ ॥ जऱ्ही नानाशास्त्रें आइकती । तऱ्ही वैराग्य नुपजे चित्तीं । उपजल्याही क्षणाप्रति । नाश सर्वार्थीं मळिणपणें ॥ १९ ॥ विषयीं सुखदुःखही देखती ।

---

१ अनेक जन्म घेवविणारें. २ संसारांत घालणारें. ३ केव्हांही. ४ अज्ञानापासून उत्पन्न झालेलें ५ उत्पन्न करणारी. ६ किरणांपासून. ७ काळोख. ८ अज्ञान नाहींसें होणें. ९ बोलणें. १० टाकावयास. ११ विषयांपासून उत्पन्न होणारें दुःख.

नारिळ्याची होय प्रतीति । परी मिथ्यत्व नुपजे चित्तीं । ह्मणोनि सेविती तेंचि तें ॥ ११२० ॥ प्रारब्धकर्मे चित्त मळिण । तेणें वैराग्य न बाणे जाण । जगसत्यत्वें नव्हे वैराग्य पूर्ण । जाण खूण रघुवर्या ॥ २१ ॥ तें वैराग्य नुपजावया कारण । जंव विषयीं नव्हे मिथ्या भान । मिथ्या दर्शनें वैराग्य पूर्ण । न साधितां आपण पाठीलागे ॥ २२ ॥ अनेक साधनें साधितां । कांहींच वैराग्य नुपजे चित्ता । जग हें मिथ्यात्वें जाणतां । वैराग्य तत्वतां पूर्ण होये ॥ २३ ॥ मिथ्या वस्तूचा निश्चयो जालिया । मग प्रीति न धरी तया विषया । यालागीं मिथ्यत्वें देखावया । दृश्या यया सर्वदा ॥ २४ ॥ हें ऐकोनि श्रीरघुपति । बोलता जाला श्रीगुरूप्रति । जगमिथ्यत्वाची प्रतीति । कोणेरीती होय स्वामी ॥ २५ ॥ सत्य जग असतां श्रीगुरुराया । तें मिथ्या कैसेनि ये आया । तें मजप्रति सांगावया । कृपा करोनियां अनुवादावें ॥ २६ ॥ आयिकोनि श्रीरघुनाथाची वाणी । श्रीवसिष्ठ हर्षनिर्भर मनीं । ह्मणे धन्य शिष्यशिरोमणि । अंतःकरणीं लागटपणें ॥ २७ ॥ हेंचि वैराग्याचें लक्षण । परमार्थ प्राप्तीसि तळमळ पूर्ण । चित्तीं लागलिया पूर्ण । लागटपण येणेंचि नावें ॥ ॥ २८ ॥ अति श्रद्धा जरी असेल चित्तीं । तेणेंचि करी प्रश्नोक्ति । गुरुवचनें अतिप्रीती । स्वीकारिती अत्यादरें ॥ २९ ॥ परी आइक आतां रघुपति । सांगेन तुझिया प्रश्नाची उत्तरोक्ति । तें येकाग्र ऐकतां चित्तीं । तें मिथ्या प्रतीति प्रपंचु हा ॥ ११३० ॥ तें उत्तरप्रकरणें करुनी । सांगेन तुज कोदंडपाणी । तेंचि ऐकें चित्त देउनी । परमार्थधणी जेणें होये ॥ ३१ ॥ ऐसें वसिष्ठऋषि बोलिले । येथें पूर्वप्रकरण संपलें । तें यथामती वाखाणिलें । सिद्धि पावलें सद्गुरुकृपें ॥ ३२ ॥ सहज पूर्ण निज रंगास । सर्वां विषयीं होये उदास । तेंचि वैराग्य सावकाश । विषयलेश नाभिलाषिजे ॥ ३३ ॥

## इति श्रीयोगवासिष्टसारे श्रीवसिष्ठरामसंवादे प्रथमं वैराग्यप्रकरणं समाप्तम् ।



१ ठसत नाहीं. २ पद्दाण्यानें. ३ कोणत्या प्रकारानें. ४ प्रत्ययास. ५ प्रश्न विचारणें. ६ उत्तर दिलेलें भाषण.

॥ श्रीः ॥

## प्रकरण २ रें.

# जगन्मिथ्याप्रकरण.

श्रीगणेशाय नमः । । श्रीमत्सद्गुरुनिजानंदाय नमः । जयजय श्रीगुरुराया । नमन करूनि तुझिया पायां । ब्रह्मकथा निरूपावया । देई स्वामिया उन्मेषु[1] मज ॥ १ ॥ तुझी कृपा जालि यावरी । वेदार्थु बोले वैखरी । तेथें अपूर्व काय जी अवधारीं । भवगजकेसरी[2] परियेसीं ॥ २ ॥ तुझी होतांचि कृपादृष्टि । होय अपरोक्षस्वरूपासि भेटी । तेथें सिद्धि होये वाचक सृष्टि । शब्दपरिपाटीं काय नवल ॥ ३ ॥ तूं वाचादि इंद्रियाचा ईश । ह्मणोनि बोलिजे हृषीकेश । करिसी सर्व करणां प्रकाश । जगन्निवास स्वप्रकाशें ॥ ४ ॥ इत्यर्थी बोलतसे श्रुति । तूं सर्वेंद्रिया प्रकाशमूर्ति । परी इंद्रियें तुज नेणती । ऐक संमति श्रीगुरुराया ॥ ५ ॥

संमतिश्रुति । यद्वाचाऽनभ्युदितं येन वागभ्युद्यते–इति ।

वाचा हें जाण उपलक्षण[3] । परी सर्वेंद्रियें नेणती जाण । आणि वाचादिकांचें प्रकाशन[4] । स्वयें आपण तूंचि येक ॥ ६ ॥

संमति श्रुति । यन्मनसा न मनुते येनाहुर्मनो मतम् । तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ।

यच्चक्षुषा न पश्यति येन चक्षूंषि पश्यति । तदेव ब्रह्म त्वं विद्धि इति ।

यच्छ्रोत्रेण शृणोति येन श्रोत्रमिदम् श्रुतम् । तदेव ब्रह्म त्वं विद्धि इति ।

एवं सकळांचा मथितार्थ ऐसा । कोण्हीच तुज न प्रकाशिती विश्वेशा । तूंचि प्रवर्तकु स्वप्रकाशा । इंद्रिया ऐसा प्रकाशि ॥ ७ ॥ जो कीं सकळांतें प्रकाशि । तेंचि परब्रह्म सर्वस्वेंसी । ऐसें श्रुति सांगे सर्वांसी । उपासावयासि निरंतर ॥ ८ ॥ जे ऐसें जाणूनि न करिती उपास्ति । त्यांसि परम नाशु बोले श्रुति । ते भवार्णवींच हिंडती । निरया[5] जाती निश्चयेंसी ॥ ९ ॥ ‘न चेदिहावेदीन्महती विनष्टिः’ । इत्यादि वचनें सांगे गोष्टी । न भजती ते पडती कपाटीं[6] । कल्पकोटी ऐसे देव ॥ १० ॥ ऐसा सर्वेंद्रियांचा प्रकाशन । जाणोनि तुज मी अनन्यशरण । तेणें तुज जालिया प्रसन्न । ग्रंथ निर्मान काय नवल ॥ ११ ॥ जयाचिया ईक्षणसत्ता । जीवासि ब्रह्मपण होय पूर्णता । ग्रंथ निर्माण करितां । कोण कोण या अर्था सांकडें ॥ १२ ॥ जेथ सृष्ट्यादिव्यापार । तो तंव मायिक व्यवहार । करणें नव्हे अपूर्व थोर । तेथ इतर किती सांगों ॥ १३ ॥ तेथें वाचा कवित्व बोलणें । हें तंव ब्रह्मत्वीं न्यून । ययालागीं चोज करणें । मानेनि मनें न करिजे ॥ १४ ॥ मी तंव सकळ पदार्थी मंद । तो तुझिया कृपा पावोनि बोध । जालों स्वस्वरूप अगाध । चिदानंदबोध पूर्णत्वें ॥ १५ ॥ त्या मज हें ग्रंथनिर्माण । करावया कोण प्रयोजन । परी धाकेपणाचें हेंकर पूर्ण । स्वरूपवर्णन तुझेंचि करीं ॥ १६ ॥ आणि ग्रंथव्याख्यान करीं । इये श्लाघ्यतेची कोण पां थोरी । जयासि समर्थ अंगिकारी । तो हें करी काय नवल ॥ १७ ॥ क्षीरार्णव अंगणप्रदेशीं[11] । जाला असे जया पुरुपासी । सर्वदा तृप्त ह्मणणें त्यासि । अपूर्वतेसि काये मिळे ॥ १८ ॥ नाना धनंजयासि कंसारी[12] । आत्मत्वें स्वयें अंगीकारी । तत्पुरुपार्थें कौरव संहारी । वर्णितां भारी काये होये ॥ १९ ॥ तेणें सृष्ट्यादिकार्य जऱ्ही केलें । तऱ्ही तेथें काय नवल जालें । जयासि ईश्वरें आत्मत्वें मानिलें । कौरव मारिले हें काय नवल ॥ २० ॥ नातरी जनकतनुजापती[13] । स्वकीयत्वें मानिला मारुति । तेणें लंकादहन क्षणा प्रति । त्रिजगतीं ख्याति केली तेणें ॥ २१ ॥ इत्यादिकीं त्रैलोक्यसंहरण । अथवा केल्या उत्पन्न

---

१ स्फूर्ति. २ संसाररूपी हत्तीचा नाश करणाऱ्या सिंहा ! ३ बाह्य लक्षण. ४ प्रकट करणारें. ५ नरकांत. ६ बंदींत. ७ रचीन. ८ कौतुक. ९ तृप्तांचें. १० दुधाचा समुद्र. ११ अंगण्यांत, दारांत. १२ कृष्ण. १३ सीतापति रामचंद्र.

पाळण । येथें नाहीं अपूर्वपण । तेथें हें करणें काये वानिजे ॥ २२ ॥ अथवा तेणें सत्यवतीसुतें कृपावलोकनें पाहिलें सूतानें । तेणें संजयें धृतराष्ट्रातें । निवविलें पुरतें ब्रह्मानंदें ॥ २३ ॥ यालागीं समर्थाचें कृपावलोकन । जालिया अनधिकारीही होय पूर्ण । सर्वत्र सर्वदा नव्हे न्यून । तेथें मी अपूर्ण काय होयें ॥ २४ ॥ तैसा मी तुमचा आंगीकेला । विशेषें आत्मत्वें मानिला । तो मी जो बोलिला बोला । तो कां वेदतुल्या येईना ॥ २५ ॥ माझें अहंकरण तूंचि येकु । सर्वेंद्रियां प्रकाशकु । साक्षी होऊन प्रवर्त्तकु । येकला येकु तूंचि स्वामी ॥ २६ ॥ माझें करणें आणि न करणें । सर्वही तुवां येकेंचि तेणें । आणि संकल्पिजे जें जें मनें । तें सर्वही होणें तुवांचि ॥ २७ ॥ माझी जें जें वदे वाचा । तो तो शब्दार्थु तूंचि साचा । यालागीं जें बोलणें याचा । विस्मयो साचा नव्हे स्वामी ॥ २८ ॥ तेथें म्या काये तुज प्रार्थावें । स्वामी ग्रंथव्याख्यान बोलावें । जेथें माझें मीपण गौरवें । तूंचि स्वभावें जालासी ॥ २९ ॥ तेथें तुजवेगळा मी कैसा उरें । जें कां प्रार्थीं सकोमळ उत्तरें । वदता वदविता साचोकारें । तूंचि तूं निर्धारें सर्वत्र ॥ ३० ॥ तें हो शुद्ध अथवा अशुद्ध । तूंपणें अवघेंचि विशुद्ध । ऐसें बोलतां वाचा जाली सद्गद । ह्मणोनि सुबद्ध आलिंगीं ॥ ३१ ॥ प्रेमें आलिंगूनि सद्गुरुरायें । आज्ञा केली ग्रंथीं इये । ह्मणे बोलतू ग्रंथप्रमेयें । संस्कृतान्वयें सप्रेमें ॥ ३२ ॥ ऐसा पावोनि प्रसादु । तेणें ब्रह्मांडीं न समाये आनंदु । ह्मणे प्रसादें ग्रंथ सिद्धु । स्वतःसिद्धु तुझेनि ॥ ३३ ॥ सद्गुरुअनुग्रहें आतां । ग्रंथव्याख्यान यथार्थता । करील सद्गुरुचि तें श्रोतां । सावधानता परिसावें ॥ ३४ ॥ तरी वैराग्यप्रकरणाचे अंतीं । बोलिलें ऐसें रघुनाथाप्रति । जे वैराग्येंविण ज्ञानोत्पत्ति । कदाकल्पांतीं घडेना ॥ ३५ ॥ आणि ज्ञानाविण जें जीवित । तें अतिमौर्ख्यत्वें उपहत । सर्वार्थीं होय निंदित । अतिकुश्चित जडपणें ॥ ३६ ॥ चांडाळगृहीं भिक्षाटण । करणें तें श्रेष्ठपण । परी निंद्यत्वें मौर्ख्यता कनिष्ठ जाण । दुःखकारण सर्वार्थीं ॥ ३७ ॥ मूर्खता जाऊनियां ज्ञान । होआवया वैराग्यचि संपूर्ण । वैराग्यासि मूळ मिथ्यात्वदर्शन । हेंचि कारण सर्वार्थीं ॥ ३८ ॥ हेंही केलें असे निरूपण । तथापि ग्रंथारंभीं स्मरण । अर्थान्वयें अनुसंधान । स्मरण पूर्ण व्हावया ॥ ३९ ॥ जग मिथ्यापणें दर्शन । अथवा सत्यत्वें होय भान । या दोहींसि मनचि कारण । मनेंचि बंधनमोक्षही ॥ ४० ॥ तंव रघुनाथ आक्षेपिती । ह्मणे जी श्रीवसिष्ठ सद्गुरुमूर्त्ती । जे केलिया प्रतिज्ञा मजप्रति । जगमिथ्यास्थिति सांगावें ॥ ४१ ॥ ते आपुली प्रतिज्ञा साच करीं । जगन्मिथ्यात्व सांग झडकरीं । वैराग्य सदृढ जेणें करी । जालिया पुरी नवजाये ॥ ४२ ॥ ऐसी प्रार्थना आइकोनि मुनि । अति हर्षनिर्भर अंतःकरणीं । ह्मणे रघुनाथा तुजलागुनी । सांगेन तें मनीं दृढ धरीं ॥ ४३ ॥ तरी प्रपंचसंहार आणि उत्पत्ती । त्यासि मनचि कारण गा महामति । मनाचे शांतीनें विश्वशांति । मनोत्पत्ती उत्पन्न ॥ ४४ ॥ यदर्थीं ऐकें उत्तर । सांगेन तुज सविस्तर । मनोनिग्रहप्रकार । आणीक विचार असेना ॥ ४५ ॥

रोयमान्मनसः शांतिर्भाति संसारसंभ्रमः । चंद्रे चास्तमयं प्राप्ते यथा क्षीरमहार्णवः ॥ १ ॥

( विस्मरण स्वरूपाचें । तेंचि संसारविभ्रम सांचें । विशेष भ्रम ह्मणोनि याचें । विभ्रम ऐसें अभिधान ॥ १ ॥ भ्रमाचें रूप संसारभान । यालागीं संसारभ्रम बोलिला जाण । मुळींचा विपरीत भाव ह्मणोन । विशेषाकारें बोलिला ॥ २ ॥ ) नानाविचित्र हा संसारभ्रम । असत्यपणींचि साचा नेम । कर्म सर्वदा आहे विषम । न वटे भ्रम थिरावल्या ॥ ४६ ॥ जैसे स्वप्नींचे जे जे पदार्थ । भ्रमरूपचि यथार्थ । शय्येवरी एकाकी शयित । तेथ अपरमित पदार्थ कैंचे ॥ ४७ ॥ हस्ती अश्व रथ पदाति । तेथ चतुरंग सेनेची प्राप्ति । देहदुर्ग काळगति । राहाटी पुरती सर्वांची ॥ ४८ ॥ तें काय रघुनाथा साच होतें । कीं मनचि परिणमलें तेथें । हें सांग पां मज निरुतें । रचिलें तेथें कोणें हें ॥ ४९ ॥ तेथें सर्व व्यवहार करी । झांकी नेत्रें देखे भारी । श्रवणें आयके शब्दकुसरी । न चलतां करी गमनक्रिया ॥ ५० ॥ पोटाळलिया हातें देणें घेणें । निश्चेष्टकरणीं सर्व करणें । हें काय साच कीं मनें होणें । जाण या खुणें रघुवर्या ॥ ५१ ॥ तेंचि मन उपशम पावतां । तेव्हडी रचना होय वृथा । जागृति होऊनि पाहतां । न दिसे तत्वतां कांहींचि ॥५२॥ येव्हडेंही संभ्रमरूप टवाळ । मन परिणामें विस्तारे सकळ । तेंचि मन होतां निश्चळ । तेव्हडें जाळ नाहींच होये ॥ ५३ ॥ तैसा हा संसारसंकल्पभ्रम । तो जाण

१ व्यासानें. २ अंगीकारिलेला. ३ वेदांच्या बरोबरीचें. ४ कल्पना करावी. ५ ग्रंथरूपी सिद्धान्त. ६ गुरूच्या कृपेनें. ७ मारलेलें. ८ शंका काढितात. ९ जगाच्या खोटेपणाचें स्वरूप. १० मन ताब्यांत ठेवण्याचे प्रकार ११ स्थिर केल्यावर.

मनाचाचि परिणाम । तोंचि मन पावल्या उपरम । तोही उपरम पावत ॥ ५४ ॥ जैसा चंद्राचेनि उदयें पूर्णता । क्षीरार्णव भरे भरितां । तोचि चंद्र अस्तग्रया पावतां । अस्तवे सर्वथा भरितेंही ॥ ५५ ॥ ये संसारभ्रांतीकारण । येक मनचि रघुनाथा जाण । मनोदयें उदय पूर्ण । होये क्षीण मनोलयीं ॥ ५६ ॥

चित्तोन्मेषनिमेषाभ्यां संसारस्योदयक्षयौ । वासनाप्राणसंरोधादनिमेषं मनः कुरु ॥ २ ॥

चित्तउन्मेषनिमेषेंकरून । संसारासि उदय क्षय जाण । उन्मेषशब्दें उदय पूर्ण । अस्तु जाण निमेषता ॥ ५७ ॥ अगा प्रपंचोन्मुखता मनाची । मनाची उन्मेषता तेचि । तेणें अनर्थपरंपरा भवाची । असे होतचि परियेसीं ॥ ५८ ॥ प्रपंचोन्मुखता मनाचें । हें विस्मरण स्वस्वरूपाचें । हेंचि अनर्थपुनरावृत्तीचें । जीवासि साचें येणेंचि होये ॥५९॥ मनाचा अस्तु तो अनिमेषता । जालिया स्वरूपीं सावधानता। प्रपंच पावे अस्तमयता । न भासे तत्वतां मिथ्यापणें ॥ ६० ॥ अगा साचचि प्रपंचु वस्तुता । तरी मनाच्या अस्तेंही असता । ह्मणोनि मनोलय जाण तत्वतां । नासे पुरता मनोनाशें ॥ ६१ ॥ याकारणें गा रघुनाथा । प्रपंचोन्मुख होऊं नेदावें चित्ता । याची करावी अनिमेषता । स्वरूपीं तत्वतां बोधावें ॥ ॥ ६२ ॥ अनिमेष करावया चित्त । येथें कोण उपाय प्रस्तुत । ऐसें ह्मणसी तरी बहुत । असती निश्चित रघुराया ॥ ६३ ॥ तरी चित्तनिमेष करावया । अनंत उपाय करिती रघुराया । परी तयांसिचि येती सहाया । निवृत्ति यया न करवे ॥ ६४ ॥ तरी ययाच्या उपायाप्रति । येकचि कारण गा रघुपति । सांगेन तें एकाग्र चित्तीं । अयोध्यापति परिस पां ॥ ६५ ॥ तरी प्राणांवासनांचेनि संयोगें । मन हें सैरा धांवों लागे । प्राणनिश्चळें राहे उगें । सांडी वेगें संकल्पजाळ ॥ ६६ ॥ मन निश्चळही असतां । वासना उठती अकस्माता । तेणेंकरूनि चळ होतसे चित्ता । अनावरता अद्भुत ॥६७॥ ( विषयापासून वासना वळवावी । ते पुनः परत न आणावी । मध्येंचि स्थिरता करावी । निरालंबीं तियेची ॥ १ ॥ निरालंबीं वासना ठेवितां । घडे प्राणांची निरोधता । प्राणनिरोध झाला असतां । वासना थितळोन जाय ॥ २ ॥ वासना जेथें नाहीं । तेथें मनचि बोलों नये कांहीं । मनाचेनि अभावें पाहीं । हें भवभान न दिसे ॥ ३ ॥ भवभान जें न भासे । तें सर्वत्र स्वरूपचि असे । तेणें करावें साधन ऐसें । प्राण निरोधापासुनि ॥ ४ ॥ ) तंव रघुनाथ ह्मणे जी श्रीसद्गुरु । हा तंव विस्मय वाटे थोरु । मन स्थिर असतां वासनाभारु । उठतां प्रकारु कैसा होये ॥ ६८ ॥ मनचि जरी स्वयें उठी । तरीच वासना पुरविती पाठी । मन निश्चळ वासना लाठी । हे तंव गोष्टि अपूर्व ॥ ६९ ॥ तरी वासनेचें रूप कैसें । तें सांगावें स्वामी विन्यासें । तंव ऋषि ह्मणती सावकाशें । अपूर्व ऐसें सांगेन ॥ ७० ॥ तरी पूर्वकर्माचेनि संस्कारें । जे जे वृत्तीसि पदार्थ स्फुरे । ते ते जाणावी निर्धारें । वासना चतुरें इयापरी ॥ ७१ ॥ मनें निश्चळ असतां हेंहीं । घटपटत्वें स्फुरे जें पाहीं । तोचि संस्कार वासनारूपेंही । उठे पाहीं विबुधनाथा ॥ ७२ ॥ अथवा देहीं अकस्मात । क्रोधलोभ असतां उपजत । मग तेणेंचि मन असे वेष्टित । होय निश्चित पदार्थी ॥ ७३ ॥ कां जें येक वेळे देखिलें आइकिलें । जें जें कांहीं अनुभविलें । तेणेंचि संस्कारें मागुतें स्मरलें । तेंचि भलें वासनारूप ॥ ७४ ॥ यालागीं मनासि चंचळता होआवया । दोनचि कारणें गा रघुराया । प्राण आणि वासना इया । करिती चित्ता या चंचळत्वा ॥ ७५ ॥ तऱ्ही तुवां येकचि करावें । वासनाप्राणातेंचि रोधावें । तेणें चित्त हें स्वभावें । अनिमेष भावें होईल ॥ ॥ ७६ ॥ अनिमेष जालिया मन । मग कैंचें होईल प्रपंचभान । मिथ्या हें मिथ्यत्वचि जाण । अग हें स्वप्न ऐसें भासे ॥ ७७ ॥

अयं हि स्वविकल्पोत्थः स्वविकल्पपरिक्षयात् । जायते दग्धसंसारो निःसार इति निश्चयः ॥ ३ ॥

अगा हा सर्व संसार । स्वविकल्पेंचि साचार । विकल्प क्षयींच असार । भस्मसात होऊनि जाये ॥ ७८ ॥ स्वस्वरूपविस्मरणें बहिर्मुखता । जेथवां चित्तवृत्तीसि होता । तोचि विकल्प जाण तत्वतां । संसार व्यथा उपजे जेणें ॥ ७९ ॥ या विकल्पापासाव उत्पत्ति । या संसाराची होय गा रघुपती । विकल्पक्षयींच दग्धस्थिति । जाय भस्मांतीं निश्चयें ॥ ८० ॥ येक लवमात्रही स्वरूपीं विस्मरण । होतांचि विक्षेप होये दारुण । देहादिप्रपंचाचें भान । सत्यत्वें पूर्ण भासों लागे ॥ ८१ ॥ तोचि स्वरूपीं सावध होतां । विपरीत देहादि सर्व तत्वतां । न स्फुरे गा रघुनाथा । पावे अस्मता

१ नाहींसें होतें. २ उत्पत्ति. ३ होळे न मिटणें. ४ नाश. ५ कल्पनांचा पसारा. ६ न आवराया सारखा. ७ लठ्ठ, मोठी. ८ हे ज्ञान्यांच्या श्रेष्ठा. ९ संसाराचें स्मरण. १० आपणच काढलेला संशय. ११ बाहेरील पदार्थच पाहणें.

विकल्प ॥ ८२ ॥ जैसा वेणु जळोनि भस्मसागर । तैसा भव होये निःसार । बोधरूपें कार्यप्रकार । न करवे साचार बाधलेपणें ॥ ८३ ॥ अगा संसाराची वृद्धि । हे तंव अविचारित संसिद्धि[१] । विचाराप्रति क्षणार्धीं । न राहे सुबुद्धि रामचंद्रा ॥ ८४ ॥

परिज्ञानेन सर्पत्वं चित्रसर्पस्य नश्यति । यथा तथैव संसारः स्थित एवोपशाम्यति ॥ ४ ॥

चित्रींचा देखोनि महाभुजंग । अतिभयकंपें कांपे आंग । देहांतुचि पावे सांग । यथार्थ अव्यंग मानूनियां ॥ ८५ ॥ तोचि परिज्ञानें पाहतां । सर्पत्व नासोनि जाय तत्वतां । तैसाचि हा संसार ताता । होय वृथा सम्यक ज्ञानें ॥ ८६ ॥ अगा अविचारें संसाराची फरारी । विचारें न राहे क्षणभरी । यालागीं संसारभरोवरी । सर्व प्रकारीं भ्रममूळ ॥ ८७ ॥ हा मिथ्याचि तो मिथ्या किती । बोलावा गा श्रीरघुपति । मनःकल्पित सर्वार्थी । आइकें पुढती सांगेन ॥ ८८ ॥

पुंसो निजमनोमोहकल्पितो दुःखदः स्मृतः । संसारचिरवेतालो विचारेण प्रलीयते ॥ ५ ॥

अगा मुख्य परब्रह्मीं जें अज्ञान । तद्रूप तो मनोमोह जाण । तेणें कल्पित संसार दारुण । सत्यत्वें पूर्ण कल्पिला ॥ ८९ ॥ जेवीं बागुलं बाळकाप्रति । आला ह्मणूनि भय दाविती । तेणें यथार्थ मानूनि क्रांतमति । दुःख अति देखतसे ॥ ९० ॥ बाळक आपुलेनि विसरें । वेताळाचें मानूनि भेडरें । तेणें दुःख शोकादि स्फुरे । पावे निर्धारें मरणांतु ॥ ९१ ॥ तैसें मुळींचेनि अज्ञानें करून, मनोमोह महादारुण । तेणें संसार कल्पिला जाण । लटिकाचि पूर्ण साच केला ॥ ९२ ॥ लटिकाचि परी सर्व दुःखातें देता । नानायोनि भोगविता । सांगतां याची दुःखवार्ता । मन सर्वथा कंटाळे ॥ ९३ ॥ मुख्य स्वरूप आतमयाची विस्मृति । जाली तेव्हांचि दुःखाची प्राप्ति । ते गणितां नये अभिव्यक्ती । अपार गति ययाची ॥ ९४ ॥ आपणातें नेणोनि पाहिजे । तंव दीर्घसंसारबागुल देखिजे । याचेनि दुःखें सहजें । आंगीं वाजे आकल्पांत ॥ ९५ ॥ जन्हीं हा विचारें पाहिला । तन्हीं निःशेष जाण हरपला । याचा मागुही बुडाला । नाहीं देखिला कोठेंही ॥ ९६ ॥ अगा स्वप्नींचें वोडंबर । विस्मृतीनें दिसे महाथोर । प्रबोधमात्रेंचि निःसार । भस्मसार होऊनि जाये ॥ ९७ ॥ जैसें वोडंबरीचेनि अनेकपणें । क्षणयेक बुद्धीसि भ्रमणें । विचारूनि पाहिजे मनें । न दिसे कोण्हे पदार्थींही ॥ ९८ ॥ तैसा हा संसारबागुल । साचपणें स्फुरला सकळ । विचारें पाहतां निर्मूळ । मिथ्या फोल होऊनि जाये ॥ ९९ ॥ यालागीं गा रावणारि । मिथ्याभूत हा सर्वांपरी । ययातें सुखोपायेंचि मारीं । विचारें करीं येकलेनी ॥ १०० ॥ अगा सम्यक विचारु जो रघुपति । तेचि संसाराची समूळ शांति । स्थिर न राहे विचाराप्रति । क्षणें भस्मांतीं पावतसे ॥ १ ॥ हा जरी वास्तव साच असता । तरी ज्ञानादिकीं ही न लोटता । हा स्वयें मिथ्याचि तत्वतां । भासे वृथा अविचारें ॥ २ ॥ हा संसारप्रभु गा रघुनाथा । हे केवळ मायाचि तत्वता । मायेवेगळें विचारितां । मूळ सर्वथा असेचिना ॥ ३ ॥ तेंचि ऐक आतां सांगेन । मायाशब्दें मिथ्या जाण । तेंचि तें अज्ञान संपूर्ण । जाण खूण विबुद्धवर्या ॥ ४ ॥

ईदृशी राम मायेयं या स्वनाशेन हर्षदा । न लक्ष्यते स्वभावोऽस्याः प्रेक्ष्यमाणैव नश्यति ॥ ६ ॥

अगा विश्वरूप जाण हे माया । हर्ष देतसे स्वनाशेंकरूनियां । सम्यक दर्शनें जाय नाशोनियां । स्वभावें राया अलक्षपणें ॥ ५ ॥ जो कीं प्रपंच मिथ्याभूत । तेचि ते माया जाण निश्चित । इयेचा स्वभाव अलक्षित । वेंचतांही सत्य मानतसे ॥ ६ ॥ खळाळींवेगें वाहिजे जळ । तेथें न गेलेंचि ऐसें कळे । तें मागोनि जैसें तैसें मिळे । यालागीं न कळे वेचलें ऐसें ॥ ७ ॥ खळाळी ऐसें वाहतां । जळ वेगें जात असतां । परी उणें न पडे सर्वथा । मिळे तत्वतां ह्मणोनी ॥ ८ ॥ जातां वेगें तरी दिसे । परी तेथें शुष्क पडलें न दिसे । मागोन मिळे जैसें तैसें । ह्मणोनि भ्रंशे देखोनि बुद्धि ॥ ९ ॥ ऐसेंनिही भ्रमलेपणें जाण । अपरि दिवसीं खळाळी येऊन । ह्मणती तेंचि जळ हें जाण । वेंचलेपण लक्षवेना ॥ ११० ॥ तैसें घडतां मोडतां ही विश्वकोटि । जना लक्षवेना भ्रमदृष्टी । तेचि हे साच ऐसी गोष्टि । परिपाटें अनादि भासे ॥ ११ ॥ नाना आलातचक्राचियेपरी । वेगें अखंडाचि दिसे भंवरी । अलक्षपणें स्वयें भंवरीपरी । जना भारी भासत ॥ १२ ॥ तेचि स्थिरावोनि पाहिजे । तंव परिच्छिन्न अणुमात्र देखिजे । मग कोलीत ऐसें बोलिजे । निश्चय कीजे सम्यक ज्ञानें ॥ १३ ॥ तैसें जग हें

---

१ आपोआप मिळालेली. २ प्राप्ति. ३ दोष रहित. ४ खऱ्या समजानें. ५ बागुलबोवा, कल्पित भय. ६ स्पष्टता. ७ ज्ञान झाल्याबरोबर. ८ खरोखर. दूर न जातां. ९ लक्षांत न येण्यामुळें. १० दुसऱ्यादिवशीं, पुढें. ११ स्पष्ट.

जितुकेंचि मोडे । तितुकें तेणेंचि काळें घडे । वेचतांही रितें न पडे । ह्मणोनि जन येडें साच मानी ॥ १४ ॥ यालागीं स्वभावो मायेचा । अलक्ष लक्षवेना तिचा । परी स्वनाशें हे आनंदाचा । सोहळा साचा करितसे ॥ १५ ॥ मायाशब्दें शुद्ध अज्ञान । जेणें स्वसुखासि केलें व्यवधान । प्रत्यक्ष परी आच्छिन्न । केलें पूर्ण नास्ति ऐसें ॥ १६ ॥ 'नास्ति नैव प्रकाशते' । ऐसें केलें स्वतः सिद्धातें । ते नाशिलिया स्वप्रकाशातें । आपणातें पाविजे ॥ १७ ॥ त्या मायेचे उद्भवें दुःखप्राप्ति । इयेचेनि नाशें सुखसंपत्ति । ह्मणोनि इयेचा लयोचि गा सुमति । करावा सर्वार्थी रघुपुंगवा ॥ १८ ॥ अगा तूं ऐसें ह्मणसी। इयेचेनि व्यापें वर्त्तणें त्रैलोक्यासी । आणि आच्छादक आत्मयासी । ते कैसेनि निवर्त्तेल॥१९॥ जियेचें भय सिद्धसाधकांसी । जपी तपी परिव्राजकांसी । जे कीं नागवियाही शरिरेंसी । जनां सर्वांसि छळित असे ॥ १२० ॥ ते नाशलिया कैसी नासे । आनंदघन कैसा प्रकाशे । तरी ऐसें हें अनारिसें । सर्वथा विश्वेशें न मानावें ॥ २१ ॥ अगा मायेची येव्हडी थोरी । शेवटीं नाशे क्षणाभीतरी । परी न नाशे उपायसहस्त्रीं । सर्व प्रकारीं विचारेंविण ॥ २२ ॥ विचारशब्दें सम्यक ज्ञान । तेणेंची सर्वथा नाशे अज्ञान । ज्ञानेंविण सर्व साधन । वृथा जाण कोटीवरी ॥ २३ ॥ इयेतें नाशावया-लागीं । जे जे उपाय बाणती आंगीं । तेणें अधिकचि साधनांगीं । इंधनें आगि प्रबळे जैसी ॥ २४ ॥ तैसें नित्यनैमित्तिक कर्मानुष्ठान । अग्निहोत्रादि सर्वही यज्ञ । जप तप अध्ययन तीर्थाटण । उद्यापन व्रतादिकांचें॥२५॥इत्यादि साधनेंही करितां । हें तंव मायाकार्य तत्वतां । कार्यकारणपुष्टता । न विचारितां घडेचि कीं॥२६॥प्रपंच तोडावयाकारणें । नित्य प्रपंचानुसंधान करणें।तरी तो तुटे कीं वाढे तेणें । विचार सर्वज्ञ करावा॥२७॥नाना तोडावया इंद्रजाळ।पारवी आम्रवृक्षादि सकळ मेळ । तें केलिया तुटे कीं प्रबळ होय हें सकळ विचारिजे ॥ २८ ॥ यालागीं नाना साधनें जे करिजेती । तेणें मायाचि वाढे सर्वार्थी । ह्मणोनि येके विचारेंचि क्षणाप्रति । नाश सर्वार्थी करावा ॥ २९ ॥ तरी रघुपति येकचि करावें । नाना उपाय सांडावे । सम्यक विचारूनि पाहावें । तेणें निरसावें मायेतें ॥ १३० ॥ अगा सम्यक विचाराच्या अंतीं । माया नाहींच होये गा सुमती । आंधार पाहिजे लावून वाति । तो कोण्हेच प्रातीं दिसेना ॥ ३१ ॥ येरव्हीं तमाचा पारु नेणिजे । व्यक्तीसि नये कोण्हे व्याजें । नानाउपाय तयासि कीजे । तरी तो सहजें काये आये ॥ ३२ ॥ त्यासि अनेक उपाय करितां । न निवर्त्ते गा रघुनाथा । हातीं दिवटी घेऊनि पाहतां । नाहींच सर्वथा ऐसें होये ॥ ३३ ॥ नाना स्वप्नसंभ्रमाची भरोवरी। अपरिमित दिसतसे भारी । दवडितां नानाउपचारीं । कोटी प्रकारीं न निवर्त्ते ॥ ३४ ॥ तेचि प्रबोधोनि पाहिजे । तंव ते कोठेंचि न दिसिजे । तैसी माया विचारव्याजें । पाहतां सहजें नाहींच होये ॥ ३५ ॥ अगा अविचारेंसि संसार भासे । तो विचारेंचि क्षणमात्रें नाशे । ह्मणऊनि उपाय आन नसे । दृढ विश्वासें जाणावें ॥ ३६ ॥ जर्‍हीं कोणी ऐसें ह्मणती । मुळीं साधनें कायि दूषिलीं असतीं । तर्‍ही लटिकेंसि कां पां दूषिजेती । अतएव गति हे निर्मूळ दिसे ॥ ३७ ॥ तरी प्रेक्षमाणेंच या एवकारें । सर्वही दूषिलीं साधनांतरें । येक प्रेक्षमाणाचि साक्षात्कारें । जाण निर्धारें नाशहेतु ॥३८॥ यालागीं संस्कृत देखिलियाविण । न करिजे ईषतही निरूपण । तुह्मी थोर ते असा शास्त्रज्ञ । सर्व हे खूण जाणतसा ॥ ३९ ॥ सर्व एवकारें साधनां इतरांची व्यावृत्ति । केली जाणा सर्वार्थी । येक ईक्षणमात्रचि नाशाप्रति । साधन सुमती बोलिजे ॥ १४० ॥ ययालागीं गा रघुपति । मायेच्या समूळ नाशाप्रति । येक ज्ञानमात्रचि सर्वार्थी । आन गति असेचिना ॥ ४१ ॥ तेणें सम्यक ज्ञानें नाशिली । तरी माया नाहीं ऐसी जाली। तेथें आनंदाची दिवाळी । लाभे नव्हाळी न साधतां ॥ ४२ ॥ अगा माया नाशावयाचें कोडें । कायसें पां तुज येवढें । हे अनिर्वाच्या परी संत न घडे । जाण धडफुडें मिथ्यारूप ॥ ४३ ॥ मिथ्या तें मिथ्याचि असे । नाशावया प्रयास कायसे । तें विचारें करूनि नाशे । मृगांभ जैसें कां रज्जुसर्प ॥ ४४ ॥ अधिष्ठानें जें अध्यारोपित । तें तंव साच नव्हे गा निश्चित । तें भ्रममात्र परी विचारें भस्मांत । होय क्षणांत रघुवर्या ॥ ४५ ॥ तैसी हे माया जाण । अधिष्ठानब्रह्मीं आरोप पूर्ण । ते विचारेंचि होतसे क्षीण । प्रयास कोण साधनांचे ॥ ४६ ॥ आणि हे द्वादशविकल्पीं विकल्पित । ह्मणोनि हे कदा नव्हे सत । तेचि ऐकें प्रस्तुत । विकल्पार्थ रघुनाथा ॥ ४७ ॥ जरी माया सत्य ह्मणसी । तरी संत तें अबाधित परियेसीं । इयेचा बाधु ज्ञानें देखसी । तरी सत्य कैसी ह्मणावी

---

१ नाहीं व भासतही नाहीं. २ नाश. ३ रघुकुळामध्यें श्रेष्ठा. ४ संन्याशांस. ५ सरपणानें. ६ गारुड्याचें कृत्य. ७ ज्ञानाच्या विचाराच्या मिषानें ८ दुसरा. ९ 'एव' यापदानें. १० पहावयाचें. ११ राहण्याचें ठिकाण असें जें ब्रह्म.

॥ ४८ ॥ संतं तें त्रिकाळीं अबाधित । जैसें ब्रह्म तें नित्य सदोदीत । तैसी ते नव्हे निश्चित । असे बाधित सम्यक ज्ञानें ॥ ४९ ॥ जरी हे माया सत्य असती । तरी ज्ञानाचेनि बापें न नासती । आणि हे तरी ज्ञानें असे बाधिती । तरी सत्य कैसे रिती ह्मणाल ॥ १५० ॥ ययालागीं हे नव्हे सत्य । असत्य ह्मणतां तरी भासत । खपुष्पासी असत्य । नव्हे निभ्रांत रघुराया ॥ ५१ ॥ असत्य तें त्रिकाळीं ही न भासावें । वंध्यापुत्रापरेसें निःशेष नसावें । माया तरी तैसी नव्हे । प्रत्यक्ष संभवे बिंबाकारें ॥ ५२ ॥ तैसें मायेचें असणें । नाहीं सत्य ना असत्यपणें । इयेचें यथातथ्य कोण्हे । नव्हे प्रमाणें पङ्घिये ॥ ५३ ॥ आतां सदसत ह्मणावी माया । तरी हेंही न घडे गा रघुराया । दोन्हीच पदार्थ बोलावया । असती यया जगामाजी ॥ ५४ ॥ येक तो जाण सत्य पदार्थ । येक तो असे असतार्थ । परी येकुचि कांहीं सत्यासत्य । ऐसा पदार्थ असेचिना ॥ ५५ ॥ अगा सत तें नव्हे असत । असत तें नव्हे सत । ह्मणोनि दोन्हींसि येकार्थ । सदसत घडेना ॥ ५६ ॥ आतां विशद विछिलक्षण । ह्मणिजे संता असंताहूनि भिन्न । हें तंव घडे गा प्रमाण । सदसद्विलक्षण माया होये ॥ ५७ ॥ यालागीं सद्विलक्षणता । मायेसि घडेचि गा तत्वतां । सदसद्विलक्षण तें सर्वथा । सत्य ना असत्यता अनिर्वाच्य ॥ ५८ ॥ जे जे वस्तु अनिर्वाच्य होये । ते ते न साधितां मिथ्या पाहे । शुक्तीसि रजत अविर्वाच्य होये । तैशी पाहे माया ही ॥ ५९ ॥ जैसें स्वप्न कां मृगजळ । सत्य ह्मणतां नासे तत्काळ । असंत ह्मणतां प्रांजळ । ह्मणोनि पोकळ अनिर्वाच्य तें ॥ १६० ॥ संत कीं असंत ज्या बोलतां नये । ते ते वस्तु अनिर्वाच्य पाहें । मायेचें यथातथ्य ऐसें आहे । यालागीं होये अनिर्वाच्य ते ॥ ६१ ॥ अनिर्वाच्य तें मिथ्याभूत । हें जाण पां निश्चित । विचारें विलय पावत । नाहींच होत क्षणमात्रें ॥ ६२ ॥ आतां ब्रह्मेसि माया भिन्न । तरी स्वतंत्र पदार्थ आहेत कोण । ब्रह्म सद्वय नव्हे जाण । अद्वय पूर्ण येकरस ॥ ६३ ॥ ब्रह्मावेगळें वस्तु यथार्थ । कोण्ही असता कां पदार्थ । तरी ब्रह्मासि सद्वयत्व । येतें निश्चित राघवा ॥ ६४ ॥ ब्रह्म तें अद्वय स्वतःसिद्ध । ऐसें श्रुति बोलती प्रसिद्ध । सद्वय स्थापिती तें विरुद्ध । श्रुति अगाध परियेसा ॥ ६५ ॥

संमतिश्रुति ॥ ॥ एकमेवाद्वितीयं ब्रह्मनेह नानास्ति किंच नेति ।

एकं पद अद्वितीयं ऐसें । तीन पदें एकार्थांशें । बोलिलें तें विन्यासें । रागीं विश्वेशें परिसावें ॥ ६६ ॥ एकं या पदेंचि कार्यार्थ होता । तरी पदत्रय बोलें कोण्या अर्था । तेंही सांगेन तत्वतां । आयिक आतां रघुनाथा ॥ ६७ ॥ तरी विजातीय सजातीय स्वगत । हे ब्रह्मीं भेद कल्पित । तयाची व्यावृत्ति निश्चित । केली निभ्रांत पदत्रयें ॥ ६८ ॥ तरी एकं या पदें विजातीय भाव । व्यावर्त्तिला अनात्मप्रपंच सर्व । एवकारें सजातीय जीव । जाण सर्व व्यावर्त्तिले ॥ ६९ ॥ जो कीं प्रपंचु अनात्मा । तो तंव वेगळा नाहीं ब्रह्मा । रज्जूसि अभिन्नत्वें भुजंगोत्तमा । तैसें रामा मानीं सत्यसिद्ध ॥ १७० ॥ गंधाक्षत लावितां रज्जुसर्पासी । तरी सर्प राहिला कोण्हे देशीं । रितें शोभलें रज्जूसी । यालागीं रज्जूसि अभिन्न ॥ ७१ ॥ आतां सजातीय जे जीवजाति । ते तंव चैतन्य गा रघुपति । नानाघटीं सूर्य भासती । काय भिन्न होती मुख्य तरणीसी ॥ ७२ ॥ यालागीं भेद विजातीय सजाति । ब्रह्मासि न घडे कोण अर्थी । ह्मणोनि एकमेव ह्मणे श्रुति । विश्वमूर्ती यया भावें ॥ ७३ ॥ आतां अद्वितीयभावें स्वगतभेद । तोही निरसिला गा विशद । ब्रह्म तें जाण अद्वयानंद । अतिअगाध सर्वत्र ॥ ७४ ॥ स्वगतभेद सत् चित् आनंद । तिहीं पदीं भासे जो भेद । तोचि येणें निरसिला विशद । अद्वयानंद ब्रह्म येक ॥ ७५ ॥ त्या तिहीं पदांचें एकपण । रामादिव्याख्यानीं केलें पूर्ण । वैराग्यप्रकरणीं विशद जाण । अनुभवरूण प्राप्त जेणें कां ॥ ७६ ॥ येथेंही विस्तारें सांगिजे । तरी ग्रंथविस्तारु येणें व्याजें । यालागीं अल्पाचि बोलिजे । सर्वज्ञा सहजें बुझतील ॥ ७७ ॥ इतुकाचि कोण्ही ह्मणेल विस्तारु । तरी हा तंव केला ब्रह्मविचारु । विपश्चितासि हाचि प्रियकरु । सेविती सार अत्यादरें ॥७८॥ जें कीं प्रापंचिक बोलणें । तयासिचि विस्तारु ह्मणणें । ब्रह्मवेत्त्यासि चाड जेणें । विस्तारु कोणे त्यासि ह्मणिजे ॥ ७९ ॥ आणि या ग्रंथाचें हृद्गत । तें तंव ब्रह्मचि जाण निश्चित । यालागीं करूनि एकाग्रचित्त । ग्रंथार्थ निश्चित परिसिजे ॥ १८० ॥ तरी ऐसेंचि बोलतातीती श्रुति । ब्रह्म तें अद्वैतचि गति । येथें दुसरें मायादि

१ सत्=खरें. २ आकाशांतील कल्पित फुलाप्रमाणें. ३ खोटा पदार्थ. सत याहून निराळा. ४ सांगतां न येणारी. ५ शिंपीचे ठायीं रुपें. ६ दुजेपणा असणें. ७ निवारण केला. ८ अनात्म्यामुळें भासणारा प्रपंच. ९ 'राम'-या पदाचा अर्थ.

विश्वस्थिति । कैंची प्रतीति येईल ॥८१॥ इह ब्रह्मणि नाना किंचिन्नास्ति । ऐसें प्रत्यक्ष बोले श्रुति । तरी माया भिन्नत्वें वर्त्तती । कोणे प्रांतीं ब्रह्माचिये ॥८२॥ यालागीं भिन्नत्व मायेसी । सर्वथा न घडे गा परियेसीं । अभिन्न तरी जैसी तैसी । ब्रह्मापेसी असावी ॥ ८३ ॥ ब्रह्म जैसें स्वप्रकाश निघोट । तैसीच असावी हे ब्रह्मनिष्ठ । प्रपंचाकारें प्रगट । प्रकाशें स्पष्ट नसावी ॥ ८४ ॥ ह्मणऊन घडे भिन्नपण । आतां ह्मणावी भिन्नाभिन्न । हें तंव वचनाचें अप्रमाण । भिन्नाभिन्न घडेना ॥ ८५ ॥ भिन्न तें तंव नव्हे अभिन्न । अभिन्न तें नव्हे भिन्न । येकचि पदार्थ भिन्नाभिन्न ॥ कदा जाण घडेना ॥ ८६ ॥ आतां भिन्नाभिन्नविलक्षण । हें तंव सर्वथा न घडेचि जाण । माया अनिर्वाच्य संपूर्ण । निर्वचन न करवे ॥ ८७ ॥ माया व्यक्त ना अव्यक्त । अथवा नव्हे व्यक्ताव्यक्त । व्यक्ताव्यक्तविलक्षण निश्चित । अनिर्वाच्यार्थ संपूर्ण ॥ ॥ ८८ ॥ जैसें शुक्तीचा ठाईं रजत । तें नव्हे संत ना असंत । कदापि नव्हे सदसंत । लक्षण निश्चित अनिर्वाच्यपणें ॥ ८९ ॥ ना तें सदसद्विलक्षण । शुक्तीसि भिन्न ना अभिन्न । ना तें भिन्नाभिन्नविलक्षण । अनिर्वाच्य जाण मिथ्याभासें ॥ १९० ॥ जऱ्ही तो अनिर्वाच्य पदार्थ । तो तो सर्वथा जाण मिथ्याभूत । तो सम्यक् ईक्षणेंचि असे नाशत । उपायशत तया कायसें ॥ ९१ ॥ तैशी अनिर्वाच्य जाण माया । ते ते प्रेक्षणें नासेचि गा रघुराया । तेथ अनेक उपाय करावया । कारण यया असेचिना ॥ ॥ ९२ ॥ मग सद्गुरुवचनें लब्धबोधें । ईक्षणमात्रेंचि माया बाधे । मग असिजे गा निजबोधें । परमानंदें परिपूर्ण ॥ ९३ ॥ अगा मायेचा निरास न करितां । स्वस्वरूप न प्रकाशे गा रघुनाथा । तेंचि सांगेन आतां । समाधान चित्ता जेणें होये ॥ ९४ ॥

अहो विचित्रा मायेयं तात विश्वविमोहिनी॥ सर्वांगप्रोतमप्यात्मा यमात्मानं न पश्यति ॥ ७ ॥

हें थोर आश्चर्य रघुराया । अतिविचित्र हे दहावली माया । विश्वातें मोह करूनियां । करी आत्मया आच्छादन ॥ ९५ ॥ तो मायेचा आच्छादनविकार । सांगेन तुज पंचप्रकार । पंचपर्वा ऐसें वेदांतीं थोर । करिती निर्धार इयेचा ॥ ९६ ॥ तैसिया पातंजलीचिया युक्ति । पंचक्लेशा इतें ह्मणती । तेचि पंचपर्वा विश्वमूर्त्ती । जें कीं वेदांतीं बोलिलें ॥ ९७ ॥ तयांचीं नांवें गा श्रीनिवासा । आइकें येकाग्रमानसा । अविद्या अस्मिता राग द्वेषाभिनिवेशा ॥ ऐसिया भावा करूनियां ॥ ९८ ॥ तऱ्ही येक ते माया दुजी ते अस्मिता । तिसरा राग आणि द्वेष चौथा । पांचवा अभिनिवेश सर्वथा । व्याख्यान सर्वथा परियेसीं ॥ ९९ ॥ तरी स्वस्वरूपाचें करी जें आवरण । तियेचें नांव अविद्या जाण । स्वतःसिद्धाचें होये विस्मरण । येव्हडी पूर्ण शक्ति जियेची ॥ २०० ॥ अस्मिता ह्मणिजे विपरीतभावना । देहात्मबुद्धि जे विचक्षणा । हें द्वितीय पर्व गा रघुनंदना । भवभावना विक्षेप हा पैं ॥ १ ॥ देहाचे ठायीं अतिप्रीति । तें तिसरें पर्व गा राग ह्मणती । त्यासि प्रतिकूळ ते द्वेषाभिव्यक्ति । पर्वव्युत्पत्ति चतुर्थाची ॥ २ ॥ देहाभिनिवेशें अहं कृश स्थूळ । बाळ युवा वृद्ध इत्यादि मेळ । आपण जीत मेलों हे तळमळ । पर्व सकळ पंचम हें ॥ ३ ॥ देहमरणें आपणा मृत्य ॥ अजरामरासि मानिती सत्य । देहविकारास मस्तकीं घेत । तेणें भ्रमत नानायोनि ॥ ४ ॥ स्वयें स्वप्रकाश निर्मळ निरंजन । अज अमर चैतन्यघन । तयासि येव्हडी दशा जियेचेन । तियेतें जाण माया ह्मणती ॥ ५ ॥ ते जाण विश्वाची मोहनी । मोह करी स्वरूप भुलवुनी । तेंचि सांगेन कार्मुकपाणी । चित्त देऊनि परियेसीं ॥ ६ ॥ यया मोहाचें मोहकपण । विश्वीं आत्मा असतां प्रोत पूर्ण । अनेका मण्यांमाजी सूत्र येक जाण । अनुस्यूत घन निबिड हा ॥ ७ ॥ हेंचि विचित्रपण इये मायेचें । आच्छादन करी स्वसिद्धाचें । प्रकाशन करी विपरीताचें । जेणें जनाचें ज्ञान भ्रंशे ॥ ८ ॥ येक स्वरूपभूत जें कीं नित्यज्ञान । तेंचि वेंची प्रपंचाकार करून । तेंचि दृश्यत्वें बैसे सत्यत्व घेऊन । मोह दारुण जाण हाचि ॥ ९ ॥ नाना शर्कराकणीं येकचि गोडी । अथवा दीपकळिका प्रकाशप्रौढी । अनेका विस्फुलिंगीं उष्णता गाढी । येकचि परवडी सर्वां जैसी ॥ २१० ॥ कां तंतु जैसा पटाभीतरी । प्रोत असे गा सर्वांपरी । तैसा आत्मा हा विश्वांतरीं । निरंतरि अखंडत्वें ॥ ११ ॥ असोनियां अपरोक्ष सत्य । जैसा तैसा न देखिजेत । हेंचि मोहाचें मोहक पण अद्भुत । करी विपरीत देहपणें ॥ १२ ॥ जें कीं सर्वदा सर्वगत । तें ब्रह्मचि नाहीं केलें निश्चित । आणि अनात्म जें विपरीत । तेंचि कुश्चित भासवी ॥ १३ ॥ तरी या विश्वाची असत्यता । तुज मी सांगेन रघुनाथा । असत्याची असत्यता । सत्य भ्रांता मानली ॥ १४ ॥

१ या ब्रह्मामध्यें कांहीं देखील नाहींच नाहीं. २ व्याख्यान. ३ स्पष्ट व अस्पष्ट यांहून वेगळा. ४ पहाण्यानें. ५ स्थिर झाली. ६ योगशास्त्रीप्रमाणें. ७–११ हीं पांच क्लेशाचीं नांवें. १२ क्लेशाचें स्थान. १३ ब्रह्माचें. १४ वस्त्रामध्यें.

यदिदं दृश्यते किंचित्तन्नास्ति किमपि स्फुटं । यथा गंधर्वनगरं यथा वारि मरुस्थले ॥ ८ ॥

अगा जे जे कांहीं वस्तु देखिजे । जे जे मनादिइंद्रियीं प्रकाशिजे । ते ते मिथ्याभूत सहजें । दृश्य रघुराजें जाणावें ॥ १५ ॥ अगा जे वस्तूचें आहेपण । तेंचि विचारें स्पष्ट नाहीं जाण । ते वस्तु नाहीं संपूर्ण । हेंचि खूण जाणावी ॥ १६ ॥ अगा जें विचारें न राहे । तैसीचि वस्तु कोण आहे । हेंचि दृढ विचारूनियां पाहें । जेणें होये निश्चळ दृढ ॥ १७ ॥ यथा विश्वायेव्हडें वोडंबर । साच ऐसें दिसे सविस्तर । निर्धारूनि करितां विचार । तंव तें अस्थिर आभासमात्रें ॥ १८ ॥ जरी तूं ऐसें ह्मणसी । तरी प्रत्यक्ष देखिजे प्रपंचासी । मा लटिकें कैसें ह्मणावें यासी । संदेहासि होतसे ॥ १९ ॥ तरी रघुनाथा ऐसें जाण । हें तंव भ्रमाचें कार्य संपूर्ण । सत्य वस्तूच्या ठाईं आभासमान । तें अज्ञानें जाण भासत ॥ २२० ॥ जैसें आकाशीं गंधर्वनगर । भ्रमें अधिष्ठानीं दिसे साचार । तयाचा करितां विचार । मिथ्याचि फार भासतसे ॥ २१ ॥ नाना मरुस्थळाच्या ठायीं । जैसें मृगांभ दिसे पाहीं । परी तें अज्ञानें साच ऐसेंही । भ्रमें कांहीं भासत ॥ २२ ॥ तेंचि विचारें निर्धारूनि पाहतां । जळ जेथें नाहींच तत्वतां । तो केवळ भ्रमुचि गा रघुनाथा । स्थळ तत्वतां जैसें तैसें ॥ २३ ॥ तैसें भ्रममूळचि हें सर्व जग । भ्रमेंचि भासतसे सांग । विचारूनि पाहतां चांग । तंव तें व्यंग मिथ्यापणें ॥ २४ ॥ जे कीं निर्धारितां न राहे । ते वस्तु सर्वथा साच नव्हे । जागृत होऊनियां पाहे । तंव स्वप्न काय भासत ॥ २५ ॥

यत्तु नो दृश्यते किंचिदंते वस्त्वपि किंचन । अविनाशं यदस्तीह तत्तदात्मेति कथ्यते ॥ ९ ॥

तैसा आत्मा नव्हे जाण । प्रपंचाऐसा नव्हे दृश्यमान । प्रपंचांती कोण्ही पदार्थ पण । नाहीं निपटून कोण्हीही ॥ २६ ॥ कोण्हीही पदार्थ नव्हतां ॥ आणि नाशु तरी नाहीं सर्वथा । तेंचि तें सर्वत्र पाहतां । आहे तत्वतां चित्सुखपणें ॥ २७ ॥ ( जें जवळी असतां ही दिसों नेणे । परंतु न वेष्टिजे अभाव गुणें । ज्ञप्तिमात्र अविनाशपणें । ये शरीरीं नांदतसे ) ऐसें अविनाश जें संत । कोण्ही पदार्थ ही न मिळत । तयासिच आत्मा ह्मणिजेत । जाण निश्चित रघुराया ॥ २८ ॥ जें कीं सर्वेंद्रियांसि ग्राह्य जाण । ह्मणऊनि स्थूळ दृश्यमान । तें तें नश्वर मिथ्यापण । मागां खूण सांगितली ॥ २९ ॥ आत्मा प्रपंचनाशें न नासे । प्रपंचोत्पत्ती उपजणें नसे । तेंचि तें जाण सर्वांशें । येर तें भ्रंशे दृश्यजात ॥ ॥ २३० ॥ तरी कायनिमित्त हें भासे । लटिकेंचि कोठें आभासे । हें पुससी तरी सावकाशें । सांगेन परियेसें रघूत्तमा ॥ ३१ ॥

स्वज्ञानदर्पणे स्फारे समस्ता वस्तुजातयः । इमास्ताः प्रतिबिंबंति सरसीव तटद्रुमाः ॥ १० ॥

अगा स्वज्ञानदर्पणाचे ठायीं । समस्त वस्तुजात प्रतिबिंबती पाहीं । ज्ञानेंविण विचारितां कांहीं । सर्वथा नाहीं कोठेंही गा ॥३२॥ जें हें स्वरूपभूतविज्ञान । वृत्तिरूपज्ञानाहूनि भिन्न । तोचि तो जाण ज्ञानदर्पण । विश्व हें संपूर्ण जेथें बिंबे ॥ ३३ ॥ प्रपंचीं अनुस्यूत सर्व ज्ञान । ज्ञानाच्या ठायीं सर्व भासमान । नाहीं अणुमात्र ज्ञानेंविण । पाहें खूण विचारुनी ॥ ३४ ॥ सर्व विश्व पदार्थजात । येका ज्ञानाच्याच ठायीं प्रतिबिंबत । सरोवरतटींचे द्रुम समस्त । प्रतिबिंबत सरोवरीं जैसे ॥ ३५ ॥ कोण्ही ऐसें ह्मणताती । तटीं साच देखिले द्रुमजाति । तरीच ते द्रुतीं प्रतिबिंबती । नसतां प्रतीति कैसी होये ॥ ३६ ॥ तैसा वस्तूच्या ठायीं प्रतिबिंबला । तरी पूर्वीं प्रपंच साच कोण्हें देखिला । साचेंविण मूळ भ्रमाला । कोण मेळा सांग पां ॥३७॥ नैय्यायिकाचें मत ऐसें । साचाचि हा प्रपंच असे । साचासिच भ्रम ऐसें । कां पां मानसें मानावें ॥३८॥ ना हो तुह्मी ह्मणतां भ्रमाचि होये । तरी भ्रमाची सामग्री काये । जैसा शुकीच्या ठायीं भ्रमुचि आहे । सामग्री पाहे तेथें असे ॥३९॥ तेथें सामान्य शुक्तिचें ज्ञान । विशेष नीलपृष्ठ त्रिकोणाचें अज्ञान । ऐसें कोण्ही येक पदार्थाचें ज्ञान । रजतस्मरण देशांतरींचें ॥२४०॥ अन्य स्थळीं रजत साच देखिलें । तरी तेंचि शुक्तिकेसि भासलें । अन्यथा येथें उगलें । कोणा बोलें भासेल ॥ ४१ ॥ तैसें सामान्य ब्रह्माचें ज्ञान । आणि विशेष पदार्थाचें अज्ञान । साचाचि पदार्थाचें स्मरण । जालें ह्मणऊन भ्रम ह्मणतां ॥ ४२ ॥ न कदाचिदनीदृशं जगत् । ऐसें श्रुति असे बोलत । जग नाहीं ऐसा निभ्रांत । काळ ईषत् असेचिना ॥ ४३ ॥ प्रपंच सर्वदा साच आहे । तरी सर्वत्र स्मरतु जाये । अन्यथा असत्याची प्रतीति होये । ऐसें काय विचारिजे ॥ ४४ ॥ येके ठायीं साच

१ पसारा. २ जलरहित देशांत. ३ मृगजळ. ४ विचार करून. ५ घेण्यास योग्य. ६ दिसणाऱ्या सर्व वस्तु. ७ आत्मज्ञानाच्या आरशांत. ८ सर्वत्र असलेलें. ९ काळ्या रंगाची पाठ. १० रुप्याची आठवण. ११ थोडासा.

वस्तु देखिजे । तरी ते सादृश्यें स्मरिजे । अन्यथा कहीं नुपजे । भ्रम नुदिजे निर्मूळ ॥ ४५ ॥ आणि भ्रमुचि जरी ह्मणतां । तरी शुक्तिका रजतरूपेंचि कां देखतां । इतर पदार्थ प्रतीतिपथा । कां पां सर्वथा नयेचि ॥ ४६ ॥ तरी आयिका येथें उत्तर । जें कां बोलिजेल मनोहर ॥ जेणें संदेहसागराचा पार । पावसी साचार अनायासें ॥ ४७ ॥ अहो रजतभ्रमाप्रति कारण । मुख्य शुक्तिचें अज्ञान । तेणेंचि होय रजतभान । सामग्रीविण अनायासें ॥ ४८ ॥ अज्ञान जालियानंतरें । तेथें काय येक न स्फुरे । स्वप्नींचा शरीरच्छेद निर्धारें । कोणे प्रकारें देखिजे ॥ ४९ ॥ तुह्मीं ह्मणाल जागृतीचा उलथा । तेचि ते जाण स्वप्नावस्था । तरी जागृतीसि स्वशरीर छेदतां । सांग तत्वतां कोठें देखिलें ॥ २५० ॥ आणि स्वप्नीं गगनभक्षण । करितुसे स्वयें आपण । हेंचि जागृतीमाजी कोण । देखे चिन्ह विपरीत ॥ ५१ ॥ आणि तुह्मी ऐसें बोलिलेती । दोषसामग्रीविण नव्हे भ्रांति । जैसी शुक्तिसी चाकचिक्याची व्यक्ति । दोषप्रतीति होतसे ॥ ५२ ॥ जैसा रजता चाकचिक्यादि असे । तैसेंचि शुक्तिकेसिही प्रतीति भासे । देखोनियां लोक पिसे । रजत ऐसें मानिती ॥५३॥ स्वप्नीं स्वप्नप्रपंचासी । सादृश्यें दोष कोण आरोपिसी । तेथ कारण येक अज्ञानासी । जे कीं आपणासी विस्मृति ॥ ५४ ॥ आपुलिया नेणणियावांचून । स्वप्नीं सामग्री आहे कोण । ना सादृश्य ना दोषदर्शन । येक अज्ञानावांचूनियां ॥५५॥ आणि सादृश्यें जरी भ्रमु होये । तऱ्ही ब्रह्मेसि प्रपंच सादृश्य काये । ब्रह्म निर्गुण पूर्णानंद पाहे । व्यापक आहे सर्वत्र ॥ ५६ ॥ स्वप्रकाश स्वयंवेद्य[1] । निरवयव निर्वेद्य[2] । प्रपंच सगुण दुःखाद्य । अतिनिंद्य भावयुक्त ॥ ५७ ॥ परिच्छिन्न परप्रकाश । परसंवेद्य[3] सावयवांश । अविद्याभूत आणि दृश्य । विश्व दृश्य तें नश्वरपणें ॥ ५८ ॥ यया परस्परें सादृश्य काये । विचारितां बहु अंतर आहे । यालागीं सादृश्य भ्रम नोहे । अज्ञानें पाहे होतसे ॥ ५९ ॥ हे जाण पां अनिर्वचनीय अन्यथा ख्याति । निर्धारूनि ठेविलें वेदांतीं । अन्यथा शास्त्रांचिया युक्ति । सर्वही निश्चिती दूपूनियां ॥ २६० ॥ आणि ब्रह्माच्या ठायीं । सामान्य विशेष सर्वदा नाहीं । ब्रह्म तें निःसामान्य अनपायी । निर्विशेष पाहीं सर्वदा ॥ ६१ ॥ ब्रह्मीं सामान्य विशेष बोलतां । श्रुतीसि येतसे अप्रमाणता । आणि श्रुतीविरुद्ध बोलतां । पाषंड तत्वतां आंगीं वाजे ॥ ६२ ॥ गोच्या ठायीं सामान्य गोत्वें । विशेष खंडत्व मुंडत्वें[6] । तैसें ब्रह्मीं सामान्य विशेषत्व । कैचें सत्व नाना तर्की ॥६३॥ कां शुक्तीचा ठायीं शुक्ति सामान्य । विशेष तें नीलपृष्ठ त्रिकोण । तैसें ब्रह्मीं विशेष सामान्य । सांगा कोण वर्त्ततसे ॥ ६४ ॥ नाहो सामान्यशब्दें समस्त । विशेष शब्दें बोलिजे व्यस्त । ऐसें समस्तव्यस्तात्मक वस्तु सत्य । ब्रह्म निश्चित ऐसें असे ॥६५॥ समस्तशब्दें निर्विकार । व्यस्तशब्दें प्रपंचाकार । समस्तव्यस्तात्मक निर्धार । ब्रह्म साचार ह्मणाळ तुह्मीं ॥६६॥ आकार गेलिया विशेष । उरे सामान्य निर्विशेष । यालागीं भ्रमसामग्री सावकाश । असे असंगा परब्रह्मीं ॥ ६७ ॥ ब्रह्म निर्विकार होय । प्रपंचाकारही तेंचि आहे । जैसें सुवर्ण येक सोनें आहे । तेंचि पाहे कटकाकारीं ॥ ६८ ॥ तरी सुवर्णविकारी परिणाम । अळंकाररूपें जालें हेम । तैसें नव्हे परब्रह्म । सर्वदा सम परिणामशून्य ॥ ६९ ॥ विश्व ब्रह्माचा परिणाम । हें बोलणेंचि अतिविषम । विकारशून्य परब्रह्म । तेथें परिणाम कैसा घडे ॥ २७० ॥ ब्रह्म सर्वदा निर्विकार । तेथ परिणाम कैंचा जगदाकार । हें बोलणेंचि अविचार । होय निर्धार भ्रममूळ ॥ ७१ ॥ जे जे वस्तु परिणामवंत । ते ते जाणावी नाशवंत । दुग्ध परिणामूनि दधि होत । स्वयें नाशत नामरूपें ॥ ७२ ॥ जे कीं परिणामवाद बोलती । ते सर्वथा कांहींच नेणती । ते शब्दज्ञानीच ह्मणिजेती । अनुभवें नेणती सर्वथा ॥ ७३ ॥ परिणामी तें विकारवंत । सांश जाणावें निश्चित । ब्रह्म अविकारी निरंश बोलत । श्रुतिसंमत परियेसा ॥ ७४ ॥ ब्रह्म परिणामीं प्रपंचाकार असतें । तरी वेदें विश्व कां निषेधिजेतें । 'नेतिनेति' येणें अर्थें । प्रपंचातें निराकारी ॥७५॥ आणीकही वेद श्रुति । प्रपंचातें निषेधिती । निषेधबोधीं ब्रह्मस्थिति । तेचि श्रोतीं परिसिजे ॥ ७६ ॥

अपूर्वमनपरमनंतरमबाह्यमिति ॥

पूर्वशब्दें बोलिजे कारण । तें तंव शुद्ध अज्ञान । ब्रह्म कार्यकारणविहीन । नव्हे अज्ञान सर्वथा ॥ ७७ ॥ अपरशब्दें कार्यजात । दृश्यप्रपंच हा समस्त । ब्रह्म कार्य नव्हे निश्चित । उभयातीत अनादिपणें ॥ ७८ ॥ ना ब्रह्म कोण्हाचेंही अंतर । दुसरा पदार्थ नाहीं साचार । बाह्यही नव्हे निरंतर ।

---

१ आपल्या अंगाचे तुकडे होणें. २ आपल्यामुळेंच जाणलें जाणारे. ३ जाणण्यास कठीण. ४ दुसऱ्या पदार्थाच्या योगानें जाणावयाचें. ५गायपणा. ६शिंगें वगैरे नसणें. ७कडें वगैरे दागिन्यांच्या रूपानें. ८नाश होणारी. ९नाहीं ह्मणून सांगलें.

निर्विकार सर्वत्रपणें ॥ ७९ ॥ येक वस्तु साच असावें । तरी त्यासि अंतर्बाह्य बोलावें । प्रपंचासि सत्यत्व न संभवे । ह्मणऊनि हें नव्हे सर्वथा ॥ २८० ॥ ऐसी प्रपंचाची व्यावृत्ति । सर्वप्रकारें करितसे श्रुति । ब्रह्म प्रपंचरूप हे स्थिति । अघट सर्वार्थी घडेना ॥ ८१ ॥ ब्रह्म सर्वथा निर्विशेष । त्यासि कैचें सामान्यविशेष । श्रुति निषेधी प्रपंचास । तंवि सावकाश परियेसा ॥ ८२ ॥

संमति श्रुति ॥ ॥ अस्थूलमनणुमदीर्घमन्ह्रस्वमिति ॥

ब्रह्म दीर्घ ना अदीर्घ स्थूळ । अणु ना ह्रस्व केवळ । तें ज्ञप्तिमात्र निष्कळ । अतिनिर्मळ निःसंगपणें ॥ ८३ ॥ स्थूळसूक्ष्मपणें प्रपंच घडे । परी ब्रह्म हें कांहींच न घडे । ह्मणूनि श्रुति हें स्थूळादिकोडें । अतिनिवाडें निषेधी ॥ ८४ ॥ यालागीं जग जैसें आहे तैसेंयासी । ब्रह्म ह्मणती तेणें रूपेंसी । सर्वथा वर्म न कळे त्यांसी । मानिती ब्रह्मासि विशेष सामान्य ॥ ८५ ॥ यालागीं भ्रमाचें कारण । मुख्य येकचि गा अज्ञान । तेणें विचित्र भ्रम हा जाण । अधिष्ठानीं पूर्ण भासत ॥ ८६ ॥ तैसें अज्ञानदर्पणाचा ठाईं । विश्व हें विचित्र भासे पाहीं । केवळ अज्ञानावांचूनि कांहीं । पाहातां सर्वही हेंचि मूळ ॥ ८७ ॥ यालागीं गा रघुनाथा । विश्व हें समूळ विचारितां । ब्रह्मीं स्फुरतसे मिथ्या । साच भ्रांता भ्रमास्तव ॥ ८८ ॥

सर्गश्चित्स्पंदमात्रात्मा सम्यग्दृष्टौ विलीयते । उदेत्यसम्यग्दृष्टौ तु रज्वां सर्पभ्रमो यथा ॥ ११ ॥

हा सर्ग समस्त विश्वरचना । तें सर्वही ज्ञानमात्रचि गा रघुनंदना । नामरूप भासे तो भ्रमु जाणा । नाहीं चिद्घनावांचूनि आन ॥ ८९ ॥ सम्यक्ज्ञानें विचारूनि पाहतां । तंव नाहींच होये सर्वथा । येऱ्हवीं अज्ञानें उद्बुद्धतां । पावे ताता जगदाभास ॥ २९० ॥ ययाचें उपजणें निमणें । होतसे गा ज्ञानाज्ञानें । पावे ताता उदय अज्ञानें । लीन ज्ञानें होतसे ॥ ९१ ॥ जैसी रज्जूच्या ठाईं सर्पबुद्धि । रज्जुअज्ञानें भयकंपबुद्धि । सम्यक् दृष्टीनें निरवधि । नाहीं त्रिशुद्धि पावतुसे ॥ ९२ ॥ तेवीं सुखदुःखासि कारण । ज्ञानें सुख अज्ञानें दुःख दारुण । बंधमोक्षासि मूळ ज्ञानाज्ञान । जाण हे खूण रघुराया ॥ ९३ ॥ अज्ञानें भोगवासना उठी । सर्व संसार वासनेच्या पोटीं । संसारीं जन्ममरणाची आटी । दुःखकोटि उत्तरोत्तर ॥ ९४ ॥

भोगवासनया याति बंधो दार्ढ्यमवस्तुजः ॥ तयोपशांतया याति बंधो जगति तानवं ॥ १२ ॥

विषयभोगवासनेंकरून । भवबंध दृढ पावे जाण । विचारितां याचें कारण । मुख्य अज्ञान रघुराया ॥ ९५ ॥ आणि अज्ञान विचारितां । कोणही न मिळे पदार्था । हें अवस्तुभूतमूळ तत्वतां । जाण ताता निर्धारीं ॥ ९६ ॥ न विचारितां तरी भरलें आहे । विचारितां नाहीं होये । हें नाहींचपणें हों पाहे । स्फुरलें आहे अवस्तुपणें ॥ ९७ ॥ याचे विकल्प बोलतां । तरी मायेचे बोलिजे ताता । ते मायाच अज्ञान तत्वतां । दोन्ही सर्वथा असती ना ॥ ९८ ॥ ऐसें अवस्थाभूत अज्ञान । त्यापासाव भवबंध जाण । दृढता पावे संपूर्ण । वाढतां पूर्ण भोगेच्छा ॥ ९९ ॥ तिये भोगवासनेची शांति । समूळ जाली गा रघुपति । तेणेंही बंध जाये क्षयाप्रति । तन्मूल ह्मणती जयासी ॥ ३०० ॥ अज्ञानकृत बंध जाण । अज्ञानक्षयें बंधही क्षीण । बंध नाहीं तोचि मोक्ष पूर्ण । जाण पां खूण रघुवर्या ॥ १ ॥ अगा मोह तोचि इतुका रघुपती । कीं मनासि सत्यत्वें विश्वप्रतीति । मनाचेनि चंचळत्वें उपजती । तन्नाशें शांति प्रपंचाची ॥ २ ॥

मनः संपद्यते तस्मान्महतः परमात्मनः ॥ सुस्थिरादस्थिराकारं तरंगा इव वारिधेः ॥ १३ ॥

याही मनाची उत्पत्ति । ब्रह्माचिपासाव रघुपती । मनोत्पत्तीनें विश्वप्रतीति । अन्य गति असेचिना ॥ ३ ॥ जो कीं परमात्मा व्यापकपणें । जयातें श्रुति ब्रह्म ह्मणे । तेथूनि मनासि उपजणें । चंचळपणें रघुपुंगवा ॥ ४ ॥ परी रघुनाथा ऐसें ह्मणसी । ब्रह्म सुस्थिर निश्चळ सर्वांशी । त्यापासाव चंचळत्व मनासी । उत्पत्ति कैसी घडेल ॥ ५ ॥ तरी आइक तुज सांगेन । स्थिरापासाव चंचलोद्गमन । जैसा क्षीराब्धि निश्चळ पूर्ण । स्थिरता जाण गांभीर्य ॥ ६ ॥ तयापासाव अतिचंचळ । उठतसे बुदबुदजाळ । क्षणिक स्थिर सकळ । स्थिर प्रांजळ भासती ॥ ७ ॥ तैसे या मनाचे उद्गारे । चंचळत्वें उठती संभार । तेंचि हें विश्व चराचर । क्षणभंगुर मनोमय ॥ ८ ॥

---

१ निराकरण. २ फक्त जाणतां येणारें. ३ उत्पत्ति. ४ वरवर दिसणें. ५ त्रास. ६ वस्तुतः नसलेलें. ७ जग आहे अशी खात्री. ८ त्याच्या नाशानें. ९ स्थिर. १० चंचलाची उत्पत्ति. ११ बुडबुडे. १२ उत्पन्न होणें. १३ क्षणभर टिकणारें.

यस्त्वयं स्वैरमेवाशु संकल्पयति नित्यशः ॥ तेनेयमिंद्रजालश्रीर्जाग्रति प्रवितन्यते ॥ १४ ॥

हेंचि मन स्वयें गा रघुनाथा । यथास्वेच्छे अतिशीघ्रता । निरंतर विश्व कल्पितां । उसंत सर्वथा नाहीं त्यासी ॥ ९ ॥ तेणें मनसंकल्पें करूनी । विश्वइंद्रजाळ भासे नयनीं । जैसा इंद्रजाळिक जनीं । संकल्पेंकरूनि विश्वरूप दावी ॥ ३१० ॥ इंद्रजाळकाचेनि संकल्पें । येव्हडें इंद्रजाल आरोपे । पक्षांचीं पारखीं रूपें । चर्मीं सर्पे दाखवी ॥ ११ ॥ तें येव्हडें साचाचिसारिखें दिसे । पाहतां साच कांहींच नसे । तैसें मनसंकल्पेंचि विश्वभासे । सर्वथा नसे साच कांहीं ॥ १२ ॥ जागृत अवस्थेचे ठायीं । हें मनचि इंद्रजाळ कल्पी पाहीं । त्या नाम विश्व ह्मणती सर्वही । विचित्र पाहीं श्यामसुंदरा ॥ १३ ॥ मनकल्पनेविरहित । जग नाहींच गा निश्चित । कोण पदार्थ साच येथ । भासे जगांत विचारिजे ॥ १४ ॥ अगा याची प्रतीति रघुनाथा । करूनि पाहें पां आतां । मन स्वरूपीं निमग्न असतां । प्रपंच सर्वथा न दिसे ॥ १५ ॥ मनाचि विरालें स्वरूपीं । मग प्रपंच कोण संकल्पी । ह्मणऊनि हा संकल्पारोपीं । असंकल्पीं न भासत ॥ १६ ॥ हा मनाचेनि संकल्पें उठी । मन स्वरूपस्थ जाल्या कदा न उठी । तरी मनकल्पित हे गोष्टि । साच जगजेठी जाण पां ॥ १७ ॥ स्वरूपानुभव नाहीं जयासी । कैसें प्रत्यया येईल त्यासी । तरी सुषुप्तीचा अनुभव समग्रांसी । लहानाथोरांसि होतसे ॥ १८ ॥ सुषुप्तीसि मन नाहीं । तेथें येकु आत्माचि पाहीं । तेथें मनाचे अभावें जग नाहीं । ऐसा सर्वांही अनुभव असे ॥ १९ ॥ अगा प्रपंच जरी साच असता । तरी सुषुप्तीसिही भासता । कालत्रयीं न नाशता । जाण रघुनाथा हेंचि खूण ॥ ३२० ॥ आणि स्वप्नही जागृतीऐसा । न देखिजे जैसा तैसा । तेथें दिसे विपरीत ठसा । भासे वीरेशा मनकल्पित ॥ २१ ॥ ऐसें जागृतीं येक कल्पिलें । स्वप्नीं आणीकचि विस्तारलें । सुषुप्तीसि नाहींच जालें । होय या बोलें नश्वर ॥ २२ ॥ जें कीं साच वस्तु असे । तें कालत्रयीं असे जैसें तैसें । सर्वथा न भासे अनारिसें । खूण विश्वेशें जाणावी ॥ २३ ॥ जैसा आत्मा सर्वदा संत । कालत्रयीं अबाधित । विपरीत नव्हे ईषत् । असे तंतु येकरूप ॥ २४ ॥ तैसें विश्व हें साच असतें । तरी कालत्रयींहीं न बाधिजेतें । आणि विपरीत न भासतें । सर्वदा असतें जैसें तैसें ॥ २५ ॥ यालागीं असंत सर्वांपरी । हें मनसंकल्पा भरोवरी । मनोदयें घे फरारी । नाहीं उरी मनोलयें ॥ २६ ॥ ययालागीं जागृतिदशे । मनचि हें इंद्रजाळ प्रकाशे । कल्पित परी साच ऐसें । मानिजे मानसें रघुवीरा ॥ २७ ॥

यथा बालस्य वेतालो मृतिपर्यंत दुःखदः । असदेव सदाकारं तथा मूढमतेर्जगत् ॥ १५ ॥

अगा बाळकासि जैसा वेताळ । साचपणें देतसे तळमळ । मृत्युपर्यंत दुःखकल्लोळ । करी सकळ दुःखमय ॥ २८ ॥ बाळासि बागुल दाविती । तो वस्तुता नये व्यक्ति । तेथें शब्दमात्राचीच व्याप्ति । दुःखसंतति तितुकेनी ॥ २९ ॥ त्याबागुलाचेनि भयेंकरून । बाळ कांपे गदगदून । दुःख करी अति दारुण । शोक संपूर्ण मृत्यूवरी ॥ ३३० ॥ बागुल आला ह्मणती । तंव तंव पीडे दुःखाच्या आर्ती । आतें केलिया वेतालनिवृत्ति । सुखसंपत्ति पावतु ॥ ३१ ॥ शब्देंचि ह्मणती बागुल आला । तो दुःखरूप होये तयाला । मृत्यूपर्यंत दुःखसोहळा । दे त्या वेळा अढळपणें ॥ ३२ ॥ गेला ह्मणतांचि आप्तवचन । अतिसुख मानी अंतःकरण । तैसा हा लटिकाचि संसार पूर्ण । दुःख दारुण देत असे ॥ ३३ ॥ अज्ञानें मूढता बुद्धीसी । परिपूर्ण जया मनुष्यासी । साच संसार होये तयासी । दे दुःखासि वेताळापरी ॥ ३४ ॥ संसार साच तरी नाहीं । परी अज्ञानें साच मानिती सर्वही । बाळासि बागुल जैसा पाहीं । दुःख अनंपायीं देत असे ॥ ३५ ॥ तैसा मरणांतर मरण । पावतु साच मानून । तंव तंव दे दुःख दारुण । संसार पूर्ण भासवी ॥ ३६ ॥ हा सत्यत्वें आला ना गेला । केवळ शब्दमात्रेंचि विरूढला । परी दुःखरूप असे जाला । अज्ञानाला रघुराया ॥ ३७ ॥ पाहतां हा असदाकार । अज्ञानें भासे संसार । यासि जो जो कीजे प्रतिकार । तेणेंचि फार होऊं लागे ॥ ३८ ॥ जरी भाग्यें भेटे सद्गुरु । तरीच सरे हा भवपूरु । येऱ्हवीं अतिदुर्धरु । दुःखसागरु दुःखात्मक ॥ ३९ ॥ शुद्धब्रह्माचे ठायीं । हा असद्रूपें भासे पाहीं । तेणेंचि भांबावती सर्वही । विचार कहीं न करितां ॥ ३४० ॥

अव्युत्पन्नस्य कृतके कनके कटकं यथा । कटकज्ञप्तिरेवास्ति न मनागपि हेमधीः ॥ १६ ॥

---

१ विश्रांति. २ गारुडी. ३ निरनिराळीं. ४ मग्न झालें ५ निद्रेचा. ६ ज्याला बाध नाहीं असा. ७ गारुड्याचें कृत्य ८ स्पष्टपणाला. ९ बागुलबोवा गेला असें सांगणें. १० अतिशय. ११ अनेक वेळां मरणें. १२ खोटा. १३ अडथळा.

अगा सुवर्णाचेचि अळंकार । केलिया कटकसंभार । तेथें कटकबुद्धिचि निर्धार । करी सत्वर अव्युत्पन्न ॥ ४१ ॥ तया अव्युत्पन्ना पुरुषासी । अळंकारीं पृथक् बुद्धि निश्चयेंसी । होय परी सुवर्ण ऐसी । नव्हे परियेसीं बुद्धि त्याची ॥ ४२ ॥ जैसे ज्याचे नाम आकार देखती । ते ते तैसेची यथार्थ मानिती । परी अधिष्ठानीं रघुपती । बुद्धि सर्वार्थीं न रिघे त्याची ॥ ४३ ॥ दृष्टि तरी प्रत्यक्ष सुवर्ण देखती । परी सुवर्णाकारें नव्हे चित्तवृत्ति । नामरूपेंचिकरूनि भ्रांति । होये सर्वार्थीं रघुपुंगवा ॥ ४४ ॥ हेंचि आश्चर्य गा रघुनाथा । प्रत्यक्ष यथार्थ वस्तु देखतां । विपरीत भास होये चित्ता । अपूर्वता काये सांगों ॥ ४५ ॥ येवढें भ्रांतीचें बळ । देखणे दृष्टीसि घाली पडळ । शुद्धासिचि करि मैळ । देखे बरळ पिशाच जैसा ॥ ४६ ॥ तैसा अपरोक्ष आत्मा स्वतःसिद्ध । त्याचा भ्रमें करूनियां बाध । नामरूपात्मक हें विरुद्ध । देखे अंध शुद्धस्वरूपीं ॥ ४७ ॥ अगा नामरूपासाठीं । वस्तु दवडिली बारावाटीं ॥ असत्प्रपंच देखे दृष्टी । साचपणें सृष्टि रघुनाथा ॥ ४८ ॥ तेंचि नामरूप वेगळें करुनी । विश्व पाहिजे विचारुनी । तऱ्ही तेंचि ब्रह्म निर्वाणीं । नाहीं कहाणी जगाची ॥ ४९ ॥ अगा दुरी कोठें नव जावें । तपादि नलगे साधावें । येक नामरूप त्यजूनि पाहावें । तरीच पावावें शुद्धब्रह्म ॥ ३५० ॥ नामपंचकाची व्याप्ति । अवघी वर्त्ततसे गा रघुपती । सांगेन आइकें संमति । येकाग्र चित्तीं परिस पां ॥ ५१ ॥

संमति श्लोक । अस्ति भाति प्रियं रूपं नाम चेत्यंशपंचकम् । आद्यत्रयं ब्रह्मरूपं जगद्रूपं ततो द्वयं ॥

सत्ता प्रकाश आणि सुख । हें त्रयात्मक येक ब्रह्म देख । जग तें नामरूपात्मक । होये सम्यक् नामद्वयें ॥ ५२ ॥ यालागीं नामरूपात्मक हें जग । नामरूपात्मकातीत ब्रह्म अव्यंग । हें निश्चियें जाण तूं सांग । नाहीं भाग ब्रह्मासि पैं ॥ ५३ ॥

तथाज्ञस्य पुरागारनगनागादिगोचरा । ईदृशी ईदृगेवास्ति नत्वन्या परमार्थदृक् ॥ १७ ॥

पुरें आगारें वृक्षयाति । पर्वत मानूनि विचित्रस्थिति । येणें विभागेंचि क्षिति । मूढ मानिती अज्ञानें ॥ ५४ ॥ अगा अज्ञाना पुरुषासी । विपरीत दृष्टी परियेसीं । वैचित्र्य पृथ्वीयेसी । येकरूपासि देखती ॥ ५५ ॥ हा वृक्ष हा उंच पर्वत । हें गृह हें नगर विस्तृत । नामरूपाचि प्रकार अनंत । कल्पिती यथार्थ नेणपणें ॥ ५६ ॥ अगा पृथ्वीयेच्या ठाईं । हे अनेक विकार कल्पिले पाहीं । ते यथार्थ मानूनि सर्वेही । भ्रमडोहीं बुडती ॥ ५७ ॥ पृथ्वीतेंचि पृथ्वी न देखती । आणि नानाविकार कल्पिती । न सतेंचि सत्य मानिती । भ्रम वाढविती अज्ञानें ॥ ५८ ॥ जो कोण्ही परमार्थद्रष्टा असे । तो तंव पृथ्वीचि जाणे सर्वांशें । तेथें नेणोनि विपरीत भासे । तें तंव नसे तयाप्रति ॥ ५९ ॥ तैसें ब्रह्मीं नानाकार । विश्व भासे चराचर । तेंचि भ्रमें मानिती साचार । जे अविचारी ज्ञानहीन ॥ ३६० ॥ तया विश्वाच्या उत्पत्तिक्षयीं । दुःखमय त्यासि जगत्रयीं । अधिष्ठानज्ञानसुख अक्षयी । जाण अनपायी रघुनाथा ॥ ६१ ॥

अज्ञस्य दुःखौघमयं ज्ञस्यानंदमयं जगत् । अंधं भुवनमंधस्य प्रकाशं च सचक्षुषः ॥ १८ ॥

अगा अज्ञानपुरुषासी । जग हें दुःखमयचि परियेसीं । बाह्यदृष्टि ते कारण दुःखासी । निश्चयेंसि जाण रामा ॥ ६२ ॥ स्वस्वरूपाची अस्फूर्ति तें अज्ञान । हें स्वरूपाचें नेणणेंपण । तेंचि दुःखाचें कारण । जाण खूण रघूत्तमा ॥ ६३ ॥ अज्ञानकृत जे विपरीतबुद्धि । जे ब्रह्मींच करी विश्ववृद्धि । तेचि दुःखरूप क्षयव्याधि । जाण त्रिशुद्धि रघुपुंगवा ॥ ६४ ॥ स्वशरीर आदिकरुनी । जें कीं विपरीत भासे नयनीं । तें तें दुःखस्वरूप भरंवसेनीं । कोदंडपाणी जाण तूं ॥ ६५ ॥ जयासि नाहीं स्वस्वरूपीं अज्ञान । तोचि तो ब्रह्म नित्यानंदघन । तयासि हें विश्व ब्रह्म पूर्ण । दुःखस्वप्न कैंचें भासे ॥ ६६ ॥ जऱ्ही ब्रह्मावेगळें दुजें भासे । तऱ्ही विश्वाकारें दुःख प्रकाशे । तेणें सुखरूप असे । ब्रह्मचि भासे म्हणउनी ॥ ६७ ॥ अगा आपण जो जैसा असे । त्यासि तैसेंचि सर्व प्रकाशे । अंधासि अंधगृह जैसें । न कळे मानसें अंधकूप ॥ ६८ ॥ जरी माडिया गोपुरें धवळारें । वरी चित्रें लिहिलीं मनोहरें । तऱ्ही तें अंधासि गाभारें । जाण निर्धारें अंधकाराचें ॥ ६९ ॥ अंध तो राजभुवनीं बैसविला । तो मानी मी अंधकूपीं पडिला । तैसा जो स्वस्वरूपीं आंधळा । विश्व तयाला

१ अज्ञानी. २ मूळ ठिकाणीं, आत्मरूपीं. ३ स्वतः अनुभवास येणारा. ४ निराश. ५ नाम व रूप या दोन प्रकारानीं. ६ भेदरहित. ७ आत्मस्वरूपाच्या ज्ञानामासून होणारें सुख. ८ बाहेरचे पदार्थ खरें असें मानणें. ९ अगदीं मधला भाग.

दुःखरूपाचि ॥ ३७० ॥ तेंचि राजमंदिर डोळसासी । प्रकाशमंत मनोहर परियेसीं । तैसें विश्व हें ज्ञानियासी । ब्रह्मचि सर्वांशीं सुखरूप ॥ ७१ ॥ यालागीं जो जैसा सर्व आहे । त्यासि सर्वही तद्रूप होये । तृप्तासि विश्व तृप्त पाहें । क्षुधिता होये क्षुधारूप ॥ ७२ ॥ आर्तासि भासे पीडित । क्लेशिया क्लेशरूपें निश्चित । धनवंतासि जग धनवंत । कुश्चिता कुश्चित शुद्धासि शुद्ध ॥ ७३ ॥ अगा तूं ऐसें ह्मणसी । शुद्धब्रह्मीं विश्वोत्पत्ति कैसी । अजडीं जडरूपासी । वस्ती कैसी सांगिजे ॥ ७४ ॥ तऱ्ही दृष्टांतेंकरूनियां उत्तर । देइजेल अतिचमत्कार । तें आइक तूं सुंदर । संदेहपार पावसी जेणें ॥ ७५ ॥

यथा विशुद्ध आकाशे सहसैवाभ्रमंडलं । भूत्वा विलीयते तद्वदात्मनि ह्यखिलं जगत् ॥ १९ ॥

अगा अतिविशुद्ध आकाशीं । अकस्मात् अभ्रमंडळें जैसीं । होऊनियां येकसरिसीं । तेंचि ते चौपासीं होऊनि ठाती ॥ ७६ ॥ आकाश तऱ्ही निर्मळ अतिशुद्ध । व्यापकपणें अतिवृत्त वृद्ध ॥ अखंड आणि स्तब्ध । अति अगाध उदंडपणें ॥ ७७ ॥ तयाच्या ठाईं जड अभ्रजात । अकस्मात उपजत । तें स्वयेंचि लयो पावत । नभ तटस्थ अभंगपणें ॥ ७८ ॥ अभ्रें आकाश काय मैळलें । किंवा अभ्रेंसि संग पावलें । तें अभ्रचि आलें गेलें । नभ उगलें जैसें तैसें ॥ ७९ ॥ अभ्रें दुजेपण नाहीं आलें । अभ्रें आकाशपण नाहीं गेलें । अभ्रचि स्वयें नाशलें । व्योम उगलें जैसें तैसें ॥ ३८० ॥ तैसें शुद्ध आत्मयाच्या ठायीं । जड विश्व भासतसे पाहीं । आणि पावतसे लयोही । आत्मा अनपायी जैसा तैसा ॥ ८१ ॥ येकचि विशुद्ध आत्मरूपीं । अज्ञानें विश्व आरोपी । इतुकेनि ब्रह्म काये लेपी[४] । लेपें आरोपी नानाविधि ॥ ८२ ॥ उत्पत्ति स्थिति विनाश । ब्रह्मींच होतसे जगास । परी ब्रह्म तें सदा उदास । अति अविनाश नित्यपणें ॥ ८३ ॥ रज्जूच्या ठाईं सर्प भासला । तो तेथेंचि स्थिति नाश पावला । रज्जु जैसा तैसा उगला । क्षयवृद्धीला न पवेचि ॥ ८४ ॥ सर्पत्वें रज्जु नाहीं वेगळी । सर्पत्वें रज्जु नाहीं मैळली । सर्पत्वें विषरूप नाहीं जाली । असे संचली जैसी तैसी ॥ ८५ ॥ तैसें जगदाभासें ब्रह्म न मैळे । जगदाभासें नाहीं वेचलें । ब्रह्म तें अचळत्वें न ढळे । असे निराळें असंगपणें ॥ ८६ ॥ विश्व हें जरी साच असतें । तरी ब्रह्मासि दुजेपण येतें । जग नसतां काये तेथें । जगें विपरीत होईल ॥ ८७ ॥ विश्व ऐसें जें ह्मणणें । तें वाचेचें विडंबणें । वांचूनि दुजें विश्वपणें । देखिजे कोण्हें ब्रह्मेंविण ॥ ८८ ॥ अगा या जगाची गोष्टी । भ्रमावांचूनि नाहीं सृष्टि । यालागीं विश्व हे परीपाटी । समूळ खोटी विचारितां ॥ ८९ ॥ भुललेपणें गा रघुनाथा । सिद्धवस्तूसि करिती अन्यथा । ब्रह्मीं विश्व आरोपितां । अनर्थता सहस्रावधि ॥ ३९० ॥ अगा ब्रह्मीं विश्वाचिया लहरी । होत जात ब्रह्मसागरीं । परी न वचे न ढळे तिळहीभरी । अढळ परी ययाची ॥ ९१ ॥ ययालागीं गा रघुनाथा ॥ अखिल विश्व ब्रह्मीं स्फुरतां । स्फुरणपणेंचि हें मिथ्या । नव्हे तत्वतां कल्पितपणें ॥ ९२ ॥

आदित्यव्यतिरेकेण रश्मयो येन भाविताः । आदित्य एव ते तस्य निर्विकल्पः स उच्यते ॥ २० ॥

अगा जयावेगळें जें नाहीं । तेंचि वस्तुत्वें तेंचि पाहीं । जैसें रवीविण रश्मि नाहीं । रविच सर्व ही रश्मिरूपें ॥ ९३ ॥ रविउदयें रश्मीचें असणें । रवीचेनि अस्तें अस्तु पावणें । तरी तें रविरूपचि जाणणें । वेगळेपणें उरी कैंची ॥ ९४ ॥ ऐसें जाणे जो निश्चयेंकरून । तोचि पुरुषजाणावा सज्ञान । येणें दृष्टांतें ब्रह्मीं दुजेपण । न देखे आन विश्वपणें ॥ ९५ ॥ ब्रह्मावेगळें विश्व न भासे । तऱ्ही येक ब्रह्मचि सर्वत्र असे । अधिष्ठानेंविण सर्वथा नसे । जाण सर्वांशें आरोपित ॥ ९६ ॥ यालागीं ब्रह्मीं विश्व दुजेपणें । सर्वथा नाहींच ऐसें जो जाणे । तोचि निर्विकल्प पुरुष सर्वज्ञपणें । जया भोगणें ब्रह्मसुख ॥ ९७ ॥ आणि निर्विकल्पसमाधीची खूण । तियेचें जाण हेंचि लक्षण । विश्व न स्फुरे ब्रह्मेंविण । नित्य चिद्घन तेंचि ते कीं ॥ ९८ ॥ परी मन कोंडूनि निवांत राहणें । अंतरीं ब्रह्मसुख सर्वथा नेणें । ते समाधि नव्हे विटंबणें । वृथा करणें श्रम तोही ॥ ९९ ॥

तंतुमात्रो भवत्येव पटो यद्वद्विचारितः । आत्मतन्मात्रमेवेदं तद्वद्विश्वं विचारितम् ॥ २१ ॥

अगा पटेंचि विचारूनि पाहतां । तंव पटत्व नाहींच मग तत्वतां । पट तो तंतुचि रघुनाथा । पाहातां अन्यथा भासेना ॥ ४०० ॥ येक तंतुचि सैंघ दिसतां । तेथ पटप्रतीति होये भ्रांता । बरवें विचारूनि पाहतां । होय अन्यथा बुद्धि त्याची ॥ १ ॥ परी विचारमानें येक तंतुचि । तेथें मिथ्या

---

१ जगाचें उत्पन्न होणें. २ अति थाटोळें. ३ अपाय रहित ४ दोषी होतें. ५ चळवळी वांचून. ६ नाश होणें अथवा वाढणें. ७ खर्च झालें, संपलें. ८ एकसारखी चाललेली राहाटी. ९ सूर्याशिवाय. १० ज्ञानरूप. ११ वस्त्र. १२ सूतच.

भ्रांति परत्वाची । तैसें जाण आत्मतन्मात्राचि । विश्ववीचि ब्रह्माब्धीमाजी ॥ २ ॥ विश्व हें विचारूनि पाहतां । येक ब्रह्मचि जाण तत्वतां । विश्वप्रतीति होये भ्रांता । तोचि तत्वतां अढळ जाली ॥ ३ ॥ अज्ञानें विश्व हें देखती । ज्ञानें ब्रह्माचीच प्राप्ति । हें तंव न चुके गा सर्वार्थी । विश्वमूर्त्ती विश्वंभरा॥४॥

विश्ववीचिविलासोयं चित्सुखाब्धेरुदेति च । विलीयते च तत्रैव मध्ये कथमतन्मयः ॥ २२ ॥

अगा चित्सुखाब्धीचिया लहरी । तैसीच विश्वाचिया भरोवरी । होती जाती क्षणाभीतरी । जाण सर्वांपरी तेथेंचि ॥ ५ ॥ चिच्छब्दें बोलिजे ज्ञान वरिष्ठ । सुखशब्दें परमानंद श्रेष्ठ । एतद्रूपें ब्रह्म निघोट । होय स्पष्ट चित्सुखात्मक ॥ ६ ॥ तया ब्रह्माब्धीचा वीचिविलास । होतां जगद्रूपें उठी उदास । तेथें विलयोही सावकाश । पावे निःशेष रामचंद्रा ॥ ७ ॥ अगा जेथूनि जें उदय पावलें । मागुते तेथेंचि लया गेलें । तऱ्ही तेंचि तें न चुके कांहीं केलें । असे संचलें तेंचि तें ॥ ८ ॥ उदय अस्तीं येकरूपता । तरी मध्येंचि केवीं अतन्मयता । उदयापूर्वीच तत्वतां । मावळतां तोचि येक ॥ ९ ॥ समुद्रीं उंचावे जें पाणी । त्यासि लहरीपणें दुजेपणा आणी । तेंचि सपाटल्या आन कोणही । भासे जीवनीं दुजी वस्तु ॥४१०॥ यालागीं आदिअंती जें नसे । आणि मध्येंचि जें आभासे । तऱ्ही आन नव्हे तेंचि असे । जाण सर्वांशें रघुनाथा ॥ ११ ॥ ते नामरूपाचीच मिरवणी । वांचूनि सर्वत्र येकचि पाणी । भ्रमें तया दुजेपण आणी । विपरीत करणी भ्रमाची ॥ १२ ॥ तेंचि अज्ञान निःशेष जाये । तेथेंचि दुजेपण सामाये । मग उदकावांचूनि आहे काये । विचारूनि पाहें तूं रघुनाथा ॥ १३ ॥ तैसा सर्वत्र येक आत्माचि असे । तेथें दुजेपणें जें जग भासे । तें भ्रमावांचूनि आन नसे । जाण ऐसें रघुवर्या ॥ १४ ॥ मुळीं ब्रह्माचेनि नेणपणें । नामरूपाचेंचि होये भासणें । जगडंबरु हें अमूपपणें । भासे नयनें भ्रमाचेनी ॥ १५ ॥ तेंचि अज्ञानजात खेंवो । जगमिथ्यत्वें ब्रह्मभावो । होय हें अपूर्व पहाहो । बोले रावो ज्ञानियांचा ॥ १६ ॥

यथा न तोयतो भिन्नाः फेनोर्मिहिमबुद्बुदाः ॥ आत्मनोपि तथाऽभिन्नं विश्वमात्मविनिर्गतं ॥ २३ ॥

अगा अधिष्ठानीं जें आभासे । अधिष्ठानाचि तें होये जैसें । तेणेंसि अभिन्नपणेंचि असे । सर्वथा नसे स्वतंत्रपणें ॥ १७ ॥ जैसें फेन ऊर्मि जळाच्या ठायीं । कां हिम बुद्बुद हिमीं पाहीं । भासती ते तेंचि सर्वही । आणीक कांहीं असेचिना ॥ १८ ॥ जे कीं उंचावलें पाणी । त्यासि भ्रमें लहरीपण आणी। कां हिम जैसें हिमकणीं । वेगळेपणीं बोलती ॥ १९ ॥ तैसें ब्रह्मीं हें विश्व भासे । तें ब्रह्मेंसि तरी भिन्न नसे । विचारूनि पाहतां असे । ब्रह्म सर्वांशें रघुराया ॥ ४२० ॥ अगा येकाचि दुजें देखणें । हें तंव भ्रमाचें साजणें । ब्रह्मावांचूनि कोण वस्तु दुजेपणें । वेगळेपणें उरली असे ॥ २१ ॥ ब्रह्मींच विश्व आभासे । आणि स्थितिकाळीं तेथेंचि वसे । लयही पावे सर्वांशें । नाहींच ऐसें तेथेंचि जाण ॥ २२ ॥ तेथें उत्पत्ति स्थिति लय भासती । परी तयावेगळे न दिसती । तरी तेंचि तें जाण विश्वमूर्त्ती । आन गति भोंऊं नये ॥ २३ ॥ यदर्थी श्लोकत्रयेंकरून । दृष्टांतचतुष्टय जाण । अध्यारोपित तें अधिष्ठान । नव्हे भिन्न हें निरोपूं ॥ २४ ॥

आत्मनोपि तथा विश्वमात्मन्येव लयं व्रजेत् ॥ मृदि कुंभो जले वीचिः कनके कटकं यथा ॥ २४ ॥

मृत्तिके पासून घट उत्पन्न । यालागीं मृत्तिकेशी तो अभिन्न । कीं वीचीकां जळापासून । नसे अभिन्न जळाशी ॥ १ ॥ कनका पासूनि कंकण । यालागीं कनकाशीं तें अभिन्न । तसें आत्मया पासून । विश्व भिन्न नव्हे ॥ २ ॥ आत्म्यापासून विनिर्गत । विश्वें नव्हे आत्माखंडित । आत्मा अज्ञात विश्व भासत । तैसें येथें निरूपण ॥ ३ ॥

आत्माज्ञानाज्जगद्भाति आत्मज्ञानान्निवर्त्तते ॥ रज्वज्ञानादहिर्भाति स्तद्विज्ञानान्निवर्त्तते ॥ २५ ॥
तस्य दृश्यात्मतत्वस्य विस्मृत्यैव स्थितं जगत् ॥ जगत्स्यादीश्वराद्राम जगद्रज्जुभुजंगवत् ॥ २६ ॥

अधिष्ठानचि साच असतां । तेथें आणीक भासे जें भ्रांता । तें भ्रांतीवांचूनि तत्वतां । नाहीं अन्यथा वस्तु कोणही ॥ २५ ॥ जैसें मृत्तिकेच्या ठायीं । घटादिपात्रें भासती सर्वही । तें तंव अज्ञानेंकरूनि पाहीं । येऱ्हवीं सकलही मृत्तिकाचि ॥ २६ ॥ येक असतां दुजें भासे । तें तंव जाण अज्ञान पिसें । तेथें नाहीं अनारिसें । दृष्टांतें ऐसें बुझे पां ॥ २७ ॥ घटाचे आदिस्थितिअंतीं । एक मृत्ति-

१ ज्ञानानंद रूपी समुद्राच्या. २ उलटापालट. ३ लाटांचे खेळ. ४ त्या रूपानें नसणें. ५ संथ असतानां. ६ कर्तृत्व. ७ जगरूपी घोंटाळा. ८ आलिंगन, अज्ञानाचा संबंध. ९ लाटा. १० बुडबुडे. ११ इतर. १२ कल्पना करूं नये. १३ वेगळें

काचि विश्वमूर्ती । तरी ते मृत्तिकाचि जाण सर्वार्थी । घटप्रतीति तो समूळ भ्रम ॥ २८ ॥ आदिअंती मृत्तिकाचि असे । घटरूपेंही तेचि वसे । मध्यें पृथुबुध्नोदराकार आभासे । तेणेंचि पिसे घट ह्मणती ॥ २९ ॥ प्रत्यक्ष अधिष्ठान दिसतां । अज्ञानें भासे आनरूपता । ते साचचि मानिती नेणतां । आश्चर्यता काय बोलों ॥ ४३० ॥ तेथ परिणाम तरी नाहीं जाला । आणि व्यर्थचि भ्रम उपजला । विवर्त्त देखतांही तयाला । अन्यथा जाला बुद्धिभ्रमु ॥ ३१ ॥ परिणाम विवर्त्तांचें लक्षण ॥ तेंही तुजप्रति सांगेन । मग तूं बुझसी संपूर्ण । येथिची ह्मूण विबुधवर्या ॥ ३२ ॥ तरी विवर्त्त तो ऐसा असे । शुक्तिका जैसी तैसी असे । तेथें अन्यथा रूपें जें मिथ्या भासे । विवर्त ऐसें तया नाम ॥ ३३ ॥ तैसेंचि मृत्तिकेच्या ठायीं । निःशेष घट तंव नाहीं । मृत्पिंड केलया तयालाही । घट कोण्हीही न ह्मणती ॥ ३४ ॥ कपाल जरी ह्यावें जालें ॥ तऱ्ही मृत्तिकापणें असे संचलें । पृथुबुध्नाकारें आलें । नामरूप भलें घटपणासी ॥ ३५ ॥ परी तेव्हांही ते मृत्तिका असे । तिसी कालत्रयीं नाश नसे । परी आकारें नाम रूप ठसे । अनारिसें भासे जना ॥ ३६ ॥ यालागीं अधिष्ठान असताचि असे । तेथें भ्रमें जें कां आणीक भासे । तो विवर्त्तु आणावा विश्वेशें । वेदांत ऐसें बोलत ॥ ३७ ॥ आतां परिणाम तो ऐसा । अधिष्ठान नाशोनि अन्यथा ठसा । होये तो जाण धीरेशा । परिणाम ऐसा बोलज तूं ॥ ३८ ॥ दूधस्वरूप स्वयें नाशे । त्याचेंचि आन दधि भासे । पहिलें अधिष्ठानचि अनारिसें । अंतीं मध्यें नसे तो परिणामु ॥ ३९ ॥ याचें नाम परिणामवादु । सांगितला तुज विशदु । विवर्त्त अधिष्ठानासि बाधु । नाहीं निर्बाधु आन भासेंही ॥ ४४० ॥ तैसा विवर्त्त भासत असतां । तें साचचि माने अज्ञानवंता । हेंचि आश्चर्य वाटतसे चित्ता । काये रघुनाथा बोलावें ॥ ४१ ॥ जैसें मृत्तिकेच्या ठायीं घटादिक । कां जलाच्या ठायीं वीचि अनेक । कां कनकीं जैसें साच कटक । दोरी सम्यक् सर्पाकारें ॥ ४२ ॥ अधिष्ठानाचेनि अज्ञानें । अधिष्ठानींच अनुमानें । तैसें ब्रह्माचेनि अज्ञानें । होये भासणें जगाचें ॥ ४३ ॥ तेंचि आत्मविषयक अज्ञान । ज्ञानें नाशलिया संपूर्ण । विश्वाभास निःशेष जाण । हारपोन जात असे ॥ ४४ ॥ रज्जूचेनि अज्ञानें अहिभ्रांति । ते रज्जुज्ञानेंचि होवे निवृत्ति । तैसी विश्वभ्रांतीसि गा रघुपती । कारण सर्वार्थी अज्ञान ॥ ४५ ॥ अगा आत्मयाचें जें विस्मरण । तेंचि जग भासावयाचें कारण । यदर्थी उपपत्ति नाहीं आन । जाण ह्मूण रघूराया ॥ ४६ ॥ अगा ईश्वरापासाव गा रघुपती । यया जगाची वर्ते उत्पत्ति स्थिति । जैसी रज्जुसर्पाची वस्ती । असे वर्त्तती रज्जूपासाव ॥ ४७ ॥ परी सदसद्विलक्षण । जग तें मिथ्याभूत जाण । कैसें तें सार्धश्लोकेंकरून । आइक संपूर्ण सांगों तुज ॥ ४८ ॥

स्वप्ने जाग्रदसद्रूपा स्वप्नो जाग्रत्यसन्मयः । मृतिर्जन्मन्यसद्रूपा मृतौ जन्माप्यसन्मयम् ॥ २७ ॥
एवं न सन्नासदिति भ्रांतिमात्रं विजृंभते । अनुभूयत एवाशु किंचित्सर्वानुभूतितः ॥ २८ ॥

अगा साच तें येकविध असावें । कालत्रयींही न पालटावें । निःशेष न नाशावें । हें तों न संभवे जगासि पैं ॥ ४९ ॥ स्वप्नकाळीं स्वप्न साच दिसे । तें जागृतीसि नाहींच भासे । तेंही जागृतीसि साच नसे । साच सर्वेंचि भ्रंशे सुषुप्तीसी ॥ ४५० ॥ तिहीं अवस्थांचें अनुसंधान । नाहींच प्रकटलिया विज्ञान । असद्रूपें मिथ्या भान । जाय बुडोन सर्वथा ॥ ५१ ॥ तैसा जन्मकाळीं मृत्यु नाहीं । मृत्युकाळीं जन्म नाहीं । एवं सत्य ना असत्य पाहीं । नसे दोन्ही बोलावया ॥ ५२ ॥ एवं अवस्थारूपेंही एक रूपता । ना नाहीं जन्मस्थितीकारितां । ह्मणऊनि हें असद्रूप सर्वथा । सदसद्विलक्षणता असे यासी ॥ ५३ ॥ सत्य तरी सर्वदा असावें । कालत्रयीं न नासावें । आणि येकविधपणेंचि वसावें । न भ्रंशावें अवस्थांतरीं ॥ ५४ ॥ तैसें तरी नव्हे सत्यता । पूर्वी बोलिली याची अवस्था । असत्य तरी भासे सर्वथा । साच तत्वतां ऐसें गमे ॥ ५५ ॥ सत्य तरी हें नासत असे । असत्य तरी साचपणें दिसे । यालागीं सदसद्विलक्षण असे । जाण सर्वांशें विश्वजाल हें ॥ ५६ ॥ जें कीं सदसद्विलक्षण । तें तंव मिथ्याभूत जाण । भ्रांतिमात्र विजृंभण । जग संपूर्ण तैसें भासे ॥ ५७ ॥ एवं सकळ निरूपणाचा इत्यर्थ । जग मिथ्या हा फलितार्थ । हा बाणलिया वैराग्यार्थु । बाणे यथार्थ रघुपुंगवा ॥ ५८ ॥ एकेही परी पाहतां । जग साच न घडे गा रघुनाथा । तऱ्ही लटकियासि विमुख होतां । प्रयासता

१ ही घागर अशी कल्पना. २ मोठी व बुधल्याच्या आकाराची. ३ हे ज्ञात्यांमध्यें श्रेष्ठा. ४ खापरी. ५ अज्ञानी पुरुषाला. ६ लाटा. ७ आत्मा ह्मणजे काय या संबंधानें अज्ञान. ८ सर्प असा भ्रम. ९ दीडश्लोकानें. १० खोटें असलेलें.

कायिसी ॥ ५९ ॥ ऐसें जग मिथ्या बाणालिया । ते रिती बोधलेंचि गा रघुराया । मग जीवन्मुक्ति आपसया । त्यासि सावया बोळगे ॥ ४६० ॥ येकाग्र करूनियां अंतःकरण । संतश्रोतीं द्यावें अवधान । पुढिलेया प्रकरणींचें व्याख्यान । जें कीं करीन भगवत्कृपा ॥ ६१ ॥ तुमच्या अवधानासाठीं । ग्रंथु सिद्ध होये उठाउठी । आणि वकृत्वीं बुद्धि लाठी । झोंबे पोटीं प्रमेयांच्या ॥ ६२ ॥ म्हणवूनि तुमच्या कृपेचा तुषार । पावतांचि वाचावल्लि मनोहार । प्रमेयफल विस्तार । वोडंबर अतिशयेंसि करी ॥ ६३ ॥ सहजीं सहज पूर्ण तेथ । निजानंदें जो डुल्लत । रंगूनिया साधिला अर्थ । कृपे वसिष्ठ रघुनाथें ॥ ६४ ॥

## इति श्रीयोगवासिष्ठसारे श्रीवसिष्ठरामसंवादे जगन्मिथ्याप्रकरणं द्वितीयं संपूर्णम् ।



॥ श्रीः ॥

# प्रकरण ३ रें.

# मनोलयप्रकरण.

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीमत्सद्गुरुनिजानंदाय नमः । यजजय जी सद्गुरुराया । नमन करूनि तुझिया पायां । ग्रंथव्याख्यान तरणोपाया । जीवांचिया करीन मी ॥ १ ॥ तरी जड जीव-उद्धारकु । तूंचि तूं परिपूर्ण येकु । जयाचा अवलोकनदीपकु । स्वप्रकाशकु करी जगा ॥ २ ॥ तया तुझिया कृपावलोकें । ग्रंथ सिद्धी जाईल कौतुकें । ये-हवीं येवढा उन्मेषु विशेषें । बोलाचि फिके सर्वही ॥ ३ ॥ ययालागीं जी कृपासागरा । येकें ज्ञानदानिया उदारा । रिघोनि मद्वाचेचिया वोवरां । प्रकाश पुरा करीं स्वामी ॥ ४ ॥ रिघा ह्मणतां परिच्छिन्न । होऊं पाहे तुझें परिमाण । तुजकरितां सर्वां चलन । तूं व्यापक पूर्ण नियंतृत्वें ॥ ५ ॥ आणि वाचादिकरणें तूं होसी । तुजविण स्थिति कैंची जगासी । यालागीं सर्वही तूंचि अनुभविसी । अनुभवासि येतसे ॥ ६ ॥ तरी कासया स्यां विन-वावें । सर्वही तूंचि होसी स्वभावें । वक्ता वदविता श्रोता सद्भावें । होसी अनुभवें सकळ तूंचि ॥ ७ ॥ कर्त्ता करविता श्रीगुरुनाथा । तेथ वर्णनाची काय कथा । गुरुनाथा गुरुशिष्यभेदु दाविता लीलावंता तूंचि तूं ॥८॥ माझें मीपण तुजविण । कोठें पावेल अवस्थान । यालागीं तूंचि तूं आनं-दघन । मीतूंपण समूळ भ्रांति ॥ ९ ॥ आपुलें ऐश्वर्य बोलावया । ग्रंथमिषेंकरूनि श्रीगुरुराया । बोलविसी ब्रह्मानुभव अभिप्राया । उद्धरावया जड जीवां ॥ १० ॥ तेणें माझें विनवणें तुजप्रति । कासयालागीं श्रीगुरुमूर्ती । तथापि परोपकारार्थ विनंति । आनंदमूर्ती करीं तुज ॥ ११ ॥ तरी तेंचि ग्रंथाचें अनुसंधान । संपलें जगन्मिथ्यत्व प्रकरण । तेथें हेंचि केलें निरूपण । जग मिथ्याचि पूर्ण आन नाहीं ॥ १२ ॥ हें वैराग्य दृढ बाणावया । सांगितलें प्रकरणीं यया । प्रपंच मिथ्या दृढ कळ-लिया । तेंचि रघुराया वैराग्यही ॥ १३ ॥ तया वैराग्याचें कारण । विषयीं दोषदृष्टि संपूर्ण । आणि प्रपंचाचें मिथ्या भान । दोन्ही जाण कारण यासी ॥ १४ ॥ तें वैराग्य दृढतर जालिया । सेवावें सद्गुरूचिया पायां । सद्गुरूनें कृपा केलीया । अभ्यास रघुराया पाहिजे ॥ १५ ॥ अगा निदिध्यासन करितां रघुपती । मन आणि वासना अति पीडिती । ह्मणोनि मनोनाश वासनांची शांति । सीतापती करावी गा ॥ १६ ॥ सद्गुरूनें तत्व उपदेशिलें । तें महावाक्यें दृढतर केलें । तेणें अपरोक्ष बाणलें । तरी जालें कार्य सर्व ॥ १७ ॥ तें न होवोनियां अयोध्यापती । असंभावना विपरीतभावना उठती । तरी श्रवणें मननें निदिध्यासनें शांति । करावी पुढती तयांचि ॥ १८ ॥ असंभावना द्विविध जाण । येकी ते प्रमाणासंभावना । दुसरी प्रमेयासंभावना । पूर्ण जाणा खुणा द्विविधाचि ॥ १९ ॥ येकी ते विपरीतकल्पना । ऐसिया त्रिविधा या असंभावना । ययालागीं करावें तिन्हीं साधनां । श्रवणमनननिदिध्यासा ॥ २० ॥ त्यांहीमाजी जें निदिध्यासन । तेथें येकाग्रता पाहिजे पूर्ण । करावें प्रपंचनिरसन । ब्रह्मानुसंधान अतिनेटें ॥ २१ ॥ तेणें मन आणि वासना । इयें दुष्ट गा रघुनंदना । आड येती स्वरू-पानुसंधाना । प्रपंचभाना प्रगट करीती ॥ २२ ॥ यालागीं मनोलय वासनाशांति । आधीं करावी गा त्रिदशपती । हाचि अभ्यासु ब्रह्मप्राप्ती । आन करिती तो श्रमुचि केवळ ॥ २३ ॥ अभ्यासांमाजी अभ्यास सार । मनोलय वासनासंहार । केलिया जीवन्मुक्तिप्रकार । यथोपचार प्राप्त होये ॥ २४ ॥ जीवन्मुक्तीची होआवया प्राप्ति । करावी मनोलय वासनाशांति । तेचि ते आतां रघुपती । सांगेन स्थिति तुजलागीं ॥ २५ ॥ अगा अपरोक्षज्ञानही जालिया । सर्वथा करावें मनोलया ।

---

१ तरावयाचा उपाय. २ पहाणें हाच दिवा. ३ ज्ञानाचें दान करण्यामध्यें. ४ नियमन ( ताब्यांत ठेवणें ) करण्यामुळें ५ अज्ञान. ६ दोष रूप ( विषय ) आहेत असें पाहणें ७ मनाचा नाश करणें. ८ प्रत्यक्ष. ९ लक्षांत येणें.

मग नव्हती सुखदुःखें तया। आप आंपणिया परिपूर्ण होये ॥ २६ ॥ मनोलयवासनाक्षयेंविण। ज्ञानियास सुखदुःखदर्शन। होतें ह्मणोन अवश्य जाण। दोहींचें पूर्ण भस्म करावें॥ २७ ॥ तेणें सप्तमी भूमिकापर्यंत। दशा होतसे तया प्राप्त। मग सुखदुःखें नेणे निश्चित। सर्वदा तृप्त ब्रह्मानंदें ॥ २८ ॥ सर्वदा परमानंदें तृप्ति। नाहीं विक्षेप प्रपंचप्रतीति। सर्वदा ब्रह्मानंदें डुल्लती। कैंची व्यक्ति सुखदुःखाची ॥ २९ ॥ ऐसें बोलतांचि वसिष्ठऋषि। रघुनाथ उल्हासे मानसीं मग ह्मणे सांगा स्वामी मजपासीं। जें बोलिलासी थोर साधन ॥ ३० ॥ तुह्मिया वचनामृतावांचून। न घडे अस्मादिकाचें सिंचन। तेणेंविण समाधान। नव्हे जाण कल्पांतीं ॥ ३१ ॥ तरी जें आतां पुढारलासी। तेंचि साधन सांग मजपासीं। तंव वसिष्ठ ह्मणती परियेसीं। सांगेन तुजपासीं रघुवर्या ॥ ॥ ३२ ॥ सप्तही भूमिकांचें लक्षण। तें जीवन्मुक्तप्रकरणीं जाण। सांगिजेल निरूपण। प्रस्तुत साधन परियेसीं ॥ ३३ ॥ आधीं मन तें किंलक्षण। त्याचा लयप्रकार तो कोण। हें तंव आधीं सांगेन। दुसरें जाण वासनानाशु ॥ ३४ ॥ प्रस्तुत यिये प्रकरणीं। मनोलय ऐकें कोदंडपाणी। जो जालया ब्रह्मसुख घणी। जनीं वनीं आपणचि ॥ ३५ ॥ तरी आधीं मनचि हें कोण। तें तुज सांगों गा संपूर्ण। मग क्षयोही सांगों नियमून। आयिक साधन श्रीरामचंद्रा ॥ ३६ ॥ आतां जें बोलत श्रीवसिष्ठगुरु। आणि श्रवण करी सर्वेश्वरु। तो आइकतां फावेल पाहुणेरु। अमृतयोगरु श्रोतयांसी ॥ ३७ ॥ तरी मनाची करूनि आराणुक। हा सुखसंवाद भोगा सम्यक। आजी श्रोतयांच्या भाग्यासि आगळिक। लाभाची देख लागली ॥ ३८ ॥ कां वसिष्ठरामाचा संवादु। प्राप्त जाला बरवा विशदु। तोचि भोगा पां स्वानंदु। अतिअगाधु श्रवणद्वारें ॥ ३९ ॥

व० उ० ॥ एषस्वभावाभिमतं स्वतः संकल्प्य धावति। चेतसा स्वयमम्लानस्तदेव मनआत्मनः ॥ १ ॥

तरी वसिष्ठ ह्मणती गा रघुपती। आयिक या मनाची स्वरूपस्थिति। मनचि कोण हें तुजप्रति। दावूं निगुती फोडूनियां ॥ ४० ॥ अगा आत्मयासि स्वभावाभिमत। जे जे कांहीं पदार्थजात। मूळ अज्ञानें रमणीय भासत। अतिप्रशस्त ग्राह्यबुद्धि ॥ ४१ ॥ मग आपुलिया मनेंकरुनी। स्वतां ग्राह्यत्वें संकल्पोनी। स्वयें धांवे ज्यामागें लागोनी। तेंचि निर्वाणि मनजाण ॥ ४२ ॥ आत्मा तरी म्लान नव्हे। आपण जैसा तैसाचि आहे। परी संकल्पोनि धांवताहे। तेंचि तें पाहें मन त्याचें ॥ ४३ ॥ आत्मयाच्या शेजारीं। राहोनि वस्तुमात्राचा संकल्प करी। तेंचि मन जाण सर्वोपरी। रावणारी जाण पां ॥ ४४ ॥

एतस्मात्सर्वगाद्देवात्सर्वशक्तेर्महात्मनः। विभागकलनाशक्तिर्लहरीवोत्थितांभसः ॥ २ ॥

या सर्वगता देवापासाव। जो कीं सर्वशक्तिमंत स्वयमेव। सर्व ज्ञाता ज्ञानभरीव। आदिदेव सर्वांचा जो ॥ ४५ ॥ त्यापासाव विभाग कलनाशक्ति। ह्मणिजे भेद कल्पित उठती। हा देह हीं इंद्रियें कल्पिती। प्राणापानादिव्यक्ति जेणें होती ॥ ४६ ॥ हें देह हें जगड्डाळ। हे घटपटादिपदार्थ सकळ। या विभागांची कलना प्रांजळ। करी तें निर्मळ मन जाण ॥ ४७ ॥ आत्मा निर्विकल्प नित्य शुद्ध। सर्वसाक्षी अतिप्रबुद्ध। तेथें नाहीं कल्पना भेद। हें निर्विवाद वोळखावें ॥ ४८ ॥ मग तयापासाव भेदसृष्टि। जे कीं निरंतर दृश्यत्वें उठी। तेंचि मन गा जगजेठी। स्वयें दृष्टी पाहें पां ॥ ४९ ॥ जैसे उदक तळीं निश्चळ। त्याच्याचि ठायीं लहरीं मेळ। उठी तैसा भेदकल्लोळ। आत्मा निर्मळ जैसा तैसा ॥ ५० ॥ ऐशा उदकापासाव जगजेठी। लहरी शक्ति कोण्ही उठी। अज्ञान येकत्वाची दृष्टी। विवेक पोटीं नाहीं ह्मणउनी ॥ ५१ ॥ तैसें पूर्ण मनाचें स्वरूप जाणावें। तऱ्ही आत्मस्वरूपी सर्व वोळखावें। तेथ भेदकलनाशक्ति स्वभावें। मन जाणावें जाणतेनी ॥ ५२ ॥ आत्मयाचें स्वरूप न कळे। तरी मन मनपणें जें वेगळें। तें तया कांहींच न कळे। येकत्रमेळें भासे ह्मणउनी ॥ ५३ ॥ शुभ्रआरक्तादिवस्त्रमेळा। तया हातें पाहतां आंधळा। काय वर्णू व्यक्ति दिसे डोळां। तैसी कळा जाण याची ॥ ५४ ॥ परी हेंची त्याचें लक्षण। आत्मा निश्चळ निर्विकल्प जाण। जेथें न स्फुरे द्वैतभान। तेंचि चिह्न आत्मस्वरूपाचें ॥ ५५ ॥ तेथूनि भेदशक्ति कोण्ही उठी। मुळीं अहं हें द्वैत जगजेठी। तेथूनि स्पष्ट होय सकळ सृष्टि। भासवी दृष्टी तेंचि मन ॥ ५६ ॥ मन संकल्पें विश्व भासे। मनविकल्पेंचि सर्वही नासे। हें आइकावें विश्वेशें। दृष्टांतविशेषें सांगेन ॥ ५७ ॥

---

१ स्थितिपर्यंत. २ नाशाची रीत ३ हे धनुर्धरा रामा. ४ आवडणारे. ५ प्रत्येक वस्तूचा. ६ आकलन करण्याची शक्ति. ७ ग्रहण, घेणें. ८ अनेक भेद. ९ निरनिराळे भेद ओळखण्याचें सामर्थ्य. १० पांढरीं तांबडीं वगैरे वस्त्रें.

अतः संकल्पसिद्धेयं संकल्पेनैव शाम्यति । येनैव जायते तेन वन्हि ज्वालेव वायुना ॥ ३ ॥

अगा या मनाचे संकल्पेंकरुनी । विश्वाभास भासे नयनीं । संकल्पमात्राची होये उमघणी । संकल्पें विरोनि जाय क्षणें ॥ ५८ ॥ जेणें कल्पिलें द्वैत होय जाये । तेंचि तें मन बोळखोनि राहें । हेंचि जना अपूर्व वाटताहे । येकेंचि होये प्रतीतिद्वय ॥ ५९ ॥ नाहो जेणें भासे विश्वाभास । तेणेंचि तयाचा कैसा नाश । या अभिनवा उत्तरास । सावकाश परिसिजे ॥ ६० ॥ तरी आइकायाचें उत्तर । जें कीं सांगिजेल सपरिकर । मनाच्या वृत्ति साचार । दोन्ही प्रकार परियेसीं ॥ ६१ ॥ येकी जाणा मळिन-वृत्ति । जे कीं करी द्वैतप्रतीति । विश्वाभासुचिये व्यक्ती । देहादि स्फुरती जियेचेनी ॥ ६२ ॥ ते मळिनवृत्ति उपजतां । द्वैत विश्वाभास भासे तत्वतां । तेचि शुद्धवृत्तिरूप ज्ञान होतां । सर्व भस्मांता जाय द्वैत ॥ ६३ ॥ दुसरी मनाची शुद्धवृति । जे कीं वृत्तिरूपें ज्ञान बोलती । तें उदय पावतांचि करी शांति । विश्वभ्रांति सकळिक ॥ ६४ ॥ ह्मणोनि मनोवृत्तीनेंचि विश्व आभासे । आणि मनोवृत्तीनेंचि सर्व नाशे । ह्मणोनि येक मनचि उल्हासे । जाण सर्वांशें द्वैताद्वैतीं ॥ ६५ ॥ अथवा संकल्पें रची विश्वपरंपरा । तेचि विकल्पें मोडी विश्वंभरा । यालागीं येक मनेंचि विश्वपसारा । भस्मसारा मनेंचि जाय ॥ ६६ ॥ जैसी वायूचेनि वन्हिज्वाळा जाली । आणि वायूचेनि अस्तातें पावली । तयापरी द्वैताद्वैतबोली । मनेंचि जाली परियेसा ॥ ६७ ॥ जैसा फुंकेंचि दीपु लागला । आणि तेणेंचि फुंकें तो मावळला । तैसा मनेंचि विश्वाभास भासला । मनेंचि जाला नाहीं ऐसा ॥ ६८ ॥

मनो मुधैवाभ्युदितं मनो देवानवेक्षणात् ॥ स्वप्ने स्वमरणाकारं प्रेक्ष्यमाणं न विद्यते ॥ ४ ॥

यालागीं मनचि द्वैताचें मूळ । मनेंचि हा संसार सकळ । ऐसें ही परी तें निर्मूळ । मन केवळ मिथ्या भ्रमु ॥ ६९ ॥ वृथाचि मन ऐसें नाम । वृथा मन हें मुख्य भ्रम । स्वस्वरूप अनवेक्षणचि काम । मन हें नाम वृथाचि भासे ॥ ७० ॥ मन हें वृथाचि उदया आलें । आत्मविस्मरणेंचि प्रगटलें । तेंही जालेपणेंचि नाथिलें । बाळका बोलें बागुल जैसा ॥ ७१ ॥ बागुल साच तरी नाहीं देखिला । ना येतां जातां नाहीं प्रत्यक्ष जाला । परी अर्भकें साच मानूनि तयाला । भयादिमेळा मृत्यूवरी ॥ ७२ ॥ बागुल यया बोलाचिसाठीं । साचपणें भयकंपेंसिच उठी । पळे लपे होय हिंपुटी । मरण शेवटीं पावतु ॥ ७३ ॥ तैसें मनचि हें वृथा नांव । हें तंव भ्रमाचेंचि सोलींव । स्वस्वरूप नेणतांचि स्वयमेव । मन ऐसा भाव उपजे देहीं ॥ ७४ ॥ स्वप्नामाजी ऐसें स्वमरण । देखे आपुलें आपण । पाहों जातां स्वयें जाण । आप आपण जीतुचि असे ॥ ७५ ॥ स्वप्नामाजी जैशी स्वमरणावस्था । तेणें मृत्यु पावे तत्वतां । देखे आपुलें दहन करितां । प्रबोधेंतां कांहींच नाहीं ॥ ७६ ॥ तैसें मन भ्रमें करीं मानी । मनें पावे संसारश्रेणि । सुखदुःखादि नानायोनि । पावे अनुदिनीं कल्पकोटी ॥ ७७ ॥ तेंचि मन विचारूनि पाहतां । स्वरूप न कळे ना नये हाता । विचारें आत्मप्राप्तिच तत्वतां । मन हें वृथा कल्पित ॥ ७८ ॥ ऐसें विचारें विचारितां । तंव आत्माचि येतसे हाता । तेचि मनाची येकाग्रता । नाशु तत्वतां यया नाम ॥७९॥ हेंचि मनाचें नाशन । विचारूनि कीजे संपूर्ण । इतर साधनें ते क्लेश जाण । प्राप्तिलक्षण तें न घडे ॥ ८० ॥

असम्यक्दर्शनं यस्मादनात्मन्यात्मभावनम् । यदवस्तुनि वस्तुत्वं तन्मनो विद्धि राघव ॥ ५ ॥ ✓

आणीकही आयिक रघुनाथा । या मनाची बोळखी तत्वतां । आयिकतांचि निश्चितता । बाणे सर्वथा परियेसीं ॥ ८१ ॥ अगा सम्यक् दर्शन तें ज्ञान । असम्यक् दर्शन तें अज्ञान । जेणें होये यथार्थ वस्तूचें दर्शन । तेंचि ज्ञान निश्चयेंसी ॥ ८२ ॥ आणि जें यथार्थ प्रकाशी । तें सम्यक् दर्शन परियेसीं । यथार्थानुभव प्रमा ऐसी । बोले नेमेंसि शास्त्रयुक्ति ॥ ८३ ॥ यथार्थ आणि अनुभवेंकरून । जेणें साक्षात् होये तेंचि विज्ञान । हेंचि शास्त्रें नेमिलें असे ज्ञान । अनुभवही पूर्ण ऐसाचि आहे ॥८४॥ अगा यथार्थ शब्देंकरून । अयथार्थाचें केलें निरसन । अयथार्थ ह्मणिजे मिथ्याभान । मृगांभ जाण शुक्तिरजतादि ॥ ८५ ॥ ऐसे नानास्वप्नादिभ्रम असती । ते ते अयथार्थ ह्मणातिजती । यथार्थें केली सर्वांची व्यावृत्ति । भिन्न गाति यथार्थेंचि ॥ ८६ ॥ आतां यथार्थ वस्तु तरी होये । परी देशांतरीं आहे । तिचें स्मरण करणें तेंचि स्मृति पाहे । अनुभव नोहे सर्वथा ॥ ८७ ॥ अनुभव नामें स्मृतिव्यतिरे-

---

१ जगाचें भान. २ दोन प्रकारचा अनुभव. ३ श्रमपूर्वक. ४ अनेक पदार्थांच्या रांगा. ५ अग्नीची ज्योत. ६ न पाहणें. ७ दुःखी. ८ आपण स्वतः ९ आपण मेलों अशी स्थिति. १० जागा झाल्यावर. ११ यथार्थ नाहीं असें.

कज्ञान । ह्मणऊनि अनुभवशब्देंकरून । स्मृतीचें केलें व्यावर्त्तन । तिह्नानि भिन्न ज्ञान तेंचि ॥ ८८ ॥ यथार्थ आणि स्मृतिव्यतिरिक्त । अनुभवसिद्ध प्रत्यक्षभूत । तेंचि ज्ञान ऐसें शास्त्रसिद्धांत । असती गर्जत बाहे उभारुनी ॥ ८९ ॥ आणि अयथार्थाचें रूप ऐसें । जें कीं अनात्मामात्र असे । त्यातें प्रकाशी तें सर्वांशें । तें असम्यक् ऐसें ज्ञान होये ॥ ९० ॥ तया असम्यक् ज्ञानास्तव । अनात्मा जो प्रपंच सर्व । देहादिक जे सर्वही भाव । जाण ते सर्व अनात्मा ॥ ९१ ॥ तया अनात्मयासि आत्मभावना । कीजे जेणें रघुनंदना । तेंचि मन गा जाण सर्वज्ञा । यथा खुणा सर्वत्र ॥ ९२ ॥ अगा देहादि अवस्तूच्या ठायीं । वस्तुबुद्धि जेणें होये पाहीं । तेंचि मन जाण पां निश्चयीं । आन कांहीं भासे जेणें ॥ ९३ ॥ यालागीं हें असम्यक् दर्शन । तेंचि तें निश्चयें जाण मन । केवळ भ्रमरूपचि पूर्ण । नाहीं आन रघुवर्या ॥ ९४ ॥ जे कीं अवस्तु शुक्ति रजत । माळा भुजंगपणें भासत । किरणीं मृगांभ दिसत । ते वस्तु जें जाणत तेंचि मन ॥ ९५ ॥ मुख्य अनात्मा तो देह जाण । त्यातें आत्मत्वें जाणे तेंचि मन । हेंचि मनाची वोळखण । जाण खूण सीतारमणा ॥ ९६ ॥ इत्यादि अवस्तुजातीं । वस्तुत्वें निश्चय करिती । तेंचि ते मनाची व्याप्ति । जाण रघुपती निश्चयेंसी ॥ ९७ ॥ आणीकही मनाचें लक्षण । सांगों श्रीरामा तुजलागून । जया युक्तीकरूनियां मन । वोळखसी पूर्ण सीताकांता ॥ ९८ ॥

अयं सोहमिदं तन्म एतावन्मात्रकं मनः । तदभावनमात्रेण 'विचारेण विलीयते' ॥ ६ ॥

अगा येकचि आत्मस्वरूप । मिथ्याचि रचिलें विकल्प । नानात्व आणोनि संकल्प । जेवीं सन्निपात जल्पा जल्पतु ॥ ९९ ॥ हा येकु तो येकु ह्मणत । मी येक आणि मज हें दिसत । ऐसें येकचि चतुर्धा विभागित । मन निश्चित एतावन्मात्र ॥ १०० ॥ इत्यादि भेदांतरें चित्त । सर्वदा भेदांतेंचि देखत । भेददर्शनें नानात्व जल्पत[४] । जाण निश्चित तेंचि मन ॥ १ ॥ इत्यादि विकारांचें अभावन । करितांचि विचारेंकरून । लय पावे सर्वथा मन । नाहींच जाण ऐसें होये ॥ २ ॥ केवळ अविचारेंचि जयाची स्थिति । विचारें जातसे भस्मांतीं । तेंचि मन गा त्रिदशपती । नाहीं व्यक्ति स्वतंत्र याची ॥ ३ ॥ मन सत्य ह्मणतां विचारें नासे । असत्य ह्मणतां प्रत्यक्ष दिसे । त्याविण जगभ्रम पिसें । कोठें असे विचारें पां ॥ ४ ॥ मन नसतां जग नाहीं । हे सुषुप्तिसमाधीसि प्रतीति पाहीं । मनचि जगदाभास सर्वही । असत्य तेही मनोलयें ॥ ५ ॥ मन नसतां ज्ञानादिसाधनें । कां प्रवर्त्तलियां असाधारणें । मनोजयासि वेद शास्त्रपुराणें । योगी साधनें योगादि करिती ॥ ६ ॥ घरोंघरीं कपाळ पिटिती । मन निश्चिळ नव्हे ह्मणती । मनोजयासि संन्यास घेती । तेही रडती मनचांचल्यें ॥ ७ ॥ मनें उत्पत्ति मनें स्थिति । मनें संहार मनें व्यवहारगति । ज्ञानाज्ञानाची प्रतीति । सकळही भ्रांति मनेंकरुनी ॥ ८ ॥ यालागीं मन नव्हे असत्य । ना तें घडे सदसत् । सत्य असत्य येकचि पदार्थ । नाहीं घडत सर्वथा ॥ ९ ॥ ना ह्मणावें सदसद्विलक्षण । तरी तेंचि तें अनिर्वाच्य जाण । इदं मिथ्यावचनेंकरून । साच तें मन अनिर्वाच्य ॥ ११० ॥ अनिर्वाच्य तें मिथ्याभूत । हा तंव वेदांतसिद्धांत[६] । आणि अनुभवासि हें येत । सर्व निश्चित जाणावें ॥ ११ ॥ अनिर्वाच्य तें विचारें नासे । ह्मणोनि तें मिथ्या भूत असे । हेंचि मनाचें स्वरूप ऐसें । रघुवंशें जाणावें ॥ १२ ॥

उपादेयानुपतनं हेयैकांतविसर्जनं । यदेतन्मनसो रूपं तद्बंधं विद्धि नेतरत् ॥ ७ ॥

अगा आणीकही मनाचें लक्षण । रघुनाथा येक सांगेन । जे कीं उपादेय पदार्थ जाण । तेथ पतन जयाचें ॥ १३ ॥ उपादेय जें विषयजात । अतिप्रियत्वें आवडत । तेथ तुरळेंचि जें जाण पडत । लतिउद्यत तेंचि मन ॥ १४ ॥ स्त्रियादिविषय देखे सुंदर । तरी तेणेंचि होये तदाकार । ते ध्यावया करी नानाप्रकार । विषयातुर विषयत्वें ॥ १५ ॥ हेय देखे जें सर्पादिक । तरी पावे भयकंपादि अनेक । कांहीं केलिया न प्रवर्त्ते देख । तेंचि सम्यक् मन जाण ॥ १६ ॥ हेंचि मनाचें स्वरूप जाण । जें अनुकूल विषयपदार्थी करी निर्वाण । स्वयें वेचे परी न सोडी संपूर्ण । मधुमक्षिका जाण जयापरी ॥ १७ ॥ कां शर्करेलागीं जेवीं मक्षिका । तैशीच जाण पिपीलिका । अर्ध तोडिलिया देखा । न सोडी कणिका शर्करेची ॥ १८ ॥ कां मशक गुंते शेंबुडीं । कांहीं केलिया तो त्यातें न सोडी । तैसें विषयीं देतसे बुडी । अतिगोडी मानुनी ॥ १९ ॥ त्याज्य पदार्थ देखे नयनीं । तरी प्राणुचि त्यागी भयेंकरुनी ।

१ खोट्या. २ अज्ञानरूपी पदार्थांत. ३ भरून राहणें. ४ बडबडतो. ५ निद्रेंत व समाधींत. ६ वेदांताचा सिद्धान्त. ७ त्याच रूपानें. ८ टाकण्यासारखें. ९ सूक्ष्ममाशी. १० मुंगी. ११ माशी.

तेंचि मन गा भरंवसेनी । कोदंडपाणी जाणिजे ॥ १२० ॥ हाचि संसारिकबंध । हाचि सर्व विंधीचा बाध । हाचि अनर्थाचा कंद । जगद्बंधू जाण तूं ॥ २१ ॥

मनो हि जगतां कर्तृ मनो हि पुरुषः स्मृतः । मनःकृतं कृतं लोके नशरीरकृतं कृतम् ॥ ८ ॥

अगा जयाचा कर्त्ता हें मन । मनेंचि जग भासे संपूर्ण । मनोनाशें जगभान । नाहींच जाण ऐसें होये ॥ २२ ॥ अगा मनोदयें उदय जगासी । ह्मणोनि जगाचें कर्तृत्व मनासी । आपुलेनि संकल्पें प्रपंचासी । निश्चयेंसि करितसे ॥ २३ ॥ मनें भाविलिया जग भासे । मनें न भावितां कांहींच न दिसे । यालागीं मन कर्त्ता ऐसें । बोलिलें असे जानकीकांता ॥ २४ ॥ मनेंचि होय जगप्रतीति । ऐशी पूर्वी वदलों उपपत्ति । तेचि ते पुढतपुढती । जाण रघुपती निश्चयें ॥ २५ ॥ मनेंचि पुरुष बोलिजे । पुरुषपण मनेंचि आणिजे । येऱ्हवीं पुरुष ना स्त्री सहजें । कांहीं न ह्मणिजे परब्रह्म तें ॥ २६ ॥ आणि मनेंचि पुरुष ह्मणणें । तेंहीं जाण येणेंचि लक्षणें । चित्त देऊनि रघुनंदनें । हें संपूर्ण परिसिजे ॥ २७ ॥ यथा मनामाजी प्रतिबिंबत । जें कीं चैतन्य बिंबभूत । तेणें परंपराध्यास निश्चित । त्यातें ह्मणिजेत पुरुषनाम ॥ २८ ॥ अंतःकरणीं प्रतिबिंबतां । चैतन्यांशु गा रघुनाथा । तयातें ह्मणिजे प्रमाता । पुरुष शब्दार्था स्वयें आला ॥ २९ ॥ अथवा पुरुषाचा उपाधि हें मन । ह्मणोनि पुरुष बोलती यालागून । मनेंचि कीजे तेंचि केलें जाण । येर तें स्वप्न केलें नव्हे ॥ १३० ॥ जैसें जागृतीसि मनें कीजे । तेणें केलेनि पापपुण्य निपजे । तेंचि स्वप्नीं मनेंविण जें निपजे । त्याचिया भुंजे फळासि कोण ॥ ३१ ॥ अगा स्वप्नीं जें घडे दुरित । त्यासि कोठें दिधलें प्रायश्चित्त । अथवा अन्नाशनें कोण तृप्त । जागृति प्राप्त जालया ॥ ३२ ॥ त्यालागीं मनें केलें तेंचि केलें । मन न करी तें नाहीं जालें । केवळ शरिरें जें कर्म उपजलें । तें नव्हे केलें सर्वथा ॥ ३३ ॥ यदर्थीं दृष्टांत सांगेन । मनें केलें तें कृत्य जाण । शरीरें नव्हे केलेपण । सर्वत्र खूण जाणावी ॥३४॥ मनपूर्वक सत्कर्म कीजे । त्याचिनामें केलें ह्मणिजे । मन नसतां जें जें निपजे । फोल सहजें विबुद्धनाथा ॥ ३५ ॥ केवळ शरिराचें केलें । तें केलें नव्हेचि जाण बोलें । जेणें कांतेतें आलिंगिलें । प्रीतीमेळें सर्वां अवयवीं ॥ ३६ ॥ त्याचि शरीरेंकरुनी । दुहिता आलिंगी प्रीतीकरुनी । तरी तो काय पडेल पतनीं । कोदंडपाणी सांग पां । ॥ ३७ ॥ कांता आलिंगनीं जैसें मन । तैसें कन्या आलिंगनीं पतन । शरीर आलिंगनीं समान । परी मन भिन्न दोन्ही ठायीं ॥ ३८ ॥ यालागीं शरिरें जें निपजलें । तें नव्हे गा कर्म केलें । मनें केलें तेंचि भलें । इहामुत्रफळें मनःकृत॥३९॥ मनेंचि अतिशयें पापपुण्य । परदाराभिलाषी जरी मन । तरी तया नरकीं पतन । शरीरेंगमन न करितांहीं ॥ १४० ॥ तेंचि मन जरी स्वस्वरूपीं लीन । जालया घडे अधर्माचरण । तरी तें शरीरकृत न करी पतन । नाहीं मन ह्मणऊनियां ॥ ४१ ॥ मनें स्वस्वरूप जाणिजे । अथवा सगुणरूप मनेंचि ध्यायिजे । तेणें पुण्यातिशय जो उपजे । तो तो न निपजे शरीरकृत ॥ ४२ ॥ मनें होय स्वरूपप्राप्ति । मनेंचि पाविजे परम शांति । येव्हडी या पुण्याची उन्नति । काय पावती शरीरें ॥ ४३ ॥ तैसेंचि मन देहातें आत्मा मानी । तरी ते देहबुद्धि घाली पतनीं । गेलिया कोटिकल्पांच्या श्रेणी । अधःपतनीं न सुटे ॥ ४४ ॥ मन जिये कर्मीं नसे । केवळ शरिरेंचि वर्तत असे । ते यागादि होतु भलतेसे । नाहीं विशेष फळ त्यांसी ॥ ४५ ॥ तीर्थव्रततपोदान । यजन याजन अध्ययन । संध्यास्नान देवतार्चन । सर्व मनेंविण निर्फळ ॥ ४६ ॥ यालागीं मनें कृत तेंचि कृत । शरीरकृत तें नव्हे निश्चित । जीवन्मुक्त देहेंकरीं समस्त । परी अलिप्त अमनस्कें ॥ ४७ ॥

चित्तं कारणमर्थानां तस्मिन्सति जगत्त्रयं ॥ तस्मिन्क्षीणे जगत्क्षीणं तच्चिकित्स्यं प्रयत्नतः ॥ ९ ॥

अगा या आठाश्लोकेंकरून । सांगितलें चित्ताचें लक्षण । आतां त्याचा नाशप्रयत्न । तुजलागून निरोपूं ॥ ४८ ॥ यालागीं गा रघुनाथा । चित्तचि कारण सर्वार्था । जगत्त्रय भासे चित्त असतां । चित्त नसतां जग कैंचें ॥ ४९ ॥ अगा जगाचें उत्पत्तिमरण । तें चित्ताच्या भावाभावें जाण । चित्तक्षीणें जग क्षीण । नाहीं आन दैत्यदळना ॥ १५० ॥ मनेंचि पदार्थजात स्फुरती । मनोलयें लय पावती। मनोनाशें सर्व नाशती । मनें उत्पत्ति सर्वांची ॥ ५१ ॥ यालागीं मनाची चिकित्सा । करावी गा त्रैलोक्याधीशा । जैशी रोगाची निर्विशेषा । कीजे चिकित्सा जयापरी ॥ ५२ ॥ विचारऔषधेंकरून । मन

---

१ देवाचा. २ हे जगीच्या बंधो रामा. ३ कल्पना केली तर. ४ एकापदार्थाच्या ठायीं दुसऱ्याची कल्पना. ५अढळा ६ अन्न खाण्यामुळें. ७ प्रत्यक्ष संग. ८ अनेक युगांचा काळ. ९ मनपणा नसल्यानें. १० असण्यानें अथवा नसण्यानें.

आमय निर्दळून । तुवां अतिमहालोन । भरंवसेनि चिकित्सिजे ॥ ५३ ॥ यासि वासनाबाहुल्यें मलिनता । निर्वासनेनें होये शुद्धता । ह्मणोनि वासनाक्षय तत्वतां । करावा सर्वथा रघुपुंगवा ॥ ५४ ॥

राम वासनया बद्धं मुक्तं निर्वासनं मनः ॥ तस्मान्निर्वासनीभावमाहराशु विवेकतः ॥ १० ॥

ऐकें रामा कमलनयना । मेघश्यामा चित्सुखैकघना । परापरम परिपूर्णा । रघुनंदना परियेसीं ॥५५॥ अगा मुख्य वासनेचिकरून । बद्धता पावतसे हें मन । मुक्त जाणावें निर्वासन । हेंचि खूण ययांची ॥ ५६ ॥ नाहो मनेंचि बद्ध आणि मुक्त । हें तंव भासतसे अयुक्त । जड अप्रकाश तें बद्ध होत । हें अनुचित अघटमान ॥ ५७ ॥ तरी येथील अभिप्रावो ऐसा । मनेंसि प्रमाता एकत्र वीरेशा । जाला-ह्मणोनि तया आभासा । विचार ऐसा बोळिजे ॥ ५८ ॥ जीवत्व सर्व मनाच्या माथां । मन तोचि जीव प्रमाता । येणें अभिप्रायें बोलतां । बंध तत्वतां असेचिना ॥ ५९ ॥ हा चैतन्याचा आभास । पडला चित्ताच्या ठायीं बहुवस । चित्त स्वच्छ सर्वेंद्रियांपरीस । ह्मणौनि चैतन्यांश विंबतु ॥ १६० ॥ ह्मणोनि मनाचे बहुतेंकरून । जीवासि होय बंधन । मन मुक्त निर्वासना जाण । तेंचि मुक्तपण जिवाचें ॥ ६१ ॥ अथवा जीवाच्या बंधमोक्षाप्रति । मुख्य मनचि कारण गा रघुपती । मनोबंधेंही जीवासि बंधप्राप्ति । मुक्तत्वें मुक्ति तत्वतां ॥ ६२ ॥ जैसें उदकाचेनि मळिणपणें । प्रतिबिंबेंहीं मळिण होणें । शुद्ध जळेंशुद्ध तेणें । सर्वदा असणें प्रतिबिंबें ॥६३॥ जळाच्या चांचल्यें चंचलता । जळाचेनि स्थैर्यें स्थैर्यता । जळप्रवाहें प्रवाहता । दिसे वाहतां प्रतिबिंब ॥ ६४ ॥ नाना दर्पणाचेनि दोषें । तितुकें प्रतिबिंबें भासती सावकाशें । राक्षस गुणा माजी कर्कशें । विश्वसदृशें प्रतिबिंब ॥ ६५ ॥ मनुष्य गुणें वर्तुळाकार । मुख दिसे महाथोर । देव गुणीं मनोहर । दिसे साचार जैसें तैसें ॥ ६६ ॥ दर्पणें वक्रपणें वक्रता । मळिणपणें मळिणता । आदर्शभाव विचारितां । दिसती वर्त्ततां प्रतिबिंबीं ॥ ६७ ॥ तैसा चैतन्यांश मनदर्पणीं । प्रतिबिंबला चित्तगुणीं । त्याच्या माळिणजडत्वादिलक्षणीं । स्वयें चित्तगुणीं विराजत ॥ ६८ ॥ मनमाळिणें मळिणता । मनःशुद्धत्वें शुद्धता । जे चित्तगुण तेचि प्रमाता । नाहीं अन्यथा भिन्न भाव ॥ ६९ ॥ जो मुख्य बिंबातें जाण । मुख्य बिंब तें मीच ह्मणे । तेव्हां चित्त भासे वेगळेपणें । मुक्त ह्मणणें तयासी ॥ १७० ॥ यालागीं चित्तगुणीं शोभत । चित्तशुद्धें शुद्ध होत । चित्तमळिणें मळिणयुक्त । ह्मणोन हे मात ऐसी आहे ॥ ७१ ॥ येऱ्हवीं जड अप्रकाशक मन । ययासि न घडे मोक्ष ना बंधन । हें बोलिलेती तें प्रमाण । परी भाव आन तोचि निरूपिला ॥ ७२ ॥ ययालागीं रघुपती । सवासने मना बंधप्राप्ति । निर्वासनेचि निर्मुक्ति । नाहीं विप्रतिपत्ति यया बोला ॥ ७३ ॥ ययालागीं गा त्रैलोक्यनाथा । तत्वविवेक करूनि सर्वथा निर्वासन करावें गा चित्ता । स्वयें मुक्तता साधावया ॥ ७४ ॥ सद्गुरुवाक्यें विवेकेंकरूनी । मन निर्वासन करीं धनुष्यपाणी । यया साधनांसि विलंब ह्मणी । येकक्षणि होऊं नेदी ॥ ७५ ॥ रघु-कुळटिळका हें मन । शीघ्र करावें गा निर्वासन । ययाचें नाम निदिध्यासन । जाण संपूर्ण आनंदमूर्ती ॥ ७६ ॥ अगा मनोवृत्ति विषयाकार । होती तोचि वासनाप्रकार । त्यांचा बाह्यचि होये संचार ॥ परी अंतर नेणती ॥ ७७ ॥ यया इंद्रियांची बाह्य प्रवृत्ति । हे अंतर कदापि नेणती । आणि अंतर्मुखही नव्हती । ते स्वयें करिजेती बलात्कारें ॥ ७८ ॥ जितुके अनात्मवर्ग असे । तितुका चित्तवृत्ति प्रकाशित असे । तरी वृत्ति नियमूनि मानसें । अंतर्मुख ऐसें करावें ॥ ७९ ॥ जितुकें विजातीय अनात्मा । तेथूनि चित्तवृत्ति उपरमा । नेऊनि सजातीय जो आत्मा । तोचि रामा अनुसंधावा ॥ १८० ॥ अगा अनात्मा तो मिथ्या असे । विचारमात्रेंचि नाशत असे । ह्मणोनि वृत्ति अनायासें । निघोनि बैसे आत्मरूपीं ॥ ८१ ॥ येणेंचि होवे निर्वासनता । मग चित्तपण कैंचें चित्ता । पावोनियां निजात्मता । होय तत्वतां परिपूर्ण ॥ ८२ ॥ अनात्मवर्ग सत्यत्वें न स्फुरे । चित्तवृत्ति स्वस्वरूपीं मुरे । तेचि मुक्तता निर्धारें । नाहीं दुसरें मेघश्यामा ॥ ८३ ॥

यथाभ्रलेखा शशिनं सुधालेपं मषी यथा ॥ दूषयत्येवमेवांतर्नरमाशापिशाचिका ॥ ११ ॥

अगा हे आशा मुख्य पिशाचिका । शुद्धासिच मैळ करी देखा । जैसी कां अभ्रांची रेखा । चंद्रासि देखा मैळ करी ॥ ८४ ॥ अथवा शुद्ध लेपातें मषि । करी आपणासदृश काळिमा ऐसी । तैसी आशाभूत हे नरासी । करी जैसी अमारजनी ॥ ८५ ॥ नसता अर्थ प्राप्त होण । प्राप्तही अर्थ अधिक कर

१ वासना नाहींशा झालेलें २ भ्रम ३ पुष्कळ काल पर्यंत. ४ कर्मेंद्रियें व ज्ञानेंद्रियें यांपेक्षां. ५ स्थिरपणानें. ६ आरशाचा संबंध. ७ मन जर दोषी असेल तर. ८ इच्छारहित. ९ आत्मा नव्हेत असे पदार्थ. १० लक्ष्य लावावें. ११ ढगाचें

न। इयें हांवे जें भरे मन। जाण हे खूण आशेचि ॥ ८६ ॥ हेंचि मुख्य विषयासक्ति। हेचि हे विक्षेपाची गति। हेचि मनाची मुख्य भ्रांति। आत्मस्थिति भ्रंशे जेणें ॥ ८७ ॥ येणें आत्मप्रकाशु लोपे। अतिशयें अज्ञान उद्दीपे। तेणें गडदचि पडे स्वस्वरूपें। अंतर न गुंपे विवेकासी ॥ ८८ ॥ धवळार मषी-माखिलें। शुद्ध वस्त्र कांटें कांटिलें। कां जळदें करूनि पांधुरविलें। अंवसेचें भलें निशीथ जैसें ॥ ८९ ॥ किंवा अंधारें सिनीवालीचे। वरी लेप दिजेती काजळाचे। तैसें आशेंकरूनि मन साचें। मैळे साचें परियेसीं ॥ १९० ॥ मन हें स्वयें तरी मिथ्याभूत। जैसा बाळा प्रति यक्ष सत्य। तैसें अंतरीं भेद भावित। वृथा दावित बडिवारुचि॥९१॥पाहतां सकळही मन येक। जें जें दिसे मिथ्या अनेक। शास्त्रही बोले सम्यक। श्रुति देख बोलतसे ॥ ९२ ॥ यद्विषयीं बृहदारण्यश्रुति। बोलिलीसे अंतिनिगुती। विस्तारें तुजप्रति। सांगेन ऐकें ॥ ९३ ॥

संमतिश्रुति ॥ ॥ कामः संकल्पो विचिकित्सा श्रद्धाऽश्रद्धा धृतिरधृतिर्ह्रीर्धीर्भीरित्येतत्सर्वं मन एवेति ॥

तरी सकळही येवढें वोडंबर। विरोनि जाये जेणें सत्वर। तो सांगों तुज प्रकार। मन स्थिर करीं आतां ॥ ९४ ॥

अंतर्मुखतया सर्वं चिद्वह्नौ त्रिजगत्तृणं। जुह्वतोंतर्निवर्त्तेत राम चित्तादिविभ्रमः ॥ १२ ॥

तरी हें मन अंतर्मुख करुनी। सर्व त्रिजगती हवीं चिद्वन्हीं। तरी चित्तादिविभ्रम अंतरोनी। जाती निवर्त्तोनि रघुपुंगवा ॥ ९५ ॥ आतां अंतर्मुख मन तें कैसें। तेंही सांगों सावकाशें। आधीं बहिर्मुख तें परियेसें। मग अनायासें जाणसी ॥ ९६ ॥ तरी सर्वदा विषयांचें अभिलाषण। सर्वदा देहादिपदार्थभान। सर्वदा सत्यत्वें दर्शन। हेंचि पूर्ण बहिर्मुखता ॥ ९७ ॥ जगीं मिथ्यत्वाभिदर्शन। आणि दोषदृष्टिनिवर्त्तन। सर्वदा ब्रह्माकारस्फुरण। अंतर्मुखता जाण मनाची ॥ ९८ ॥ अनात्मा तितुका दृश्यजात। हें तत्वतां जाणोनि बाधित। स्वरूपीं निमग्न चित्त। हेचि निश्चित अंतर्मुखता ॥ ९९ ॥ इये अंतर्मुखतेकरुनि। हें सर्व विश्व तृणप्राय भरंवसेनी। तेंही तृण हविजे चिद्वह्नीं। तरी भरंवसेनि चित्त कैंचें ॥ २०० ॥ तया पुरुषाच्या अंतरीं। ज्या ज्या चित्तभ्रमाच्या लहरि। त्या त्या निवर्त्तती क्षणाभीतरी। जाण असुरारी निश्चयेंसीं ॥ १ ॥ अंतरी चिद्वह्नि जाला प्रदीप्त। येथें चित्तादिभ्रम तृण समस्त। विरूढे कैसें जाण तेथ। होये भस्मांत वह्निस्पर्शें ॥ २ ॥ अगा तरुकोटरांतरगत। वह्नि असतां प्रदीप्त। तेथें तृण पेरितां अंकुरित। नव्हे निश्चित जयापरी ॥ ३ ॥ कां वडवानल पेटतां वनीं। तेथ अंकुर नुपजे पेरिलिया धान्यीं। तैसा चित्तादिभ्रम ब्रह्मज्ञानीं। जागृतिस्वप्नीं नुदेजे पैं ॥ ४ ॥ आणीकही उपाय सांगेन। जेणें चित्त होये विभ्रम पूर्ण। चित्तासवेंचि दृश्यमान। विरोनि जाण जातसे ॥ ५ ॥

यदा न भाव्यते किंचिद्धेयोपादेयरूपि यत्। स्थीयते सकलं त्यक्त्वा तदा चित्तं न जायते ॥ १३ ॥

तऱ्ही हेय उपादेय जे पदार्थ। ते कांहीं न भावावे यथार्थ। तेणेंचि विरे नुपजे चित्त। स्वयें उर्वरित सकळ त्यागें ॥ ६ ॥ तेव्हां न स्फुरे द्वैतभान। चित्त पावलें अचित्तपण। आतां द्वैत कल्पीत कवण। भस्मांत पूर्ण चित्त द्वैत ॥ ७ ॥ जेव्हां विश्व कल्पित तें मुदल जाये। तेव्हां विश्व कल्पितें कवण आहे। तेथें हेय उपादेय कवण काये। जरी होये रूपवंत ॥ ८ ॥ अगा कारण अज्ञान नाशलें। तत्कार्य मन कैंचें उरलें। मनासवें कल्पित गेलें। तेथ नुरे भलें ग्राह्याग्राह्य ॥ ९ ॥ आधीं कल्पितें मुदल जरी असे। तरीच अल्पित विश्व भासे। मग त्यामाजी ग्राह्य त्याज्य ऐसें। घेइजे मानसें शुभाशुभ ॥ २१० ॥ अगा अंतर्मुखतेकरुनी। न भावनचि होय निर्वाणीं। न भावितां जगडवाळ नयनीं। न देखे स्वप्नीं जागृतीसी ॥ ११ ॥ मुख्य चित्तचि मृत जालया। मग जगचि न स्फुरे गा रघुराया। मन हें असे अवस्थात्रया। तेव्हां क्षया जाईल ॥ १२ ॥ तरी तेंही सांगों तुजप्रति। येकाग्र ऐकें गा रघुपती। चित्त निमालिया हे त्रिजगती। विश्वभ्रांति न भासे ॥ १३ ॥

घोरं जाग्रन्मयं चित्तं शांतं स्वप्नं व्यवस्थितं। मूढं सुषुप्तिभावस्थं त्रिभिर्हीनं मृतं भवेत् ॥ १४ ॥

घोररूपेंकरूनि जागृतीसी। चित्त चपळ होये परियेसीं। व्यवहारांत ह्मणोनि तयासि। घोर ऐसी संज्ञा असे ॥ १४ ॥ आणि घोर हा रजोगुण। तद्रूपचि तें जालें मन। ह्मणोनि होतसे विश्व

१ चुनेगची वाडा. २ कांट्यावर घालून पाडिलें. ३ काळोख. ४ चद्र युक्त अमावास्येचे. ५ भिवविती. ६ यासंबंधानें. ७ स्पष्टपणानें. ८ पसारा. ९ होमकर. १० ज्ञानाग्नींत. ११ इच्छा. १२ बाहेरचे पदार्थमात्र पाहणें. १३ दिसणारा प्रत्येक पदार्थ.

भासत । जागृति जाण ह्मणिजे तिसी ॥ १५ ॥ स्वप्नीं मन शांत सत्वगुणें । तेथें परिणमे स्वप्नपणें । यालागीं शांत ह्मणणें । अतिमूढपणें सुषुप्तीसी ॥ १६ ॥ सुषुप्तीसि तमोगुणेंकरून । जडमूढता पावे हें मन । ययावेगळें तें मृतपण । जाण खुण रघुराया ॥ १७ ॥ तिन्ही अवस्था जेथ नाहीं । तेंचि स्वरूप तुर्य पाहीं । तिन्ही नसतां मनही । कैंचें काय स्फुरेल ॥ १८ ॥ बुद्धीचे जे तिन्ही गुण । सत्व आणि रज तम जाण । त्यांच्या वृत्ति जागृतीसुषुप्तिस्वप्न । जाण खूण विबुद्धनाथा ॥ १९ ॥ मन बुद्धि दोन्ही येकत्रपणें । तया मनचि ऐसें ह्मणणें । वृत्ति नाशलिया मनाचें नाशणें । नाहीं जिणें सर्वथा ॥ २२० ॥ मनाच्या तिन्ही गुणवृत्ति । तयां बोलिजे जागृति स्वप्नसुषुप्ति । वृत्तिरूपें मनाचीच व्यक्ति । हीनवृत्ति मनचि नसे ॥ २१ ॥ मनोवृत्ति त्याचि मन जाण । वृत्तिहीन तेंचि मृतपण । यालागीं अवस्थात्रयविहीन । केलिया मन मृत होये ॥ २२ ॥ मनाचेनि मृत्यें जग नाहीं । जग न भासे तुर्य पाहीं । तेंचि स्वरूपस्थिति सर्वही । आन नाहीं सीतारमणा ॥ २३ ॥

विलाप्य पंकं कतकं रजोंम्बु विलयं यथा । यथात्मनि तथा विद्धि विलाप्य विलयं मनः ॥ १५ ॥

अगा डहुळलिया जळा आंत । कतकरज जरी निक्षेपिजेत । तरी तें पंकातें करूनि अध्यस्त । स्वयें जळगत तळीं राहे ॥ २४ ॥ जेणें पंकें शुद्ध जळासि । डहूळ केलें स्वरजेंसी । कतकरजें भस्म पंकासी । आपणासि केलें रामा ॥ २५ ॥ प्रथम पंकरज ग्रासुनी । मग स्वयेंही लय जळस्थानीं । जळ तें स्वस्थ स्वरूपपणीं । असे निर्वाणीं अतिशुद्ध ॥ २६ ॥ तैसें प्रपंचाध्यासें ब्रह्मासी । सद्वितीयत्व आलें परियेसीं । ब्रह्मीं निक्षेपिलिया मनासी । तें घेऊनियां जगासि स्वयें शमेल ॥ २७ ॥ जळस्थानीं ब्रह्म निर्मळ । तेथें जगदाभास पंक डहूळ । यामाजी मन कतक प्रबळ । घालितां निर्मळ जैसें तैसें । ॥२८॥ जग द्वैत मनकल्पित असे । तेणें सद्वितीय ब्रह्म भासे । तें मन जें स्वरूपीं प्रवेशे । तेंच नाशे जग टवाळ ॥ २९ ॥ अगा जगटवाळासरिसें । स्वयें मन स्वरूपीं नाशे । तत्क्षणींच नाहीं ऐसें । अनायासें होये मन ॥ २३० ॥ मन विचारितां सबाह्याभ्यंतरीं । तरी सकळ ब्रह्मचि गा रावणारी । मनोदयें जग भरोवरी । ब्रह्म निर्धारीं नाहींच होये ॥ ३१ ॥ ह्मणऊनि मन तोचि संसार । मन तोचि बंध महाथोर । मनेंचि चंचळ हें शरीर । मनें मनोहर सर्वेंद्रियें ॥ ३२ ॥

चित्तं जानीहि संसारं बंधश्चित्तमुदाहृतं । पादपः पवनेनैव देहश्चित्तेन चाल्यते ॥ १६ ॥

जैसा पवनेंकरीं पादप चळे । पवनेंकरूनि सर्वही हाले । पवनेंविण सर्वदा न ढळे । कांहीं न चळे स्थिरपणें ॥ ३३ ॥ तैसा चित्तेंचि हा देह चळे । चित्तें इंद्रियां चेष्टविलें । चित्तेंचि हें सुखःदुख स्फुरलें । चित्त शमलें स्वरूपस्थिती ॥ ३४ ॥ यालागीं चित्त तेंचि संसार । चित्तचि हा बंध थोर । चित्तलयेंचि सुख अपार । निर्विकार होये स्थिरता ॥ ३५ ॥ यालागीं त्रिदशाधिपती । आधीं हें मन जिंकावें सर्वार्थीं । मनोजयें सुखसंपत्ति । ब्रह्मस्थिती सर्वदा ॥ ३६ ॥ मनोजयें स्वाराज्यप्राप्ति । मनोजयें ब्रह्मस्थिति । मनोजयें शमदम होती । साधनसमाप्ति मनोजयें ॥ ३७ ॥ मनोजयें ब्रह्मता सिद्ध । मनोजयें प्रपंचाचा बाध । मनोजयें ब्रह्मावबोध । जाये अबोध मनोजयीं ॥ ३८ ॥ मनोजयें सुखकोटी । मनोजयें स्वरूपीं भेटी । मनोजयें फल्गुप्राय सृष्टि । सरे द्वैत आटी मनोलयें ॥ ३९ ॥ मनोजयें सुखाचा सुकाळु । मनोजयें दुःखाचा दुकाळु । मनोजयें द्वैतासि काळु । आनंदकल्लोळु मनोजयें ॥ २४० ॥ मनोजयें संसृतिभंग । मनोजयें सदा अभंग । मनोजयें अव्यंग । परमभाग्य मनोजयें ॥ ४१ ॥ ह्मणोनि भलतेन भलते प्रकारें । मनोजय करावा अत्यादरें । तीर्थव्रतादिसाधनपुरें । कासया बारे वाहाती ॥ ४२ ॥ तीर्थव्रतादि तप दान । हें तंव संसृतीसिच कारण । मोचक मनोनिग्रह जाण । करिती सज्ञान सुखलब्धीसी ॥ ४३ ॥ प्रतीति स्वानुभव आपणापाशीं । करूनि पाहावें अहर्निशीं । साधनें प्रवर्तलीं सुखासी । परी दुःखासि नव्हती हेतु ॥ ४४ ॥ तीर्थाटनादिसाधन करितां । आजन्म श्रमु उपजे चित्ता । मनोलय क्षण मात्र करितां । सुखस्वरूपता प्राप्त होये ॥ ४५ ॥ हे दोन्ही अपणा आधीन असती । तेचि करूनि पाहावी संतीं । मन जेणें होये सुखप्राप्ति । तेंचि सर्वार्थीं साधावें ॥ ४६ ॥ जो सद्गुरूचा असेल अनुगृहीतु । तेणें सेवावा येकांतु । तेथें मनोजय यथोचितु । करावा वाक्योक्ति सद्गुरूचिया ॥ ४७ ॥ वायुधारणेकरूनि मनोजय । करणें तो सर्वथा जाण लय ।

---

१ परिणाम पावतें २ निद्रेंत. ३ भेलेलें ४ चवथें ५ गुणांचे प्रकार. ६ जागेपणा; स्वप्न, व नीज, या तीन अवस्था नाहींत असें. ७ वायूमुळें. ८ ब्रह्माचें ज्ञान ९ जन्ममृत्यूंस. १० उपदेश झालेला. ११ मन जिंकून टाकणें.

तेणें सिद्धि होती परब्रह्मोपाय । नव्हे अपाय तो याविहेतु ॥ ४८ ॥ परी तोहि ब्रह्मप्राप्ति फळेल । मध्यें तंव सिद्धि अंतराया होईल । निःकामें चिरकाळें होय फळ । करतळामळ जैसा स्फुट ॥ ४९ ॥ यालागीं ज्ञानविचारेंकरुनि । नेतिमुखें द्वैत निरसुनी । मनोलय परब्रह्मस्थानीं । आतेनिर्वाणीं करावा ॥ २५० ॥ अथवा स्वरूपाकारेंचि असणें । हेंचि सन्मुख होय देणें । विजातीय स्फुरे तें मी ह्मणे । विक्षेप मनें जाणाया ॥ ५१ ॥ या मनाचे पंचवीस वृत्ति दोष । ते स्फुरलिया विक्षेप विशेष । त्याचि-नामें सविशेष । बोलिजे सोस विक्षेपाचा ॥ ५२ ॥ त्या मनाचे दोष नेणती । आणि वृथाचि मना कोंडिती । कोंडिलिया पडे पुढती । नये व्यक्ति कोंडितियांसी ॥ ५३ ॥ प्रपंचाचा तळवट घेती । तळीं मनातें निक्षेपिती । तेथूनि तें उफळे पुडती । जळीं बुडविती दुधिया जैसा ॥ ५४ ॥ तो जंव तळीं दडपिती । तंव चळवळित राहे क्षण स्थिति । सोडितां उसाळे सबळगती । जळाही वरता धांव घेत ॥ ५५ ॥ ऐसेनि कोटिकल्प जात । परी मनोजय नव्हे निभ्रांत । लौकिकीं सेवी ये कांत । समाधिस्थ होतों ह्मणती ॥ ५६ ॥ परमार्थ तो लौकिक नव्हे । तो तों स्वहिताचलागीं केला आहे । सांडूनि लौकिक दंभ सोये । धरावे पाय सद्गुरूचे ॥ ५७ ॥ सद्गुरूचे दृढ सेविलिया चरण । सर्वांचाही जय होये जाण । नलगे दारुण आन संधान । स्वयेंचि श्रीकृष्ण बोलती ॥ ५८ ॥ सप्तमस्कं-धीं श्रीभागवतीं । पाहा पां सादरें हे संमति । कृष्णद्वैपायनाची उक्ति । भतिप्रीती अवधारीं ॥ ५९ ॥

। संमति श्लोक । । असंकल्पाज्जयेत्कामं क्रोधं कामविवर्जनात् । अर्थानर्थेक्षयालोभं भयं तत्त्वाभिमर्शनात् ।
आन्वीक्षिक्या शोकमोहौ दंभं महदुपासया । योगांतरायान्मौनेन हिंसां कायाद्यनीहया ।
कृपया भूतजं दुःखं दैवं जह्यात्समाधिना । आत्मजं योगवीर्येण निद्रां सत्त्वनिषेवया ।
रजस्तमश्च सत्त्वेन सत्त्वं चोपशमेन च । एतत्सर्वं गुरोर्भक्त्या पुरुषोह्यंजसा जयेत् ।
यस्य साक्षाद्भगवति ज्ञानदीपप्रदे गुरौ । मर्त्या सद्धीः श्रुतं तस्य सर्वं कुंजरशौचवत् ।

अगा संकल्प न करितां पाहीं । काम जिंकावा गा सर्वही । कामाचेनि जयें क्रोध ही । होये निश्चयीं जिंकिला ॥ २६० ॥ अर्थाचा ठाईं अनर्थदृष्टि । करितां होये अर्थलोभासि तुटी । तत्वाभिम-र्शनें भयकोटि । जाय सृष्टि पळोनियां ॥ ६१ ॥ आन्वीक्षिकीविवेकरुनी । शोक मोह जिंकीजेती भरंवसेनी । संतांचे सेवेकरुनी । दंभ निर्वाणीं भस्म कीजे ॥ ६२ ॥ लोकेंसि लौकिक बोलणें । योगियांसि अंतराय हेंच जाणणें । तें जिंकावें धरोनि मौनें । अनीहपणें हिंसा जिंकावी ॥ ६३ ॥ भूतापासाव दुःखें होती । कृपेकरूनि जिंकीजेती । दैवसंबधीं दुःखें भस्मांतीं । सर्वथा जाती समा-धीस्तव ॥ ६४ ॥ देहापासाव दुःखें होती । तीं योगसामर्थ्यें जिंकीजेती । सत्वसेवनें सर्वदा जागृति । निद्रा भस्मांतीं जाय तेणें ॥ ६५ ॥ रजतमगुण सत्वेंकरुनी । जिंकावे गा भरंवसेनी । सत्वगुणही उपशमउनी । लीन निर्वाणीं करावा ॥ ६६ ॥ परी इतुकेंही क्लेश न करितां । येकयेकाचें जयीं न लगतां । येकेचि काळें जय समस्तां । प्रयास नव्हतां होय तें सांगूं ॥ ६७ ॥ तरी भावें धरितां सद्गु-रुचरण । भक्तीनें करितां अनन्यभजन । सर्वांचा जय होये संपूर्ण । नाहीं आनुपाय येथं ॥ ६८ ॥ कांहीं न करितां क्लेशसाधन । अनायासें सर्वांचा जयो जाण । येक सेवितां सद्गुरुचरण । लाभ पूर्ण पूर्णत्वाचा ॥ ६९ ॥ अहो वास्तव तरी विचारितां । भजनीय कोण सद्गुरूपरता । जो कीं ज्ञानदीप प्रकाशिता । जीवा तारिता ब्रह्मपणें ॥ २७० ॥ साक्षात् सद्गुरु ब्रह्ममूर्ति । तोचि भजनीय गा सर्वार्थीं । तेथें असत्य बुद्धि करूनि मूढमती । अन्य पूजिती अन्योपायें ॥ ७१ ॥ सद्गुरूवेगळें देवतांतर । पूजणें जाण तो व्यभिचार । स्वपुरुष टाकूनि परनर । भजे गव्हार पुंश्चली जैसी ॥ ७२ ॥ सद्गुरूची कृपा तयासि । फळली नाहीं निश्चयेंसी । ययालागीं तो भक्तीसी । विमुख सर्वांशीं राम-चंद्रा ॥ ७३ ॥ तयाचें जें श्रुतजात । तें व्यर्थचि जालें गा समस्त । कुंजरशौच बोलिजेत । धुतला धूळ मागुतां ॥ ७४ ॥ तैसें जें जें तो पढिन्नला । श्रुत्यध्ययनाचा अभ्यासु केला । महावाक्याचा विचारमळा । व्यर्थ गमाविला गुरुभजनेंविण ॥ ७५ ॥ यालागीं सद्गुरूसि होऊनि शरण । येकांत भक्ती करावें भजन । तेणें सांगितले मार्गेंकरून । मन संपूर्ण जिंकावें ॥ ७६ ॥

॥ हस्तं हस्तेन संपीड्य दंतैर्दंतान्विचूर्ण्य च । अंगान्यंगैः समाक्रम्य जयेदिंद्रियशात्रवम् ॥ १७ ॥

---

१ अणिमादि सिद्धि (भागवत एका॰ १५ वें पहा) २ व्यासाची. ३ भाषण. ४ तत्वज्ञानानें. ५ गौतमकृत न्यायशास्त्र. ६ विघ्न. ७ शिनल स्त्री. ८ हत्तीचें स्नान.

वसिष्ठ ह्मणती गा रघुराया । आधीं जिंकावें गा मना यया । सर्व साधनांचे क्लेश सांडूनियां । करावें उपाया मनोजयाच्या ॥ ७७ ॥ अगा सर्वदां हेंचि करावें । अतिप्रयासें मनातें जिंकावें । स्थिर न राहे तरी दाटावें । येकत्र करावें बलात्कारें ॥ ७८ ॥ अगा हस्तें हस्त दडपोनी । नेटें चुरावे बळें-करुनी । दंतीं दंत रागें चाऊनी । नेटेंकरूनि जिंकावें ॥ ७९ ॥ क्रोधें दांत खावूनि रघुपती । मनातें जिंकावें सर्वार्थी । जैसा महाशूर रणाप्रति । करी विक्रांति शत्रुजया ॥ २८० ॥ आंगें आंगातें पीडुनी । आसन घाली चरण मोडुनी । परी आधीं जिंकावें भरंवसेनी । मन निर्वाणीं सीताकांता ॥ ८१ ॥ हें मन जिंकिलिया रघुवीरा । मोडे विश्वभ्रांतीचा पसारा । मग बुडोनि राहिजे सुखसागरा । नाहीं दरारा संसृतीचा ॥ ८२ ॥ अगा गुरुसंप्रदायेंविण । करितां मनाचें दमन । तें स्थिर नव्हे अधिकचि जाण । होये दारुण अतिचांचल्यें ॥ ८३ ॥ अगा या मनाच्या ज्या दोषवृत्ति । त्या निरोधिल्या निवृत्तिक स्थिति । त्या पंचधा बोलों तुजप्रति । जय ह्मणती मनाचा तो ॥ ८४ ॥ त्या वृत्ति जिंकिलिया नसतां । मनोजय केला ऐसें ह्मणतां । लाज मोठी गा रघुनाथा । त्यासि बोलतां कोण वारी ॥ ८५ ॥ मनाच्या वृत्ति वोळखोनी । मग जय करावा वृत्ति त्यजुनी । मग प्रयास न करितां भरंवसेनी । होय निर्वाणीं मनोजय ॥ ८६ ॥ तरी सद्गुरुमुखें वृत्तींचें ज्ञान । करूनि करावें नियमन । वृत्ति निरोधिल्या निवृत्तिक मन । होत जाय आपसया ॥ ८७ ॥ यया वृत्तीतें नोळखती । आणि मनोजय करूं इच्छिति । तेणें थोर श्रमु गा पावती । मनोजयाची प्राप्ति असेचिना ॥ ८८ ॥ त्या मनोवृत्ति कोणकोण । सांगेन तयांचें लक्षण । आइकें एकाग्र करूनि मन । मनोनियमन महाथोर ॥ ८९ ॥ अगा महाशूरातें मारितां । तो न मरे नानाउपाय करितां । बुद्धीनें करचरण तोडितां । मग तो सर्वथा निमेचि कीं ॥ २९० ॥ नाना सहस्रकरातें परशुधरु । युद्धीं देखूनि अनिवारु । मग सहस्रभुजा छेदूनि महावीरु । जय थोरु करी त्याचा ॥ ९१ ॥ नाना करचरण मोडिलियावरी । पांगूळ निश्चळ बैसे परवरीं । तो कांहीं केलिया न निघे बाहेरी । तैसी परी मनाची होये ॥ ९२ ॥ तैसे या मनाचे करचरण । त्याचि या पंचवृत्ति जाण । ययांतें नेमिलिया आपण । मना स्थिरपण स्वरूपीं ॥ ९३ ॥ मग कांहीं केलिया न ढळे । बाहेरी घातलेया न चळे । ब्रह्मींच राहे निश्चळें । नव्हे मेळ बाह्यवृत्ती ॥ ९४ ॥ तया पंचवृत्तिप्रकार । तुज सांगेन गा सविस्तर । तेणें बुझसी सर्वसार । मनोमार जेणें होये ॥ ९५ ॥ तरी प्रमाण विपर्यय विकल्प । हा वृत्तित्रय जाण दीप । निद्रा स्मृति हे संकल्प । पंचविध-रूप जाणावें ॥ ९६ ॥ आतां येकेकाचें लक्षण । तेंही तुजप्रति सांगेन । तेणें तूं बुझसी संपूर्ण । आइक चिन्ह सर्वोत्तमा ॥ ९७ ॥ प्रमाण तेंही षड्विधप्रकार । नितुकिया मनोवृत्ति साचार । तयांसि वोळखावें सविस्तर । आयिक सादर रघुनाथा ॥ ९८ ॥ प्रत्यक्ष अनुमान उपमान । शाब्द अर्थापत्ति अभाव जाण । हेंचि षड्विध प्रमाण । ऐक लक्षण ययाचें ॥ ९९ ॥ नेत्रीं घटपटादि भासती । श्रवणें शब्दाची प्रतीति । घ्राणें गंधत्वाची स्पर्शव्यक्ति । रसना रसवृत्ति प्रत्यक्षाची ॥ ३०० ॥ जें जें प्रत्यक्ष जाणिजे । तें प्रत्यक्ष-प्रमाण ह्मणिजे । अनुमानें अनुमान लक्षिजे । तेंहि परिसिजे लक्षण ॥ १ ॥ पर्वतीं धूम देखिला । तेणें अग्नि आहे ऐसा अनुमानिला । येणें न्यायें अनुमान केला । जाण श्यामला मदनमूर्ती ॥ २ ॥ आतां उपमान तें ऐसें । येके वस्तूसि साम्य देइजेत असे । 'गो सदृशो गवयः' ऐसें । हेंचि सर्वांशें उपमान ॥ ३ ॥ हा पुरुष सिंहाचि असे । कां मुख हें चंद्रासारिखें दिसे । येकासि येक उपमिजतसे । उपमान ऐसें या नाम ॥ ४ ॥ शाब्द तो जाण चौथें प्रमाण । शाब्दें अर्थ प्राप्त होत जाण । महावाक्यें जैसें ब्रह्म पूर्ण । देखिजे खूण गुरुमुखें ॥ ५ ॥ लौकिकशब्दें अर्थप्राप्ति । होये हे सर्वांसि प्रतीति । नदीतीरे पंच फलानि संति । होय प्राप्त आप्तवचनें ॥ ६ ॥ आतां अर्थापत्तीचें लक्षण । तें तंव एवंविध जाण । येकु दिवसा न करी भोजन । पुष्टपण सर्वांगा ॥ ७ ॥ तेथें निशिभोजनाची संभावना । कीजे ते अर्था-पत्ति जाणा । अभाव तो ऐसा रघुनंदना । राजीवलोचना परियेसीं ॥ ८ ॥ घट नाहीं जिये भूमिकेसी । तेचि तो घटाभाव परियेसीं । येणें न्यायें सर्वत्र ऐसी । अभावरूपासि जाणिजे ॥ ९ ॥ ऐसें षड्विध प्रमाण । ह्या तंव चित्तवृत्ति जाण । प्रथमवृत्ति ते षड्विध संपूर्ण । दुसरी पूर्ण विपर्ययता ॥ ३१० ॥ तरी शुक्तिकेचा ठाईं रजत । कां रश्मिजाळीं मृगांभ दिसत । रज्जुसर्पादिभ्रम समस्त । जाण निश्चयें विपर्यय तो ॥ ११ ॥ येके साच वस्तूच्या ठायीं । असत्य तें दुजें पाहीं । तोचि विपर्यय

१ कोंवळें. २ पराक्रम. ३ भ्रांति. ४ जन्ममरणांचा. ५ दोष असलेले प्रकार. ६ आपोआप. ७ मरतो. ८ कार्तवीर्याला. १००० हात होते अशी कथा आहे. ९ गोडी घेणें १० गवा हा बैलासारखा असतो. ११ उलटेपणा.

जाण सर्वेही । मनोवृत्ति तेही रघुनाथा ॥ १२ ॥ विकल्प तो असत्याचें स्मरण । वंध्यापुत्रादि व्योमसुमन । हेचि चित्तवृत्ति संपूर्ण । जाण खूण रघुपुंगवा ॥ १३ ॥ मुख्य विकल्प संशय जाण । हें होय कीं नव्हे संदेह पूर्ण । हेंचि विकल्पाचें लक्षण । जाण खूण रघुनाथा ॥ १४ ॥ चतुर्थ वृत्ति ते जाण निद्रा । वस्तु अवलंबूं न दे राजेंद्रा । स्वरूपस्थितीसि अभद्रा । भवसमुद्रा पाडित असे ॥ १५॥ पूर्वीं अनुभविला जो अर्थ । त्याचें स्मरण होय यथार्थ । ते स्मृति जाण पां यथातथ्य । हे निश्चित चित्तवृत्ति ॥ १६ ॥ हे पंचविधाचित्तवृत्ति । हेचि नियमावी गा सर्वार्थी । वृत्तिनियमनें अवृत्तिक-स्थिति । होये प्राप्ति मनोनिग्रहाची ॥ १७ ॥ जागृतिस्वप्नसुषुप्तीच्या पोटीं । यया पंचवृत्तींची होतसे आटी । अवस्थात्रय टाकितां नेटीं । होय भेटी साक्षियासी ॥ १८ ॥ साक्षीस्वरूप जाणतांचि खेवो । होय लयो मनादिदृश्याचा अभावो । यालागीं हाचि मुख्य उपावो । होय लयो मनाचा या ॥ १९ ॥ अगा येणेंचि मार्गेंकरुनी । आधीं मना नियमावें भरंवसेनी । हेचि मुख्य कोदंडपाणी । आन करणी तो सर्वही श्रमु ॥ ३२० ॥ आतां मनोजय करूं न शकति । लौकिकीं दंभु मिरविती । त्यांची श्रीव-सिष्ट निंदा करिती । ते श्लोकसंगति परिसिजे ॥ २१ ॥

चित्तमेकं न शक्नोति जेतुं स्वातंत्र्यवर्जितः । ध्यानवार्तां वदेन्मूढः स किं लोके न लज्जते ॥ १८ ॥

येक चित्तचि गा रघुनाथा । जे कीं कोंडूं न शकती सर्वथा । तयांची हरली स्वतंत्रता । आस-क्तता विषयांचेनी ॥ २२ ॥ विषयासक्तीनें स्वतंत्र आपण । आणि हरितले त्यांचें ज्ञातेपण । मनें बोलतां दंभेंकरून । आह्मी करूं ध्यान सर्वदा ॥ २३ ॥ ऐसेही ध्यानेंवार्त्ता बोलती । हें तंव आश्चर्य थोर गति । मूर्ख ते बोलतां न लज्जती । ऐसी गति या लोकांची ॥ २४ ॥ हा प्रयत्न तो पुरुषा आधीन । स्वचित्त करावें स्वाधीन । तें नव्हे विषयासक्तीन । वार्त्ता श्लाघोन ध्यानाची करिती ॥ २५ ॥ नाहो विषयासक्ति कां होय तयांसी । आणि आदरु कां नुपजे अभ्यासीं । केलाही अभ्यासु कां तयांसी । नेदी फळासि तें सांगिजे ॥ २६ ॥ तरी अवैराग्यें विषयासक्ति । अनादरें अभ्यासु न करिती । अभ्यासें नव्हे फळप्राप्ति । निरंतर नाहीं प्रीति ह्मणोनियां ॥ २७ ॥ हें न करोनियां रघुपती । दंभेंचि ध्यानवार्त्ता बोलती । आह्मी ध्यानस्थ होतों ह्मणती । परी न करिती प्रयत्न कांहीं ॥ २८ ॥ अगा मनोजय करा-वया । तीन साधनें पाहिजेती गा रघुराया । वैराग्य आदर आणि नैरंतर्या । पाहिजेती साह्या प्रकार तिन्हीं ॥ २९ ॥ अगा वैराग्यें विषयासक्ति नव्हे । विषयासक्ति नसतां विक्षेप न होये । आदरें अभ्यासीं उदासता नये । यालागीं होये मुख्य अभ्यासु ॥ ३३० ॥ आदरें अभ्यासुही करी । परी तो निरंतर न करी । दोचौमांसाआड आदर न धरी । तेणें नव्हे साध्य प्राप्त ॥ ३१ ॥ यालागीं साधनत्रय असावें । अखंड अभ्यासीं मन घालावें । क्षण येक चित्तानुसारिखें वर्त्तावें । सवेंचि मोहरावें आत्मा मोहरा ॥ ३२ ॥ जैसा कां खळ अश्वजाति । सर्वथा न धरी मार्गु सुमजाति । अश्वधारकु तयाप्रति । ऐसी युक्तिप्रयुक्ति करी ३३ ॥ मार्गानुसार ने तयासी । नृत्यादि त्याकरवीं अभ्यासीं । अडल्या क्षण येक त्याच्या मार्गासी । अनुसरे क्रेशीं तदनुसार ॥ ३४ ॥ सवेंचि नेमीं स्वप्रवृत्तीसी । परी उमासु घेवों नेदी तयासी । ऐसा हळूहळू अतिप्रयासीं । स्वायत्त तयासि करितसे ॥ ३५ ॥ तैसा या मन-प्रज्ञावंता । निरंतर अभ्यासींच घालितां । क्षणें तदनुसारही चालतां । सवेंची वळितां निज अभ्यासीं ॥ ३६ ॥ ऐसें वैराग्यादि तिन्ही गुणीं । अभ्यासु केला गा अनुदिनीं । तेणें चित्त भरंवसेनी । होय लीन तत्क्षणीं दितिजशत्रो ॥ ३७ ॥

एक एव मनो देवो ज्ञेयः सर्वार्थसिद्धिदः ॥ अन्यत्र विफलः क्लेशः सर्वेषां तज्जयं विना ॥ १९ ॥

सर्वांसही तमारिवंशप्रदीपा । हा मनोजयमार्गु गा सोपा । परी न करिती हें आश्चर्य बापा । थोर पापाचें हें फळ ॥ ३८ ॥ अगा सर्वही क्लेश त्यजुनी । येक मनोजय करावा कार्मुकपाणी । न करावें विफल क्लेशालागुनी । सुखसमाधानीं मनोजय ॥ ३९ ॥ सर्व साधनांचें निराकारण । 'एव' कारें क्लेशाचें परिहरण । करूनि मनोदेवोचि ज्ञेयत्वें जाण । सर्वसंपन्न सिद्धिहेतु ॥ ३४० ॥ नाहो मनोदेवो कां ह्मणितलें । देवत्व यासि कायसेनि आलें । तरी तेंही सांगों येथ्या बोलें । जेणें केले पदार्थही पैं ॥ ४१ ॥ अगा सर्वां जो प्रकाशी तयासी । देवो ह्मणती हृषीकेशी । प्रत्यक् वृत्तीनें परि-

१ वांझेचा पोर, आकाशाचें फूल, सशाचें शिंग वगैरे. २ पांच प्रकारचें मन. ३ निर्विकार. ४ इतर. ५ ध्यानाची गोष्ट. ६ एकसारखा अभ्यास. ७ दोनचार महिने टाकून. ८ किंचित् मागें फिरावें. ९ विश्रांति. १० ताब्यांत आलेला.

येसीं। सर्व प्रकाशी अंतरपणें ॥ ४२ ॥ वृत्तिरूप ह्मणती जें ज्ञान। तें प्रकाशत्वें प्रकाशमान। देव ह्मणती यालागून। आणीक चिन्ह परियेसीं ॥ ४३ ॥ सकळ इंद्रियांच्या वृत्ति। मनास बाह्य प्रकाशा करिती। यालागीं मन हा देवो ह्मणती। लक्ष्मीपती परियेसीं ॥ ४४ ॥ ऐसेंच येकादशीं उद्धवासी। स्वयें सांगे हृषीकेशी। भयंकर देवदेवो ह्मणती मनासी। दुर्जय योगियांसि ह्मणोनियां ॥ ४५ ॥.

**संमतिश्लोक**। मनोवशेऽन्ये ह्यभवंस्म देवा मनश्च नान्यस्य वशं समेति ॥
भीष्मो हि देवः सहसः सहीयान् युज्याद्वशे तं स हि देवदेवः ॥

**संमतिश्रुति** ॥ ॥ मनसो वशे सर्वमिदं बभूव नान्यस्य वशे मनो वशमन्वेति ॥ भीष्मो हि देवः सहसः सहीयानिति ॥

असो या मनातें ज्ञेय करावें। ज्यासि जाणणें तेंचि नियमावें। नियमनें तेंचि जाणावें। ज्ञेयत्व ह्मणावें हेंचि वर्म ॥ ४६ ॥ तो येक मनोजय केलिया। सर्व सिद्धि होती आपैसया। अन्यत्र साधनें केलिया। जयो न करी तया विफळक्लेश ॥ ४७ ॥ अगा मनोजयेंविण जाण। सवे व्यर्थचि होय साधन। येकें मनोजयें सर्व संपूर्ण। समाधान हृतुकेशी ॥ ४८ ॥ तया मनोजयाची उपायसंपत्ति। सांगेन तुज जनकजापति। येकाग्र करूनि चित्तवृत्ति। महामती परियेसी ॥ ४९ ॥

अनुद्वेगः श्रियो मूलमनुद्वेगात्प्रवर्त्तते ॥ जंतोर्मनोजयादन्यत्त्रैलोक्यविजयस्तृणम् ॥ २० ॥

अगा मनाचा जो अनुद्योग। जो कीं व्यवहारशून्य[1]ांग। कामत्यागमात्र निःसंग। तो अनुद्योगभाग जाणावा ॥ ३५० ॥ मनीं संकल्पमात्र तुटी। सर्व कार्यजात जेथें आटी। त्या नाम अनुद्वेग गा जगजेठी। थोर सृष्टी थोर येकु ॥ ३५१ ॥ जग बाधित देखिलया। अनुद्वेग उपजे आपसया। मृगांभाच्या[4] प्राप्ती उपाया। ज्ञाता काय तया प्रवर्त्ते ॥ ३५२ ॥ तोचि तो मोक्षलक्ष्मीसि मूळ। तेणेंचि मोक्षलक्ष्मी प्रबळ। अनुद्वेगेंचि सकळ। प्राप्त फळ अनुद्वेगाचें ॥ ५३ ॥ सर्व कार्यांचा अनुद्वेग करणें। तेणेंचि अनुद्योगाचें होणें। यालागीं अनुद्योगेंचि असणें। उद्वेग टाकणें सर्वथा ॥ ५४ ॥ सर्वदा अनुद्वेगपणें। तेंचि गा मनातें जिंकणें। मनोजया सर्व साधनें। आत्मा साक्षात् करणें मनातें या ॥ ५५ ॥ यया प्राणियांसि गा रघुनाथा। मनोजयो लाभ सर्वथा। मनोजयावेगळें तत्वतां। त्रैलोक्य ताता तृणप्राय ॥ ५६ ॥ अगा मनोजयापरतें। त्रैलोक्य जिंकिलें तृणासमान तें। यालागीं जिंकणें सर्व सामर्थ्यें। यया मनातें रघुवर्या ॥ ५७ ॥ अगा शूरांमाजी तो महशूर। जो येकलें मन जिंकी सत्वर। देहादि करी सर्व संहार। तो अखंड नर शूरपणें ॥ ५८ ॥ अगा मनापुढें शूरनायका। त्रैलोक्याचा कोण लेखा। विश्व तें तृणतुल्य विश्वतोमुखा। नाहीं लेखा मनापुढें ॥ ५९ ॥ अगा अतिशूर जो असेल। तो त्रैलोक्य तत्काळ जिंकील। परी मन जिंको तो विरळ, न भेटे भूतल भेदिलिया ॥ ३६० ॥ मन जिंकिल्या त्रैलोक्य जिंकिलें। मन जिंकिल्या सर्वही केलें। मन जिंकिल्या आत्मत्व साधिलें। सुख लाधलें ब्रह्मानंदें ॥ ६१ ॥ अगा त्रैलोक्य हें मनाच्या पोटीं। मन जिंकिल्या जयो सृष्टि। सृष्टि जिंकिल्या कोणेंसि भेटि। सांगें जगजेठी पुरुषार्थ काये ॥ ६२ ॥ यालागीं मन जेणें जिंकावें। तया त्रैलोक्य ऑपैतें स्वभावें। तरी मनोजयाच्या उपायें गौरवें। सांगेन तें राघवें परिसिजे ॥ ६३ ॥

सत्संगो वासनात्यागः स्वात्मविद्याविचारणा। प्राणस्पंदनिरोधाश्चेत्युपायाश्चेतसो जये २१ ॥

अगा चित्तजयोकरणाच्या ठाईं। हे उपाय बोलिले पाहीं। येकें पक्षें जाण पंचकही। विचारणा हेही पर केलिया ॥ ६४ ॥ अतिनिकट तत्काल फळते। तेचि उपाय सांगेन तूतें। येकाग्र येकिजे रघुनाथें। चित्त जयातें पात्रे जेथें ॥ ६५ ॥ तरी प्रथम उपाय महाथोर। जो कीं उपायांचें सर्व सार। तो साधुसंग गा उदार। मनोमार जेणें होये ॥ ६६ ॥ अगा सर्व संगाचें अपोहन। होय येकें साधुसंगेंकरून। मनोजय आपआपण। होय क्षण न लगतां ॥ ६७ ॥ मनाचा अहंकारेंसि संग। मन आवरिल्या असंग। मनें सर्वदा वासनाप्रसंग। मनें अभंग देहबुद्धि ॥ ६८ ॥ मनें पुत्रवित्तादिकांची गोडी। मनें द्रव्यदारांची आसक्ति फुंडी। मन पाडी भवआगडीं। संसारबेडी मनेंचि केली ॥ ६९ ॥ देहेंद्रियांचा संगु। मनें वाढे संसाररोगु। तो सत्संगें होय वियोगु। निश्चय अभंग आत्मतत्वीं ॥ ३७० ॥ सत्संगेंकरीं त्रैलोक्यनाथा। सर्व संग नाशती गा तत्वतां। सत्संगें वासनात्यागु सर्वथा। होये निजात्मता सत्संगें ॥ ७१ ॥ अगा सत्संगापरतें कांहीं। या त्रैलोक्यांत बरवें नाहीं। सत्संगें लाभे सर्वही।

---

१ अकराव्या स्कंधांत. २ आपेआप. ३ रिकामें असणें. ४ मृगजळाच्या. ५ पाङ्, प्रतिष्ठा. ६ हे सर्व व्यापका. ७ आइते. ८ मनाचा नाश. ९ त्याम. १० मोठी. ११ संसाररूप कोंडवाड्यांत.

मनोजय कायी तयापुढें ॥ ७२ ॥ मनादिप्रपंचभ्रम जेणें होये । तें अज्ञान सत्संगें पळोनि जाये । सत्संगें देहबुद्धि कैंची राहे । सत्संगें होय निजात्मलाभ ॥७३॥ सत्संगें खळाचें खळपण मोडे । सत्संगें देहबुद्धि तत्काळ विघडे । सत्संगें सर्व संसार बुडे । सत्संगें घडफुडें ब्रह्मज्ञान ॥ ७४ ॥ सत्संगें सत्कर्मादि अनुष्ठान । सत्संगें जपादिसाधन । सत्संगें बाणे वैराग्य पूर्ण । पावे खूण आत्मयाची ॥ ७५ ॥ ह्मणोनि येकें सत्संगेंकरून । मनाचें होये भस्म पूर्ण । यालागीं करावें साधुसेवन । पदरजवंदन साधूचें ॥ ७६ ॥ अगा संताचे चरणींची धुळी । तेणें करितांचि आंघोळी । नुरे अज्ञानाची काजळी । मन मनमेळीं उरे कैचें ॥ ७७ ॥ ह्मणोनि साधनांमाजी साधन । सत्संग साधनशिरोरत्न । याहूनि कोटि न चढे गा जाण । तूंही सज्ञान जाणसी ॥ ७८ ॥ दुसरें साधन वासनात्याग । ज्या ज्या चित्तवृत्ति उठती अभंग । त्याचि वासना हें जाण पां सांग । रूप अव्यंग वासनांचें॥७९॥ मना पासाव जे जे वृत्ति उठी । तयाची मूळींच करावी आटी । साक्षित्वाच्या अंगा नेहटीं । दृश्य पोटीं घालूनियां॥३८०॥ जो जो संकल्प विषयाकार । उठे घेऊनि वासनांकुर । तो तो करावा निर्विकार । पदार्थाकार होऊं नेदीं ॥ ८१ ॥ स्वरूपावेगळें अनात्मजात । जें जें दृश्यत्वें स्फुरत । तें स्फुरणचि चैतन्यार्थ । करीं निश्चित प्रत्यक् वृत्ति ॥८२॥ यातेंचि जाणावें वासनात्याग । जाण श्रीरामा अव्यंग । नानाभेदें वासनाचि सांग । जाण अभंग रघुराया ॥ ८३ ॥ तिसरें साधन विचारणा । जे कीं आत्मविद्या बोलिजे जाणा । तेणें उरी नुरे मनपणा । भस्म पूर्ण स्वयें होये ॥ ८४ ॥ अथवा विचारणा ते ऐसी । आत्मानात्म विवेक परियेसीं । तेणें मनोजय निश्चयेंसी । सर्वस्वेंसि होय रामा ॥ ८५ ॥ अगा आत्मविद्या तें ज्ञान । मनादिलयाचें कारण । आत्मज्ञानें सर्व संपन्न । नाहीं न्यून कोण्हेविषईं ॥८६॥ अथवा श्रवण मनन निदिध्यासन । जें कीं आत्मविद्येचें मुख्य साधन । तें करितां मनाचें भस्म होय पूर्ण । जाण ती खूण अनुभविजे ॥ ८७ ॥ आणि प्राणस्पंदाचें निरोधन । हेंही येक मनोजयाचें कारण । जो कीं प्राणायाम निर्वाण । वायुधारण जेणें होये ॥ ८८ ॥ पवननिरोधें मनोजय होये । कां मनोजयें प्राण जयो होताहे । परस्परें हा निश्चय आहे । यालागीं पाहें साधुनी ॥ ८९ ॥ आणि याचा अनुक्रम गा रघुपती । साधुसंगें वासना तुटती । वासनाक्षयें ज्ञानप्राप्ति । विचाराअंतीं जे होये ॥ ३९० ॥ प्राणस्पंदनिरोध करूनी । मनोजय होय भरंवसेनी । ययालागीं याही साधनीं । होय निर्वाणीं मनोजय ॥ ९१ ॥ मनोजय जालिया रघुपती । तेचि पूर्णता गा सर्वार्थीं । पूर्णपणें मोक्षसंपत्ति । होये त्रिजगती सुखरूप ॥ ९२ ॥

पूर्णे मनसि संपूर्णं जगत्सर्वं सुधाद्रवैः । उपानद्गूढपादस्य ननु चर्मास्तृतैव भूः ॥ २२ ॥

ब्रह्माकार होतांचि मन । त्याचें नाम पूर्णपण । पूर्ण मन असतांचि जाण । जग संपूर्ण ब्रह्मत्वें ॥ ९३ ॥ मग ज्ञानामृत गा महावीरा । द्रवों लागे इंद्रियद्वारा । मग मन विषय विश्वपसारा । ब्रह्मेंसि दुसरा भासेना ॥ ९४ ॥ दुसरें न भासे ब्रह्मेंविण । त्याचेंचि नाम परिपूर्ण । मग त्रिजगती त्या सुखसंपन्न । आपणाविण न देखे दुजें ॥ ९५ ॥ अगा उपानहें गूढचरण । तया पृथ्वीप्रति चर्मास्तरण । चर्ममयचि धरा जाण । नाहीं वणवण जळजळेंची ॥ ९६ ॥ अगा मोक्ष आणि बंधन । हे दोन्ही आपणाचि आधीन । विपरीत संकल्पें बंधन जाण । सुपरीतें विमोचन स्वतःसिद्ध ॥ ९७ ॥ तेंही सांगेन तुजप्रति । आइकें मैथिलेश्वरदुहितापती । वैकुंठाधीशा विश्वतोमूर्ती । सुखसंवित्ति सुखरूप ॥ ९८ ॥

नाहं ब्रह्मेति संकल्पात्सुदृढं बद्ध्यते मनः । सर्वं ब्रह्मेति संकल्पात्सुदृढं मुच्यते मनः ॥ २३ ॥

मी ब्रह्म नव्हे या दृढ संकल्पें । मन बंधन पावे येणेंचि अल्पें । मन उपलक्षणें प्रमातांचि जल्पे । निरूपण सोपें केलें मागें ॥ ९९ ॥ ह्मणोनि मी ब्रह्म नव्हेचि कल्पितां । भवबंधु पावे गा सर्वथा । आणि मीच ब्रह्म सुदृढ जाणतां । स्वयें मुक्तता वरी त्यातें ॥ ४०० ॥ सर्वब्रह्म ऐसें सुदृढज्ञानें । तत्काळ मुक्ति होइजे मनें । ह्मणोनि दृढताचि सर्वज्ञें । साधावी येणें प्रकारेंकरुनी ॥ १ ॥ सर्वशब्दें विश्व बोलिजे । जें जें दृश्याकारें देखिजे । तें सर्वही ब्रह्मचि जाणिजे । श्रुतीनें बोलिजे स्वतःसिद्ध ॥२॥ 'इदं सर्वं यदयमात्मा' ऐसें । 'सर्वं खल्विदं ब्रह्म' ऐसें । प्रत्यक्ष श्रुति बोलतसे । अनुभव वसे ऐसाचि ॥ ३ ॥ जैसें सर्पचि रज्जु ह्मणतां । बाधु काय पावे गा रघुनाथा । वास्तव आदिमध्य असतां । रज्जुचि पाहतां रज्जुपणें ॥ ४ ॥ यश्चोरः सस्स्थाणुरेव ऐसें । ह्मणतां तो स्थाणुचि असे । चोर भासला

---

१ सर्व साधनांहून श्रेष्ठसाधन. २ परिपूर्ण. ३ नेटानें. ४ प्राणांचें चलनवलन. ५ वायु कोंडविल्यानें. ६ प्राणायाम केल्यानें. ७ वाहणा घातलेला. ८ चर्मिड्याचें हांतरूण. ९ हे सीतापते रामा १० ज्ञानीपुरुष. ११ 'जो आत्मा तोच हें सर्व होय'.

ह्मणोनि उच्चारतसे । येऱ्हवीं वसे स्थाणुचि स्थाणु ॥ ५ ॥ तैसें पूर्वी भ्रमेंकरुनी । विश्व भासलें ब्रह्मस्थानीं । यालागीं बुझावया त्याचे वचनीं । श्रुति परामर्षणीं प्रवर्त्तली ॥ ६ ॥ विश्वाचा परामर्ष करून । इदंकारें विश्व दाऊन । ब्रह्मचि दावी निर्वाण । तेंचि प्रमाण श्रुतिवाक्य ॥ ७ ॥ तोचि अनुभव विपश्चितासी । तेंचि विचारें पाहतां मानसीं । हेंचि कारण बंधमोक्षासी । हृषीकेशी जाण तूं ॥ ८ ॥ यथार्थ जैसें आहे तैसें देखणें । हेंचि मोक्षाचें कारण । विपरीत विश्वपणें जाणणें । बंधन मनें तेंचि पाविजे ॥ ९ ॥ अगा आपण तें यथातथ्यें । ब्रह्म जाणणें यथार्थें । तेंचि मुक्ति वरी त्यातें । तयापरतें दुजें नाहीं ॥ ४१० ॥ तोचि देहाद्याकारेंकरुनी । देहादिइंद्रियसमुदाय आपणा मानी । तोचि बंधन तेचि सर्वस्वें हानि । संसारश्रेणि उत्तरोत्तर ॥ ११ ॥ यालागीं अहंब्रह्मेतिसंकल्पें येणें । सर्वदा मुक्तचि गा असणें । 'नोहं ब्रह्मेति' हेंचि बंधन । संसारदैन्य पावावया ॥ १२ ॥ अगा स्वतःसिद्ध स्वयें ब्रह्म असतां । लोक लाजती मी ब्रह्म ह्मणतां । जैसी परपुरुषा स्पर्शतां । होय लज्जिता पतिव्रता जैसी ॥ १३ ॥ पंचभौतिक बहुतांचा । भक्ष्य तरी श्वानसूकरांचा । तो देहचि मी ह्मणती साचा । बोध तयांचा काय सांगों ॥ १४ ॥ श्वान मस्तकावरी पाय देऊन । जेव्हां भक्षितसे या देहालागून । तेव्हां येतां देखे दुसरा श्वान । तरी गुरगुरून पाठी लागे ॥ १५ ॥ ते आपुला विभाग ह्मणउनी । तें कलेवर आपुलेंचि मानी । स्पर्शों नेदी दुसरियालागुनी । धरी निर्वाळूनि पोटासी ॥ १६ ॥ ऐसीं जे जे भक्षिती तयासी । ते ते आपुलाचि मानिती निश्चयेंसी । शृगालवृकादि यासी । ह्मणती देहासि विभाग आपुला ॥ १७ ॥ तैसेंचि जीतां स्त्रीपुत्रादिक । सुहृद बंधु मित्र सकळीक । माझा ह्मणती तयासि देख । सांग निष्टंक कोणाचा हा ॥ १८ ॥ ऐसें या देहातें मीच ह्मणे । आणि स्वयें ब्रह्म असोनि ब्रह्म न ह्मणे ऐसे । लोक अतिशहाणे । दुःखें दारुणें पावती ॥ १९ ॥ अगा मी ब्रह्म ह्मणणें याचिसाठीं । होय अपरोक्ष ब्रह्मोसि भेटी । संसारासि लागे कांटी । पळे उठाउठी अज्ञान ॥ ४२० ॥ हें सकळही मनेंकरुनी । बंध मोक्ष होती कोदंडपाणी । द्वैताद्वैतही स्फुरे मनीं । अनर्थकरणी मनाचीया ॥ २१ ॥ तरी ययालागीं हेंचि करावें । यया मनातेंचि समूळ टाकावें । मग आप आपणिया स्वभावें । असिजे गौरवें आपुलेनी ॥ २२ ॥

चित्ते त्यक्ते लयं याति द्वैतमैक्यं च सर्वतः । शिष्यते तु परंब्रह्म शांतं नित्यमनामयम् ॥ २४ ॥

चित्ताचे संकल्प टाकितां । चित्तचि लय पावतसे सर्वथा । चित्तलयें श्रीरघुनाथा । सर्वत्र ताता द्वैत ना ऐक्य ॥ २३ ॥ अथवा मन आपणाहूनि भिन्न देखणें । मनाचा साक्षी स्वयें होणें । याचि नाम गा मन टाकणें । खूण जाणणें हेचि मुख्य ॥ २४ ॥ मनाच्या येकत्वें जंव हा असे । तंवचि मनासि मनपण वसे । आपणाहूनि भिन्न देखतांचि सर्वांशें । चित्त आपैसें टाकिलें होये ॥ २५ ॥ अगा मनेंचिकरूनि द्वैत स्फुरे । आणि मनेंचिकरूनि द्वैत विरे । द्वैताभावें अद्वैत स्फुरे । दोन्ही निर्धारें मनेंचि होती ॥२६॥ अहो द्वैताद्वैतपण स्फुरणें । ऐक्य स्फुरे द्वैताचि स्मरणें । यें दोन्ही हीं अनुसंधानें । करिजे मनें सर्वथा ॥ २७ ॥ यालागीं मनाचा त्याग केलिया । मग द्वैत ना ऐक्य रघुराया । येक नव्होनि येकलिया । उरणें अद्वया ब्रह्मासी ॥ २८ ॥ अगा येकु ह्मणतांचि विश्वमूर्ती । गणितेंनसीं दोन्ही होती । यालागीं द्वैत ना ऐक्य भासती । मनशांति जालिया ॥ २९ ॥ यालागीं संकल्प त्यागें लयो मनाचा । मनोलयें उपरमु द्वैताचा । मग ब्रह्मचि उरे जेथ सर्वांचा । होय साचा उपरमु ॥ ४३० ॥ अगा येकाचि ब्रह्माचा ठाईं । मनेंचि द्वैतजाळ कल्पिलें पाहीं । ऐसेंचि ऐक्य येणें न्यायेंही । मनें सर्वही कल्पिलें ॥ ३१ ॥ टवळें वातीच्या उपाधीकरून । येक अग्नीसिच भेद दाऊन । मन हे दीप मानी भिन्न भिन्न । तैसें हें जाण ऐक्यही ॥ ३२ ॥ दोन्हीही दीपांसि ऐक्य मानित । येऱ्हवीं येकुचि अग्नि संतत । तैसें ब्रह्मीं विश्व कल्पित । मनेंचि द्वैत कल्पिलें ॥ ३३ ॥ कां जळासिचि बुड्बुद वीचि । भेदकल्पना तेथ मनाची । तेचि सपाटलिया प्रतीति ऐक्याची । येऱ्हवीं जळाचे उपरमु ॥ ३४ ॥ तें कल्पिलें मुदळ मन जाये । मग द्वैत ना ऐक्य दोन्ही नोहे । येकलें येक सर्वत्र आहे । ब्रह्मचि पाहे सदोदित ॥ ३५ ॥ नातरी आकाश सर्वत्र येकु असे । घटमठादि उपाधीनें भिन्न भासे । घट मठ भंगल्या ऐक्य दिसे । पाहतां मानसें द्वैत ना ऐक्य ॥ ३६ ॥ तैसें सर्वांहूनियां जें कीं पर ।

---

१ विद्वानास. २ 'मी ब्रह्म नव्हे असें' समजणें. ३ कोल्हे लांडगे वगैरे. ४ खराखरा. ५ नाश होतो. ६ मन पाहणारा. ७ नसल्यामुळें. ८ हिशोब पाहिल्यास. ९ नाहींसी झाल्यावर.

तेंचि परब्रह्म गा साचार। शांतशब्दें निर्विकार। नाहीं विकार उपाधीचा ॥ ३७ ॥ अगा उत्पत्तिमरणादिरोग। तेचि ते आमयशब्दें सांग। मुख्य अज्ञान तोचि रोगयोग। होये भंग ययाचा जेथें ॥ ३८ ॥ अथवा आमयशब्दें उपाधि। तो सर्व नाशे जेथें निरवधि। तेंचि निरामयपद गा सुबुद्धि। ब्रह्मत्रिशुद्धी जाणिजे ॥ ३९ ॥ तेंचि निर्विकार निरंजन। शांत परब्रह्म निर्गुण। तेंचि उरे येर होये क्षीण। विश्वभान कल्पित जें ॥ ४४० ॥ अगा कल्पित जाऊनि रघुनाथा। उरे परब्रह्मचि तत्वतां। तेंचि तें जाण सर्वथा। सांगेन आतां तें आइकें ॥ ४१ ॥

चिन्मात्रत्वं प्रयातस्य तीर्णमृत्योरचेतसः। भवत्येव परानंदः केनासावुपमीयते ॥ २५ ॥

अगा ऐसेनि उपायेंकरूनी। चिन्मात्र जो पावला निर्वाणीं। तो मृत्यु तरला भरंवसेनी। चित्त निश्चयेनि प्रत्यङ्मुखें ॥४२॥ अगा प्रत्यङ्मुख तें मन कैसें। तेंही सांगों तुज सावकाशें। आयिक येकाग्र मानसें। अपूर्व असे अर्थ याचा ॥४३॥ आधीं प्रत्यक्शब्दें काय बोलिजे। तेंचि तंव आधीं वोळखिजे। मग प्रत्यङ्मुख मन कीजे। सांगों सहजें रमाकांता ॥ ४४ ॥ देहेंद्रियसमुदाय भरंवसेनी। त्याच्या प्रतिकूळें जैसा तरणि। प्रकाशतु स्वतां ज्ञानी। जागृतीं स्वप्नीं सुषुप्तीसीं ॥ ४५ ॥ सर्व देहेंद्रियांचा प्रकाशकु। देहेंद्रियांचा जो चाळकु। तोचि प्रत्यक्शब्दें ज्ञानदीपकु। येकायेकु परमात्मा ॥ ४६ ॥ ऐसें प्रत्यक्चैतन्य जें निर्वाण। साक्षित्वें परब्रह्म निर्गुण। तत्सन्मुख करावें मन। वृत्तिशून्य करोनियां ॥ ४७ ॥ सर्व दृश्यासि पाठमोरें। करूनि प्रत्यक् मुख मोहरें। केलिया मन निर्धारें। पावे खरें प्रत्यङ्मुखता ॥ ४८ ॥ ऐसें प्रत्यङ्मुख करितां मन। चिन्मात्रत्वें होय संपन्न। तें परब्रह्मचि होय संपूर्ण। तेथ जाण मृत्यु कैंचा ॥ ४९ ॥ तो मृत्यु तरला रघुपती। जयासि जाली परमानंदप्राप्ति। स्वयें तोचि परमानंदमूर्ति। मृत्यूत्पत्ति कैंची तया ॥ ४५० ॥ तयासि कैंचें उपमावें। तयासि तोचि जाणे स्वभावें। उपमिजे ऐसें असावें। जरी मानावें तया समान ॥ ५१ ॥ हें सर्वही मनोनाशें घडे। मनोनाशें संसार उबडे। यालागीं मनोनाश वाडे कोडें। कीजे फुडें उपायबळें ॥ ५२ ॥ तेही उपाय गा कैवल्यपती। सांगितले पुनःपुनः सांगिजेती। जेहीं उपायीं ब्रह्मप्राप्ति। बाणे स्थिति चित्तनाशें ॥ ५३ ॥

संमति श्लोक। द्वाविमौ चित्तनाशाय योगो ज्ञानं च राघव। योग श्चित्तनिरोधो हि ज्ञानं सम्यगवेक्षणम्।

अगा उपायांमाजी उपाय थोर। जो कीं सकळ गुह्यांचें सार। चोरूनि ठेविलें जें साचार। तेंचि गुह्यतर सांगेन ॥ ५४ ॥ अगा सर्व साधनां मुगटमणि। तेंहि साधन जाण कोदंडपाणी। तेंचि सांगेन तुजलागुनी। चित्त देऊनि परियेसीं ॥ ५५ ॥ तरी चित्त नाशावया गा रघुनाथा। हे दोन्ही क्रम जाण तत्वतां। इतर साधनें सांडूनि आतां। करीं सर्वथा हेचि दोन्ही ॥ ५६ ॥ इतर साधनें बोलिजती। परी तें करणें चित्तशुद्धी प्रति। चित्तशुद्धि जालिया परमार्थगति। ब्रह्मप्राप्ति चित्तनाशें ॥ ५७ ॥ तरी महता प्रबंधें गा रघुनाथा। चित्त नाशावयाचा उपाय तत्वतां। तुजप्रति सांगेन आतां। सांडीं कथा इतरांची ॥ ५८ ॥ तें उपाय परिसतां श्रवणीं। जेणें सुख न माये त्रिभुवनीं। तेंचि एकाग्र आइकें मनीं। पुरे धणी जेणें तुझी ॥ ५९ ॥ तरी गा योग एक ज्ञान। हेंचि चित्त नाशाप्रति कारण। यांचेंही सांगेन लक्षण। सावधान परियेसीं ॥ ४६० ॥ आतां योगाचें कैसें लक्षण। आणीक ज्ञान ही किं लक्षण। तेंही सांगों विशद करून। आयिक चिन्ह असुरांतका ॥ ६१ ॥ तरी योगाचें परिस लक्षण। तें एवंविध गा जाण। करावें चित्तनिरोधन। अष्टांग पूर्ण अंगें त्याचीं ॥ ६२ ॥ तेचि अष्टांगें कोणकोणें। सांगेन ऐकें येकाग्रमनें। यम नियम आसन जाणणें। प्राणायाम खूण चतुर्थ हे पैं ॥ ६३ ॥ पांचवें अंग प्रत्याहार। साहावा तो ध्यानप्रकार। सातवा धारणा महाथोर। समाधिसार आठवें अंग ॥ ६४ ॥ आतां यांचीं वेगळालीं लक्षणें। सांगेन आयिकें येकाग्रमनें। तऱ्ही यम तो ऐसा जाणणें। द्वादश लक्षणें उभयांचीं ॥ ६५ ॥

संमतिश्लोक ॥ ॥ अहिंसा सत्यमस्तेयमसंगो ह्रीरसंचयः ॥ आस्तिक्यं ब्रह्मचर्यं च मौनं स्थैर्यं क्षमा भयम् ॥ शौचं जपस्तपो होमः श्रद्धातिथ्यंमदर्चनम् ॥ तीर्थाटनं परार्थेहा तुष्टिराचार्यसेवनम् ॥ एते यमाः सनियमा उभयोर्द्वादश स्मृताः

प्राणिमात्राची हिंसा न करणें। शब्दादिकींही दुःख न देणें। तेचि अहिंसा जाणणें। साधारणें सांगितलें ॥ ६६ ॥ अहिंसा शब्दें बहुतापरी। निरूपिली असे ग्रंथांतरीं। ते बोलतां ग्रंथविस्तारीं।

---

१ आमय (रोग) या शद्बानें. २ प्रारब्धरहित. ३ आत्मज्ञान झाल्यानें ४ सूर्य. ५ मृत्यु उत्पन्न होणें. ६ नाश पावतो. ७ मोठ्या आवडीनें. ८ अतिशय गुप्त. ९ इच्छा. १० कोणत्या प्रकारचें. ११ इतर ग्रंथांत.

जाईल यापरी जाणिजे ॥ ६७ ॥ आणि सर्वदा सत्यचि बोलणें । तृणादिचौर्य सर्वथा न करणें । हें लक्षण तिसरें जाणणें । चौथें न करणें संग कोणासी ॥ ६८ ॥ सर्वदा असंगवृत्ती । असावें गा सीतापती । अकरणीं लज्जा सर्वार्थी । पांचवी वृत्ति लक्षणाची ॥ ६९ ॥ स्वयें आपण ब्रह्म असतां । देहरूप पावलों तत्वतां । आत्मघात ययापरता । विचारितां आन नाहीं ॥ ७० ॥ याची लज्जा सर्वदा वाहणें । गुरुनिगमीं संशयो न धरणें । आस्तिक्यबुद्धि असों देणें । सांतवें जाणणें लक्षण हें ॥ ७१ ॥ असंचय असणें आठवें लक्षणें । वित्तादिसंचय न करणें । संचयें होये दुःखदारुण । ह्मणोनि सज्ञान न करिती ॥ ७२ ॥ संन्यासी आणि ब्रह्मचारी । तऱ्ही उभयतां नैष्ठिक-ब्रह्मचारी । अष्टमैथुनांची परी । वर्जूनि ब्रह्मचर्याचारी असावें ॥ ७३ ॥

संमतिश्लोक ॥ दर्शनं स्पर्शनं केलिः कीर्तनं गुह्यभाषणम् । संकल्पोध्यवसायश्च क्रियानिर्वृत्तिरेव च ॥
एतन्मैथुन मष्टांगं प्रवदंति मनीषिणः । विपरीतं ब्रह्मचर्यमेतदेवाष्टलक्षणम् ॥

ग्राम्यवार्तांचें उपलक्षण । तेंचि जाणावें सर्वदा मौन । गुरुवचनीं धर्मी स्थैर्यपण । दहावें लक्षण हें ऐसें ॥ ७४ ॥ शीतोष्णादिद्वंद्वसहन । करणें तेंचि क्षमा जाण । अभय तें पंचविध लक्षण । आयिक सांगेन रघुनाथा ॥ ७५ ॥ साधितां सिद्धि होईल कीं नव्हे । अंतरायासि सर्वदा बिहे । होय नव्हे संशयो आहे । इत्यादि जाय भय त्याचें ॥ ७६ ॥ ह्यें यमाचीं लक्षणें बारा । सांगितलीं तुज महावीरा । आतां नियमलक्षणेंही श्यामसुंदरा । सांगेन साचारा ते आयिकें ॥७७॥ तरी प्रथम शौच तो जाणावा । तोही अंतर्बाह्य द्विविध गा राघवा । अंतर मनबुद्धीचा आघवा । सर्व सांडावा दुःखसंकल्प ॥ ७८ ॥ हा अंतःशौच तो ऐसा । बाह्य मृत्तिकाजळें होतु कैसा । जपु करावा वीरेशा । मंत्र जैसा असेल त्याचा ॥ ७९ ॥ कृच्छ्रादिकें तपें आचरावीं । अग्निहोत्रादिकें करावीं । आणि श्रद्धा असों द्यावी । सर्वभावीं कर्माच्या॥८०॥अग्नी अतिथीचें पूजनें । सर्वदा सर्वोत्तमाचीं अर्चनें । चित्तशुद्धीलागीं तीर्थाटणें। परोपकार करणें परहितालागीं ॥ ८१ ॥ सर्वदा संतुष्टचि असावें । यथालाभें सुख मानावें । येकाग्र गुरुभजन करावें । संतोपवावें सद्गुरुराया ॥ ८२ ॥ इत्यादि बारा नियम पूर्ण । संक्षेपें केलें यांचें कथन । अष्टांगयोगाचें हें जाण । समसमान भूमिका हे ॥ ८३ ॥ तिसरें योगाचें अंग आसन । उंचनिंच वर्जूनि समसमान । जेणें चित्त पावे समाधान । वीर पद्मासन अथवा वज्र स्वस्तिक ॥ ८४ ॥ तिये आसनीं बैसोनी । प्राणायाम करावा प्रणव जपोनी । रेचक पूरक कुंभक करूनी । यथाधारणीं अभ्यासबळें ॥ ८५ ॥ चंद्रें पूरिलिया सूर्यें रेचावें । किंवा सूर्यें पूरिलिया चंद्रें टाकावें । अथवा समसमान धरावें । मुख्य कुंभावें हेंचि थोर ॥ ८६ ॥ ऐसा प्राणायाम केलियावरी । प्रत्याहार करावा वरवियापरी । विषयाकार वृत्ति होतांचि धरीं । रोवीं परवरीं हृदयास्था ॥ ८७ ॥ जे जे वृत्ति मनीं-हूनि उठी । तेणें वळावी परतल्या दृष्टि । नेऊनि घालीं मनाच्या पोटीं । मनही नेहटीं साक्षियासी ॥ ८८ ॥ हें प्रत्याहाराचें लक्षण । वृत्तीचें विषयापासाव निवर्तन । वृत्ति चित्ताच्या पोटीं जिरऊन । मनें पूर्ण अभ्यासु कीजे ॥ ८९ ॥ वृत्तींचा मोकळ होउनी । उपजों नेदाव्या मुळींहुनी । उपजल्या काढाव्या विषयांवरुनी । सांठवण मनीं करावी ॥ ४९० ॥ हें प्रत्याहाराचें लक्षण । संक्षेपें केलें कथन । ग्रंथ विस्तारेल ह्मणऊन । अल्प निरूपण केलें असे ॥ ९१ ॥ परी निरूपणाचें जें सार । तो इतुकिया केला प्रकार । जैसा बीजापोटीं तरुवर । असे फार निर्धारेंसी ॥ ९२ ॥ ययावरी ध्यानाचा योग । तोही करावा अव्यंग । ध्यानलक्षणाचेंही अंग । सांगों सांग परियेसीं ॥ ९३ ॥ मनोवृत्तीचा पंचप्रकार । तो मागां सांगितला सविस्तर । प्रमाण विपर्यय विकल्प सार । चतुर्थप्रकार निद्रेचा ॥ ९४ ॥ पांचवी जाण अनुभूतिस्मृति । यया पांचही जाण मनोवृत्ति । निरोधूनियां प्रत्यगावृत्ति । लक्ष चित्तीं धरूनियां ॥ ९५ ॥ स्वरूप सगुण अथवा निर्गुण । तें ध्येय ध्यावें चित्तंकरून । विक्षेप जालिया विषयांवरून । ध्येयीं नेऊनि लावावें ॥ ९६ ॥ ध्येय सांडूनियां जाण । चित्त जरी जाये तेथून सावधान । होऊनि लावावें मागुतेन । ध्यान ह्मणणें ययालागीं ॥ ९७ ॥ दृढ ध्येयीं चित्त ठेऊन । मागुतें उठों नेदावें तेथून । धैर्य धरावें गा दाटून । धारणा जाण साहावी हे ॥ ९८ ॥ अथवा धैर्यें करूनि हें मन । स्वरूपा धरिजे दाटून । या नांव धारणा हें साहावें लक्षण । सातवें ध्यान तें परियेसीं ॥ ९९ ॥

१ गवताची काडी सुद्धां न चोरणें. २ न करण्यांत. ३ गुरु व वेद ह्यांच्या भाषणांत ४ सुख, दुःख, शीत, उष्ण; इत्यादि सोसणें. ५ कृच्छ्र चांद्रायणादि प्रायश्चित्तें. ६ हीं निरनिराळ्या आसनांचीं नांवें होत. ७ ॐकार. ८ मागें फिरल्यास.

स्वस्वरूपाकार मन करणें । अन्यार्थ कांहीं स्मरों नेदणें । ययाचें नाम ध्यान ह्मणणें । समाधिलक्षण तें ऐसें ॥ ५०० ॥ सर्व मनोवृत्ति मनीं लयो पावती । मन मनपणें पावे निवृत्ति । स्वरूपींच समाधानस्थिति । समाधि बोलती तिये नाम ॥ १ ॥ ऐसी अष्ट आंगें सांगोपांग । अष्टांग बोलिजे हा योग । चित्तवृत्ति निरोध जो सांग । तोचि योग अत्युत्कट ॥२॥ योगबळेंकरूनियां मन । स्वस्वरूपीं जालिया निमग्न । तेंचि प्रपंचाचें अदर्शन । विश्वभानभ्रांति कैंची ॥३॥ चित्तादिप्रपंचाचें अदर्शन । तोचि मनोनाश ऐसें जाण । हे योगमार्गींची खूण । जाण पां पूर्ण रघुराया ॥ ४ ॥ 'चित्तवृत्तिनिरोध' योग ऐसें । सकळां शास्त्रीं निर्णिलेंचि असे । वृत्तीच्या निरोधें मन नाशे । उपाय विश्वेशें जाणावा॥५॥ दुसरा उपाय मनोनाशासी । तें येक ज्ञान जाण हृषीकेशी । त्या ज्ञानाचीही खूण ऐशी । सांगों परियेसीं सावकाश ॥ ६ ॥ तरी ज्ञान तें गा सम्यगवेक्षण । हेचि ज्ञानाची मुख्य खूण । येणें मनोनाश होय संपूर्ण । जें विश्वभान बाधितें ॥ ७ ॥ अगा सम्यक् पाहणें तें ऐसें । सांगेन श्रीरामा सावकाशें । सद्गुरुमहावाक्यसमरसें । अतिउल्हासें ज्ञानपणें ॥ ८ ॥ सकळ जितुकें दृश्यजात । जो की सत्यत्वें प्रपंच भासत । तितुका जड परप्रकाश निश्चित । मिथ्याभूत जाण तितुकें ॥ ९ ॥ अगा जें जितुकें परिच्छिन्न । तितुकें जड दृश्यमान । दृश्य तें अनात्म संपूर्ण । असत्य जाण काळत्रयीं॥५१०॥याहूनि व्यतिरिक्त प्रकाश । जो कीं साक्षित्वें बोलिजे परेश । तयासि भासे जो जो भास । तोचि सावकाश दृश्यजात ॥ ११ ॥ अहंकारमनबुद्ध्यादिक । जें जें सत्यत्वें भासे सम्यक् । तें तें दृश्य जाण परी निष्टंक । साक्षी येक सत्य असे ॥ १२ ॥ तयासि यथातथ्य जाणणें । तेथेंचि आरोपित विश्व देखणें । साक्षी ब्रह्मेंसि येक पाहणें । तद्रूपें राहणें आपण स्वयें ॥१३॥ निरंतरस्वस्वरूपें राहतां । विश्व बाधित होये तत्वतां । विश्वांतःपाति-सर्वथा । मन बाधकता पावेचि कीं॥१४॥जैसें रज्जूचां ठाईं सर्पादिक । कीं शुक्तिकेसि रजत सम्यक । वस्तुज्ञानें बाधे सकळीक । वस्तु देव वस्तुत्वें प्रकाशे ॥ १५ ॥ ऐसें लक्षणीं अलंकृत । तेंचि ज्ञान गा निश्चित । सम्यगपेक्षण तें इत्थंभूत । जाण निभ्रांत रघुराया ॥ १६ ॥ जो अनात्मा अविवेक । दोन्ही सत्यत्वें भासे येक । तेंचि अज्ञान जाण सम्यक । याचा विवेक तेंचि ज्ञान ॥ १७ ॥ अगा या ज्ञानाचा ठाईं । चिदाभास बिंबला पाहीं । तोचि प्रमाता जीव इहीं । शब्दीं सर्वहो जाणिजे ॥ १८ ॥ त्या चिदाभासें मनपण आलें । चिदाभासें प्रकाशमंत आलें । चिदाभासेंचि भासविलें । आपण गोविलें चिदैक्यकरीं ॥ १९ ॥ आत्मा अजड स्वप्रकाश । मन अनात्मा अचित्तांश । ययाचा विवेक जो सावकाश । ज्ञान तयासि ह्मणताती ॥ ५२० ॥ जैसी देहाच्या ठाईं आत्मबुद्धि । अतिसदृढ बैसली अनादि । उपाय करितां सहस्रावधि । न संडी कधीं कांहीं केलिया ॥ २१ ॥ ते स्मरतां न स्मरतां लागली असे । कांहीं केलियाही न नासे । तैसीच आत्मबुद्धि स्वरूपीं दृढ बैसे । तेंचि सर्वांशें ज्ञान जाण ॥ २२ ॥ तो जन्हीं इच्छीना मुक्तता । तन्हीं तो मुक्तचि जाण तत्वतां । जयाची आत्मत्वीं आत्मत्व ताता । बुद्धि तत्वतां पाहे जरी ॥ २३ ॥

॥ संमतिश्लोक ॥ देहात्मज्ञानवज्ज्ञानं देहात्मज्ञानबाधकम् । आत्मन्येव भवेद्यस्य सनेच्छन्नपि मुच्यते ॥

अगा देहीं मीच आत्मत्वें जें ज्ञान । दृढ बैसलेंसे पुरातन । तैसेंचि आत्मयाचा ठाईं पूर्ण । दृढ जाण बैसिजे ॥ २४ ॥ देहात्मयाचा ठाईं अनात्मपण । दृढ बाणतांचि गा पूर्ण । देहात्मज्ञान बाधे जाण । न इच्छितां खूण पावे मोक्षु ॥ २५ ॥ ऐसें जें कां आत्मज्ञान । याचें नाम सम्यग्वीक्षण । येणें होये मनोनाशन । भस्म पूर्ण संसाराचें ॥ २६ ॥ परी जैसें होये मनोनाशन । तैसें नव्हे योगेंकरून । जोंवरी वृत्तीचें कीजे निरोधन । तोंवरी मन मूर्छित होये ॥ २७ ॥ जेव्हां चित्तवृत्तिनिरोध नाहीं । तेव्हां जैसें तैसेंचि मन पाहीं । मन सावध असतां जगही । आहे सर्वही जैसें तैसें ॥ २८ ॥ आणि सुखदुःखादि जे भोग । जे तया होणार सांग । ते तंव होती अव्यंग । प्रारब्ध अभंग ह्मणोनियां ॥२९॥ तेव्हां फळ द्यावया उद्यंत । पूर्वकर्म होये प्राप्त । तेव्हां समाधीसि व्युत्थान होत । मन भोगित सुखदुःखें ॥ ५३० ॥ अगा ईषत्तूंही जें सुखदुःख । सुषुप्ति आदिकरूनि देख । तें पूर्व कर्म होय सकळीक । थोर कौतुक प्रारब्धाचें ॥ ३१ ॥ यालागीं बाधु सर्व प्रपंचाचा । ज्ञानेंकरूनियां जाला जयाचा । तया भोगही सुखदुःखाचा । बाध जाला साचा निर्धारें ॥ ३२ ॥ जया देहादिप्रपंच बाधला । तया सु-

---

१ अतिकठिण. २ जगाच्या प्रलयाविषयीं संशय. ३ मनाचे विकार ताब्यांत ठेवणें. ४ लक्ष्यपूर्वक पहाणें. ५ मर्यादित. ६ विश्वामध्यें फिरणारें. ७ देहरूप आत्मा. ८ उत्तमप्रकारें पहाणें ९ नाश न होणारे. १० तयार. ११ थोडेंसें.

सदु:खादिभोग सत्यत्वें उरला । नाहीं कोठेंही देखिला । मिथ्या जाला बोधलेंपणें ॥ ३३ ॥ हा उपाय मनोनाशाप्रति । सर्वथा करावा गा महामती । प्रज्ञामांद्य असिलिया सर्वार्थी । निरोधचित्तवृत्ति करावा ॥ ३४ ॥ अगा बुद्धीचें मांद्यपण असतां । ज्ञान प्रतिबिंबेना सर्वथा । महावाक्याचिया अर्था । अशुद्धा चित्ता प्रवेश नाहीं ॥ ३५ ॥ पदार्थज्ञानपूर्वक । वाक्यार्थ जाण सम्यक् । यासि तीक्ष्ण बुद्धि अधिक । पाहिजे देख रघुराया ॥ ३६ ॥ अगा प्रज्ञा अतितीक्ष्ण असतां । वाक्यार्थ प्रतिबिंबे गा सर्वथा । गुरुमुखेंहूनि उदेजतां । प्राप्त्यर्थी पाविजे कीं ॥ ३७ ॥ तेंचि प्रज्ञेसि मंदपण असतां । वाक्य न प्रतिबिंबे गा सर्वथा । तेणें योग करावा ताता । वृत्तिरोधता मनाची ॥ ३८ ॥ ज्ञानें चित्तवृत्तिनिरोध करणें । हेंचि निदिध्यासन जाणणें । येणें विपरीतभावना तत्क्षणें । नाशे सत्राणें रघुपुंगवा ॥ ३९ ॥ योगाउपरी वाक्यार्थु बोधितां । गुरुप्रयास न लगती सर्वथा । निदिध्यासनही न करितां । प्राप्ति तत्वतां परब्रह्माची ॥ ५४० ॥ जरी पूर्वीच जालें आहे ज्ञान । परी वासना उद्भवती पूर्वसंस्कारेंकरून । त्यालागीं योगसाधन । करावें जाण सीताकांता ॥ ४१ ॥ तेणें मनोनाश वासनाक्षय । जालिया सुख अप्रमेय । प्राप्त होय, दुःख जाय । यालागीं उपाय दोन्ही करावे ॥ ४२ ॥ यामध्यें तुज जो आंवडेल । तोचि उपाय करिजे प्रांजळ । तेणेंचि मनोनाश होईल । सुख पावसील निरातिशय ॥ ४३ ॥ यया दोन्ही उपायेंकरुनी । मनोनाश करावा कोदंडपाणी । मनोनाशें सुख त्रिभुवनीं । नाहीं निर्वाणीं दुजें कांहीं ॥ ४४ ॥ जेथें जन विजन नाहीं दोन्ही । सुखचि सुखत्वें राहे कोदंडपाणी । सुखावांचूनि त्रिभुवनीं । नाहीं निर्वाणीं दुजें कांहीं ॥ ४५ ॥ सहजीं सहज पूर्णानंदु । सर्वभावें सेवोनि येकांतु । निजानंदें रंगूनि स्वार्थु । निरालसपणें जोडिला ॥ ४६ ॥ ( सद्गुरूचा ह्मणे रंगनाथु । सर्वभावें सेवूनि एकांतु । मनोनाश करावा हा कलितार्थु । साधावा स्वार्थु आलस्यत्यागें । ) पुढें वासनाक्षय प्रकरण । श्रोतीं आइकावें सावधान । सद्गुरु करिती निरूपण । निमित्त जाण मज करुनी ॥ ४७ ॥ हें मनोनाशप्रकरण । येथें जालें असे संपूर्ण । ययाचा अर्थ मनन करून । हेंचि साधन साधावें ॥ ४८ ॥ सद्गुरुचरणयुगल । तेथें सुखपराग अतिनिर्मळ । निजानंदें रंगोनि अलिकुल । सुखकल्लोळ भोगितु ॥ ४९ ॥

## इति श्रीयोगवासिष्ठसारे श्रीवसिष्ठरामसंवादे मनोलयप्रकरणं तृतीयं संपूर्णम्



१ बुद्धीची मंदता. २ गुरूनें उपदेशिलें असतां. ३ जलद. ४ 'अंगवेल' असा पाठ आहे. ५ जुनींवर्नी कोंदतसे असापाठ. ६ भ्रमरांचा समूह. ६ 'सेवी रंगनाथ होऊनि अळिउळ' असापाठ आहे.

॥ श्रीः ॥

## प्रकरण ४ थें.

# वासनोपशमप्रकरण.

श्रीगणेशायनमः । श्रीसरस्वत्यैनमः । श्रीमत्सद्गुरुनिजानंदायनमः । जयजयाजी श्रीसद्गुरुमूर्ती । अव्यक्तचि मत्कृपा आलासि व्यक्ती । हेंही ह्मणणें माझी भ्रांति । आनंदमूर्ति अविकार तूं ॥ १ ॥ अहो पुत्राचेनि जालेपणें । मातेसि जैसें माता होणें । तैसेंचि माझे जालेपणें । जननीपणें शोभसी तूं ॥ २ ॥ परी तूं जननी येकुलती । मज येक अपत्यातें प्रसवती । स्नेहें येका वरद जालीसि मूर्ति । ह्मणोनि येकुलती येकपणें ॥ ३ ॥ अनेक शिष्यपणें बहु जनिता । परी सकळ कृपेची ऐक्यता । मज समरसली ह्मणोनि तूं माता । होसी तत्वतां येकुलती ॥ ४ ॥ ह्मणोनि येकुलती माउली । संसारश्रांतासि साउली। तुझी कृपा जी मज प्रसवली । माउली जाली अतिस्नेहें ॥ ५ ॥ परी तुवां येक नवल केलें । विवेकशस्त्रें वासनानाळ खांडिलें । उपजोनि पोटींच सामाविलें । वाढविलें उदरामाजी ॥ ६ ॥ परी इतरां माउलियांसारिखें । बाहेरी घालूनियां बाळकें । वेगळेपणें पाळिती हरिखें । द्वैतसुखें अतिदुस्तर ॥ ७ ॥ जगदुदर तुझें विशाळ । सांठविसी अनेक शिष्यबाल । परी मजवरी अतिस्नेहकल्लोळ । तेणें वेल्हाळ तूं येकुलती ॥ ८ ॥ कृपाळूपणें तूं जननी । मजलागीं उदरीं समाउनी । वाढविसी अतिस्नेहेंकरुनी । वाक्यस्तनीं लाऊनियां ॥ ९ ॥ तेंचि तुझें गोड स्तनामृत । पिऊनियां मी धालों बोधित । तेणें बोधेंचि असें डुल्लुत । आनंद न समात त्रिभुवनीं ॥ १० ॥ बाळसें बाणलें ब्रह्मत्वाचें । तेणें मी पढियंतें संतसज्जनांचें । लडिवाळ बोलकें तुझे प्रीतीचें । ह्मणोनि संतांचें मन निवे ॥ ११ ॥ जैसें समर्थाचें आणि लडिवाळ । सुंदर बोलिकें वेल्हाळ । तें सकळां जनां होये प्रेमळ । वेधी सकळ गुणीलोकां ॥ १२ ॥ तैसा मीही तुझा लडेवाळ । आणि स्नेहाचें येक वेळाउळ । अपरोक्षज्ञानें सुंदर सफळ । अतिवेल्हाळ बाळसेनी ॥ १३ ॥ ब्रह्मपणाचेनि बाळसें । सर्वांगीं सुंदर बाणलेंसे । परी बोधाची प्रभा फुटली बहुवसे । अतिलाडसें लडिवाळ ॥ १४ ॥ ब्रह्मवर्चसाचें गोरेपण । आंगीं बाणलें सुंदर जाण । अमानित्वादिज्ञानलक्षण । अलंकारभूषणभूषित ॥ १५ ॥ याहीवरी ज्ञानशब्दें शब्दित । तुवां बोलविलें बोलत । तेणें संतांचें मन रिझत । प्रेमयुक्त डोलती ॥ १६ ॥ त्यावरी त्रिभुवनीं तूं समर्थ थोर । जगाचा नियंता सर्वेश्वर । त्या तुझें बाळक सकुमार । अतिथोर ते लाडविती ॥ १७ ॥ सकळ स्नेहाचा येकवळा । करुनि लाडविती वेल्हाळा । वांकुड्याही बोबड्या बोला । आनंद संतांला सर्वोपरी ॥ १८ ॥ असो तुझेनि बाळपणें मज । प्राप्त जालें तुझें गुह्य गूज । यालागीं जें जें बोलणें तें तत्व सहज । फावे निजगूज ब्रह्मानंदु ॥ १९ ॥ असो तुझें अपत्य मी येणें गुणें । कांहीं मज नव्हेचि उणें । सर्वत्र वर्त्तें संपूर्णपणें । तुझेनि गुणें गुणवंतु ॥ २० ॥ जैसें पितयाचें गुप्त धन । तें औरस जैसा पावे आपण । तैसें तुझें गौप्य धन जें ज्ञान । प्राप्त मी संपूर्ण तुझेनी ॥ २१ ॥ आतां येकी विनंती माहेरा । रिघोनि मद्वाक्याचे वोवरा । प्रवर्तवीं ग्रंथ विस्तारा । आनंदसागरामाजी पोहवीं ॥ २२ ॥ तुझेनि वैभव बोलावया । वाणी विस्तारीं सद्गुरुराया । ग्रंथनिर्माणीं चातुर्या । वासनाक्षया वदवीं मज ॥ २३ ॥ ऐसी ऐकोनि विनवणी । प्रसन्न जाली सद्गुरुजननी । मस्तकीं अभयकर ठेउनी । ह्मणे ग्रंथनिर्माणीं प्रवर्त्त आतां ॥ २४ ॥ ऐसें आज्ञालक्षणवचनामृत । परमभाग्यें जालें प्राप्त । तेणें आनंदें टीका करित । जे कीं श्लोकार्थ यथामती ॥ २५ ॥ तया ग्रंथाचें अनुसंधान । आयिकोत श्रोते सावधान । मनोनाशावरी प्रकरण । उठिलें कोण तें सांगों ॥ २६ ॥ मनोनाश वासनोपशमन । ज्याचेनि होये तो जीवन्मुक्त जाण । हेंचि करावया निरूपण । मनोनाश सांगितलें ॥ २७ ॥ आतां वासनेचा क्षय पूर्ण । होआवया वासनाक्षयप्रकरण । प्रारंभिलें अतिगहन । श्रोतीं

---

१ 'भ्रांतासि' असापाठ. २ महावाक्याचा उपदेश. ३ मावत नाहीं. ४ आवडतें. ५ घर. ६ अविकृत असा पाठ. ७ आळशी. ८ 'मद्वाचेचा' असा पाठ.

सावधान परिसिजे ॥२८॥ तेंचि निरूपण पैं आतां। करिजेल अतिसावधानता। सद्गुरुचरण स्मरतां।
ग्रंथ ऐकतां सिद्ध हा ॥२९॥ तरी आत्मानात्मविचारा वेगळें। कोण्हीच साधन फळीं न फळे। यालागीं
आत्मस्वरूप निराळें। अनात्म्यावेगळें निवडीजे ॥ ३० ॥ तरी सर्वदा करितां आत्मविचार। आत्म-
त्वीं होय दृढ निर्धार। मग अनात्मवर्गु तितुका निःसार। होये प्रकार फल्गुऐसा ॥ ३१ ॥ यालागीं
वसिष्ठ ज्ञानियांचा रावो। आधीं आत्मविचाराचा भावो। श्रोता ऐके देवादिदेवो। अयोध्येचा
रावो श्रीराम ॥ ३२ ॥

राम स्वात्मविचारोयं कोहं स्यामिति रूपकः। चित्तदुर्द्रुमबीजस्य दहने दहनः स्मृतः ॥ १ ॥

तरी आइकें गा रघुकुळटिळका। चित्सदानंद परब्रह्म व्यापका। निर्गुणा निर्विकारा विश्वा-
त्मका। निर्विशेषा निरंजना ॥ ३३ ॥ जें कीं व्यापकचैतन्यनिरंजन। तो तूं ह्मणविसी दशरथनंदन।
करिसी प्रपंचाचें विडंबन। भक्तजन तरावया ॥ ३४ ॥ तयांलागीं हें प्रश्नांतर। करूनि करिसी
जगदुद्धार। तरी आइकें आधीं आत्मविचार। वासनासंहार जेणें होये ॥ ३५ ॥ तरी मुख्य आत्म-
विचारु तो कैसा। तऱ्ही देहीं आपण कोण ऐसा। स्थूळलिंगकारण देहाचा ठसा। तो सहसा मी
नव्हे ॥ ३६ ॥ तैसेंचि अस्थि मज्जा मांस सप्तधातु। त्या मी नव्हे सर्वातीतु। सकळ मज दृश्य मी
सर्वा आंतु। व्यतिरिक्त अवस्थात्रयीं ॥ ३७ ॥ इंद्रियें नव्हे मी इंद्रियां चाळकु। बुध्यादि अहंकाराचा
प्रकाशकु। तो मी कोण ऐसा जो विवेकु। तोचि येकु आत्मविचार ॥ ३८ ॥ हाचि विचार जो कीं
एवंभूत। तो चित्तदुर्द्रुमबीजाचा अंत। द्रष्टा चित्तदुर्द्रुमाचें बीजभूत। तें अज्ञान निश्चित मेघश्यामा
॥ ३९ ॥ तया अज्ञानाचा दहनकर्ता। अग्निरूप हा विचार ताता। जाळूनि नेतसे भस्मता। तेथें
वासना चित्ता कैंचा ठावो ॥ ४० ॥ (तया अज्ञानाचा दहनकर्ता। आत्मानात्म विचार गा ताता। जा
ळूनि नेतसे भस्मांता। तेथें अविद्यात्मकासि कैंचा ठावो।)मूळ छेदिलिया कैंचा तरु। कारण नाश-
लिया कार्यविचारु। सूर्यास्तवें मृगजळपूरु। प्रतिबिंबाकारु बिंबनाशें ॥ ४१ यालागीं मनवासनादि
यांचें। मूळ अज्ञानचि जाण गा साचें। सर्व देहादिप्रपंचाचें। अज्ञान यांचें मूळभूत ॥ ४२ ॥ तेंचि
मूळ छेदिल्या आत्मविचारें। कैंची वासनादिसंसार थारे। मन मूळसहित विरे। आनंदें भरे
ब्रह्मांड हें ॥ ४३ ॥

॥ विचारदर्पणे लग्नां धियं धैर्यधुरं गताम्। आधयो न विलुंपंति वातश्चित्रलतामिव ॥ २ ॥

अगा विचारदर्पणाचा ठाईं। धैर्यैंसि बुद्धि जडली पाहीं। अतिसदृढतर जैसी कांहीं। अढळ
तेही सर्वस्वें ॥ ४४ ॥ धैर्यसाह्यादिकांची समृद्धि। विचारें स्थिरता पावल्या बुद्धि। तेथ उठिलि-
याही थोरा आधि। न लोटे बुद्धि तयांचेनी ॥ ४५ ॥ दर्पणीं जें रूप बिंबलें। तें दर्पणीसच जडलें। तें
हस्तें काढितांही बळें। परी तें न ढळे सर्वथा ॥ ४६ ॥ तैसीच विचारदर्पणीं। बुद्धि जडलिया गा
कोदंडपाणी। न काढवे आधींचेनी। हे खुण मनीं जाण तूं ॥ ४७ ॥ आधि ह्मणिजे ज्या ज्या मान-
सिक व्यथा। चिंतारूपें ज्या परिणमता। त्यासि वासना जाण तत्वतां। पर्यायकथा इत्यादिक ॥४८॥
नानासंकल्प जे मनोरथ। चित्त करी सर्वदा विषयार्थ। करीतांहीं नव्हे तृप्त। वणवणपणें ॥ ४९ ॥
स्वस्वरूपावेगळें राहतां। मन स्थिर नव्हे गा सर्वथा। वणवण करी विषयार्थां। त्यासि तत्वतां
आधि जाण ॥ ५० ॥ त्याचि आधि उठतां चित्तस्वभावें। परी विचारस्थ बुद्धि न अभिभवे। विचा-
रचित्रीं लिहिलें तें न काढवे। कांहीं न करवे तियेचें ॥ ५१ ॥ ते ज्ञानरूप होऊनि दृढावली। तियेसि
आधिवायो लागतां महाबळी। परी ईषत् न ढळे प्रयत्नमेळीं। जैसी चित्रवल्लि वातोर्मियां ॥ ५२ ॥
वातोर्मि उठिलिया अनेका। तऱ्ही चित्रींची न हले वल्लिका। तैसी बुद्धि आरोपिली विवेका। आधि-
वातझुळुका न लोटे कीं ॥ ५३ ॥ नाना पाषाण कोरूनि अक्षरें। लिहिलीं तीं पुसिजेती नीरें। तरी
आधींकरूनि निर्धारें। बुद्धि विरे विचारस्थु ॥ ५४ ॥ यालागीं सर्वथा ऐसेंचि करावें। विचारसमुद्रीं
बुद्धीसि बुडवावें। ते कदापि आधींनें न अभिभवे। सुखें सुखावे ब्रह्मानंदें ॥ ५५ ॥ अगा नाना
विचारवन्हीचा ठाईं। आधितृण नुगवेचि पाहीं। विचाराग्नि भस्म उरी उगवल्याही। आलाटे ठायीं
धिषणा असे ॥ ५६ ॥

१ तुच्छ, निःसत्व. २ 'प्रश्नोत्तर' असा पाठ. ३ चित्तरूपी वाईट वृक्षांच्या बियांचा. ४ "विंबिलला' असा पाठ. ५ निरा-
ळीं नावें ६ नाहींशी होत नाहीं. ७ वायूच्या लाटेनें. ८ हा शद्ब कांहीं प्रतीत नाहीं. ९ बुद्धि.

॥ विचारोध्यात्मविद्यानां ज्ञानं तत्वविदो विदुः । ज्ञेयं तस्यांतरेवास्ति माधुर्यं पयसो यथा ॥ ३ ॥

अगा अध्यात्मविद्यांचा रावो । हा आत्मविचार जाण महाबाहो । अध्यात्मविद्येचा अभिप्रावो । हाचि निर्वाहो नानाविद्या ॥५७॥ आत्मयातें अधिकारूनि वर्तती । जे कीं जाणणयाची संपत्ति । जें जें ज्ञान ते विद्या सर्वार्थी । शास्त्रव्युत्पत्ति वेदाध्ययनें ॥५८॥ ज्या ज्या विद्या अतिकुशला । जेहीं आणिजे पदार्थमेळा । ज्ञान जितुकें तितुकें चित्कळा । विद्या या रूप जालें ॥ ५९ ॥ त्या सर्वां विद्यांचा मुगुटमणि हा आत्मविचारु जाण कोदंडपाणी । हें मुख्य ज्ञान या भरंवसेनी । जाणती ज्ञानी जे तत्वेत्ते ॥ ६० ॥ अथवा आत्मविद्याविचार । करणें जो तात्पर्य निर्धार । त्यातें ज्ञान ह्मणती चतुर । अतिधीर ब्रह्मवेत्ते जे ॥ ६१ ॥ तया ज्ञानाच्या जाण पोटीं । ज्ञेय सांपडे गा उठाउठी । जेथ ज्ञान तेथ ज्ञेयभेटी । ज्ञानाच्या पोटीं ज्ञेय वसे ॥ ६२ ॥ ज्ञेयशब्दें ब्रह्म केवळ । जेथें नाहीं विशिष्टादिमळ । चिदानंद निष्कळ निर्मळ । अचळ अढळ परिपूर्ण जें ॥ ६३ ॥ ऐसें हें जें ज्ञेय जाण । तें ज्ञानाच्या पोटीं वसे संपूर्ण । जैसें रसीं मौल्यपण । माधुर्य जाण मधुरीं ॥ ६४ ॥ किंवा गुळाठायीं गोडी । लवणीं क्षारता असे फुडी । शब्दाच्या पोटीं अर्थपरवडी । अनुभव आवडी गुरुवचनें ॥ ६५ ॥ जैसा काष्ठाच्या पोटीं । वन्हि सर्वत्र गा जगजेठी । पटु तंतूच्या पोटीं । मृत्तिका घटीं सगर्भ जैसी ॥ ६६ ॥ तैसें जें कीं आत्मज्ञान । तदंतर्वर्ती ज्ञेय जाण । ऐसें अनुभवसिद्ध आणि सज्ञान । विचारें पूर्ण बोलती ॥ ६७ ॥

विचारेण परिज्ञातस्वभावस्योदितात्मनः । अनुकंप्या भवंतीह ब्रह्मविष्णुशिवादयः ॥ ४ ॥

ऐसिया आत्मविचारेंकरून । ज्ञेयचि फावे सर्वस्वें जाण । तेथ कैंचें वासनाशमन । न करितां क्षीण सर्वस्वें होती ॥ ६८ ॥ यालागीं हाचि विचार दृढ करून । साक्षात केलें स्वरूप पूर्ण । जें कीं स्वप्रकाश चैतन्यघन । उदित पूर्ण पूर्णत्वें ॥ ६९ ॥ जाण ऐसिया पुरुषासी । अनुकंप्य सकळ जीवरासि । किंबहुना ब्रह्मादिकांसि । विष्णुशंकरांसि अनुकंपावें ॥ ७० ॥ ब्रह्मादिकांसि तेणें पुरुषें । अनुग्रह करावा गा विश्वेशें । तो परब्रह्मचि सगुण वेशें । निर्विशेषें नांदत ॥ ७१ ॥ हें तंव प्रसिद्धचि असे । निर्गुण ब्रह्मादिकांतें अनुग्रहिजेतसे । तेणें सृष्ट्यादिकार्यविशेषें । सामर्थ्य वसे त्याच्या ठायीं ॥ ७२ ॥ नाहीं येकें विचारेंकरूनी । ब्रह्म जाला निर्वाणीं । विश्व सत्य भासतां कहाणी । प्राप्ति कैसेनि ब्रह्मत्वाची ॥ ७३ ॥ तरी ऐका याचें उत्तर । जें कीं सांगिजैल परिकर । ज्ञानाचें सामर्थ्य महाथोर । यथा प्रकार तोचि भासवा ॥ ७४ ॥ विश्व आरोपितपणें बाधित होये । तें भासतांही मृगजळ तुल्य पाहें । येन्हवीं वास्तव पाहतां कैंचें काये । विश्वाची सोय तेही नाहीं ॥ ७५ ॥ अगा हें अज्ञान जंववरी असे । तंवचि विश्वसाचासारिखें दिसे । तें अज्ञान अपरोक्षज्ञानें नाशे । मग सत्य तेंचि असे परब्रह्म जें कां ॥७६॥ यालागीं सत्य तेंचिसत्य भासे । नाथिलों विश्वाभास तो भ्रंशे । मग ब्रह्म साक्षात्कारचि असे । विचारलेशेंकरूनियां ॥ ७७ ॥ ह्मणोनि तो परब्रह्म जाला । तेणें अनुग्रहही सकळां केला । ऐसियासि कैंचा वासनामेळा । तो असे निराळा सर्वातीत ॥ ७८ ॥ अगा हें विश्व साच भासावें । तरीच वासनेनें उद्भवावें । तरी विश्व हें आत्मविचारें आघवें । बोधिस्वभावें रघुपुंगवा ॥ ७९ ॥ मग लटकियाच्या ठायीं । वासना उपजोनि करिती कायी । उपजल्याही नाशती सर्वही । निर्धनाचे पाहीं मनोरथ जैसे ॥ ८० ॥ किंवा बालकाचे वेव्हसाव । गंधर्वनगरींचे बुरुज सावेव । कीं इंद्रजाळाचें गौरव । नाशे सर्व उपजलेंही ॥ ८१ ॥ तैसें बोधिताच्या ठायीं । वासना नुपजती जाण कांहीं । उपजलेंही त्या अनपायी । नाशु सर्वही पावती ॥ ८२ ॥ यालागीं गा रघुपती । आत्मविचारु करावा सर्वार्थी । विचारें न भासे विश्वभ्रांति । तद्वारें शांति वासनेची ॥ ८३ ॥ तोचि आत्मविचारु कैसा । तन्ही पूर्वीच सांगितला गा वीरेशा । प्रस्तुत मागुताही परियेसा । विश्वविळासा विश्वंभरा ॥ ८४ ॥

किमिदं विश्वमखिलं किमस्याहमिति स्वयम् । विचारनिरतस्यैतदसदेव भवेज्जगत् ॥ ५ ॥

तरी तोचि विचार गा येथ । ह्मणे हें चराचर कोणाचें प्रस्तुत । याचें स्वरूप काय यथार्थ । यातें देखता तो मी कोण ॥ ८५ ॥ यया सकळ विश्वातें जाणत । तें माझें स्वरूप काय यथार्थ । हें विचारें पाहतां जें सत्यभूत । तेंचि यथार्थ आत्मस्वरूप ॥ ८६ ॥ ह्मणे जो पंचमहाभूतांचा पसारा । तो मी माझें स्वरूपें नव्हे खरा । विचारितांही विवेकवरा । न राहे पुरा कोण्ही अर्थ ॥ ८७ ॥ इंद्रियें

---

१ फार. २ निरनिराळे अर्थ. ३ दयाकरण्यास योग्य. ४ विशेषें असा पाठ. ५ नसलेला. ६ व्यवसाय असापाठ. ७ किल्यांचे बुरूज.

ह्मणों मनादिक । तरी ते प्रत्यक्ष भासती सकळीक । जें जें दृश्य तें मिथ्या सम्यक् । भासें पराक् ह्मणउनी ॥ ८८ ॥ जे जे बाह्य पदार्थ भासती । ते ते पराक् जाणिजेती । पराग् ते नश्वर सर्वार्थी । दिसे व्यक्ति स्थूळ ह्मणोनी॥८९॥तैसेचि अहंकारादिपदार्थ । ते ते आपणासि परोक् भासत । जें भासे तें तें दृश्यजात । मिथ्याभूत जाण तूं ॥९०॥ आतां यथार्थ सर्वांवेगळें । आपण येथें कोण पां निवळें । ऐसें विचारितांही न कळे । सद्गुरु मिळे तोंवरी ॥ ९१ ॥ सद्गुरूचे कृपाप्रकाशभरें । नाशोनि जाय । संशयअंधारें । आपण आपणा सर्व प्रकारें । भेटे निर्धारें तत्काल ॥ ९२ ॥ त्याही विचाराचें कारण । तुजप्रती कांहीं पुसेन । तें सांगताचि जाणसी आपण । हेचि खूण एक पां॥९३॥तरी जो देहेंद्रियसमुदाय असे । तयातें पुरुष ऐसें बोलिजतसे । तो कोणाचे तेजें वर्तत असे । जाण कैसें कोणेंकरुनी ॥ ९४ ॥ सर्व कर्में करी कर्तव्य जें जें । तें तें सांग पां कोणाचेनि तेजें । सर्वेंद्रियीं व्यापारु निपजे । कवणा सुझे विचारु सर्व ॥ ९५ ॥ येरु ह्मणे मी सांगेन । सर्व प्रकाशे सूर्येंकरून । आयिका येकाग्र करूनि मन । सूक्ष्म गहन हा विचारू असे ॥ ९६ ॥ ईयेविचारीं जयाचें मन । प्रवर्त्तलें सावधान अतितीक्ष्ण । तयासि होय आत्मदर्शन । भेटे आपण आपणा पैं ॥ ९७ ॥ तरी एक हें बोलिलासी यथार्थ । सूर्यतेजें प्रकाशे समस्त । मग पुरुष सर्व कर्मीं वर्त्तत । हे प्रतीत सर्वांसी ॥ ९८ परी सूर्य अस्तवलियावरी । पुरुष वर्त्ते हा कवणेपरी । येरु ह्मणे चंद्रप्रकाशें करी । राहाटी पुरी सर्वेंद्रियांची ॥ ९९ ॥ हें होय यथार्थ वचन । परी चंद्रास्तें प्रकाशी कवण । उडुगण सौदामिनी जाण । करिती भान सर्व कर्मीं ॥ १०० ॥ हेंही नसतां कवण प्रकाशी । कोण पुरुष प्रवर्ते कर्मासी । येरु ह्मणे अनलें सर्वांसी । पदार्थजातासि प्रकाशिजे ॥ १ ॥ दीप दिविया इत्यादिप्रकारें । हव्यवाट्तेजें आविष्करे । तेणें प्रकाशें प्रचुरें । पुरुष व्यवहारे सर्व कर्मीं ॥ २ ॥ तोही नसतां कोणें जाणिजे । हें आतां निश्चयेंसि बोलिजे । येरु ह्मणे शब्दें प्रकाशिजे । आंधारीं सुझे शब्दें सकळ ॥ ३ ॥ शब्दही नसतां कवण प्रकाशी । हेंही सांग पां गुणराशी । येरु ह्मणे मन सर्वांसि प्रकाशी । जाणणें त्यासि सर्व प्रपंचजात ॥ ४ ॥ मनें स्थूळसूक्ष्म जाणिजे । मनेंचि सर्वही कल्पिजे । मनेंचि व्यवहारें घेपे दिजे। मनेंचि बुझे अंतर्बाह्य ॥ ५ ॥ तरी तेंही मन स्वप्नाकार । परिणमलें जेव्हां सविस्तर । तेव्हां देखे स्वप्नव्यवहार । सांग साचार कोण्हे तेजें॥६॥ मन आणि बुद्धि स्वप्नाकारें । पदार्थरूपें आविष्करे । तेथ देखावया मनही तुरे । सांग पा खरें प्रकाशका ॥७॥ जीं जीं जाणावयाचीं कारणें । ते सर्वही स्वप्नीं जाली लीनें । तरी कोण्हें स्वप्न प्रकाशणें । सांग हे खुणे विचारुनी ॥ ८ ॥ ना प्रमाता स्वप्न देखतु । हें बोलतांचि होय अनर्थु । मनोपाधि तो असे बिंबतु । मनांत वर्ततु आभासोनी ॥ ९ ॥ उपाधि गेलिया प्रतिबिंब कैंचें । घटीं जळ नाशल्या सूर्यादिकांचें । प्रतिबिंब तुमटे कोणाचें । उपाधि साचें असेचिना ॥ ११० ॥ जंववरी घटीं जळ असे । तंवचि प्रतिबिंब प्रकाशे । जळनाशें तेंही नाशे । प्रत्यक्ष असे सर्वां जनां ॥ ११ ॥ अगा आदर्श परौतां नेलिया । ठाव कैंचा प्रतिबिंब दिसावया । उपाधिनाशें नाशु तया । जनां यया प्रत्यक्षसिद्ध ॥ १२ ॥ तैसें अंतःकरण उपाधीसी । बिंब जो चैतन्यांश तयासि । बिंबलेपणें निश्चयेंसी । प्रमाता ऐसी संज्ञा जाली ॥ १३ ॥ तो अंतःकरण उपाधि वेचला । स्वप्नपदार्थाकारें परिणमला । तया आंतु जो भासला । तो ही गेला उपाधिनाशें ॥ १४ ॥ तर्‍ही स्वप्न कोण्ही प्रकाशिलें । पदार्थ सत्यत्वें कोण्ही देखिलें । हें सांग पां येक्या बोलें । जैसें कळलें असेल तुज ॥ १५ ॥ इंद्रियवर्गु लयातें पावला । मनाचा परिणाम स्वप्न जाला । प्रमातादि तेथें नाशला । कोणें देखिला स्वप्नसंभ्रमु ॥ १६ ॥ अगा प्रमातयाचें देखणें । जंववरी असतां बाह्यकरणें । तयावेगळें स्वतंत्रपणें । जीवा नेणणें असेचि कीं ॥ १७ ॥ येथें न चले कोण्ही युक्ति । तटस्थ राहिला मौनास्थिति । जाणतु नेणे स्वयें भ्रांति । न वदे भारती कांहीं त्याचि ॥ १८ ॥ मग गुरु ह्मणती एक आतां । निर्धारु सांगेन तुज तत्वतां । जेणें बुझसी सर्वार्था । तेंचि आतां जाण तूं ॥ १९ ॥ तुझें स्वरूप तें साक्षी जाण । जो करितसे सर्वांचें भान । जालियाही इंद्रियें लीन । स्वयें आपण जो प्रकाशी ॥ १२० ॥ अगा सकळ सामग्रीविण । अंतराचें करी जो प्रकाशन । तोचि तो सर्वथा साक्षी जाण । नाहीं भिन्न आपणेंसी ॥ २१ ॥ आणि बाह्यार्थांचें प्रकाशन । तेंही साक्षीच करी जाण । इंद्रियें बाह्यत्वें स्थूळभान । करी आपण स्वप्रकाशें ॥ २२ ॥ जो जो रूपवंत असे पदार्थ । तोचि इंद्रियां होय प्रत्यक्षभूत । रूपवंत नव्हे तेणें

१ वेगळें. २ 'पृथक्' असा पाठ ३ संसार असा पाठ. ४ 'ज्ञेयविचारीं' असा पाठ. ५ नक्षत्रसमुदाय. ६ वीज. ७ विस्त-[illegible] ८ घेणें. ९ प्रगट होतें. १० 'जे जे' असा. ११ पलीकडे.

प्रकाशवंत । तेंही जाणत साक्षीच येकु ॥ २३ ॥ शुक्तिरजत बाह्यपदार्थ । परी तो नव्हे रूपवंत । यालागींच इंद्रियें न प्रकाशीत । साक्षी जाणत चक्षुद्वारा ॥ २४ ॥ तैसीं अंतरींचीं सुखदुःखें । तीं इंद्रियेंविण साक्षीच जाणे असकें । तें अरूपवंत इंद्रियां नटके । प्रकाशी निकें साक्षीच येकु ॥ २५ ॥ तैसाचि कीं स्वप्नपदार्थ । तो भासमात्र परी नव्हे रूपवंत । ह्मणोनि तेही साक्षीच प्रकाशित । नव्हे अन्यार्थ रघुराया ॥ २६ ॥ तो जो साक्षी तेंचि स्वरूप आपुलें । वास्तव अनुभवें जाणावें भलें । तें विचारेंचि होय साधिलें । तेंचि तें निराळें सुषुप्तीसी ॥ २७ ॥ हें स्वप्नादिकही मावळलिया । तो साक्षीच उरे आपणया । साक्षस्वप्नादि गेलिया । साक्षित्व तया तेंही नाहीं ॥ २८ ॥ साक्ष अपेक्षा ससाक्षित्व । ते साक्ष गेलिया उरे येकत्व । साक्षीपणाचेंही तत्व । राहे निवांत स्वस्वरूपीं ॥ २९ ॥ तेव्हां सच्चिदानंद सुखपणें । असे आपणया आपणें । सुखरूप नसे तरी कैसा जाणे । प्रबोधीं कोणें प्रकाशिजे । ॥ १३० ॥ 'सुखमहस्वाप्सं' ऐसें । प्रबोधीं स्वयें जाणतुचि असे । यालागीं मी केवळ सुषुप्तीं वसे । दुजें नसे तेथ कांहीं ॥ ३१ ॥ ऐसें हें विचारें विचारितां । स्वतःसिद्ध आपणचि आयता । सर्वातीत ब्रह्मसत्ता । तोचि तूं तत्वतां रघुराया ॥ ३२ ॥ अहो सुषुप्तीसि कांहींच नेणे । प्रपंचमात्रातें जाणणें । सुखदुःखादि नाहीं भोगणें । मी अमुका नेणे कांहींच तेथें ॥ ३३ ॥ जाति वर्णाश्रम गुण । कांहींच नेणे अनुसंधान । अमक्याचा पिता पुत्र इत्यादि खूण । नेणें संपूर्ण कांहींच तो ॥ ३४ ॥ केवळ चैतन्यसुखावबोधें । राहे सुषुप्तीसि अगाधें । तें आपणाचि जें ऐसें बोधे । तेंचि स्वानंदें जाणिजे ॥ ३५ ॥ मी कोण ऐसें जाणणें । तें जाणावें यिये खुणें । विश्व नश्वर दृश्यपणें । नाहींच होणें वास्तव कदा ॥ ३६ ॥ जग स्वप्नसुषुप्तीसि बांधलें । ह्मणोनि नश्वरत्व पावलें । तें आभासमात्र संचलें । विचारा भलें समर्थ नव्हे ॥ ३७ ॥ विचारक्षम नव्हे जे वस्तु । तेचि ते आभासमात्र जाण तूं । जैसा कां अहि रज्जुगतु । शुक्तिकांतर्भूतु रजताभासु जाण ॥ ३८ ॥ कां रोहिणीजळाचा पूर । कीं गंधर्वनगरींचें गोपुर । इंद्रजाळाचें सपूर । अतिसुंदर लाघव तें ॥ ३९ ॥ वोडंबरीचे अलंकार । कां चित्रींची वनिता सुंदर । कां स्वप्नींचें वैभव परिकर । मनोहार राज्य भोग ॥ १४० ॥ सायिखेडियाच्या गजघंटा । छायामंडपींच्या सुरश्रेष्ठा । युद्धाच्या होती खटपटा । दिंकु गोमटा गोलांगुळाचा ॥ ४१ ॥ तैसें हें विश्व जालें सकळ । पाहतां आभासमात्र टवाळ । विचारतां निर्मूळ । फोल सकळ रघुराया ॥ ४२ ॥ अगा हें सत्यवस्तुचा ठाईं । भासे ह्मणोनि सत्याभास पाहीं । विचारितां असत्य सर्वही । भ्रमेंविण पाहीं आन न देखे ॥ ४३ ॥ अगा येणें विचारेंकरून । विश्व हें असत्यचि बाधून । सत्य आपणयातें निवडून । राहणें परिपूर्ण जाणुनि ॥ ४४ ॥ तोचि आपण अकळ अढळ । प्रांजळ सत्यसेतु निर्मळ । अखंड स्वप्रकाश अचळ । सुखकल्लोळ सुखत्वें ॥ ४५ ॥ स्वसंवेद्य निरंजन । अप्रमेय निष्कळ निर्गुण । साक्षी निरंतर चैतन्यघन । स्वार्थपूर्ण पूर्णत्वें ॥ ४६ ॥ एवंविध पैं आपण असे । देहादिप्रपंचाचें रूप तें ऐसें । चंचल दृश्य परिच्छिन्न भासे । अनित्य दिसे मळिनपणें ॥ ४७ ॥ अखंड अप्रकाश क्षणभंगुर । दुःखरूप दुःखोदर्क निरंतर । परसंवेद्य जड अस्थिर । जाणिजे सपूर दृश्यपणें ॥ ४८ ॥ अज्ञानांध कलंकयुक्त । अतिस्थूळ बाह्य नियुक्त । साक्ष क्षणिक जड प्राकृत । पदार्थप्रतीत सर्वेंद्रियां ॥ ४९ ॥ एवंगुणीं जाण अलंकृत । हें विश्व मिथ्याचि भासत । जें जें इंद्रियीं जाणजेत । तें तें मिथ्याभूत जाण तूं ॥ १५० ॥ ऐसिया विचारेंकरुनी । सर्वदा पाहतां कोदंडपाणी । असंतचि जग नयनीं । जैसें स्वप्नीं तैसें भासे ॥ ५१ ॥ मिथ्या भासलिया विश्वजन । वासना नुपजती गा जाण । अज्ञान नाशलिया विश्वभान । मिथ्या पूर्ण भासत ॥ ५२ ॥ तेवीं साधन तुजप्रति । सांग सांगेन गा रघुपति । जेथें वासनाचि नुदेजती । तेंचि विश्वमूर्ती परियेसीं ॥ ५३ ॥

यस्य मौर्ख्यं क्षयं यातं सर्वं ब्रह्मेति भावनात् । नोदेति वासना तस्य प्राज्ञस्यांबुमतिर्मरौ ॥ १ ॥

अगा सत्य वस्तूचे ठायीं । असत्य विश्व भासे सर्वही । यासि कारण अज्ञानावांचूनि नाहीं । सत्य पाहीं रघुवर्या ॥ ५४ ॥ परम मौर्ख्य तें अज्ञान । ह्मणोनि मौर्ख्य हें अभिधान । वस्तुविस्मरण भासवी आन । ह्मणोनि जाण मूर्खपण तया ॥ ५५ ॥ अनादि जेणें नाहींसें केलें । तें मौर्ख्य ज्याचें क्षया गेलें । त्यासिच ब्रह्मत्व हाता आलें । स्वयेंचि जालें ब्रह्म पूर्ण ॥ ५६ ॥ अगा 'सर्वंब्रह्मेति' भावना । तेणें निःशेष नाश होय अज्ञाना । कार्य तें विश्वभास जाणा । तें कार्य कोणा आश्रयें राहे ॥ ५७ ॥

१ स्पष्टपणें; येथें 'अखिकें' असा पाठ आहे. २ मी सुखानें निजलों होतों. ३ जागा झाल्यावर. ४ विचारास योग्य. ५ जादूगाराचे. ६ कळसूत्री बाहुल्यांच्या. ७ चमत्कार; 'टिंक' असा पाठ. ८ परिणामीं दुःख देणारें. ९ उत्पन्न होत नाहीं.

कारण तें अज्ञान जाण । कार्य तें विश्वभास पूर्ण । कारणनाशें विश्वभासस्वप्न । न भासे संपूर्ण रघुवर्या ॥ ५८ ॥ ज्ञान जालें नसतांही गा रघुपती । सर्वब्रह्म ऐसी करितां क्षण वृत्ति । ते भावनाचि फळे सर्वार्थी । त्रिजगतीं ब्रह्मचि भासे ॥ ५९ ॥ सर्वदा करितां ब्रह्मभावना । अज्ञान नाशे गा रघुनंदना । तेथें विश्वभासरचना । नाहींच क्षणामाजी होये ॥ १६० ॥ ऐसा हा साधनप्रकार । येणेंचि मौर्ख्याचा होय संहार । मौर्ख्यनाशें वासनांकुर । नुगवे साचार सर्वथा ॥ ६१ ॥ अगा वासनावल्लीचें बीजभूत । ते हें अज्ञानचि जालिया भर्जित । पुनरपि तें वासनांकुरित । नव्हे संचित जऱ्ही जालें ॥ ६२ ॥ जैसें मरुस्थळाचा ठाई । ज्ञातया अंबुबुद्धि नव्हे पाहीं । रज्जु हस्तगत तयाही । न भासे अहि सर्वथा ॥ ॥ ६३ ॥ यालागीं मुळाचें छेदन करावें । येणेंचि वासनाजय संभवे । अन्यथा तेंचि अभिभवे । वर्म जाणावें निश्चयेंसी ॥ ६४ ॥ ह्मणोनि वासनेची शांति । अज्ञाननाशें गा महामती । करावी हे तुजप्रति । साधनसंपत्ति बोलिलों ॥ ६५ ॥ आतां चित्ताचेंही जेणें अचित्तपण । रघुनाथा येतसे गा जाण । जेणें चित्तपण होये क्षीण । तेंही लक्षण सांगों आतां ॥ ६६ ॥ आणि वासनाक्षयाचे प्रकार । तेही सांगों सविस्तर । तऱ्ही मन करूनि येकाग्र । उपायसार परियेसीं ॥ ६७ ॥

वासना संपरित्यागाच्चित्तं गच्छत्यचित्तताम् ॥ प्राणस्पंदनिरोधाच्च यथेच्छसि तथा कुरु ॥ ७ ॥

अगा वासनाशब्दें पूर्वसंस्कार ॥ जे कां धर्माधर्म मनोहर ॥ सूक्ष्म अदृष्ट गोचर ॥ व्यक्त साचार नव्हे पैं ॥ ६८ ॥ ते फळोद्भवें व्यक्तीसि येती ॥ येऱ्हवीं अव्यक्तपणेंचि असती ॥ तद्रूपेंचि अंकूर निघती ॥ पुण्य अघें होती तेणेंचि पैं ॥ ६९ ॥ आणि वासनांची स्वरूपस्थिति ॥ पूर्वींही सांगितली तुजप्रति ॥ त्याची वासना जाणिजेती ॥ आयिकें गति तयांची ॥ १७० ॥ तया वासना संगसंपत्ति ॥ जालिया चित्तासी चित्तत्वस्थिती ॥ वासनाक्षयें अचित्तगति ॥ शुद्धस्थिती सर्वदा ॥ ७१ ॥ विषयापेक्षा त्याचि गा वासना ॥ तेणें चित्त पावे चित्तपणा ॥ वासना जालिया सर्व लीना । तेणें चित्तपणा मुकलें ॥ ७२ ॥ नाहो पूर्वसंस्कारें वासना होती ॥ त्या तंव प्रारब्धरूपें ठसावती ॥ प्रारब्धाची अलोटगति ॥ नव्हे समाप्ति कोटिउपायें ॥ ७३ ॥ ज्ञान जालियानंतरें ॥ संचितक्रियमाण तत्काळ सरे ॥ परी प्रारब्ध तें भोगार्थ उरे ॥ सर्वथा न सरे ज्ञानेंहीकरीं ॥ ७४ ॥ तेथें वासनाक्षय कोणें होये ॥ कैसें चित्ताचें चित्तपण जाये ॥ हें तंव अभिनवचि आहे ॥ कोण उपाय त्या बोला ॥ ७५ ॥ हें तंव बोलिलें तें यथार्थ ॥ संस्कारप्रारब्धरूपें भोगार्थ ॥ जालें तें अचळ निश्चितार्थ ॥ नाहीं ढळत ज्ञानेंकरूनी ॥ ७६ ॥ ज्ञानाच्याहीपेक्षां थोर ॥ प्रारब्धाचें फल गंभीर ॥ तयाहीपरी सबळ फार ॥ महाथोर योगाचें ॥ ७७ ॥ परि ज्ञानें विश्व बाधित होये ॥ विषयजात तें मिथ्यारूप पाहें ॥ मिथ्यत्वावरी वासना जाईल काये ॥ गेलीही होताहे बाधित ॥ ७८ ॥ यालागीं ज्ञानेंही वासना नाशती ॥ प्रारब्धभोग तेही बाधिजेती ॥ जालेही ज्ञानी न मानिती ॥ मिथ्या देखती सुखदुःखें ॥ ७९ ॥ दुःखें दुखवोनी जे दुःखी होती ॥ उद्वेगें देहाकारप्रतीति ॥ तयांसिच दुःखें दुःख देती ॥ ज्ञानियांप्रति तें तंव नाहीं ॥ १८० ॥ तैसेंचि सुखें जे सुखावती ॥ सुखभोगें धन्य ऐसें मानिती ॥ आणिकाची अपेक्षा करिती ॥ तेचि बुडती तेणें सुखें ॥ ८१ ॥ तैसे नव्हती ते ज्ञानीजन ॥ ते सुखदुःख देखती समान । दोहींचें जाणती नश्वरपण । नव्हती उद्विग्न कां सुखरूप ॥ ८२ ॥ हें सुख हें दुःख निवाडाही जाणती । परी दुःखेंकरूनि तळमळ न करिती । बाधित सर्वेही देखती । स्पृहा न करिती सुखाची ॥ ८३ ॥ दोहींही मिथ्याभूत ते नश्वर । क्षणयेकही नव्हती स्थिर । सुखीं राग दुःखीं इतर । नाहीं साचार ज्ञानबळें ॥ ८४ ॥ यदर्थी शारंगधरें । बोलिलें गीतेसि निर्धारें । तेंचि परिसिजे येकाकारें । जेणें स्फुरे अर्थ सकळ ॥ ८५ ॥

संमतिश्लोक । दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः । वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते ॥

ययाचा अभिप्रायार्थ । पूर्वींच बोलिला निश्चित । तोचि भाव जाणिजे यथार्थ । नाहीं अन्यार्थ सर्वथा ॥ ८६ ॥ ज्ञानेंही वासना नाशती । इत्यादि खूण जाण उपपत्ति । तें प्रारब्धातेंही न गणिती । मिथ्या देखती देहादिसर्व ॥ ८७ ॥ आणि योगें प्रारब्धभोग नाशे । तें सर्वेही शास्त्रीं बोलिलें असे । तें तंव नव्हे अनारिसें । अनुभवें असे तैसेंचि ॥ ८८ ॥ योगाभ्यासें सम्यक् समाधि । लागलीया चिरकालावधि । प्रारब्धभोग काय तया बाधी । सुखदुःखबुद्धि रिघेना ॥ ८९ ॥ ऐसें अनुभवसिद्धही

---

१ भाजलेलें २ सर्प. ३ नाश पावतें. ४ स्पष्टपणास. ५ विषयांच्या इच्छा. ६ ज्ञानाच्याही हातून. 'ज्ञानेंही कांहीं' असा पाठ. ७ इच्छा. ८ पुष्कळ वेळपर्यंत. ९ 'थारेना' ( स्थिर होत नाही ) असाही पाठ.

असे । यालागीं योगें प्रारब्ध नाशे । ह्मणोनियां योगाभ्यासें । नाशु असे वासनेसी ॥ १९० ॥ ह्मणोनि वासनेच्या क्षयासी । योगाभ्यास सांगे हृषीकेशी । प्राणनिरोधें वासनांसी । क्षयो सर्वांसि निर्धारें ॥ ९१ ॥ ह्मणोनि आसनपूर्वक प्राण । रोधिलया वासनाक्षय संपूर्ण । वासनाक्षयें जाण चित्तपण । अचित्तपण सर्वदा ॥ ९२ ॥ अगा अचित्त तेंचि ब्रह्म पूर्ण । अचित्त तेंचि चैतन्यघन । अचित्तपणें विश्वअभान । अचित्त पूर्ण पूर्णत्वें ॥ ९३ ॥ वासनायोगें चित्तपण । वासनाक्षयें अचित्त जाण । चित्तें संसार होये दारुण । अचित्तें पूर्ण ब्रह्मत्व ॥ ९४ ॥ वासनाक्षयाचा उपावो । तो सांगितला तुज निर्वाहो । आतां जैसी इच्छा तैसा रघुरावो । करूनि भावो माने तैसा ॥ ९५ ॥ आतां आणीकही उपायप्रकार । सांगेन तुज महाथोर । जेणें ज्ञानप्राप्ति होये सत्वर । आणि निर्धार अज्ञानाचा ॥ ९६ ॥ तें अज्ञान गा नाशे तत्क्षणीं । सर्वां वासनांची होय धुणी । तें वर्म कोदंडपाणी । सांगों वचनीं आइक पां ॥ ९७ ॥ सर्व उपाय अलंकाराचे । शिरोमणि जे कीं मुगुटींचे । जे साजे साधिलिया उपायांचे । उद्दीमस्थाचे खांवती ॥ ९८ ॥ सर्वांही उपायांचा राजा । तो तूं पेकें गा सौमित्राग्रजा । जो करितां संसृति[3]समाजा । मुक्त वोजा होइजे कीं ॥ ९९ ॥

साधुसंगमसच्छास्त्रपरो भवसि सन्मते[4] । तद्दिनेनैव नो मासैः प्राप्नोसि[5] परमां धियम् ॥ ८ ॥

साधुसंगमसच्छास्त्र । येथें होसी जैं तत्पर । तरी तद्दिनींच[6] असे बुद्धि थोर । पावसी निर्धार विबुधपती ॥ २०० ॥ सत्समागमाहूनि सार । समाधान नाहीं महाथोर । तैसेंचि जाण सच्छास्त्र । जेणें दुस्तर निस्तरिजे ॥ १ ॥ परी नानासाधनें करितां । तैसी सद्बुद्धि नव्हे गा रघुनाथा । जिये बुद्धीस्तव भवव्यथा । जाय भस्मता क्षणमात्रें ॥ २ ॥ बुद्धिशब्दें जाण । जेणें निःशेष तुटे अज्ञान । अज्ञाननाशें ब्रह्म पूर्ण । प्राप्त जाण सर्वथा ॥ ३ ॥ अगा तैसी बुद्धि सद्गुरूकरून । साधुशब्दें तोचि तो जाण । तयाच्या मुखें सच्छास्त्रश्रवण । तेणें पूर्ण ज्ञान होये ॥ ४ ॥ साधुसंग आणि सच्छास्त्रश्रवण । जे दिवशीं पुरुषासि होये जाण । तेचि क्षणीं ज्ञान होये संपूर्ण । तेथ विलंब असेचिना ॥ ५ ॥ अगा महाभाग्येंकरून । सत्समागम आणि सच्छास्त्रश्रवण । होतां तेचि क्षणीं जाण । सुखसंपन्न तो होये ॥ ६ ॥ तेथ नलगे येक मासभरी । तेथें वर्षांची काय कुसरी । तेचि क्षणीं दशग्रीवारी । सद्बुद्धि वरी तयातें ॥ ७ ॥ परम बुद्धि ययास्तव बोलिजे । जियेहूनि थोर बुद्धि न देखिजे । सर्वां वरिष्ठ तें ज्ञान सहजें । नाहीं दुजें तत्समान[7] ॥ ८ ॥ तो ज्ञानोदयो होतांचि क्षणीं । अज्ञानाची होये धुणी । स्वतःसिद्ध ब्रह्मत्व आणि । बुद्धि निर्वाणीं तेचि ते ॥ ९ ॥ तेचि बुद्धि पाहिजे सत्संगेंकरीं । दुसरी सच्छास्त्रभरोवरी । तेचि दिवशीं सद्बुद्धि वरी । नलगे दुसरी मासमर्यादा ॥ २१० ॥ सच्छास्त्रशब्दें[8] निगमशिर[9] । ज्या कीं उपनिषदा महा उदार । तदर्थ तें वेदांत महाथोर । तेंचि सच्छास्त्र बोलिजे ॥ ११ ॥ संत तोचि सद्गुरुरावो । त्याचेनि मुखें वेदांतश्रावो[10] । जालिया तोचि नाशी ठावो । आन भावो असेचिना ॥ १२ ॥ अगा होतांचि सद्गुरुचरणीं मिळणी । तन्मुखें वेदान्त पडे श्रवणीं । ब्रह्मज्ञान होय तत्क्षणीं । हातधरणी ब्रह्म भेटे ॥ १३ ॥ ब्रह्म स्वतःसिद्ध स्वयेंचि असे । परी तें अज्ञानें व्यवधानिलें असे । अज्ञाननाशें भेटलें पेसें । जाणतसें तयापरी ॥ १४ ॥ जैसें कंठगत चामीकर । भ्रमें आला त्याचा विसर । भ्रमनाशें आनंद थोर । प्राप्त प्रकार मानूनियां ॥ १५ ॥ अथवा सच्छास्त्रवेदांतादिक । अध्यात्मशास्त्रेंही सम्यक । तें आणि संत ज्या सद्गुरूसि तुक । तेचि देख संतशब्दें ॥ १६ ॥ येथेंही जालिया तत्पर । ज्ञान होयेचि हा निर्धार । उभय अर्थांचें अर्थांतर । सर्वसार शास्त्रसंत ॥ १७ ॥ पैसिया जे दिवसीं गा रघुनाथा । सच्छास्त्र आणि संतीं प्रीति उपजतां । तेचि क्षणीं पावे ब्रह्मता । विलंबु सर्वथा असेचिना ॥ १८ ॥ तेथें वासनेची कैंचीं गोठी । सर्व ब्रह्ममय जाली सृष्टि । वासना कासयाची कोणासि उठी । जाण जगजेठी विबुधनाथा ॥ १९ ॥ आणीकही येक उपाय थोर । जेणें तुटती वासनासंभार । तोचि सांगिजेल प्रकार । आयिक येकाग्र करूनि मन ॥ २२० ॥ परी तेही उपाय जानकीपती । सत्संगानंतरेंचि होती । परी पूर्वीं करितां न साधती । अंतरें असती ह्मणऊनि यां ॥ २१ ॥ तऱ्ही तेंही सांगों प्रकारत्रय । जेणें नव्हती वासनोद्भव । त्या येकयेकीं सामर्थ्य गौरव । सांगेन भाव तो आयिका ॥ २२ ॥

---

१ 'प्रणव' असा पाठ. २ निःशेष नाश. ३ अनेक संसारापासून. ४ 'राम चेत्' असा पाठ. ५ 'प्राप्तोसि' असा पाठ. ६ त्याच दिवशीं. ७ मोठेपणा. ८ 'शास्त्र' असा पाठ. ९ वेदांचे मस्तक. १० वेदांत ऐकणें. ११ 'सर्वशिर' असा पाठ.

असंगव्यवहारित्वाद्भवभावनवर्जनात् । शरीरनाशदर्शित्वाद्वासना न प्रवर्त्तते ॥ १ ॥

आतां प्रथम साधन तें ऐसें । असंगपणीं व्यवहार दिसे । तेणें वासना निःशेष नाशे । पुढें न प्रवेशे हृदयाकाशीं ॥ २३ ॥ तेंचि तें असंगत्व कैसें । तेंही सांगों गा सावकाशें । तऱ्ही सकळांव्यतिरिक्त स्वयें असे । बुझला असे गुरुमुखें जो ॥ २४ ॥ देहादि इंद्रियें आणि अहंकार । हा मिथ्याभूत सर्व संभार । तैसेंचि विश्व कल्पित चराचर । निर्विकार तद्भिन्न ॥ २५ ॥ जें जें आपणासि दृश्य । तें तें जाण मिथ्या आभास । आत्मप्रकाशकु स्वप्रकाश । असंग उदास नित्यपणें ॥ २६ ॥ हें सद्गुरुमुखें बरवे प्रकारीं । जो बोधला असेल पौलस्त्यारी । तेणें अनुसंधानें असंगपरी । जाणे कुसरी अकर्तेपणें ॥ २७ ॥ आपण निःसंग उदास । अकर्त्ता अभोक्ता परेश । कार्यकर्तृत्वादि नाहीं क्लेश । जैसें आकाश अलिप्तपणें ॥ २८ ॥ येऱ्हवीं तऱ्ही रघुनाथा । परबाहिरी चाले कर्मव्यवस्था । ते बलात्कारें घे आपुले माथां । भवपंथा पाडावया ॥ २९ ॥ ऐशी संमति असे थोर । जे बोलिला श्रीकृष्ण उदार । तेचि सांगों एक उत्तर । श्रोते चतुर परिसोत ॥ २३० ॥ अगा शरीरवाचामानसें । जें जें कर्म निपजत असे । तें अधिष्ठानपंचक आपैसें । होतचि असे शुभाशुभ ॥ ३१ ॥

**संमति श्लोक** । पंचैतानि महाबाहो कारणानि निबोध मे । सांख्ये कृतांते प्रोक्तानि सिद्धये सर्वकर्मणाम् ।
अधिष्ठानं तथा कर्त्ता करणं च पृथग्विधम् । विविधाश्च पृथक्चेष्टा दैवं चैवात्र पंचमम् ।
शरीरवाङ्मनोभिर्यत्कर्म प्रारभते नरः । न्याय्यं वा विपरीतं वा पंचैते तस्य हेतवः ।
तत्रैवं सतिकर्त्तारमात्मनं केवलं तु यः । पश्यत्यकृतबुद्धित्वान्न स पश्यति दुर्मतिः ॥

श्यामसुंदर राजीवलोचना । देवादिदेव विराजमाना । करीं प्रपंचाचें विडंबणा । दीनोद्धारण करावया ॥ ३२ ॥ श्रीकृष्ण ह्मणे गा अर्जुना । सांगेन याची विवंचना । कर्मसिद्धीचिया प्रयोजना । सांख्यीं जाणा निवाड केला ॥ ३३ ॥ सर्व कर्म जेंहीं निपजे । तें न्याय्य अथवा अन्याय्य जें । त्यांचीं पांच कारणें जाणिजे । सांगों ज्याजें येणेंचि ॥ ३४ ॥ तऱ्ही सकळांचें जें अधिष्ठान । तें प्रथम हें शरीर जाण । तैसाचि अहंकार कर्त्ता पूर्ण । जयालागून प्रमाता ह्मणती ॥ ३५ ॥ तिसरा समुदाय इंद्रियांचा । परी वेगळा व्यवहार त्यांचा । तैसाचि विकारु यया प्राणांचा । विविधा पांचा प्राणशक्ति ॥ ३६ ॥ पांचवें दैव पूर्वसंस्कार । तेणेंचि सर्वांसि चेष्टा विकार । अदृष्टें होय कर्माचार । हा निर्धार रघुनाथा ॥ ३७ ॥ अथवा दैवशब्दें जाण । अधिष्ठात्री देवता ह्मणती सज्ञान । येहीं पांचा कारणीं करून । क्रिया निर्माण होय सर्व ॥ ३८ ॥ येहीं पांचा कारणींकरुनी । सर्व कर्म निपजे कोदंडपाणी । आत्मा निर्विकार अकर्त्तेपणीं । राहे निर्वाणीं साक्षित्वें ॥ ३९ ॥ तोचि साक्षीययाचा प्रकाशकु । अकर्त्ता अभोक्ता सर्वात्मकु । ऐसें असोनिही अविवेकु । करी कुतर्कु कर्त्तेपणाचा ॥ २४० ॥ अगा देहात्मबुद्धीकरुनी । कर्त्ता भोक्ता आपणातें मानी । ते देहात्मबुद्धि भरंवसेनी । सद्गुरुकृपेनी ज्याची गेली ॥ ४१ ॥ त्यासी असंगपणें कर्म करितां । सर्व शरीरव्यवहारकर्त्तव्यता । क्लेश नाहींत श्रीरघुनाथा । कूटस्थ आइता कर्माध्यक्षु ॥ ४२ ॥ ऐसा असंगत्वें व्यवहार करितां । वासना नुपजती गा सर्वथा । हा उपाय येकु रघुनाथा । दुजा महंता परियेसी ॥ ४३ ॥ तरी भवभाववर्जनकरीं । वासना नुठती गा धनदानुजारी । तेही आयिक पां कुसरी । सांगों विस्तारीं जैसी असे ॥४४॥ भव शब्दें संसारजात । त्यासि ब्रह्माच्या ठायीं भावना भावित । हेचि विपरीतभावना निश्चित । विश्वाचें तथ्य नेणोनियां ॥ ४५ ॥ जैसा स्वप्नाभास स्वप्नीं भासे । तो अवस्थांतरीं न दिसे । ऐसें जाणोनिही घेऊन बैसे । यथार्थ ऐसें मानुनी॥४६॥ मिथ्याभूत ऐसी होय प्रतीति । तरी भ्रमें यथार्थ मानिती । हे नवल भ्रमाची स्थिती । काय रघुपति बोलावें ॥ ४७ ॥ तें जैसें आहे तैसेंचि मानावें । इतुकें तया न करवे । विपरीतचि आघवें । जें न करावें तेंचि करिती ॥४८॥ जैसें आहे तैसेंचि देखतां । तयाचें कांहीं न वेचे गा सर्वथा । यालागीं सत्य बुद्धि गा तत्वतां । प्रपंचीं रघुनाथा न करावी ॥ ४९ ॥ यथार्थाचें अयथार्थ देखणें । येकाचे ठायीं अनेक भाषणें । नसतें तेथ कल्पणें । भावना येणें कारण होये ॥ २५० ॥ पाषाणीं जैसी देवबुद्धि । अश्वत्थप्रमुखादिकीं तेचि वृद्धि । येक दिसतां येक प्रतिपादी । भावना सुबुद्धी इये नाम ॥ ५१ ॥ कीं आकाशीं जैसी निळिमा । कीं मेघीं गंधर्वपूरसीमा । रश्मीसि मृगांभमहिमा । भुजंगप्रतिमा दोरीसि

१ समूह; 'संसार' असा पाठ. २ परभारी; 'परी बाहेर' असा पाठ. ३ रहाण्याची जागा. ४ 'असोनि अविवेकु.' असा पाठ. ५ हे कुबेराच्या बंधूच्या ( रावणाच्या ) शत्रो ! ६ जसें नाहीं तसें ( खोटें ). ७ बोलतो. ८ किरणांस.

भावी ॥ ५२ ॥ दर्भमुष्टीचा यजमान । सोमवल्लीनाम अमृतपान । परी तें शास्त्रदृष्टिप्रमाण । विप्र तें प्रमाण सत्य ह्मणतु ॥५३॥ तैसें सत्य ब्रह्माचा ठाईं । असत्य विश्वाची भावना पाहीं । हे त्यजिलिया वासना कहीं । तुटिजे कांहीं बोलावें नलगे ॥ ५४ ॥ अगा जो जो पदार्थ साच दिसे । तेथेंचि वासना हे प्रवेशे । तेंचि असत्य ऐसें जऱ्ही भासे । तऱ्ही वासना नासे उपजलीही ॥ ५५ ॥ अगा असत्य मृगांभभासलें । त्याचें स्वरूप यथार्थ कळलें । तेथ मन काय प्रवर्त्तलें । तृषाही पीडलें जऱ्ही असे ॥ ५६ ॥ कां वोडंबरीचे अलंकार । देखिले अतिमनोहर । कां दर्पणीचा अ-अपूर्व हार । देखिल्या सत्वर बुद्धि नोहे ॥ ५७ ॥ तैसें विश्व हें मिथ्या देखिलें । तेथें वासनेचें आर्घोच उपडलें । प्रवर्त्तलियाही बोलें । कोणें काळें प्रवर्त्तेना ॥ ५८ ॥ तैसें असत्य कळलियावरी । वासना न धरी तयावरी । मग आपेआप दनुजारी । वासना पुरी भस्म होय ॥ ५९ ॥ हें दुसरें साधन गा रघु-राया । सांगितलें वासनाक्षया । तिसरेंही चित्त देऊनियां । परिस तनया कौसल्येच्या ॥ २६० ॥ जऱ्ही विश्व असत्य देखिलें । तेणें वासनाहिबळ विरालें । परी शरीर असे साच भाविलें । त्यालागीं मेलें विषयांध ॥ ६१ ॥ जोंवरी हें शरीर साचचि भासे । तंव उत्तम यासि पाहिजत असे । त्या विषयां लागीं अनायासें । वासना प्रवेशे पदार्थजातीं ॥ ६२ ॥ त्यालागीं तिसरें साधन गा रघुपती । तेंही सांगेन तुजप्रति । शरीनाश क्षणक्षणाप्रति । देखावा सुमती विवेकेंही ॥६३॥ जें हें शरीर दृश्य असे । तें तव आपणा देखतांचि नाशे । पितादिपरंपरा कोठें असे । शरीर न भासे त्यांचें कांहीं ॥६४॥ तैसेंच आपुलेंही शरीर । नाशिवंत परिणामी थोर । बाळयुवादिकप्रकार । वृद्ध तरुण साचार तेंचि जालें ॥६५॥ ऐसा क्षणक्षणाप्रति नाश । देहाचा देखावा सावकाश । आत्मदृष्टी लक्षितां परेश । होय दास शरीर-भावीं ॥६६॥ देह हें अध्यस्त स्वरूपीं असे । स्वरूपप्रकाशें शरीर न भासे । न भासतां नाशलेंचि दिसे । जाण ऐसें दितिजारी॥६७॥सर्वदा स्वरूपस्थिति असतां । शरीर न भासे जगन्नाथा । आणि शरीरनाश सर्वदा देखतां । तुधविती माथा वासना इया ॥ ६८ ॥ कां अतिवैराग्य तीव्रपणें । आणि आत्मानात्म-विवेकें निपुणें । शरीरनाश सर्वदा देखणें । वासना तेणें भस्म होती ॥ ६९ ॥ एवं या साधनत्रयें करून । होय वासनाक्षय संपूर्ण । मागुता वासनांकुर कोठून । उगवेल जाण अनाथबंधो ॥ २७० ॥ अगा जेणें भावें जो असे । तयासि तैसेंच फळ होतसे । मूढेंही भावितां होय विशेषें । सज्ञानियासि काय अपूर्व ॥ ७१ ॥ मूढें देहचि होतु । जैसा भृंगकीटकाचा वृत्तांतु । दुःखें दुःखरूपचि होतु । सुखीं सुखावतु सुखरूपें ॥ ७२ ॥ ब्रह्म भावितां ब्रह्मचि होये । संसार कल्पितां तेंचि आहे । यालागीं जें भावी तेंचि होये । नवल पाहें भावनेचें ॥ ७३ ॥ तेंचि आतां आयिकें रघुपती । सांगेन भावनेची ख्याति । तेणें तुज चमत्कार चित्तीं । होय सिद्धार्थी[4] सीताकांतां ॥ ७४ ॥

दृढभावानुसंधानाद्विमूढा अपि राघव । विषं नयंत्यमृततताममृतं विषतामपि ॥ १० ॥

अगा भावशब्दें पदार्थ जाण । तें दृढभावें करितां अनुसंधान । मूर्खही पावे तदाकारपण । भावी तें पूर्ण तेंचि होये ॥ ७५ ॥ विषाचा ठाईं अमृताध्यासु । करितां तेंचि होय शुद्धांशु[5] । अमृतीं करितां विषाध्यासु । अमृतलेशु विषचि होये ॥ ७६ ॥ कोण्ही एका भुजंगें दंशिलें । तयातें कृपेनें अपरें वंचिलें । कैंच्या[6] वृश्चिकें खादलें । मरणभय गेलें इतुकेनि निश्चित ॥७७॥ वृश्चिकाचेनि जीविताध्यासें । सर्पकृतभय गेलें कैसें । विषचि अमृत जालें आपैसें । मरणपिसें ढळे त्याचें ॥ ७८ ॥ तेंचि येकु वृश्चिकें दंशिला प्राणी । तयासि सर्पभय लावी कोणी । तो सर्पाध्यासेंचि तत्क्षणीं । मरण जीवनीं पावतु ॥ ७९ ॥ वेताळभयाध्यास बाळकासी । नसता मृत्यु होये निश्चयेंसी । गेला ह्मणतां सुखा-ध्यासीं । जीवितासि पावत ॥ २८० ॥ जड कीटकी भृंगी होत ॥ हें दृढाध्यासाचें जाण सामर्थ्य । किंबहुना भावी जो जो अर्थ । पुरुष भावार्थ तैसाचि पावे ॥ ८१ ॥ अथवा विषरूप जें दुष्टकर्म । तेंचि उत्तम या ध्यासें करी अमृतोपम । कां अमृतासारिखा जो स्वाचारधर्म । तो विषम अध्यासें मानी ८२

सत्यभावेन दृष्टोयं देहो देहो भवत्ययम् । दृष्टस्त्वसत्यभावेन व्योमतां याति देहकः ॥ ११ ॥

अगा प्रत्यक्ष पाहें रघुपती । सत्यत्वें भाविल्या देहमूर्ति । सत्यचि भासे याची व्यक्ति । अचळ कल्पांतीं चळेना ॥ ८३ ॥ देह भावितां देहचि होत । तो सर्वदा सत्यत्वेंचि स्फुरत । लोटल्याही

१ 'कांहीं' असा पाठ. २ 'टवाळ' (लटकेपणा) असा पाठ. ३ वर करीत नाहींत. ४ 'सर्वार्थी' असा पाठ. ५ अमृताचा भ्रम. ६ 'ह्मणे भुजंग कैंचा वृश्चिकें खादलें' असा पाठ.

कल्पाचा अंत । असत्यभूत कदा नव्हे ॥ ८४ ॥ अदेह जों कीं आत्मा जाण । तो देह भावितांची पावे देवपण । तोचि देखतां असत्यभावें करून । देह असून पूर्णत्व पावे ॥ ८५ ॥ तो देखतांचि असत्यबुद्धी । व्योमता पावे त्रिशुद्धी । असत्यपणें बाणे बुद्धी । नव्हे आधीसी तो हेतु ॥ ८६ ॥ तो सत्य भावितां सत्यचि जाला । असत्य भावितां नाहींच केला । रज्वादि सर्प भावितां स्फुरला । तोचि मोडला रज्जुदर्शीं ॥ ८७ ॥ तोचि विचारें जैं सर्पु देखिजे । तऱ्ही तो असंतपणेंचि नाहीं सहजें । भयादि सर्वथा नुदैजे । सुखें असिजे सुखपणें ॥ ८८ ॥ हेंचि तुज दृष्टांतें सांगेन । तें एकाग्र आयिकें गा रघुनंदन । जेणें संदेह होऊनि भस्म पूर्ण । पावे खूण निश्चयाची ॥ ८९ ॥

सुखतल्पगतो येन स्वप्नदेहेन दिक्तटात् । परिभ्रमसि हे राम संदेहस्ते क्व सांप्रतम् ॥ १२ ॥

अगा सुखरूप पर्यंक सुपतीवरी । निद्रा केलिया सुखशेजारीं । तोचि अन्यदेहीं स्वप्नाभीतरी । दिशा चाऱ्ही हिंडतु ॥ २९० ॥ तरी स्वयें तूंचि पाहें रघुराया । सुखशेजारीं निद्रा करूनियां । नसता अन्यदेह धरूनियां । स्वप्नींयाह्यांळिया[1] खेळसी ॥ ९१ ॥ तोचि जेणें स्वप्नदेहेंकरुनी । सुखसंपत्ति भोगिली स्वप्नीं । तोचि देह जागृतीसि कोदंडपाणी । जना नयनीं न दिसे ॥ ९२ ॥ अथवा सुषुप्तीसि ही भेटता । तरी तो साच मानिजेता । कोठेंही उपलब्धि पावतां । न दिसे ताता क्षणहीभरी ॥ ९३ ॥ तैसाचि देह मंगळमूर्ती । जागृतीसि भासे सत्यत्वें व्यक्ति । तोचि पाहतां स्वप्नसुषुप्तीं । येही अर्थीं भासेना ॥ ९४ ॥ अगा जे कीं सत्य वस्तु असे । ते काळत्रयीं साचचि दिसे । जें कोण्हे काळें बांधलें नसे । तेंचि वसे सर्वदा ॥९५॥ देह तरी येकेचि काळें भासे । स्वप्नीं तो आनेंचि आभासे । सुषुप्तीसि तऱ्ही कांहींच नसे । तरी तें सत्य कैसें सांगपां ॥ ९६ ॥ जैसाचि स्वप्नदेह भ्रमें भासे । तो जागृतीसि कोठेंचि न दिसे । जागृतीसि तैसाचि देहही असे । परी भ्रंशे मिथ्यापणें ॥ ९७ ॥ हा अध्यस्त[4] असे स्वस्वरूपीं । ह्मणोनी आत्मत्वें भलताचि आरोपी । अविचारितां सिद्धि जीवस्वैरूपीं । विचारें भ्रमरूपीं । असत्यचि हा ॥९८॥ अगा असत्यैंसि असत्यपणें । देखतां काये हारेये उणें । असत्याचेनि नाहींपणें । हानि कोणें गुणें होये ॥ ९९ ॥ देह हा असत्यपणें देखतां । वासनामात्र नुपजती गा रघुनाथा । देहाचेनि नाशें जगनाशता । होय तत्वता रामचंद्रा ॥ ३०० ॥ अगा विश्व हें असत्य भासतां । स्वतःसिद्ध ब्रह्म ये हाता । स्वयेंचि बाणे पूर्णता । नलगे कथा साधनाची ॥ १ ॥ अगा मुख्य स्वस्वरूपा आड । देहादिप्रपंचाचें पडलें कवाड[5] । तेंचि नाहीं जालिया उघड । सुख उदंड सच्चिदानंद ॥ २ ॥ यालागीं श्रीरघुपती । देह बुद्धि खोटी हे सर्वार्थीं । हे आहे तों स्वस्वरूपप्राप्ति । कदाकल्पांतीं घडेना ॥ ३ ॥ तयालागीं इतुकेंचि करावें । आह्मी सांगों तें दृढ धरावें । धरिलया इतकेंचि स्वभावें । स्वसुख आघवें पावशील ॥ ४ ॥

देहोऽहमिति धीस्त्याज्या सर्वनाशेऽप्युपस्थिते । स्प्रष्टव्या सा न भव्येन श्वमांसेनेव पुल्कसी ॥ ३ ॥

ह्मणोनि देह मीच ऐसी बुद्धि । आत्मयासि लागली क्षयव्याधि । ते सर्वथा त्यजावी गा त्रिशुद्धी । निरंतर आधि हे खोटी ॥ ५ ॥ अगा जिये देहात्मबुद्धीकरून । अनर्थकोटि अतिदारुण । होती तियेतें संग्रहून[6] । कार्य कोण रघुवर्या ॥ ६ ॥ अगा ब्रह्मकल्पाचिया कोटी । पहावें जन्ममृत्यूचिया वाटीं । ते देहबुद्धि सर्वथा खोटी । त्यजीं जगजेठीं मुळींहुनी ॥ ७ ॥ नाहो देहबुद्धी सर्व संसार । देहबुद्धीनें होय सर्वसार । देहबुद्धीनें पुत्र वित्त गृह दार । सुखसंभार देहबुद्ध्या ॥ ८ ॥ देहबुद्धीनें जप तप अनुष्ठान । देहबुद्धीनें यज्ञदानादिसाधन । देहबुद्धीनें देव देवतार्चन । परलोकगमन देहबुद्ध्या ॥ ९ ॥ ते देहात्मबुद्धि टाकितां । इत्यादिक सर्व सर्वथा । तरी त्यजावी कसी जी अहंममता । सांग ताता कृपा करुनी ॥ ३१० ॥ तंव वसिष्ठ ह्मणती गा श्रीरघुपती । जऱ्ही सर्व नाशाची जाली उपस्थिति । तऱ्ही हे गा त्यजावी सर्वार्थीं । नको सुमती थारा देवों ॥ ११ ॥ अगा निरतिशय लाभाकारणें । अल्प लाभु लागे टाकणें । इत्यादि लाभ नव्हती मूर्खपणें । व्यर्थ करणें काळक्षेपु ॥ १२ ॥ तो काळक्षेपु ऐसा जाण । स्वसुखा सांडोनियां संपूर्ण । बाह्यार्थी करी कर्माचरण । काळक्षेपण याचें नाम ॥ १३ ॥ यातेंही वासनाचे ह्मणिजती । येहीं होये पुनरावृत्ति । अज्ञानियांसि परम प्रीति । ज्ञानी मानिती अंतरायभूत[10] ॥ १४ ॥ तेंही सांगों रघुनाथा । या वासनेचि समूळ कथा । येकी शुद्ध

१ 'चि बोधे बोधीं' असा पाठ. २ स्वप्नरूप खेळांत. ३ निराळाच. ४ अध्यास—एका वस्तूवर दुसऱ्या वस्तूचा आरोप. ५ दरवाजा; पडदा. ६ संग्रहीं ठेवून. ७ 'व्यवहार' असा पाठ. ८ मासी. ९ पुनर्जन्म. १० विघ्नरूप.

येकी मळिण ताता । तेचि आतां सांगेन ॥ १५ ॥ मळिण त्या संसारभावना । सर्वदा ज्या विषयवासना । विषयीं प्रीति रे रघुनंदना । मलिना वासना जाणाव्या ॥ १६ ॥ शुद्ध याही द्विप्रकार । सांगेन त्यांचा विचार । येकी मलिना येकी शुद्धतर । भेदांतर परियेसीं ॥ १७ ॥ संध्या स्नान देवतार्चन । जप तप यज्ञ अध्ययन । तीर्थाटण अतीथिपूजन । इच्छा पूर्ण करावया ॥ १८ ॥ इत्यादिकी त्या शुद्ध वासना । परी शुद्धामध्यें ही या मलिना । शुद्धतर ते रघुनंदना । जे विचारणा महावाक्याची ॥ १९ ॥ करावें वेदांतश्रवण । गुरुमुखें महावाक्य परिशीलन । समाधिसुखें सुख करून । अनीह पूर्ण बैसावें ॥ ३२० ॥ हे शुद्धतर वासना । लक्षण जाण गा रघुनंदना । स्वसुखें रहावें आनंदघना । सर्व वासना टाकूनियां ॥ २१ ॥ बृहद्वासिष्ठसंमति । सांगों आयिकें कल्याणमूर्ती । तेचि धरूनियां चित्तीं । स्वरूपस्थिती असावें गा ॥ २२ ॥

संमतिश्लोक ॥ कालं यज्ञतपोदानतीर्थदेवार्चनभ्रमैः । चिरमाधिशतोपेताः शपयंति मृगा इव ।
तस्माश्चैतां परित्यज्य दुर्दृष्टिं रघुनंदन । शुद्धां संविदमाश्रित्य वीतरागः स्थिरो भव ।

अगा मानासिक दुःखें अपरमित । तेणें आहाळे ज्यांचें चित्त । हें यज्ञदानादि आचरत । आपणा मानीत सदाचारी ॥ २३ ॥ जैसीं मृगें वनामाझारी । काळक्षेप करिती नानापरी । तैसें हे इत्यादि धर्माचारी । करिती संसारी काळक्षेपु ॥ २४ ॥ येणें पुनरपि प्राप्त संसृति । परी अखंडैक आनंद नेणती । वृथाचि धर्मपरायणें श्लाघती । चवी नेणती ब्रह्मानंदाची ॥ २५ ॥ तूं हे दुर्दृष्टि टाकूनि । निमग्न होयें ब्रह्मानंदस्थानीं । नलगे आचार सोसणी । सुखें सुखपर्णी असावें ॥ २६ ॥

संमतिश्लोक ॥ यत्सुखं साधनाधीनं दुःखमेव तदुच्यते । अनन्यसाधनं तस्मात्स्वात्मस्थं परमं सुखम् ।

साध्यसुख तें सुखाभासता । परी तें सुख नव्हे गा सर्वथा । हें वासनाकृत्यचि गा रघुनाथा । निर्वासना ते दुर्लभ ॥ २७ ॥ हें सर्व देहबुद्धीस्तव घडे । देहबुद्धीनें संसार जोडे । सत्कर्मादिककोडें । होय घडफुडें देहबुद्धया ॥ २८ ॥ ह्मणोनि जऱ्ही सर्व नाशु जाला । तऱ्ही इयेचा त्यागु पाहिजे केला । मीच देह ह्मणतां घातु संचला । आपला केला आपणेंचि ॥ २९ ॥ ऐसें कल्प कोटि जऱ्ही जाती । तऱ्ही जन्ममरण न सरे संसृति । तितुकिया ही आत्महत्या होती । ऐसी निष्कृति कैंची रामा ॥ ३३० ॥ असंख्य गोवधाचें वृजिन । तैसेंच आत्महत्येचें दारुण । होय तयासि गा संपूर्ण । 'देहोहं' जाण बुद्धि जयाची ॥ ३१ ॥ यालागीं भव्य जो सज्ञान । तेणें देहात्मबुद्धि हे परम हीन । न पोसावी त्यजावी जाण । दृष्टांतें सांगेन परियेसीं ॥ ३२ ॥ श्वानाचेनि मांसें अत्यादरें । पुल्कसी पोसिजे जैसी गवारें । तैसी देहबुद्धि अहंकारें । वासनांतरें पुष्ट कीजे ॥ ३३ ॥ अगा चांडाळामध्यें नीच याति । तियेतें पुल्कसी ह्मणती । तियेतें श्वानमांस सडलें निरूपिती । काय निवती तेणेंकरुनी ॥ ३४ ॥ पुल्कसी चांडाळी निर्दय सर्वार्थी । दर्शनें सचैल स्नान सर्वही करिती । तियेतें आलिंगूनि पढियंती । कोणें अर्थी शुद्धता देईल ॥ ३५ ॥ यालागीं देहात्मबुद्धि गा रघुनाथा । दुरी त्यजावी सर्वथा । इतुकेनि कार्यार्थ हाता । आला तत्वतां भरताग्रजा ॥ ३६ ॥ यालागीं देहबुद्धि सर्वथा खोटी । देहबुद्धीनें वासना लाठी । देहबुद्धीनें संसार लागे पाठी । यातना मोठी देहबुद्धया ॥ ३७ ॥ देहबुद्धि ज्ञानाचें पिधान । देहबुद्धि मुख्य तेंचि अज्ञान । देहबुद्धीनें संसार दारुण । नरक पूर्ण देहबुद्धया ॥ ३८ ॥ देहबुद्धि स्वरूपाच्छादक । देहबुद्धि अज्ञानाची द्योतक । देहबुद्धि तोचि नरक । तुच्छ देख देहबुद्धि ॥ ३९ ॥ किंबहुना गा धनुर्धरा । देहबुद्धीनें संसारपरंपरा । देहबुद्धि हिंडवी योनिद्वारा । अनर्थपसारा देहबुद्धि ॥ ३४० ॥ ह्मणोनि देहबुद्धि हे विबुधपती । सर्वथा टाकावी गा सर्वार्थी । देहबुद्धित्यागें सुखसंपत्ति । सीतापती पाविजे ॥ ४१ ॥ तंव राम ह्मणती जी श्रीगुरुराया । देहात्मबुद्धीतें टाकूनियां । मग काय करावें जी बैसोनियां । सांगावें स्वामिया कृपानिधी ॥ ४२ ॥ तंव वसिष्ठ ह्मणती आनंदमूर्ती । सांगेन कर्तव्य तें तुजप्रति । देहबुद्धिवियोगें सुमती । जिये स्थिती असावें ॥ ४३ ॥

ब्रह्मैकं भावयन्साधुः शांतास्तिष्ठेद्गतव्यथः । ततस्तेऽसावहंभावः स्वयमेव विनश्यति ॥ १४ ॥

तरी आइकें रघुकुळटिळका । सांगेन कर्तव्यतेचा उपाय निका । तरी येक ब्रह्मभावनेंचि देखा । नेणे आणिकां प्रपंचासि ॥ ४४ ॥ अगा शास्त्रदृष्टीकरून । कळलें प्रपंचाचें मिथ्यापण । सर्वत्र येक ब्रह्म पूर्ण ।

---

१ अतिशय शुद्ध. २ निरिच्छ. ३ 'तस्मादेतां' असा पाठ. ४ 'पाप' असा पाठ. ५ जलद. ६ पाप. ७ मी देह आहे. ८ मांगीण. ९ 'सडलेनि पोशिती' असा पाठ. १० झांकण. ११ खरा. १२ 'अनेका' असा पाठ.

तोचि खूण जाणावी ॥ ४५ ॥ तेणें सर्वदा सर्वत्र ब्रह्म येक । हेचि भावना करावी देख । न व्हावें कदा प्रपंचोन्मुख । अनेकीं येक परब्रह्म ॥ ४६ ॥ आणि भावनाशब्दें तद्रूपता । साधावी गा श्रीरघुनाथा । सर्वब्रह्मभावेंचि तत्वतां । सीताकांता असावें गा॥४७॥ऐसी निरंतर करावी ब्रह्मभावना । तेणें कामक्रोध नाशती तत्क्षणा । बुद्धीसि शांति उपजे सहस्रगुणा । विपरीत भावना नाशती ॥ ४८ ॥ देहादिप्रपंचाचें सत्यत्वभान । नव्हे तेंचि शांतीचें लक्षण । ब्रह्मदृष्टि प्रपंचाचें अभान । न देखे स्वप्न विश्वभ्रमाचें ॥४९॥ आणि जेव्हांचि प्रपंचभान गेलें । कामक्रोधही मावळले । तेव्हांचि सकळ वृथा उबदलें । दुःखादि गेले भोग त्याचे ॥ ३५० ॥ अगा प्रपंचाचें भान नसतां । मग सुखदुःखाची कैंची व्यथा । ह्मणोनि गतव्यथ तो सर्वथा । नाहीं तत्वतां व्यथालेशु ॥ ५१ ॥ रागद्वेष जेथ मावळले । जगाचें सत्यत्व जेथें गेलें । तेथें सुखदुःखव्यथा कोणें बोलें । बाधित जालें सर्व जन ॥ ५२ ॥ आधिभूत आधिदैव आध्यात्मिक । त्रिविध जाण हें सुखदुःख । तेंही सांगोपां सम्यक । येकाग्र आयिक रघुनाथा ॥५३ ॥ तरी भूतांपासूनि जें उपजे । तेंचि आधिभूत दुःख जाणिजे । देवीं जो जो उपद्रव कीजे । आधिदैवत सहजें त्याचें नाम ॥ ५४ ॥ देहीं ज्वरादिक उपद्रवमेळा । आध्यात्मिकदुःखगा वेल्हाळा । हा त्रिविधदुःखाचा येकवळा । नव्हे कोण्हे काळा तयासी ॥ ५५ ॥ कां जें जेहीं सुखदुःख द्यावें । अथवा जेणेंकरूनि भोगावें । तें बाधित जालें आघवें । दुःख मानावें कोणकोणाचें ॥ ५६ ॥ यालागीं तो गतव्यथ जाला । तेथें अहंभाव स्वयेंचि नाशला । सर्वब्रह्मभावेंचि बाणला । अहंभाव गेला गळोनी ॥ ५७ ॥ जया सर्वत्र ब्रह्मभावचि होये । त्याचा अहंकार समूळ जाये । सूर्यासवेंचि मावळताहे । प्रकाशु पाहें क्षणमात्रें ॥ ५८ ॥ जेव्हां देहानुसंधान ब्रह्मभावें । तुटोनि गेलें पैं आघवें । तेव्हांचि अहंभाव न समावे । स्वयेंचि पावे नाश समुळीं ॥ ५९ ॥

॥ सर्वत्रैक्यावबोधेन स्वस्थोंतःशीतलः सदा । निरहंकृतिराकाशो विशदस्तेन संस्थितः ॥ १५ ॥

ऐसा सर्वत्रैक्यावबोधेंकरुनी । सर्वदा अंतरीं शीतळ मनीं । स्वस्वरूपें स्थिरावोनी । राहे निर्वाणीं ब्रह्मसुखें ॥ ३६० ॥ तेणेंचि सुखें अंतरीं शीतळ । नेणे द्वैत सुखाचि तळमळ । बोधलियाचें सार्थक फळ । जो कीं प्रांजळ ऐक्यावबोधु ॥ ६१ ॥ देहादि जें कां प्रपंचजात । हें जयाचे ठाईं सर्व अध्यस्त । तें तेंचि जाणावें समस्त । नाहीं व्यतिरिक्त तयाविण ॥ ६२ ॥ अगा ज्याचे ठाईं असे अध्यस्त । तें तें जाणावें इत्थंभूत । जैसें कां आपुले ठायीं स्वप्न भासत । नव्हे व्यतिरिक्त आपलेंसें ॥६३॥ आपणेंविण तऱ्ही न भासे । प्रबोधलियां कोठेंचि न दिसे ॥ तऱ्ही सर्वही आपणचि असे । दुजें नसे तें ऐक्य जाण ॥ ६४ ॥ शुक्तीचा ठाईं रजत भासे । रजत तें शुक्तिकाचि असे । परस्परें भेदु न दिसे । ऐक्य तैसें जाणावें ॥६५॥ तैसें आपणासहित ब्रह्मेंसीं । ऐक्य बोधलें गा जयासी । न विस्फुरे भेदु तयासि । ऐक्यता ऐसी रघुपुंगवा ॥६६॥ रज्जुचि स्वयें व्यालरूप जाली । परी रज्जु ते रज्जुचि भली । सर्पबुद्धि वाव जाली । ऐक्यीं बोली तेचि असे॥६७॥ ऐसा ऐक्यबोधें जो बोधला । तोचि अंतर शीतळ भला । निरहंकृती आतला । कूटस्थ संचला आकाश जैसें ॥६८॥ तोचि तो ऐक्यावबोध जाण । जेणें जाला होय परिपूर्ण । जैसें कूटस्थ निरीह गगन । तैसा पूर्ण पूर्णत्वें ॥ ६९ ॥ तया सर्व ब्रह्म येकचि जालें । दुसरें न भासे कांहीं केलें । स्वयें ब्रह्म ह्मणोनि आतळलें । ब्रह्म संचलें तया येकें ॥३७०॥ स्वयें ब्रह्म तोचि विश्वमूर्ती । आनंद जाला तया त्रिजगतीं । द्वैत देखे त्या द्वैत दुःखस्थिति । आपणा देखती सुख दुःखरूप ॥७१॥ अगा जो जैसा अंतरीं असे । तैसोंचि तथा बाह्यही भासे । हें निश्चित जाणावें रघुवंशें । सावकाशें सांगेन ॥ ७२ ॥

---

१ नाहींसें झालें. २ दुःखरहित. ३ देहासंबंधाची कल्पना. ४ सर्वत्र ह्या एकेच आहे अशा बोधानें. ५ आरोपित. ६ ज्ञान झाल्यास. ७ सर्पाकारही. ८ इच्छारहित. ९ 'ब्रह्मही' असा पाठ.

अंतःशीतलतां याहि लब्धायां शीतलं जगत् । अंतस्तृष्णोपतप्तानां दावदाहमयं जगत् ॥ १६ ॥

अगा ऐक्यावबोधेंकरून । शीतळ अंतर जयाचें जाण । तया जग शीतळ परिपूर्ण । ब्रह्मत्वें जाण सुखरूप ॥ ७३ ॥ सकळ वासनांचे उपरमें । अंतरीं कोंदलें परब्रह्में । तया सकळ ब्रह्मचि संभ्रमें । गेलेनि भ्रमें ऐसें होये ॥ ७४ ॥ आणि अंतरीं तृष्णाग्नीकरुनी । तापला जैसा वडवाग्नी । तया दावदाहरूप जगनयनीं । त्रिकाळक्षणीं भासत ॥ ७५ ॥ बालाग्नीं सर्व संसार रघुनाथा । असे जाण वासनेच्या माथां । वासनाक्षयीं जीवन्मुक्तता । बाणे तत्वतां जाण तूं ॥ ७६ ॥ येथें संपलें हें प्रकरण । जें कीं बोलिलें वासनोपशमन । तयाचें यथामती टिपण । केलें दीपन सद्गुरुकृपें ॥ ७७ ॥ सद्गुरुचिया कृपादृष्टी । निजानंदें रंगूनि बोलिली हे गोठी । जेणें होती संतसंतुष्टि । स्वानंदपुष्टि पातलों ॥ ७८ ॥ सद्गुरुचरणकमलयुगुळ । निजानंदें रंगूनि अलिकुळ । पुढील प्रकरण अतिरसाळ । श्रोतीं सकळ परिसिजे ॥ ३७९ ॥ श्रीगुरुचा रंगनाथू । श्रोतां विनवीत विनीतस्थितु । पुढें आत्मोपास्ति विख्यातु । प्रकरण असे ॥ ३८० ॥ ते कथा असे अतिरम्य । श्रोतां ऐकिजे अनुपम्य । वसिष्ठराघवसंवाद गहन । अद्वैत आनंद जो ॥ ३८१ ॥

## इति श्रीयोगवासिष्ठसारे श्रीवसिष्ठरामसंवादे वासनोपशमप्रकरणं चतुर्थं संपूर्णम्



१ ' रंगनाथें बोलिली हे प्रसंगोष्टी ' असा पाठ. २ ' वरी भ्रमे रंगनाथ अलिउळ ' असा पाठ.

॥ श्रीः ॥

## प्रकरण ५ वें.

# आत्ममननप्रकरण.

॥ श्रीगणेशायनमः ॥ जय जय श्रीसद्गुरुमूर्ति । तूं अव्यक्तचि आलासि व्यक्ती । तूंचि कृपाळु त्रिजगतीं । माझी भ्रांति फेडावया ॥ १ ॥ तुझिया चरणदर्शनें । उठिलें आविद्येचें धरणें । परमानंद सर्वदा भोगणें । तो बोलावा कोणें स्वसंवेद्य ॥ २ ॥ तो तूं सच्चिदानंदमूर्ति । सन्मुख जालासि सदयस्थिती । स्वस्वरूप वर्णावया भारती । ग्रंथव्यक्ति वदविली ॥ ३ ॥ नातरी कोण्ही ऐसें ह्मणती । प्रथमारंभीं मंगलमूर्ति । वंदावा मंगलार्थ गणपति । ग्रंथसमाप्ति अविघ्न तेणें ॥ ४ ॥ त्यानंतरें वाग्देवता । जे कीं बोलिजे जगन्माता । कार्यसिद्धि तियेसी वंदितां । परंपरा ऐसी असे ॥ ५ ॥ ह्मणोनि प्रथम मंगलाचरणीं । वंदावी हे विघ्नेशभवानी । हें यथार्थचि परी माझ्या मनीं । अनुदिनीं आनचि असे ॥ ६ ॥ पाहतां गणेशाची मूर्ति । सर्वस्वें तूंचि येताहेसि व्यक्ति । तैसी शारदा मंगळमूर्ति । तूंचि सर्वार्थी भाससी ॥ ७ ॥ तुजव्यतिरिक्त देवतांतर । न भासे हें आश्चर्य थोर । तूंचि तूं सर्वत्र निरंतर । भेदांतर तेथ कैंचें ॥ ८ ॥ हे सद्युक्ति वाचाबळें । जरी मी उपचारपणें बोलें । यदर्थी देवा तुझींच पाउलें । जिव्हा गळे जरी उच्चार करीं ॥ ९ ॥ यालागीं सर्वदा सर्वत्र पाहें । तंव अंतर्बाह्य तूंचि तूं आहे । तुजविण ना देखें त्रैलोक्य हें । साच पाहें कोठेंही ॥ १० ॥ स्वामी मृगजळाचियेपरी । विश्वाभासु होये मृगजललहरि । ब्रह्मादि मुख्य सुरवरीं । तरंग लहरि होईजे ॥ ११ ॥ साचपणें तूंचि येक । सर्व तुजवांचोनि अवलोक । येकपणें तूंचि अनेक । येकायेक न भासे मज ॥ १२ ॥ अवस्थात्रयीं सर्वदा । तूंचि भोगिजसी परमानंदा । भोग भोगणें या आस्वादा । ठाकोनि मर्यादा अमर्याद तूं ॥ १३ ॥ भोक्ता भोग्य भोगणें ॥ या तिहींचें जेथें विलावणें ॥ तें तूंचि सच्चिदानंदपणें ॥ सर्वदा भोगणें मिथ्या स्वामी ॥ १४ ॥ तेथें दुजयाची कैंची मातु । दुजें बांधूनि तूंचि भासतु । तुजविण न पुरे उसंतु । सर्वत्र तूंचि तूं मजलागीं ॥ १५ ॥ दुजेपण जें दृश्यजात । भासतां तत्काळ बाधित । भेटि वास्तवरूपा निश्चित । होय निभ्रांत तुजसींचि ॥ १६ ॥ सत्कर्मादिधर्म आचरितां । जपयज्ञदानतपतीर्थव्रतां । संध्यास्नानादिकर्म करितां । तूंचि सर्वथा भाससी ॥ १७ ॥ आणिकही धर्म मानती चित्ता । अर्चा पूजा आवादिदेवता । अथवा अश्वत्थादि स्थावरांता । गोस्पर्शता इत्यादि ॥ १८ ॥ तेथें तुजवांचोनिया दुसरें । मज न भासे गा निर्धारें । तुझेया स्वरूपाचेनि विसरें । होय पुरें ह्मणोनि बैसें ॥ १९ ॥ तंव तो विसरुचि उफराटा । स्मारकुचि होये मोठा ॥ हें लाघव भोगितां ब्रह्मनिष्ठा । दृश्यवाटा मोडती ॥ २० ॥ किंबहुना माझें मीपण । भासतांही देहभान ॥ मिथ्यत्वें प्रतीयमान । फावे पूर्ण सत्यत्वें तूंचि ॥ २१ ॥ ऐसें काय नेणों मज केलें । तुवांचि ये दृशेसि आणिलें । पाहों बैसें तों आंतलें । तुवां कोंदलें ब्रह्मांड हें ॥ २२ ॥ ऐसे सकळ इंद्रियांचे व्यापार । श्रवणदर्शनादि व्यवहार । करणें ग्राह्य पदार्थप्रकार । तूंचि सर्वत्र भाससी ॥ २३ ॥ ऐसियासि मी काय करूं । न भासे आणीक प्रकारु । तूंचि येक सर्वेश्वरु । बाह्य अंतर व्यापिसी ॥ २४ ॥ यालागीं दुसरें देवतांतर । न भासे सर्वथा साचार । आणि मनोवृत्ति तदाकार । नानाकार नव्हेती ॥ २५ ॥ मन लांचावलें तुझिया पाईं । आणीक गोडी नेणे कांहीं । ह्मणोनि तूंचि वंदनीं पाहीं । मंगळार्थ कांहीं प्रवर्त्तें ॥ २६ ॥ इतरां देवांचे स्वरूपीं । बळेंचि मनातें आरोपीं । पाहें तों केधवां तुझा स्वरूपीं । आपणा निक्षेपीं लांचावलेंनी ॥ २७ ॥ यालागीं जो जो चिंतीं उपावो । तो तुझ्याचि स्वरूपीं करी सद्भावो । ह्मणोनि सकळ इंद्रियीं निर्वाहो । केला ठावो विश्रांतीसी ॥ २८ ॥ मनें जें जें चिंतितु जाये । तें तूंचि येक वास्तव आहे । चक्षुरिंद्रियें जें जें पाहें । तें देखतु जाये तुज येकातें ॥ २९ ॥ तुजचि घेऊनियां उठिती । ऐसेया सर्वेंद्रियांच्या वृत्ति । तुजवांचूनि नाहीं प्रवृत्ति । कोण्हे अर्थी अगाधरूपा ॥ ३० ॥ तुजचिपासाव इंद्रियप्रवृत्ति । तुजचि आलिंगूनि उठिती । तुजवेगळी अकिंचित् गति । सर्वही अर्थी सर्वांची ॥ ३१ ॥ आणि अर्थु ऐसा

---

१ 'स्वयंवेद्य' ( आपणच जाणावयास योग्य ) असा पाठ. २ सरस्वती. ३ गोडीला. ४ गाईला स्पर्श करणें वगैरे. ५ भासणारें. ६ लुब्ध झालें. ७ केवळ डोळ्यांनींच. ८ सर्व इंद्रियांचे व्यवहार.

शास्त्रसिद्धांतीं । आत्मानालिंगनीं इंद्रियप्रवृत्ति । न करिती पदार्थीं प्रवृत्ति । महामती सांगेन ॥ ३२ ॥ यदर्थीं श्रीरामा सुरेश्वर । आचार्यांमाजी आचार्य थोर । बोलिला तो अर्थविचार । असे साचार ऐसाचि ॥ ३३ ॥

संमति श्लोक वार्तिक । प्रत्यगर्थमनालिंग्य न पराग्वर्ति किं च न । विज्ञानं जायते यस्मादात्मोपास्तिः सदा ततः ।

इंद्रियांच्या ज्या ज्या वृत्ति । त्या त्या स्वरूपापासाव उठती । आत्मयाविण जडस्थिति । कांहींच न चलती करणें हें ॥ ३४ ॥ जें जें होय पदार्थीं स्फुरण । ते स्फूर्ति उठे आत्मयातें आलिंगून । कोण्हीच अर्थ न घडे त्यावांचून । ह्मणोनि भजन सर्वदा घडे ॥ ३५ ॥ आत्मयाचिपासाव विज्ञान होये । ह्मणोनि आत्मोपास्ति सदा आहे । परी नेणोनियां येवढें हें ॥ अज्ञानी वायें घाडिती ॥३६॥ तैसें नव्हे स्वामी तुह्मेनि बोलें । स्मृतिरूपचि मज तुवां केलें । तेथें तूतें विसरे कोणा बोलें । येर तें न कळे तुजविण ॥ ३७ ॥ आतां श्लोकाचा प्रगटार्थ । सांगेन जैसा असे यथार्थ । प्रत्यक्शब्दाचा फलितार्थ । इत्थंभूत असे ऐसा ॥३८॥ देहेंद्रियेंसि विलक्षण । देहेंद्रियांच्या निरासें जाण । स्वयें प्रकाशे प्रकाशमान । प्रत्यक्[1] पूर्ण तेंचि होये ॥ ३९ ॥ तयातेंचि नव्हे स्फूर्ति । तयाहूनि स्थिति तें स्थिति । ऐसी जे वस्तूची प्राप्ति । ते या जगाप्रति दुर्लभ ॥ ४० ॥ आधीं ब्रह्माकारवृत्ति होये । बाह्यपदार्थें कवटाळित जाये । प्रथम ब्रह्मस्फुरण उठणें आहे । उपास्ति होये तेचि वरिष्ठा ॥ ४१॥ ह्मणोनि बाह्यसेवा ते गौण । मुख्य सेवा ते आत्मानुसंधान । ते होतसे वृत्युत्पत्तीन । हेचि खूण ज्ञातयां ॥ ४२ ॥ ह्मणोनि संकल्पइंद्रियवृत्ति । आणि इंद्रियें जे जे पदार्थ घेती । ते ते जाण तुझी उपास्ति । आनंदमूर्ती श्रीगुरुराया ॥ ४३ ॥ माझीं सकळ इंद्रियें जाण । न स्पर्शती तुजवांचून । यालागीं तूंचि तूं सेव्य पूर्ण । नाहीं आन गुरुवर्या ॥ ४४ ॥ जैसें पतिव्रतेचें अंतर । कहींच नेणे पुरुषांतर । स्वपतीविण इंद्रियव्यापार । कोण्ही प्रकार न निपजे ॥ ४५ ॥ तैसीं लाजावोनि इंद्रियें माझीं । उपास्ति करिती सर्वदा तुझी । अन्य स्पर्शतां व्यभिचारवोझीं । बुडे समाजीं वृजिनांच्या ॥ ४६ ॥ आणीकही येक कारण । देवतांतरें बाह्यचि जाण तें करिती विघ्नादिविदारण । परी प्रेरण अंतरीं न करवे ॥ ४७ ॥ जो कीं साक्षी सर्वांतर । तोचि तो बुद्धीचा प्रेरणार । तयावेगळा बाह्यप्रकार । होय नश्वर दृश्यपणें ॥ ४८ ॥ यालागीं आधीं बुद्धीसि प्रेरिता । होय तरीच स्फुरणकरितां । कवित्व नसतां निर्विघ्नता । वरी तत्वतां कोणाची ॥ ४९ ॥ मुख्य मुळीं कवित्व स्फुरावें । तरी गणेशें निर्विघ्न करावें । तें नसतां कांहीं न संभवे । ह्मणोनि बोलावें पडिलें हें ॥ ५० ॥ ह्मणोनि साक्षी तूं सर्वांतर । धिषणाप्रेरकु निर्विकार । यालागीं तुज निरंतर । वंदीं साचार सर्वां तूंचि ॥ ५१ ॥ वेदांत वदविता सद्गुरुराया । तूंचि येकु सर्व स्वामिया । ह्मणोनि ग्रंथारंभीं मियां । वंदन पायां तुझ्याचि केलें ॥ ५२ ॥ आणि बाह्यही निर्विघ्नकर्ता । गणेशशारदारूप धरिता । ह्मणोनि उभयरूप तूंचि तत्वतां । येकु अनंता अनेक होसी ॥ ५३ ॥ ह्मणोनि तोचि तूं गणाधिपति । शारदारूपेंही त्रिजगतीं । निर्विघ्नकर्त्ता मंगळमूर्ति । तूंचि तूं सर्वार्थीं वंद्य मज ॥ ५४ ॥ यालागीं सर्वदा सर्व कार्यांतरीं । तुजचि वंदीं मी सर्वोपरी । माझे अंतर्बाह्य श्रीहरी । पूर्ण करीं पूर्णत्वें ॥ ५५ ॥ यालागीं मी तुजवेगळें । नेणे वस्तुता निराळें । तुझेनि पूर्णानंदकल्लोळें । जाकळिला न कळे आन कांहीं ॥ ५६ ॥ ऐसें बोलतांचि प्रेमेंकरीं । प्रकटला सद्गुरू अंतरीं । ह्मणे ग्रंथ वदें झडकरी । ते आज्ञा शिरीं वंदिली मियां ॥ ५७ ॥ तो घेऊनियां महाप्रसाद जाण । आतां ग्रंथ बोलेन । जें कां नित्य अगाध ज्ञान । ऋषिसिद्ध बोलिले ॥ ५८ ॥ तेंचि कारणानुसंधान । अर्थ बोलिजेत अतिगहन [2] पूर्वीं जालिया वासनोपशमन । तेंही कारण ऐसें असे ॥ ५९ ॥ सद्गुरुदर्शन जालियावरी । गुरु महावाक्य उपदेश करी । तेणेंचि साक्षात्कार जाला जरी । सिद्धि तरी साधली ॥ ६० ॥ जरी चित्तमालिन्यें असंभावना । आणि उठाती विपरीतभावना । तरी करावें श्रवणमनना । निदिध्यासना निरंतर ॥ ६१ ॥ अगा मनावासनेकरितां । असंभावना उठती अनंता । ययालागीं वासनेसि चित्ता । नाशु सर्वथा करावा ॥ ६२ ॥ तो नाशु करितां मनावासनेसी । सर्वथा नव्हे अतिप्रयासीं । वेदां गुरुचां ठाईं तयासी । असे मानसीं अविश्वासु ॥६३॥ वेदें गुरूनें जें उपदेशिलें । विश्व मिथ्या ब्रह्म सत्य जें बोलिलें । तेंचि तुझें स्वरूप असे संचलें । मनीं बोलें तयांचेनी ॥ ६४ ॥ पूर्वाभ्यासेंकरुनी । आपण संसारी जीव मानी । विश्व सत्यत्वें देखे नयनीं । हेचि करणी मनावासनेची

---

१ आत्मज्ञान न झाल्यास. २ आत्मस्वरूपाचें मनन. ३ 'तयातें नालिंगूनि इंद्रियेंवृत्ति । सर्वदा विषयाकार नव्हती ॥ विषयज्ञानाची नव्हे स्फूर्ति । तयावीण स्थिति नव्हे तेही ॥ ४० ॥' अशी सर्व ओंवी वेगळी आहे. ४ पापांच्या.

॥६५॥ त्या मनावासनेची शांति। करितां नव्हे साधनसंपत्ती। येकें श्रवणेंवांचूनि। त्रिजगतीं न देखिजेती कोठेंही ॥ ६६ ॥ श्रवणावेगळाही अभ्यासु करिती। मनावासनेतें कांडिती। परी ते साधनेंचि क्लेशी होती। नव्हे प्राप्ति साधनाची त्यां ॥६७॥ सर्वही शास्त्रांचें तात्पर्य। येका ब्रह्माचां ठाईं अन्वय। वेदगुरुप्रमाणें आणि मिथ्यामय। जग सर्व हें श्रवणें माने ॥ ६८ ॥ श्रवणें ब्रह्मरूपनिर्धार। वेदवाक्यचि प्रमाण थोर। विश्व असत्य मृगांभपूर। माने साचार इत्थंभूत ॥ ६९ ॥ अगा प्रपंच मिथ्या तरी बाणला। तोचि मनाचा नाशु संचला। मिथ्याभूतासि कोणाला। वासनामेळा उपजले ॥ ७० ॥ यालागीं येक श्रवणेंकरूनी। मनोनाश वासनाक्षय भरंवसेनी। होती निश्चयें ह्मणोनी। श्रवण अनुदिनीं करावें ॥७१॥ श्रीरामा तोचि उपाय श्रवणाचा। मागां निवेदिला साचा। मनोनाशवासनाक्षयाचा। उपाय याचा जो बोलिला ॥ ७२ ॥ मनोनाशवासनाक्षयप्रकरणीं। श्रवण सुचिलें अनुदिनीं। गुरुवाक्यें विश्वासुनी। 'ब्रह्मास्मि'[1] ब्रह्मपणीं नित्य असें ॥ ७३ ॥ गुरुवाक्य आणि शास्त्रप्रतीति। श्रवणें दोन्ही सिद्धी पावती। तोंचि निरूपिलें पूर्वग्रंथीं। वासनोपशांति मनोनाशें ॥ ७४ ॥ वेदांतश्रवणें ऐसें होये। प्रमाणासंभावना[2] तात्काळ जाये। वेदें आणि गुरुप्रामाण्य निश्चयें। विश्वासें पैं हें होय तेथें ॥ ७५ ॥ तया वेदवाक्याचा ठाईं। दृढ विश्वासु बाणे अनपायी[3]। तेणें शास्त्रान्वय जो ब्रह्मीं पाहीं। होय निश्चयी बुद्धि तेथें ॥७६॥ तेणें सर्वब्रह्म ऐसें कळलें। प्रपंच मिथ्याभूत प्रत्यया आलें। तरी तें शास्त्राचार्यांच्या बोलें। परी अनुभविलें नाहीं स्वयें ॥ ७७ ॥ शास्त्राचार्यविश्वासु जाला। तेणेंचि प्रपंच मिथ्या मानिला। आपण ब्रह्म हा विश्वासु केला। परी स्वप्रतीतीला नयेचि ॥७८॥ तोंचि आत्मप्रतीतीसि पाहिजे आलें। आणि आपण ब्रह्म ऐसें जें गुरूनें बोलिलें। तें मानिलें तेथें उपजलें। संशय भले प्रमेयासी ॥ ७९ ॥ तेचि प्रमेयासंभावना। मीच ब्रह्म कैसें हा संदेह जाणा। उपजला त्यालागीं साधना। आत्ममनना प्रवर्तला ॥ ८० ॥ आपणचि ब्रह्म ऐसें व्यक्ति[4]। आपणासि आलें पाहिजे प्रतीती। त्यालागीं आत्ममननाची प्रवृति। जाली वदती वसिष्ठवाणी ॥ ८१ ॥ युक्तिकरूनि जें अनुचिंतन। आत्मयाचें करणें जाण। त्याचेंचि नाम आत्ममनन। केलिया पूर्ण प्रतीतीसि ये ॥ ८२ ॥ तिंया शास्त्रयुक्तीकरून। निश्चय कीजे मी ब्रह्म ह्मणऊन। तयाचें नाम आत्ममनन। वसिष्ठ आपण सांगती ॥ ८३ ॥ तेंचि तें आत्ममननप्रकरण। प्रवर्तलें[5] येथ संपूर्ण। तेंचि ऐका श्रोतेजन। येकाग्रमन करूनियां ॥ ८४ ॥ आतां येणें प्रकरणेंकरून। निरूपिजेल आत्ममनन। तयापुढें निदिध्यासन। अनुक्रमें पूर्ण निरूपिजेल ॥ ८५ ॥ एवंभूत आत्मा आपण। ऐसें अनुभवासि येतसे पूर्ण। तया नाम आत्ममनन। तेंचि निरूपण येथें कीजेल ॥ ८६ ॥ अहो आत्मानुभवा आड। असे मनाचें तें कवाड। तें श्रवणें केलिया उघड। अनुभव अखंड मानतु ॥ ८७ ॥ परी दृढ निश्चय युक्तीकरून।[6] जाला पाहिजे गा संपूर्ण। यालागीं करावें आत्ममनन। तेंचि निरूपण परियेसा ॥ ८८ ॥ युक्तीकरूनियां निर्वारीं। निश्चय कैसा होय अंतरीं। प्रमेयासंभावना जाय दुरी। निश्चय अंतरीं ऐसा होये ॥ ८९ ॥ तेंचि वसिष्ठ श्रीरामाप्रति। आत्ममनन अनुवादती। तेंचि आयिका श्लोकसंगति। कृपा संतीं करोनि ॥ ९० ॥

॥ शुद्धो निरंजनोऽनंतो बोधोहं प्रकृतेः परः। चेष्टमानमिमं देहं पश्याम्यन्यशरीरवत् ॥ १ ॥

जो पूर्वीं मनावासनेकरितां। मी देहाचि ऐसें ह्मणत होता। तोचि मनोनाशें उद्बोधतां[7]। आत्मा तत्वतां ऐसाचि बोधु ॥ ९१ ॥ अगा नानायुक्तींकरून। नित्य करितां आत्मानुचिंतन। तेणें बाणे मीचि आत्मा पूर्ण। ब्रह्म निर्वाण स्वयंवेद्य ॥९२॥ ह्मणोनि ज्ञानस्वरूप स्वयंवेद्य। नित्य ज्ञानेंकरूनि अगाध। स्वप्रकाश शुद्धबुद्ध। नित्यानंद गुणातीत ॥ ९३ ॥ शुद्धशब्दें स्वप्रकाश। सर्वथा नव्हे परप्रकाश। परप्रकाश होय नाश। मी अविनाश शुद्धपणें ॥ ९४ ॥ तैसा मी जाण निजबोध। स्वप्रकाश अगाध। सर्वप्रकाशकु नित्य शुद्ध। निर्विवाद अखंड ॥ ९५ ॥ सूर्य हा प्रकाशवंत असे। परी अभ्रादिउपाधि तेथें वसे। तैसा नव्हे मी निरूपाधि असें। जाण सर्वांशें सर्वोपरी ॥ ९६ ॥ यालागीं मी निरंजन। अंजनशब्दें उपाधि जाण। तैसेंचि जनरहित करितां व्याख्यान। निरुपाधि पूर्ण घडतसे ॥ ९७ ॥ जनशब्दें प्रपंचजात। जें जें कीं इंद्रियेंगृहीत। किंबहुना दृश्यजात। दृष्टश्रुतार्थ[8] सर्वही ॥ ९८ ॥ तें निःशेष जेथें नसे। तया निरंजन बोलिजेत असे। तो मी निरुपाधिक सर्वांशें। सावकाशें जाणवें ॥ ९९ ॥ निरुपाधिक जऱ्ही जालें। तऱ्ही परिच्छेद असेल पावलें। ह्मणोनि अनंतपद घेतलें। तेंचि

[1] मी ब्रह्म आहें. [2] प्रमाणांविषयी विपरीत कल्पना. [3] नाश न होणारा. [4] स्पष्टपणें. [5] सुरु झालें. [6] ही ओवी कांहीं प्रतींत पुढील ओवी नंतर आहे. [7] उमजतेपणा. [8] पाहिलेलें व ऐकिलेलें. [9] मर्यादा.

असें परियसा ॥ १०० ॥ अनंतशब्दें नाश त्रिविध । नाहीं तया सर्वथा बाध । तेंचि अनंतशब्दें नाश अगाध । नित्य सिद्ध ब्रह्म मी ॥ १ ॥ तोचि त्रिविधपरीच्छेद कैसा । सांगों आयिक बोधे तैसा । काळदेशवस्तूचा ऐसा । हाचि ठसा सर्वत्र ॥ २ ॥ त्रिविधपरिच्छेदा विरहित । तुर्य परिच्छेद नाहीं निश्चित । तऱ्हा छेदत्रय नाहीं निभ्रांत । अबाधित स्वरूप माझें ॥ ३ ॥ ते परिच्छेद कोण कोण । तें ही आतां सांगेन । येकु काळपरिच्छेद जाण । वर्त्ते पूर्ण घटादिकीं ॥ ४ ॥ घट तो येके काळीं असे । सर्वेचि दुसरे काळें विनाशे । घट तो सर्वथा सत्य नसे । काळें भ्रंशे ह्मणोनियां ॥ ५ ॥ जें जें देश-काळवस्तूकरून । परिच्छेद वस्तु पावे जाण । तें तें नश्वर असे पूर्ण । जाण खूण रघुनाथा ॥ ६ ॥ आतां देशपरिच्छेद तो सांगतसें । नैय्यायिकाचें मत ऐसें असे । परमाणु आकाश नित्य वसे । नाश नसे कोण्हे काळें ॥ ७ ॥ महाप्रळयीं पृथ्व्यादिनाशती । परी यांचे परमाणु असती । ते सर्वदा नित्य वर्त्तती । नाशप्राप्ति असोचिना ॥ ८ ॥ मागुती ईश्वरइच्छेकरून । सृष्टि होय जैं निर्माण । तै परमाणु येकत्र करून । पृथ्व्यादि आपण स्वयें करी ॥ ९ ॥ हेंही यथार्थचि होये । परी परमाणुसि देशपरिच्छेद आहे । सूक्ष्मरूपें येके देशीं राहे । व्यापक नव्हे परमाणु तो ॥ ११० ॥ सूक्ष्मरूप याचें असे अंतीं । तेथें दुसरे स्थळीं कैंची व्याप्ति । ह्मणोनि देशें परिच्छेदती । नाहीं व्याप्ति सर्वत्र ॥ ११ ॥ ह्मणोनि तैसा मी नव्हे सर्वथा । मज देशकाळें नाहीं परिच्छेदता । आतां आकाश नित्य व्यापकता । परिपूर्णता सर्वदेशीं ॥ १२ ॥ हेंही यथार्थचि असे । आकाश नित्य व्यापक भासे । परी त्या वस्तुपरिच्छेद असे । दुसरें वसे वस्त्वंतर ॥१३॥ पृथ्व्यादिकें पंचमहाभूतें । तैसीं घटपटादि अनंतें । तेणें परिच्छेदलें जाण निरुतें । येकचि तें ऐसें नाहीं ॥ १४ ॥ माझें स्वरूप तैसें नव्हे । येकचि व्यापक सर्वत्र आहे । दुजेपणाचि मातु न साहे । परिपूर्ण आहे पूर्णत्वें ॥ १५ ॥ येथेंही विश्वप्रतीति । होतसे दुजेपणाचि व्यक्ति । तरी वस्तुपरिच्छेद सर्वार्थीं । होतसे अंतीं येथेंही ॥ १६ ॥ तरी जे कीं भासे विश्वप्रतीति । ते सर्वही जाणावी भ्रांति । विश्व नाहींच हें अनेका युक्ती । अनुभवस्थिती ठाईं ठेविलें ॥ १७ ॥ विश्वाची अविचारित सिद्धि । विचारें होये मिथ्या बुद्धि । जैसी शुक्तीचा ठाईं रजतसद्बुद्धि अविचारें प्रसिद्धि होतसे ॥ १८॥ तेंचि विचारूनि पाहिजे । तंव रजताची मातुही नेणिजे । शुक्ति ते शुक्तिचि सहजें । विचारें कीजे वस्तुभेटी ॥ १९ ॥ जैसें कां रज्जूचा ठाईं । सर्पधारामाळादि पाहीं । अविचारें भ्रमाची संख्या नाहीं । विचारें पाही रज्जुचि कीं ॥ १२० ॥ रश्मीचा ठाईं जैसें मृगजळ । तें भ्रमें दिसे अळुमाळ । विचारें आघवेंचि होये फोल । असे केवळ रश्मिचि कीं ॥ २१ ॥ आणि विश्व हें ब्रह्मात्मक । विश्व तें ब्रह्मचि देख । सुवर्ण जैसें कंटक । दुजें लेख तेथें कैंचें ॥ २२ ॥ ऐसिया उपपत्ति सांगों किती । विश्वाकारें हे सकळ भ्रांति । अतिविचारें सत्य भासती । विचारें भस्मांतीं जाये सकळ ॥ २३ ॥ यालागीं वस्तूसि नाहीं दुसरें । येकलें येक ब्रह्म खरें । तेथें परिच्छेदत्रय हें न स्थिरे । कोंदलें पुरें पूर्णत्वें ॥ २४ ॥ ह्मणोनि परिच्छेदत्रयाविरहित । सच्चिदानंद मी अनंत । ऐसिया नांवें उन्नत । नाहीं देखत आपणा न्यून ॥ २५ ॥ नाहो प्रकृत्यंतर्वर्ती जें जालें । तें तंव परिच्छेदातें पावलें । दृश्य सर्वही जें देखिलें । तें परिच्छेदलें तेणें न्यायें ॥ २६ ॥ यालागीं प्रकृतीपर वसें । ह्मणोनि ऐसें बोलिलेंसे । मी प्रकृतीचा नियंता असें । दुरी वसें तियेहुनी ॥२७॥ ते जड अप्रकाश परतंत्र । मी बोधरूप स्वप्रकाश स्वतंत्र । नियंता चाळक अगोत्र । नामरूपमात्र असोचिना ॥ २८ ॥ एवंभूत व्यापक मी असें । ऐसा बोधही उल्हासे । आपुलें पूर्णत्व न दिसे । दुजें ऐसें सर्वत्र ॥ २९ ॥ ऐसाचि मी अगाध बोध । नित्यानंद स्वसंवेद्य । नाहीं देहादिकासि संबंध । शुद्धबुद्ध निर्विकार ॥ १३० ॥ आतां चेष्टमान जऱ्ही हें शरीर । संस्कारें करी सर्व व्यापार । तथापि साक्षी मी निर्विकार । देहाकार नव्हें कदा ॥ ३१ ॥ जऱ्ही पूर्वसंस्कारेंकरून । देह हें कर्मेकरूनि चेष्टमान । तरी अन्य देहाचेपरी मी आन । मजसीं भिन्न देखतसें ॥ ३२ ॥ इतराचें दृश्यत्व करूनी । देह देखे जैसें मी नयनीं । तैसा माझाही देह जागृतिस्वप्नीं । परकीय स्थानीं देखतु असें ॥ ३३ ॥ वस्तुता तरी देह भिन्नचि असे । भिन्न तें दृश्य जाण ऐसें । दृश्य तें मिथ्या सर्वांशीं । नश्वर वसे काळत्रयीं ॥ ३४ ॥ 'इमं देहं' हें मूळीं बोलिलें । इमंकारें भिन्नचि देखिलें । भिन्न तंव आपणा न मिळे । होय निराळें निश्चयें ॥ ३५ ॥ इमंकार आणि इदंकार । हे दृश्याचे वाचक सर्वत्र । भिन्न तें भिन्नपणेंचि

---

१ 'तऱ्हीं' असा पाठ. २ 'ऐसा असे' असा पाठ. ३ निराळी वस्तु. ४ 'सर्व होये असा पाठ. ५ ब्रह्मरूपच. ६ 'बोधे' असा पाठ. ७ प्रकृतीमध्यें असणारें. ८ 'इमं' या शब्दानें.

निरंतर । देखें पर परकीयत्वें ॥ ३६ ॥ स्वतःसिद्ध तरी भिन्नचि असें । आपणा तया सादृश्यही नसे । असोनि ही लोक पिसे । मीच देह ऐसें ह्मणताती ॥ ३७ ॥ मी तंव स्वयंबोधें बोधलेपणें । देहातें मी ऐसें न ह्मणें । देह तें दृश्य वेगळेपणें । परातें देखणें तैसें देखे ॥ ३८ ॥ अगा परत्वें देखतां । देहीं साक्षित्वचि वर्त्ततां । न मिळे देहाच्या कर्त्तव्यता । न पवे उसंता सुखदुःखभोगीं ॥ ३९ ॥ ऐसा नानायुक्तीकरुनी । एवंविध ऐसा आपणा मानीं । हेंचि मनन गा कोदंडपाणी । जाणें निर्वाणीं आपणा ऐसें ॥ १४० ॥ इतुकेंचि विस्तारें सांगितलें । तें तंव युक्तीचें रूप केलें । येही युक्तीकरूनियां भलें । जाण निराळें आत्मरूप ॥ ४१ ॥ आतां एवंभूत जऱ्ही आपण असे । तऱ्ही देहादिप्रपंचु कां भासे । तेंही सांगों सावकाशें । येकाग्रमानसें परिसिजे ॥ ४२ ॥

एते तु चिद्विलासांता मनोबुद्धींद्रियादयः । असंतः सर्व एवाह व्यवधानं विना स्थितः ॥ २ ॥

तरी हें सकळ पदार्थजात । मन बुद्धि इंद्रियादिसमस्त । हें चिद्विलास जाण सकळ भासत । सर्वदा असंत सर्वही ॥ ४३ ॥ चित्शब्दें शुद्ध ज्ञान । ब्रह्म जें प्रकाश चिद्घन । त्याचाच विलास पंच[1] जाण । विलासे पूर्ण सर्वदा ॥ ४४ ॥ विलास मात्र विश्वरूप याचें । मन बुद्धि दृश्यजातांचें । जें ज्याचा विलास तें स्वरूप त्यांचें । वास्तव साचें विचारितां ॥ ४५ ॥ वास्तव तऱ्ही अधिष्ठान सत्य । तेथ विपरीत भासतें असत्य । स्वप्नसंभ्रमें अधिष्ठानीं भासत । मिथ्याभूत तो सर्वथा ॥ ४६ ॥ जैसा आपणा जो अधिष्ठान । त्याचा विलास संभ्रमस्वप्न । वास्तव अर्थे सत्य आपण । मिथ्या पूर्ण विलासत ॥ ४७ ॥ कां शुक्तिकाविलासें रजत । वास्तव शुक्त्यात्मक निश्चित । पाहतां शुक्तिव्यतिरिक्त । मिथ्याभूत भ्रममात्र ॥ ४८ ॥ जें ज्याचा ठाईं विपरीत भासे । तें तंव तदात्मकचि असे । जैसें स्थाणूचांठाईं[4] चोर दिसे । दुजा नसे तो तदात्मक ॥ ४९ ॥ रज्जूचा ठाईं सर्पादि भासतो । ते तंव रज्वात्मकप्रतीति । रज्जुव्यतिरिक्त सर्व भ्रांति । नाहीं स्थिति रज्जुविण ॥ १५० ॥ तैसें हे देहादिदृश्यजाळ । तो तंव चिद्विलासु सकळ । विचारें अधिष्ठान केवळ । वृथा फोल विलासमात्र ॥ ५१ ॥ सकळही ब्रह्मात्मक पाहीं । ब्रह्म व्यतिरिक्त दुजें नाहीं । भासे तें तरी मिथ्या सर्वही । सत्यत्वें कांहीं असेचिना ॥ ५२ ॥ हें तंव काळत्रयीं असंत । ज्ञानमात्रेंचि होय बाधित । नाहो स्थिति याची देखिजेत । असे भासत दीर्घ काळ ॥ ५३ ॥ ऐसा आक्षेप बोलिलेती । जे दीर्घकाळ भासे याची स्थिति । तऱ्ही ते तोंवरिपर्यंत राहाति । व्यवधानप्राप्ति जो नाहीं ॥ ५४ ॥ विशेषें करूनी जें अवधान । त्यातेंचि बोलिजे व्यवधान । व्यवधानशब्दें अपरोक्ष ज्ञान । अनवधानं अज्ञान तें ॥ ५५ ॥ जागृति प्राप्त होतांचि अपरोक्ष ज्ञान । जेणें बोधें ब्रह्म तें आपण । ऐसें बोधताचि दृश्यमान । नाशे स्वप्न जागृति जैसें ॥ ५६ ॥ जागृति प्राप्त होतां जे क्षणीं । स्वप्नाभास न दिसे नयनीं । अपरोक्षानुभवें दृश्यकाहाणी । मनीं नयनीं न देखिजे ॥ ५७ ॥ अहंविशिष्ट स्वयें जीव । यासि होतांचि अपरोक्षानुभव । तोचि जागृतीचा उद्भव । होतांचि सर्व स्वप्न नासे ॥ ५८ ॥ अहो अपरोक्षभ्रम जऱ्ही जाला । तो अपरोक्षज्ञानेंचि जाईल भला । येऱ्हवीं जैसा तैसा संचला । न ढळे कल्पिकाळा लोटितांही ॥ ५९ ॥ यालागीं व्यवधान ऐसें बोलिलें । तेणेंचि दृश्यजात नाशलें । ज्ञान नसतांचि संचलें । असे भरलें जैसें तैसें ॥ १६० ॥ यालागीं ज्ञान नसतां याची स्थिति । कोटिकल्प राहे प्रतीति । ज्ञान होतांचि भस्मांतीं । क्षणाप्रति जातसे ॥ ६१ ॥ जागृति जंववरि न ये हाता । तंवपरी चिरकाळ स्वप्नावस्था । मग न दिसे दशदिशा पाहातां । जागृति होतां तत्क्षणीं ॥ ६२ ॥ ह्मणोनि अज्ञान असतां याची स्थिति । कोटिकल्प पाहे प्रतीति । ज्ञान होतांचि भस्मांति । क्षणाप्रती जातसे ॥ ६३ ॥ ह्मणोनि अज्ञानेंचि विश्व सिद्ध । देहेंद्रियादि दृश्य प्रसिद्ध । ते ज्ञान होताचि पावे बाध । निर्विवाद निश्चय ॥ ६४ ॥ ह्मणोनि देहेंद्रियादिकरूनी । मी देहवंत ऐसें मानुनि । मी देह हें बुद्धि झेंकोनी । नेणपणीं ह्मणी लागा ॥ ६५ ॥ यालागीं देहेंद्रियां विरहित । मी आत्मा निर्गुण नित्यानंद भरित । ऐसा युक्तीकरूनि होय निश्चितार्थ । तें निश्चित आत्ममनन ॥ ६६ ॥ आणिकही बोध कैसियापरी । मनन बाणे गा पौलस्त्यारी । तेंही सांगों तुज अवधारीं तूंही करीं नित्य हेंचि ॥ ६७

आपद्यचलचित्तोस्मि जगन्मित्रं च संपदि । भावाभावविहीनोस्मि तेन जीवाम्यनामयः ॥ ३ ॥

नानापत्ति आलिया प्राप्त । मी अचळचित्त असें स्वरूपस्थ । आपत्ति देहवंतासि होत ।

---

१ विश्रांति. २ 'जाण समस्त' असा पाठ. ३ पंचमहाभूतें. ४ ठोंब्याचे ठिकाणीं. ५ प्रत्यक्ष ज्ञान. ६ ही ओवी किंत्येक प्रतींत मुळींच नाही. ७ टाकून. ८ अनेक संकटें.

मी तद्व्यतिरिक्त देहेंद्रियां ॥ ६८ ॥ विश्वासि संपत्तिविपत्ती होती । मी तंव विश्व नव्हे स्वयंज्योति । विश्वप्रकाशकु अनंतमूर्ति । संपत्ति विपत्ति कैंची मज ॥ ६९ ॥ ह्मणोनि विपत्ति जालिया । मी अचळु कैसा । वातोर्मी झडपिला मेरु जैसा । कां ग्रीष्म वर्षाकाळीं सारिसा । सिंधु तैसा अगाधपणें ॥ १७० ॥ संपत्तीचीही जालिया प्राप्ति । जगन्मिथ्यात्वें होये प्रतीति । सर्व विश्व आत्मास्थिति । नाहीं व्यक्ति तुंबेपणीची ॥ ७१ ॥ संपत्ति जालिया नुचंबळे । क्षीराब्धि जैसा वर्षाकाळें । संपत्ति विपत्ति यथानुकूळें । देहमेळें होये जगा ॥ ७२ ॥ मी तंव भावाभाव विहीन । भावशब्दें देह जाण । अभाव तोचि अभाव पूर्ण । असें विलक्षण दोहींसि मी ॥ ७३ ॥ तैसोंचि देहसंबंधें नानारोग । आधि मानसिकधर्म सांग । मी तंव देहेंद्रियांसि असंग । कैंचा भवरोग । मजलागीं ॥ ७४ ॥ तेणेंचि साक्षित्वें सर्वदा असें । जीव तें जीवन हेंचि वसे । येणेंचि सुखें सुख उल्हासे । नेणें मानसें विपरीत कांहीं ॥ ७५ ॥ ऐसिया मननें श्रीरघुनाथा । आपणातें जाणावें गा तत्वतां । येणेंचि निश्चयो बैं होता । भवव्यथा नेणें कांहीं ॥ ७६ ॥ आणीकही तया बोधु कैसा । मनन उपजे गा वीरेशा । तोही सांगों वैकुंठनिवासा । रमाविलासा विश्वंभरा ॥ ७७ ॥

निरीहोस्मि निराशोस्मि स्वच्छस्वस्थोस्मि निस्पृहः । शांतोस्म्यहमरूपोस्मि चिरायुरचलं स्थितः ॥ ४ ॥

देहेंद्रियें चालतां कर्मगति । मी तंव निरीह अचळस्थिति । प्रवर्त्तवी सर्वांची गति । कूटस्थस्थिति दीपु जैसा ॥ ७८ ॥ दीपाधारें सर्व वर्त्तती । दीपाधारें कर्माची निष्पत्ती । होय परी अचळ स्थिति । असे सर्वार्थी निरीह सदा ॥ ७९ ॥ आशा जरी असावी पोटीं । तरीच कर्तव्याची आटाआटी । आशा न भासे माझिया दृष्टी । देखें सृष्टि नश्वरपणें ॥ ८० ॥ मिथ्याभूत पदार्थ जो नश्वर । देखोनि वासना नव्हे तयासमोर । मृगजळीं वासनांकुर । नुपजे नश्वर ह्मणउनी ॥ १८१ ॥ यालागीं ईहाआशाविरहित । मी तंव निरीह अकर्त्ता कूटस्थ । नभाचेपरी सभरीभरित । स्पृहा किंचित् मज नाहीं ॥ ८२ ॥ मज कर्मी नाहीं कर्त्तेपण । आशा स्पृहा कीं गेली निपटून । अतएव शांत मी गुणविहीन । अरूप पूर्ण ययालागीं ॥ ८३ ॥ जो कीं गुणवंत पदार्थ । तोचि तो रूपवंत बोलिजेत । गुणाचा द्रष्टा मी साक्षिभूत । रूपवंत कैसा होयें ॥ ८४ ॥ रूपा आलें तें नाशे सर्वथा । मी अरूपपणें चिरकाळ वर्ततां । चिरायु तो अचळ तत्वतां । न चळे सर्वथा अविनाशपणें ॥ ८५ ॥ विनाशी तें सर्वत्र चळे । अविनाशी तें कोठें न ढळे । राहे व्यापूनि सर्वत्र निराळें । कोण्हे न मिळे पदार्थासी ॥ ८६ ॥ ऐसाचि मी एवंविधु । मननेंकरूनि होय बोधु । ह्मणोनि सर्वदा तूंही कृपासिंधु । मननवेधु सांडूं नको ॥ ८७ ॥ नाही आशा स्पृहा येकार्थ । असतां बोलिलें कां पुनरुक्त । तैसें नव्हे आयिका अर्थ । विशेषार्थ कांहीं असे ॥ ८८ ॥ कांहींच नव्हे जो अर्थप्राप्त । त्याची इच्छा ते आशा निश्चित । प्राप्त अर्थही न्यून मानित । अधिक इच्छीते तेचि स्पृहा ॥ ८९ ॥ यालागीं दोहींस विशेष असती । यास्तव आशा स्पृहा बोलिजेती । परी सर्वथा नये पुनरुक्ति । विचारें श्रोतीं पाहिजे ॥ ९० ॥ कोण्ही आशंका करील भेद । ह्मणोनि वाखाणिलें हें पद । श्लोकार्थ जालिया विशद । निर्विवाद ऐसें केलें ॥ १९१ ॥ आणि सकळ विश्व ब्रह्मस्थिति । मजसहित चिदेकमूर्ति । ऐसेंही आलें मज प्रतीती । तेचि विज्ञप्ति परियेसा ॥ ९२ ॥

चिदेव पंचभूतानि चिदेव भुवनत्रयम् । विज्ञातमधुना सम्यगहमेव चिदेव हि ॥ ५ ॥

चित्स्वरूप महाभूतें । पृथ्वी आप तेज वायु नभ तें । तैसींच तज्जनित चराचरभूतें । जे कीं व्यक्तें दिसताती ॥ ९३ ॥ इत्यादि सकळही चिद्धन । चित्शब्दें ज्ञान जाण । ज्ञान तेंचि ब्रह्मपूर्ण । नाहीं भिन्न शब्दमात्रें ॥ ९४ ॥ हेंचि विचारेंकरूनि आतां । युक्तीकरूनि मनन करितां । मीच ब्रह्मरूप तत्वतां । प्रत्ययार्थी आलें मज ॥ ९५ सम्यक् प्रकारें जाणितलें । मीही चिद्रूपचि संचलें । ब्रह्मावेगळें उरलें । नाहीं निराळें अणुमात्रही ॥ ९६ ॥ आणीकही माझीं विशेषणें । आयिकावीं संतीं येकाग्रमनें । करून श्लोकाचेनि अनुसंधानें । जे कीं ऋषीनें बोलिलीं ॥ ९७ ॥

सर्वातीतः सर्वगश्च स्वामिवायमहं स्थितः । यत्तदस्मि तदेवास्मि वक्तुं शक्नोमि नेतरत् ॥ ६ ॥

सर्वदृश्या मी अतीत । आणि सर्वत्र वर्त्ते तदंतर्गत । नाहीं कोठूनियां व्यावृत । अनुगत असेंचिना ॥ ९८ ॥

---

१ त्याहून निराळा. २ वायूच्या वेगानें. ३ खटाटोप. ४ इच्छा व आशा यांहून निराळा. ५ जिकडे तिकडे भरलेला. ६ 'तथा' असा पाठ. ७ पाहावें. ८ त्यापासून उत्पन्न झालेलीं. ९ वधिष्ठानें.

संमतिश्रुति। अव्याकृतानुगतं वस्तु ब्रह्मेति भण्यते।

सत्य असे अन्ही कोण्ही पदार्थ। तन्ही त्यामाजी दुसरें अनुगत। विश्व मिथ्यापणेंचि असंत। ब्रह्म अनुगत तेथें कैचें॥ १९९॥ येक ब्रह्मचि सर्व श्रुति बोलती। तेथें दुसऱ्याची कैची व्यक्ति। दुसरें नाहीं तेथ अनुगति। आणि व्यावृति असेचिना॥ २००॥ ह्मणोनि सर्वत्र ब्रह्मचि असे। त्यातेंचि सर्वगत बोलिजे ऐसें। गगनाचेपरी स्थिर असे। विश्व हें भासे त्याचा ठांई॥ २०१॥ ह्मणोनि जें जें दृष्ट श्रुत विश्वभाव। तें तें मीच ब्रह्मत्वें पूर्ण। मद्व्यतिरिक्त नाहीं आन। आनंदघन सर्वार्थी मी॥ २॥ त्याहीवेगळें बोलावया। बोलों न शकिजे जगीं राया। आणि मजव्यतिरिक्त भासा-वया। लोकां यया कारण नाहीं॥ ३॥ याळागीं सर्वातीत सर्वव्यापक। स्थिर जैसें गगन येक। जें विश्वरूपें भासतें देख। तें येकायेक मीचि असें॥ ४॥ ऐसें मनन करूनियां तया भासें। सर्वत्र आपणचि सर्वदा असे। सर्व जीवसमूह मजमाजी वसे। जीवत्वें उल्हासे माझा ठांई॥ ५॥

मय्यनंतचिदंभोधावाश्चर्यं जीववीचयः। समुल्लसंति खेलंति प्रविशंति स्वभावतः॥ ७॥

ह्मणे मी जो कीं चिदांबोधि। अनंत अगाध निरवधि। परिच्छेद त्रयातीत ज्ञानाब्धि[1]। पूर्ण त्रिशुद्धी पूर्णत्वें॥ ६॥ तया माझा ठांई उल्हासती। जीववीचि[2] अनंता भासती। उत्पत्ति आणि स्थिति पावती। लया जाती माझाचि ठांई॥ ७॥ अहो हें स्वभावेंचि करूनी। मज चिदब्धीसि प्रतीदिनीं। विश्वलहरी परी मानीं। उल्हासे नयनीं जगाचिये॥ ८॥ क्षीराब्धीचे विचित्र विलास। ते सर्व क्षीराब्धि सावकाश। अज्ञाना भासती इतरांश। तन्ही क्षीराब्धीसि आन काय॥ ९॥ नाना पृथ्वीचे परमाणु पृथ्वीवरी। विकासतांही पृथ्वीच खरी। तैसा सर्वत्र मी सर्वांपरी। नाहीं दुसरी मातु तेथें॥ २१०॥ ऐसा बोधु होय तयासी। मनन आण आपणांसी। निश्चयो करी प्रमेयासी। आणीकही कैसी प्रतीति॥ ११॥

मय्यनंतसुखांभोधौ विश्ववीच्यादिकल्पना। उदेतु वास्तमायातु न मे वृद्धिर्न च क्षयः॥ ८॥

ह्मणोनि सुखाचा समुद्र परिपूर्ण। देशकालवस्तुपरिच्छेदविहीन। त्या माझ्या ठांई विश्ववी-चिकल्पन। भासे आन अज्ञानांचि॥ १२॥ त्या विश्ववीचि उदय पावतां। मज वृद्धि नाहीं सर्वथा। विश्ववीचि अस्तमय होतां। क्षय तत्वतां असेचिना॥ १३॥ हें तंव प्रत्यक्ष सिद्धचि असे। महा-र्णवीं वीचिविलास भासे। इतुकेनि काय वृद्धि होतसे। सपाटल्या नसे क्षय त्यासि॥ १४॥ तैसें विश्वलहरी माझ्या ठांई। उदय अस्त होतां वृद्धि क्षय नाहीं। मी तंव जैसा तैसा अक्षयी। अनपायी स्वतंत्र॥ १५॥ हें विश्व असत्य तरी कां भासे। तुह्मी मानाल जरी ऐसें। तन्ही तेंही सांगों साव-काशें। येकाग्रमानसें परिसिजे॥ १६॥

मदज्ञानोदितं विश्वं मय्येव लयमागतम्। अपरोक्षचिदानंदसाम्राज्यमधुनास्म्यहम्॥ ९॥

तरी हें सर्व विश्वजात। माझेनिचि अज्ञानें उदय पावत। शेवटीं माझेचि ठांई लयस्थ। ज्ञान होतां अनुभवसिद्ध॥ १७॥ जन्ही हें भासे माझा ठांई। अथवा लय पावतसे सर्वही। तरी मी आतां तैसा पाहीं। मी सर्वही सर्वज्ञ॥ १८॥ मी तंव अपरोक्ष चिदानंदैकसाम्राज्यबोध। दुसरेंविण परा-पर अगाध। नित्य सिद्ध तें मी साम्राज्य॥ १९॥ एवंरूप मी सच्चिदानंदघन। तो हर्षें करीं आपणा नमन। परमानंद उचंबळोन। बोले वचन मनांत॥ २२०॥

सर्वभूतांतरस्थाय नित्यमुक्तचिदात्मने। प्रत्यक्चैतन्यरूपाय मह्यमेवं नमो नमः॥ १०॥

जो जो मी सर्व भूतांचा अंतरस्थ। अंतर्यामी जो सर्वगत। ऐसिया मज मी नमन करित। पुनः-[6] रुक्त अत्यादरें॥ २१॥ आणि माझ्या स्वरूपीं जें स्फुरत। तेंचि तें मजहूनि व्यतिरिक्त। तें मिथ्या-पणें मीचि सत्य। होय निश्चित चिदात्मा मी॥ २२॥ तया मजकारणें नमन। चिदात्मा चैतन्यघन। प्रत्यक्रूप जो आनंदघन। करीं नमन तयासी॥ २३॥ देहेंद्रियांच्या प्रातिकूल्यें। जें स्वयंप्रकाशे सर्वकाळें। तें मी प्रत्यग्रूप निराळें। प्रपंचानुमेळें स्वप्रकाशें॥ २४॥ तया मी आपणाकारणें। पुनः पुनः करीं नमनें। आनंदाचेनि उचंबळलेपणें। आपणा आपण वंदिजे॥ २५॥ मज वेगळें कांहीं दुसरें। न दिसेचि कोण्हे प्रकारें। याळागीं नमनपुरःसरें। नमीं आदरें आपणया॥ २६॥ अगा शांत

---

१ 'भ्रासावया' असा पाठ. २ ज्ञानरूप समुद्र. ३ जीवरूपी लाटा. ४ लाटांचा खेळ. ५ 'ऐका' असा पाठ. ६ पुनः पुनः. ७ प्रथम नमन करून.

जालिया वासना मन । ऐसें बाणे आत्ममनन । ऐसें सांगितलें तुज संपूर्ण । जाण [illegible] रघुवर्या ॥ २७ ॥ आपुलें ब्रह्मत्व न बाणावया । अंतराय मन आणि वासना यया । शुद्ध ते दोन्ही उपश-मलिया । जाणे आपणयां आपण ॥ २८ ॥ मना वासनेची जे तीव्रता । तेचि जाण निश्चयें मळिनता । मळिण असतां तत्वतां । न बाणे सर्वथा आत्मतत्व ॥ २९ ॥ हे नसतां कोटियत्न । केलियान बाणे आत्मेपण । हा मळ गेलिया ब्रह्माचि जाण । स्वतःसिद्ध पूर्ण स्वयें लाभे ॥ ३० ॥ आपण ब्रह्म हें स्वतःसिद्ध असे । परी वासनेनें व्यवधानीं मन प्रवेशे । तेणें आपणा आपण न प्रकाशे । तेणेंचि भ्रंशे स्वरूपींहुनी ॥ २३१ ॥ हें वर्म जाण श्रीरघुनाथा । म्हणोनि आत्ममननींच तत्वतां । असों द्यावें नित्य चित्ता । हेचि मुक्तता मुक्ताची ॥ ३२ ॥ ऐसी बोलतांचि गोष्टि । रघुनाथा आनंद पोटीं । परमानंदें हेलावे पुष्टि । पडे मिठी निरूपणा[3] ॥ ३३ ॥ निजानंदें[4] रंगूनिया । निरूपण केलें ग्रंथान्वया । हेंचि मनन मुक्ताभिप्राया । बोलिला हा येणें अर्थें ॥ ३४ ॥ येथ मनोनाश वासनाक्षयासी । उपाय मनन हें निश्चयेसी । युक्ति करूनि अहर्निशीं । करावें परियेसीं श्रोते हो ॥ ३५ ॥ येथ संपलें आत्ममनन । पुढें बोलिजेल शुद्धनिरूपण । तेंही जाण निदिध्यासन । श्रोतीं सावधान परिसिजे ॥ ३६ ॥

## इति योगवासिष्ठसारे श्रीवसिष्ठरामसंवादे आत्ममननप्रकरणं पंचमं संपूर्णम् ॥



१ उच्चंबळतो. २ ' सृष्टि ' असा पाठ. ३ ' निजरूपीं ' असा पाठ. ४ ' रंगनाथ म्हणे श्रीसद्गुरुरायें ' असा पाठ.

॥ श्री ॥

## प्रकरण ६ वें.

# शुद्धनिरूपण.

श्रीगणेशायनमः । जयजय श्रीगुरुराया । परमानंदा जी आत्मया । मजवरी कृपा करूनि स्वामिया । ग्रंथा यया संपूर्ण करीं ॥ १ ॥ तूं तंव निर्विघ्नकर्त्ता गणेशु । तूंचि विद्याविद्यांचा ईशु । मंगळमूर्त्ति तूं तुंडेशु । विघ्ननाशु करावया ॥ २ ॥ प्रारंभिला ग्रंथसिद्धि । तुझ्या कृपाकटाक्षें कृपानिधी । जातसे अतिवृद्धि । त्या तुज नमूं बुद्धिप्रकाशका ॥ ३ ॥ ऐसें येके-कपेंरी स्तवन । किती करावें यया वाचेकरून । तूं वाचादिकां अप्राप्त जाण । तुझी स्तुण न बोलतां ॥ ४ ॥ ह्मणोनि न बोलतां वाणी । नमन कीजे तुझ्या चरणीं । कांहीं न करणें जें सर्वपणीं । पूजा निर्वाणीं तेचि तुझी ॥ ५ ॥ ऐसिया सर्वगता तुज नमन । करितांचि ग्रंथसिद्धि जाण । तेंचि परियसा निरूपण । करीन कथन तुझिया कृपा ॥ ६ ॥ ऐसिये विनं-वणीसाठीं । श्रीगुरु पाहाती कृपादृष्टी । ह्मणती ग्रंथेंसिद्धि तूं उठीं । जेणें संतुष्टि आह्मा होय ॥ ७ ॥ आमुचें ऐश्वर्य ग्रंथव्याजें । जें कीं सर्वदा तुवां बोलिजे । मनन निदिध्यासन सहजें । तुवां कीजे हेंचि नित्य ॥ ८ ॥ तरी हाचि मनोभाव तुझा फळो । ब्रह्मानंदें तुझी वृत्ति रुळो । वृत्तीचें वृत्तीपण मावळो । स्वसुख आकळो स्वसुखेंसी ॥ ९ ॥ आमुचें ऐश्वर्य बोलणें । हेंचि तुझें मनन निदिध्यासणें । तरी हेंचि फळो साक्षात्कारपणें । सर्वदा भोगणें ब्रह्मानंदु ॥ १० ॥ आमुच्या स्वरूपाचें निरीक्षण । तोचि तुज समाधि जाण । तरी फळो गा निर्वाण । सुखेंसमाधान तेंचि तुज हो ॥ ११ ॥ सर्वदा करितां कर्माचरण । तेंचि तूं मानिसी आमुचें भजन । तरी तेंचि फळो गा तुजलागून । अनन्यपण हो तुज ॥ १२ ॥ श्रवणदर्शनादिक्रिया । गमनवक्तृत्व शिष्यराया । तें तूं मानिसी मद्भजनीं यया । त्या फळो तुझिया पदर्थेंचि ॥ १३ ॥ आणि आमुच्या नामउच्चारणीं । महामंत्रजप गुह्यस्थानीं । तऱ्ही तेंचि फळो गा निर्वाणीं । सुखस्वरूपें दोन्ही होतु कां ॥ १४ ॥ ऐसा महाप्रसाद लाधला । तेणें ब्रह्मानंद उचंबळला । तो न समाय कांहीं केल्या । वोसंडला नित्यानंदु ॥ १५ ॥ आतां या ग्रंथाचें व्याख्यान । यथार्थत्वें मी करीन । सद्गुरुकृपा दिव्यांजन । वरप्रदान लाधलों मी ॥ १६ ॥ अहो सद्गुरुकृपेचियेसाठीं । कीजे ब्रह्मादि पदांची पोउटी । स्वयें ब्रह्मत्व ये भेटी । येरींची गोष्टि काय तेथें ॥ १७ ॥ सद्गुरुकृपेनें अमरस्थान । सद्गुरुकृपेनें ब्रह्मलोकीं आसन । सद्गुरुकृपेनें स्वयें ब्रह्म पूर्ण । शब्दब्रह्मखूण तेणेंचि ॥ १८ ॥ जो जो कीं अभिलाषितां अर्थु । तो सद्गुरुकृपा पूर्ण होतु । सद्गुरुकृपा कल्पनातीतु । ब्रह्म सदोदीतु स्वयें होये ॥ १९ ॥ येव्हढें ज्याचें कृपावलोकन । तेथ किती ग्रंथाचें व्याख्यान । त्याहीवरी प्रसाद प्रतिगहन । पूर्णकृपेनें दिधला मज ॥ २० ॥ अतिदुर्लभ सद्गुरुदर्शन । तेथें स्पर्शन तें मूर्त्तिमंत पुण्यें । जन्मकोटिपुण्यफळें अवलोकन । प्रसाद पूर्ण तो बोलवेना ॥ २१ ॥ तेथें तोंडभरूनियां बोलणें । तें पुण्य प्रशंसावें कवणें । त्याहीवरी प्रसाद लाधणें । कृपेनें बोलणें अतिदुर्लभ ॥ २२ ॥ हें किती कोण्या पुण्याचें फळ । तें तंव कांहीं न निवडे प्रबळ । अनंत जन्मीं करितां पुण्यकल्लोळ । दर्शन केवल सद्गुरूचें ॥ २३ ॥ दर्शनासि सामग्री पाहिजे हे । तेथें संवादीं काय पुण्य आहे । तें तंव न बोलवे काये । भाग्य पाहें अत्युत्कट ॥ २४ ॥ तया भाग्याची गणना । न करवे गा श्रुतिशास्त्रां पुराणां । तो कृपाळू समर्थ दीनां । कळवळोनि जाणा कृपा करी ॥ २५ ॥ तो दीनदयाळ ईश्वर । दीनांकारणें दयासागर । पाहातां आपुली सामग्री अपूर । कोटि-

---

१ ‘ प्रवर्त्तका ’ असा पाठ. २ ‘ नानापरी ’ असा पाठ. ३ ‘ समाधान तेंचि ’ असा पाठ. ४ ‘ मननादिकी ’ असा पाठ. ५ मावत नाहीं. ६ इच्छा ‘ पदाचिया उठी ’ असा पाठ. ७ ‘ स्पर्शनादिक तें मूर्तिमंत अर्चन ’ असा पाठ.

साधनसंभार जऱ्ही जाले ॥ २६ ॥ असो आतां बोलणें किती । नाहीं पुण्यलेखा प्रसादाप्राप्ति । केवळ कृपाचि दीनावरी अति । प्रकारीं बहुतीं हेंचि घडे ॥ २७ ॥ अहो देखोनियां मज दीनासी । कृपा आली तया सद्गुरूसी । तेणें कृपें लाधलों प्रसादासी । धरीन मानसीं ते सिद्धि ॥ २८ ॥ येऱ्हवीं पाहतां काय सामग्री मज । केलें नाहीं सत्कर्म निज । अथवा जपलों नाहीं मंत्रगूज । प्रसाद सहज लाधलों मी ॥ २९ ॥ असे त्याचें तो सर्व कर्ता । मी तरी साइंखडियाचा वक्ता । सूत्रधाराची कर्त्तव्यता । आपुल्या माथां कासया घ्यावी ॥ ३० ॥ यालागीं जैसें करित असों तैसें । मार्गे मीपण बवडूनि देशें । जेथें मीपणासिचि ठाव नसे । तेथें कायसें करणें न करणें ॥ ३१ ॥ असो सद्गुरुरायें बोलाविलेंनि-पणें । ग्रंथाचें तों व्याख्यान करणें । तेंचि अनुसंधान अंतःकरणें । सावधान परिसिजो ॥ ३२ ॥ पूर्वग्रंथीं ऐसें निरूपण । मनन केलिया युक्तीकरून । आपुलें आत्मत्व बाणे पूर्ण । दृश्यही जाण तदात्मक ॥ ३३ ॥ देहादिविश्व दुसरेपणें । साच नाहीं कोण्ही गुणें । आपण पूर्ण सच्चिदानंद-पणें । जाण खुणे अनुभवाचे ॥ ३४ ॥ ऐसें युक्तीकरूनियां कळलें । परी तैसेंचि अनुभवा पाहिजे आलें । आणि विश्व भासतें निराळें । ह्मणोनि न मिळे स्वस्थितीसी ॥ ३५ ॥ प्रमेय जें कीं ब्रह्मस्वरूप । तेथ संशय होतां जो विक्षेप । तो मननें नासला अमूप । शुद्धस्वरूप ऐसें कळलें ॥ ३६ ॥ ब्रह्म मी तें होये कीं नोहे । ऐसा संदेह होता जो पाहें । तो मननें नासला सर्व होये । सर्वत्र आहे मीचि ह्मणे ॥ ३७ ॥ निश्चयोवरी ब्रह्म मी ऐसें बाणलें । तरी देहादि प्रपंचाचें टवाळें । सत्यत्वें भासती तेणें चळे । स्थिति ढळे स्वरूपींहुनी ॥ ३८ ॥ जंव देहादिक दृश्यजात । तें सत्यपणेंचि असे स्फुरत । तंववरी नाहीं आत्मप्रतीत । वस्तुगत कदा नव्हे ॥ ३९ ॥ आणि ये स्वरूपस्थितीचे आड । असे या दृश्याचें कवाड । जंव जंव भासे तंव तंव नव्हे उघड । ब्रह्म अखंड आत्मत्वें ॥ ४० ॥ यालागीं करावें निदिध्यासन । तेणें निःशेष बाधे प्रपंचभान । उरे स्वस्वरूप चिदानंदघन । अखंडपण ब्रह्मात्मैक्य ॥ ४१ ॥ तेंचि निदिध्यासन कैसें । सांगावया सावकाशें । शुद्धनिरूपणप्रकरणमिसें । आरंभिलें असे तें परिसिजे ॥ ४२ ॥ जेथें प्रपंचाचें होय निरसन । उपाधीचा क्षय संपूर्ण । ह्मणोनि बोलिजे शुद्धनिरूपण । ब्रह्म परिपूर्ण उरे केवळ ॥ ४३ ॥ तेंचि आतां कैसिया रिती । श्रीगुरुवासिष्ठ अनुवादती । तें येकाग्र आइकें त्रैलोक्याधिपती । तेंचि श्रोतीं परिसिजे ॥ ४४ ॥ त्याहीमध्यें श्लोकत्रयें-करून । ऐसें कीजेल निरूपण । मननें आत्मत्व बाणल्या पूर्ण । कैसें अनुसंधान तयाचें ॥ ४५ ॥ तो विचरे कैसा लोकांत । आणि अंतरीं कैसा निश्चित । तेंचि पुसता जाला रघुनाथ । वक्ता सर्वार्थ वसिष्ठगुरु ॥ ४६ ॥ ह्मणे आयिक सांगों गा रघुपती । मनन जालिया कैसी स्थिति । तो वर्ते कैसा जगाप्रति । अंतरगति तेही सांगों ॥ ४७ ॥ अगा शुभेच्छा जालियानंतरें । तुटे संसाराचें भेंडरें । मा मनन जालिया कैचें उरे । निःसंग विचरे सर्व कर्मी ॥ ४८ ॥ तेचि निःसंगता पैं कैसी । आणि अंतरीं प्रतीति जे मानसीं । तेही सांगेन परियेसीं । तूंही तैसी स्थिति साधीं ॥ ४९ ॥ यावरी निदिध्यासनप्रकार । तोही सांगों सविस्तर । तऱ्हीं तूं मन करूनि येकाग्र । आइक समग्र रघुपुंगवा ॥५०॥

बहिः कृत्रिमसंरंभो हृदि संरंभवर्जितः । कर्त्ता बहिरकर्त्तांतर्लोके विहर राघव ॥ १ ॥

तरी रघुनाथा येक सांगेन । लौकिकीं कैसें करावें वर्त्तन । तरी अंतरींचें टाकोनि कर्त्तेपण । संरंभ पूर्ण कर्माचा ॥ ५१ ॥ संरंभशब्दें अंतरींचा । जो कांहीं हव्यास मनाचा । अभिलाषोनि विषयाचा । चळे तो मनाचा संरंभु ॥ ५२ ॥ बाह्य कर्त्तव्यतेची चरफड । कर्म संपादावें अतिउदंड । जेणें विषयसुख अतिगोड । होय उघड आचरतां ॥ ५३ ॥ तेथें आपपर न विचारी । युक्तायुक्त मनीं न धरी । कर्म करितां हो विश्व-बोंहरी । परी तें करी विषयांलागीं ॥ ५४ ॥ यया नाम संरंभ जाण । अंतर्बाह्य बोळलें बाची खूण । तो अंतरींचा संरंभ टाकून । बाह्य वर्त्तन सुखें करीं ॥ ५५ ॥ तो संरंभ अंतरींहुनी । सर्वथा नसे तया निपटुनी । बाह्य संरंभ अतिनि-र्वाणीं । दाखवी जनीं कृत्रिम ॥ ५६ ॥ नाहो अंतरीं नसतां बाह्य कैसें करी । हें तंव न घडे कोण्हे प्रकारीं । आधीं मनीं जऱ्ही इच्छा धरी । तरीच करी बाह्य कर्म ॥ ५७ ॥ 'यन्मनसा ध्यायति तद्वाचा वदति ' । ऐसें बोलतसे स्वयें श्रुति । आधीं मनें जे पदार्थ ध्याइजेती । तेचि करिती करणें सकळ ॥ ५८ ॥ वाचा हें उपलक्षण । वाचाशब्दें सर्वही इंद्रियगण । अर्थ मनीं धरिलियाविण । इंद्रियें

---

१ कोट्यवधी साधनें. २ कळसूत्री बाहुल्यांच्या खेळांतील. ३ 'पूर्व प्रकरणीं' असा पाठ. ४ खोटेपणा. ५ भीति. ६ 'चळवळेचा जो समारंभु' असा पाठ. ७ राखरांगोळी. ८ जें मनांत आणितो, तें वाचेनें बोलतो, ९. इंद्रियें.

जाण न प्रवर्तती ॥ ५९ ॥ मनाच्या अभिलाषाविण । बाह्यसंरंभु न घडे जाण । आधीं इच्छा जरी करी मन । तरीच वर्त्तन इंद्रियांसी ॥ ६० ॥ तऱ्ही सर्वही याची विवंचना । मनिल जैसी सज्ञाना । सांगेन तैसी द्या अवधाना । येकाग्र मना करूनियां ॥ ६१ ॥ तरी जितुकें विपरीत कल्पन । तितुकें अज्ञानियासि मिथ्या भान । तेथें संकल्पविकल्प मनन । करी कोण कोण्या अर्थी ॥ ६२ ॥ अपूर्णकाम जो पुरुष असे । तो कामना करी स्वेच्छासोसें । आणि सर्वांहूनि उत्तमते जो असे । स्वयेंचि वसे सर्वां वरिष्ठ ॥ ६३ ॥ तो आपणांहूनि दुजें थोर । देखेल तरी कामना प्रकार । मनें करी अतिसत्वर । येऱ्हवीं सपूर परमानंद ॥ ६४ ॥ सकळ दुःखांची अप्राप्ति । आणि होआवी सकळ सुखांची विश्रांति । इतुकें सर्वजण इच्छिती । पशुपक्षी याति आदिकरूनी ॥ ६५ ॥ द्रव्यदारादि देहसौख्य । इंद्रादिकीं पदें असंख्य । इच्छिती परम सौख्य । हेंचि मुख्य जीवमात्रां ॥ ६६ ॥ भूतभविष्यदुःख आपणासी । न व्हावें येके घटिकेसी । निरंतर सुखसंयोगासी । असावें मानसीं हेंचि वर्ते ॥ ६७ ॥ तऱ्ही दुःखनाश आणि सुखोन्नती । व्हावी निरतिशयसुखाची प्राप्ति । ते आत्मसुखावेगळी गा रघुपती । नाहीं सर्वार्थी सत्यलोकींही ॥ ६८ ॥ जऱ्ही साम्राज्य भौज्य स्वाराज्य । वैराज्य पारमेष्ठ्य महाराज्य । सातवें तें आधिपत्य राज्य । आठवें सायुज्य ब्रह्मानंदें ॥ ६९ ॥ आतां या सप्तराज्यांचें विवरण । तुज सांगों देइजे अवधान । इत्यादिक राज्याभिधान । काय कोण कोण ह्मणिजेत ॥ ७० ॥ भुवादिक जे सतही लोक । भूर्लोक भुवर्लोक । महर्लोक जनोलोक तपोलोक । सातवें सम्यक ब्रह्मभुवन ॥ ७१ ॥ अनुक्रमेंचि सप्तलोकांचें । साम्राज्यादिराज्य गा साचें । तुळना न पवती ब्रह्मसुखाचे । तेथें विषयांचें कोण सुख ॥ ७२ ॥ आणीक अर्थेंही सांगेन । सप्तराज्यांचें विवरण । आपस्तंबशाखेसि वचन । उपनिषदें आपण गर्जती ॥ ७३ ॥ मनुष्यानंदापासुनी । शतगुण आनंद वरिल्यास्थानीं । ऐसें सत्यलोकपर्यंत वाखाणी । कोडिसवाणी स्वयें श्रुति ॥ ७४ ॥ आणीकही अर्थांतर ऐसें । स्वयें बोलिलें वेदव्यासें । तेंचि शुकें भागवतमिसें । निरूपिलें असे परीक्षितीप्रति ॥ ७५ ॥ तरी साम्राज्य ह्मणिजे सार्वभौमता । ते तंव ब्रह्मसुखेंसि नये समता । भौज्य तें एकाधिपत्यता । असे क्षुल्लकता तियेसी ॥ ७६ ॥ स्वाराज्य ह्मणिजे इंद्रपद । तेंही सुख तेथें अतिमंद । आणि अंतरायही अगाध । अंतीं बाध पतनाचा ॥ ७७ ॥ तेंही ब्रह्मसुखेंसि सरी । न पवे एक निमिषभरी । वैराग्यविराटसुखाची थोरी । न पवे सरी ब्रह्मसुखेंसी ॥ ७८ ॥ जेव्हां महाप्रळयो असे होत । तेव्हां विराट होये अभिमान-गळित । ब्रह्मांड सर्वही लय पावत । राज्य करीत तेथें कोण ॥ ७९ ॥ सार्वभौम आणि इंद्रसुख । दोन्हीं एकत्र केलिया देख । सत्यलोकींचें परम सुख[4] । न पवे लेख[5] ब्रह्मसुखाचा ॥ ८० ॥ पारमेष्ठ्य-राज्य तें ब्रह्मपद । चिरस्थाइ अतिअगाध । तें सुख निरूपितां विशद । निरूपणबाध विस्ताराचा ॥ ८१ ॥ जेथ शुद्ध पेरोजांची[6] उभवणी । घरोघरीं कामधेनुचिंतामणि । दैन्यदुःख न देखती स्वप्नीं । नायकती कहाणी मरणाची ॥ ८२ ॥ जन्ममृत्यु नाहीं कोणासी । तेथें रोगाची गोठि कायसी । अमृतपान सर्व जनांसी । नाहीं सुखासी मर्यादा ॥ ८३ ॥ असत्य न बोलती कोणी । ब्रह्मविचारुचि सर्वदा वदनीं । प्रपंचदुःखें न देखती नयनीं । न भीती कोण्हीं कळिकाळा ॥ ८४ ॥ ऐसिया लोकांचा जो अधिपति । चतुरानन मंगलमूर्ति । निजासनीं सहजास्थिति । बैसोनि उत्पत्ति जगाची करी ॥ ८५ ॥ तेहतीसकोटि देव सकळ । गण गंधर्व नागकुळ । अप्सरागण विद्याधर प्रबळ । करिती सकळ उपास्ति[7] ज्याची ॥ ८६ ॥ चंद्रार्क दोन्ही दीपधारी । पवन सारिखा विंजणा वारी । इंद्र स्वयें छत्र धरी । मेटेंकरी[8] अष्टौदिक्पाल ॥ ८७ ॥ सकळ ऋषीश्वरांची मांदी[1] नमन करिती ये ब्रह्मपदीं । वेदघोष पदोपदीं । करिती शब्दीं सामगायन ॥ ८८ ॥ सकळ देवांचा मुगुटकोटी । नमस्कारीं होतसे दाटी । टणत्कार निजासनपीठीं । होतसे पेठी[9] रत्नांची ॥ ८९ ॥ ऐसी दाटणी दास्य करितां । अवसरु न लभे इंद्रादि समस्तां । तेथ असुरकिन्नरपुरुषांच्या कथा । कोण प्रांता होतील ॥ ९० ॥ अश्विनौदेव विंजणे जाणविती । मूर्तिमंत वेद चाऱ्ही तिष्ठती । दोन्ही पार्श्वभागीं चाऱ्ही मूर्ति । स्वयें बोलती उपनिषदार्थ ॥ ९१ ॥ कामक्रोध आणि रागद्वेष । नाहीं जेथें सर्वजनांस । तेथें स्वयें त्या सत्यलोकनाथास । काय देखावास संकल्पावें ॥ ९२ ॥ असो आतां किती बोलावें । सुख सहस्रां वदनीं न वर्णवे । ऐसेंहीपरी सरी न पवे । न उपमानवे ब्रह्मसुखेंसी ॥ ९३ ॥ महाराज्य

---

१ 'तेज भाले' असा पाठ. २ 'न येती' असा पाठ. ३ लज्जित. ४ 'तेंचि विराटसुख' असा पाठ. ५ तुळना. ६ (?) 'पेरो ज्याची' असा पाठ. ७ उपासना. ८ रखवालदार; 'भेटकरी' असा पाठ. ९ आसन.

तेंही ऐसें । महत्तत्व जया ह्मणिजतसे । ईश्वरुचि प्रपंचउद्देशें । इच्छी सोसें सृष्टि करूं ॥ ९४ ॥ तेथ प्रपंचाकारचित्तवृत्ति । प्रपंच रचावया हे आर्ति । ह्मणऊनि ब्रह्मसुखासनीं न पवती । व्यवहार-स्थिति ह्मणोनियां ॥ ९५ ॥ आधिपत्य तें नियंतृत्व । षड्गुणैश्वर्य ईश्वरयुक्त । तेंही सुख न्यून ह्मणिजेत । विकारवंत ह्मणोनियां ॥ ९६ ॥ इत्यादिसुखें जेथें न सरती । त्या ब्रह्मसुखाची जयांसि प्राप्ति । तेही विषय फल्गु[2] इच्छिती । समूळ भ्रांती भावितयांची[3] ॥ ९७ ॥ जो निरंतर परमामृत सेवी । तो कांजी कासया आठवी । जो नित्य दिव्यान्नें जेवी । तो कां सेवी कक्षशाका ॥ ९८ ॥ इंद्रपदीं जो कां बैसला असे । सूकराचे भोग त्याचेनि मानसें । स्वप्नींही परी न स्पर्शे । भोगवरी विटंबला अन्ही ॥ ९९ ॥ तैसा स्वयें जो ब्रह्म जाला । नित्य ब्रह्मसुखेंचि धाला । त्याचें मन विषयभोगाला । कोण्हेही वेळा इच्छीना ॥ १०० ॥ ऐसें इच्छेवांचून । कर्म करी जें हेतूविण । कर्मीं आसक्ति नाहीं इच्छेकरून । अहं पूर्ण गेला ह्मणउनी ॥ १ ॥ जेथ अहंकारआसक्ति नाहीं । तेथ कामसंकल्प कैंचा[4] कायी । काम-संकल्पशून्य जें कर्म सर्वही । तेंचि पाहीं संरंभहीन ॥ २ ॥ ऐसया अंतरसंरंभेंविण । बाह्यसंरंभें शिथिल जाण । यदर्थीं पार्थाप्रति श्रीभगवान । स्वयें श्रीकृष्ण बोलिले ॥ ३ ॥

संमतिश्लोक ॥ यस्य सर्वे समारंभाः कामसंकल्पवर्जिताः । ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पंडितं बुधाः ॥
यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते । हत्वापि स इमाँल्लोकान्न हंति न निबध्यते ॥

अगा पूर्वसंस्कारेंकरुनी । बाह्यसंरंभ होती भर्वसेनी । परी तो तेथिंचा नव्हे निर्वाणीं । न लिंपे कोण्ही कर्मविषयीं ॥ ४ ॥ अथवा बाह्यसंरंभही करी । परी अहंविरहित असे अंतरीं । तैसा तूंही होयें रावणारी । लोकांभीतरी सुखें वर्तें ॥ ५ ॥ अगा हृदयीं संरंभ नसतां । बाह्य करिजे ते कृत्रिमता । तो तेथिंचा नव्हे गा कर्त्ता । सर्वथा अकर्त्ता प्रतीतिबळें ॥ ६ ॥ बाह्य सकळ कर्मांचियेपरी[5] । सर्व संरंभ सर्वदा करी । कर्त्ता दिसे जनांसि निर्धारीं । परी अकर्त्ता अंतरीं ब्रह्मत्वें ॥ ७ ॥ तयाचें साक्षीपण न मैळे । यालागीं कर्तृत्व तया नातळे । अकर्त्ता अंतरीं बाह्य कळे । संरंभमेळे इतर दृष्टीं ॥ ८ ॥ तरी रघुनाथा गा ऐसिया स्थिती । सर्वदा वर्त्तावें जनांप्रति । तुज वर्त्ततांही न बाधती । कर्माकर्मगति स्पर्शेना ॥ ९ ॥ आणी-कही राहाटीपरी । येकाग्र आयिकें गा रावणारी । तसेंचि वर्त्ततां काळांतरीं । बाधु अंतरीं न पाविजे ॥ ११० ॥

अंतः संत्यक्तसर्वाशो वीतरागो विवासनः । बहिः सर्वसमाचारो लोके विहर राघव ॥ २ ॥

अगा रागशब्दें विषयप्रीति । हेंचि कारण सर्वां[6] अनर्थांप्रति । आशापाश येणेंचि पडती । ह्मणोनि सर्वार्थीं टाकावा हा ॥ ११ ॥ अंतरींचा राग जऱ्ही गेला । सर्व आशेचा थारा मोडला । अप्राप्तीचा अभिलाष भला । तोचि संचरला आशासमूह ॥ १२ ॥ जेथ विषयराग समूळ गेला । तेथ अभिलाष सहजेंचि मावळला । प्राप्तविषयही भोगाला । नव्हे त्या वेगळा उद्यतु ॥ १३ ॥ ते आशा आणि विषयप्रीति । अंतरींहूनि जयाच्या जाती । तोचि जाण वैराग्यमूर्ति । राग चित्तीं जया नाहीं ॥ १४ ॥ तेंचि विवासनेचें रूप । नाहीं भोगेच्छा ना भयकंप । अंतरसुखें असे अमूप । आत्मस्वरूप होऊनि ठेला ॥ १५ ॥ अथवा आशाशब्दें ऐसें व्याख्यान । अप्राप्तविषयीं इच्छा पूर्ण । तें होआवें मजलागून । ऐसें जें जाण अभि-लाषावें ॥ १६ ॥ प्राप्तविषयांचां ठाईं अतिप्रीति । जे कीं द्रव्यपुत्रदारादिसंपत्ति । ते न्यून न व्हावी सर्वदा चित्तीं । वियोगें अति मरण मानी ॥ १७ ॥ तो राग नाहीं जेथें विशेषें जाण । तेंचि वीतरागाचें लक्षण । विषयीं अप्रीति स्वानंदेंकरून । लोलुपता जाण तेथें कैंची ॥ १८ ॥ वासनाशब्दें पूर्वीं अनुभविलें । जें विषयगोडपणें मानलें । तेंचि चित्तीं दृढ बैसलें । तें स्मरे भलें वेळोवेळां ॥ १९ ॥ हेंही सर्व जयाचें तुटलें । बाह्यत्वें आचार असती उरले । ऐसें विचरतां लौकिकीं भलें । बाधमेळें न लिंपे जो ॥ १२० ॥ ऐसा असोनियां अंतरीं । बाह्य बरवा आचार करी । लोकसंग्रहार्थ कां संस्कार करी । लोकांभीतरी रघुराया ॥ २१ ॥ जैसा रागेंकरीं अज्ञानी जन । करिती सवासनाकर्माचरण[9] । तैसें बाह्य जनांचें वर्त्तन । अंतरीं-हीन रागद्वेषीं ॥ २२ ॥ ऐसा होऊनि लोकांमाझारी । सुखें वर्तें गा पौलस्त्यारी । लोक-

---

१ ' नित्यतृप्त ' असा पाठ. २ तुच्छ. ३ मानणारांची. ४ इच्छा व विचार यांशिवाय. ५ ' जनांचिये परी ' असा पाठ. ६ विषयांवरील प्रेम. ७ ' आपण ' असा पाठ. ८ प्रेमासाठीं. ९ वासनायुक्त कर्में करणें.

व्याख्या द्विप्रकारीं । सांगेन दुसरी परियसा ॥ २३ ॥ लोकशब्दें सर्वजन । हें तंव प्रसिद्धचि असे जाण । दुसरें लोकशब्दें देह पूर्ण । असे व्याख्यान सर्वशास्त्रीं ॥ २४ ॥ ऐसा अंतरीं असोन । देहीं असे बाह्यसंरंभेंकरून । बाधु न पवे सर्वथा जाण । विदेही आपण ह्मणोनियां ॥ २५ ॥ जेथवांचि सकळांहूनि व्यतिरिक्त । आपणातें जाणे सुनिश्चित । तेथवांचि तो देहातीत । नाहीं लिंपत देहसंगें ॥ २६ ॥ तैसा देहीं असोनि । कर्म करी देह आश्रयूनी । परी तेथिंचा नव्हे भर्वसेनी । देहीं जनीं वर्त्ते जैसा ॥ २७ ॥ मनना उपरी वर्त्तणुक । एवंविध वर्त्तावें देख । सांगों आणीकही कौतुक । वर्त्तणुक अंतर्बाह्य ॥ २८ ॥ आणीकही वर्त्तिंपरी । सांगेन तुज भवगजकेसरी । तैसा होऊनियां अंतरीं । जनांभीतरीं वर्त्तें सुखें ॥ २९ ॥ अंतरीं वरूनि निदिध्यासन । तेणेंचि अनुसंधानेंकरून । जनीं वर्त्तावें ऐसें जाण । सांगेन खूण विबुधवर्या ॥ १३० ॥

पूर्णां दृष्टिमवष्टभ्य ध्येयत्यागविलासिनीम् । जीवन्मुक्ततया स्वस्थो लोके विहर राघव ॥ ३ ॥

अगा ध्येयत्यागें विलासती । ते पूर्णदृष्टि गा सीतापती । ध्येय स्फुरे जेथें अपूर्णगति । द्वैतस्थिति ह्मणोनियां । ३१ ॥ एक ध्येय आपण ध्याता । ऐसें स्फुरे जेथें जानकीकांता । तेचि अपूर्णदृष्टि गा द्वैतता । येकरूपता नाहीं तेथ ॥ ३२ ॥ ध्येय आपणावेगळें । स्फुरे गा जेथें निराळें । ते अपूर्णदृष्टि द्वैतमेळें । तेथें खेळे अज्ञानें ॥ ३३ ॥ ब्रह्मात्मैक्यबोध ह्मणीजत । ध्येय ध्याता ध्यान न स्फुरे जेथ । तेचि पूर्णदृष्टि गा निश्चित । विपश्चित ह्मणताती ॥ ३४ ॥ ऐसी पूर्णदृष्टि अवलंबुनी । आपण ध्याता एक त्यजुनी । राहें जीवन्मुक्तीकरुनी । स्वस्थ जनीं विहरावें ॥ ३५ ॥ स्वस्वरूपीं राहणें तें स्वस्थपण । तैसा राहें मुक्त होऊन । आतां दुसरें आइकें व्याख्यान । समाधान समाधीचें ॥ ३६ ॥ अगा पूर्णदृष्टि करून । स्वरूपस्थ राहें दृश्य त्यजून । लोकांत वर्ते धरून खूण । बाधू जाण न पवसी ॥३७॥ अथवा अहंममतेकरून । मी देहविशिष्ट जाणें आपण । ममकारें पुत्रदारादिस्वधन । इष्टबंधुजन मानीं तूं ॥ ३८ ॥ तैसियाचि सारिखें वर्त्तन । भरण पोषणादिक चिंतन । तें तें सर्वही ध्येय जाण । तत्त्यागें पूर्ण राहिजे सुखें ॥ ३९ ॥ अहंकारममकाराविरहित । जीवन्मुक्त सर्वत्र वर्तत । ते तेणें कर्तव्याचा ईषत । बाधु निश्चित कदा नव्हे ॥ १४० ॥ ऐसा वर्त्ततो लोकाचारीं । तेचि जीवन्मुक्तता गा रावणारी । ऐसें मनन जालियावरी । लोकांभीतरी असावें ॥ ४१ ॥ तीं श्लोकीं करूनि वर्त्तणें । सर्वदा सर्वत्र इये खुणें । सांगितलें परी स्थिति न बाणे । यालागीं साधनें करावीं ॥ ४२ ॥ तऱ्ही देहादिप्रपंचाचें सत्यत्वभान । होय तेंचि विपरीतभावन । तेंचि समाधीसि परम विघ्न । स्वरूप पूर्ण न प्रकाशे ॥४३॥ असंभावना विपरीत भावना । साक्षात्कारासि हें विघ्न जाणा । यालागीं श्रवणमननिदिध्यासना । तिन्हीं साधनां साधावें ॥ ४४ ॥ त्यांमाजी श्रवणमनन दोन्हीं । सांगितलीं गा कार्मुकपाणी । आतां विपरीतभावने लागुनी । निदिध्यासनीं प्रवर्तावें ॥४५॥ ब्रह्मावेगळें जितुकें द्वैत स्फुरे । तेंचि प्रपंचाकारें द्वैत खरें । तेंचि निरसावया साधन बरें । जाण निर्धारें निदिध्यासन ॥ ४७ ॥ तऱ्ही सर्वदा एकांतीं बैसोनी । द्वैत निरसावें गा धनुष्यपाणी । तेणें साक्षात्कार तत्क्षणीं । होय निर्वाणीं अनाथबंधो ॥४७॥ आपणाहून जें जें विजाति । तें तें स्फुरों नेदावें गा आनंदमूर्ती । राहावें आपुले सहजस्थिति । तेचि गती प्राप्तीची ॥ ४८ ॥ ऐसेनि चित्तमालिन्यें करून । विजातीय स्फुरे संस्कारें जाण । अथवा विषयप्रीतिकरून पूर्ण । देहादि स्फुरण जऱ्ही जालें ॥ ४९ ॥ तरी तें द्वैत तिरस्कारून । विजाति ऐसें वोळखोन । सजातिप्रवाहेंकरून । धैर्य पूर्ण करावें गा ॥ १५० ॥ सजातीय स्वरूप आपुलें । ब्रह्मासि ऐक्य जेथें बाणलें । तेंहि गुरुमुखें वोळखिलें । सच्चिदानंद भलें तेंचि जाण ॥ ५१ ॥ तद्रूपें करूनि जें राहणें । तयातेंचि साक्षात्कार ऐसें ह्मणणें । तो होय तोंवरी वळणें । वृत्ति खुणे स्वरूपाचिये ॥ ५२ ॥ तरी तेंचि निदिध्यासन कैसें । सांगों आइकिजे रघुवंशें । जेणें साक्षात्कार होतसे । सुखें उल्हासे परमानंदु ॥ ५३ ॥

एको विशुद्धबोधोऽहमिति निश्चयवह्निना । प्रज्वाल्य द्वैतगहनमेक एव सुखी भव ॥ ४ ॥

अगा अद्वैतबोधाग्नीपुढें । द्वैत तृणराशि बापुडें । भस्मांत होय धडफुडें । ह्मणोनि रोकडें हेंचि करीं ॥ ५४ ॥ तोचि अद्वैतबोधाग्नि गा कैसा । तोही सांगोंया वीरेशा । तरी सजातीय विजातीय

---

१ संसाररूप शत्रूचा नाश करणाऱ्या सिंहा. २ विद्वान्. ३ 'कर्तव्यतेचा' असा पाठ. ४ थोडासा. ५ मन मलिन झाल्यामुळें. ६ 'ध्येय' असा पाठ. ७ अद्वैताचें ज्ञान या अग्नीच्या समोर.

येशा । स्वगतभेदलेशा भेदेना कीं ॥ ५५ ॥ भेदत्रयाहूनि विहीन । ऐसा सर्व येक अपरिच्छिन्न । स्वप्रकाश शुद्धनिर्वाण। नित्य ज्ञानस्वरूप मी ॥५६॥ ऐसा अखंड ऐक्यावबोधदहन । तेणें प्रज्वळूनि द्वैत कानन । येकुला येकुचि होऊन । सुखसंपन्न सुखें राहे ॥ ५७ ॥ अगा ऐसया बोधें करूनि राहतां । द्वैत बाधूं न शके सर्वथा । ह्मणोनी येणें बोधें सीताकांता । अपरोक्षता स्वयें होये ॥ ५८ ॥ अगा मुख्य द्वैत तें देहस्फुरण । स्वस्वरूपीं होतसे देहभान । हेंचि द्वैत गा अतिगहन । पाश पूर्ण बद्धरूपें ॥ ५९ ॥ तोही तोडावयाचें साधन । आणीक निर्वाण तुज सांगेन । तेथें एकाग्र करूनियां मन । आयिक पूर्ण पूर्णानंदा ॥ १६० ॥ अगा देहादि द्वैत जंव स्फुरत असे । तंव तंव स्वरूप कैसें प्रकाशे । ह्मणौनि द्वैत जेणें करूनियां नाशे । तें साधन ऐसें आण रामा ॥ ६१ ॥

देहोहंमानपाशेन दृढं बद्धोसि सर्वतः । बोधोहंज्ञानखड्गेन तन्निष्कृत्य सुखी भव ॥ ५ ॥

अगा देहोहंमानपाशेंकरून । सर्वत्र दृढ बांधला असे जाण । मान शब्दें बोलिजे ज्ञान । देहबुद्धि पूर्ण तेचि ह्मणिजे ॥ ६२ ॥ अगा देह मी जाणणें याचिया साठीं । देह पाशासि पडे वज्रमिठी । मग सोडितां न सुटे ही गांठी । जगजेठी परिस तूं ॥ ६३ ॥ अथवा देह मी ऐसा जो मान । प्रसिद्ध जो कीं देहाभिमान । तेंचि पाशाचें लक्षण । दुसरें व्याख्यान एवंरूप ॥ ६४ ॥ या देहाभिमान पाशें करून । सर्वत्र बांधिजे कळांसून । तोचि मी बोधरूपें हें ज्ञान- । खड्ग तीक्ष्ण छेदावया ॥ ६५ ॥ मी देह नव्हे इंद्रियवर्ग । विश्व नव्हे मी असंग । ज्ञानस्वरूप मी अव्यंग । नाहीं भंग जयासी ॥ ६६ ॥ ऐसिया ज्ञानखड्गें करून । देहोहंमानपाशनिकृंतन । सुखी राहे सुखरूप होऊन । हेंचि खूण निदिध्यासनाची ॥ ६७ ॥ आणि ऐसिया स्थिती राहतां । ह्मणऊनि बाह्यसंरंभें न पवे बाधकता । तो अंतरीं असोनी अकर्ता । बाह्य कर्त्ता ऐसें भासे ॥ ६८ ॥ असो निदिध्यासनाचे परी । आणीक तुज सांगेन असुरारी । अनुष्ठितांचि सरे द्वैतवारी । साक्षात्कारीं आपणा भेटी ॥ ६९ ॥

अनात्मनि रतिं त्यक्त्वा निर्विभागो जगत्स्थितौ । एकनिष्ठतया स्वस्थः सच्चिन्मात्रपरो भव ॥ ६ ॥

तऱ्ही अनात्मा जो देहमूर्ति । तेथ टाकूनियां अतिप्रीति । असतां जगाची स्थिति । निर्विभागगती असावें ॥ १७० ॥ तऱ्ही भासतां ही जगडंबर । स्थिति भासे नानाकार । तेथें चित्त पावे जो विकार । भागप्रकार यया नाम ॥ ७१ ॥ आतां जगस्थिति ते काये । तेथें निर्विभाग काय आहे । हेंही विवंचूनि सर्व पाहें । आयिक अर्थ हे विबुधपती ॥ ७२ ॥ हा गजपति हा अश्वयाति । मनुष्य पशु इत्यादि प्रतीति । सत्य भासे तें जानकी पती । विभाग स्थिती या नाम ॥ ७३ ॥ हें सर्वही आकृतिजात । देखतांही न मने ज्या यथार्थ । अधिष्ठानत्वें वस्तु जाणत । तोचि अर्थ निर्विकार ॥ ७४ ॥ जग जगत्वें प्रतीती भासे । व्यक्तीही जैसी तैसी दिसे । परी सर्वथा बाधित ज्या असे । मिथ्या भासे जैसें मृगांभ ॥ ७५ ॥ ज्ञान तयाही लागीं जैसें । शुक्तीचां ठाईं रजत भासे । परी तो रजतत्वें न घेतसे । जाणत असे अधिष्ठान पूर्ण ॥ ७६ ॥ अधिष्ठान तयासि पूर्ण कळलें । अपरोक्ष बरवें असें बाणलें । तया तेथें आन जऱ्ही भासलें । तऱ्ही साचमेळें न घेपे तो ॥ ७७ ॥ त्याची इतराभासीं दृष्टि नसे । अधिष्ठानची शुद्ध जाणतसे । तया प्रतिभासिक भासे । परी साच दिसे अधिष्ठान ॥ ७८ ॥ हें निर्विभागाचें लक्षण । जग भासतां नेघे सत्यपण । पूर्ण जाणे अधिष्ठान । आकार शून्यवस्तु ॥ ७९ ॥ जेव्हां जगस्थिति प्रतिभासक । बाणली जाण सम्यक । तेथें आतां उपजे तया देख । मिथ्यत्वें सुख कैंचें उपजे ॥ १८० ॥ अगा वोडंबरीचे अलंकार । देखिजेती जरी अतिसुंदर । तरी मिथ्या कळलिया प्रीति थोर । न करी धीर जयापरी ॥ ८१ ॥ नातरी स्वप्नींची सुंदर वनिता । देखोनि नाभिलाषी जागृत होतां । हार देखिला दर्पणीं पाहतां । घ्यावया चित्त चळ नव्हे ॥ ८२ ॥ तैसें असत्य कळलियावरी । प्रीति नुपुजे सर्व प्रकारीं । ह्मणोनि उपेक्षुनि बहुतांपरी । असे अंतरीं एकनिष्ठ ॥ ८३ ॥ ऐसें मिथ्या बाणलिया जगड्वाळ । तेथें प्रीति नुपजे काय नवल । याळागीं रति टाकूनि केवळ । येक निर्मळ अंतरस्थ होई ॥ ८४ ॥ अगा एकनिष्ठते करूनियां । अंतर्मुख व्हावें रघुराया । सच्चिन्मात्रपर होऊनियां । गूढार्थ यया रूप करूं ॥ ८५ ॥ एकशब्दें परब्रह्म जाण । तन्निष्ठता होणें ते एकनिष्ठता पूर्ण । निष्ठिकेंही स्वरूपलक्षण । सांगों

---

१ अमर्याद. २ देहाच्या ठिकाणीं आत्मत्व कल्पिणें या फांसानें. ३ 'टाकिजे' असा पाठ. ४ जखडून. ५ कापणें. ६ 'ऐसें भासवी' असा पाठ. ७ 'हा गज हा पक्षि' असा पाठ. ८ खऱ्याप्रमाणें. ९ जादुगिरीचे. १० स्पष्ट.

खूण निर्जरपती ॥ ८६ ॥ तऱ्ही ते एकनिष्ठता ऐसी । न स्पर्शे दुजया पदार्थासी । ब्रह्मव्यतिरिक्त आणिकासी । दृश्यजातासि स्पर्शेना ॥ ८७ ॥ जें जें दृश्य तें बाह्य जाण । सर्वांचें अंतरस्थ तें ब्रह्म पूर्ण । तेंचि तें सच्चिदानंदघन । तत्पर जाण होइजे ॥ ८८ ॥ बाह्य न स्पर्शे दृश्यासी । तोचि अंतरीं पावे विश्रांतीसी । अंतरशब्दें ब्रह्म परीयेसीं । तेथें आपणासि विश्रांति कीजे ॥ ८९ ॥ तथा मात्र अंतस्थपण । हें जाण रामा येथिंची खूण । तत्पर होआवें संपूर्ण॰। कांहीं आन न स्पर्शावें ॥ १९० ॥ तन्मात्रशब्दें आन व्यावृत्ति । केली येणें पदार्थी । ब्रह्मा वेगळी दृश्याकारवृत्ति । सीतापती होऊं नेदीं ॥ ९१ ॥ दुसरें तरी वास्तव नसे । परी अवास्तव जें मिथ्या भासे । तें मनदृष्टीनेंही न स्पर्शो । सर्वदा असे तत्परचि ॥ ९२ ॥ ऐसिया निदिध्यासनें रमाकांता । साक्षात्कार होतसे गा सर्वथा । तरी निरंतर करावें त्रैलोक्यनाथा । विपरीतार्थी मुकिजे जेणें ॥ ९३ ॥ आतां सच्चिन्मात्रपर । होई ऐसें बोलिले सुरेश्वर । तऱ्ही याचेंही व्याख्यान सविस्तर । सांगेन सार परियेसा ॥ ९४ ॥ तऱ्ही तेंचि ब्रह्म कैसें आहे । जें सच्चिच्छब्दें बोलिलें पाहे । तें वाचा तरी बोलिलें न जाये । परी विशिष्ट होये बोलावया ॥ ९५ ॥ अगा जें जें वाचा बोलिजे । तें तें विशिष्टचि जाणिजे । त्याचीही लक्षणें जऱ्ही कीजे । तरी केवळ सहजें लक्षिजेत ॥ ९६ ॥ आतां विशिष्ट तें काय कैसें । लक्षण तें किम् लक्षण असे । लक्षण केलिया काये उरतसे । वाचा प्रवेशे तें स्थान कोण ॥ ९७ ॥ हेंहीं सांगों तुह्माप्रति । जेणें कळेल याची स्थिति । तें सर्व परिसोनि चित्तीं । दृढ श्रोतीं धरावें ॥ ९८ ॥ तेंचि वसिष्ठ रघुनाथाप्रति । सांगती ब्रह्मस्वरूपस्थिति । ब्रह्म तेंचि परिसोनियां चित्तीं । विश्वमूर्त्ती धरावें गा ॥ ९९ ॥ वास्तव नित्य शुद्ध केवळ । त्यासि मिळे कल्पितमेळ । तऱ्ही तेंचि विशिष्ट सकळ । जडेंसि केवळ येक जें भासे ॥ २०० ॥ शुद्ध तें सर्वांसि मिळत । तेथेंचि जड सर्व अध्यस्त । उभयतां एकचि भासत । त्यासि ह्मणिजेत विशिष्ट ऐसें ॥ १ ॥ जैसें शुद्ध स्फटिकाचे ठाईं । जड नानावर्ण भासती पाहीं । तें येक भासलिया जाण सर्वही । भाविती तोही तोचि वर्ण ॥ २ ॥ तो आरक्तसंगें आरक्त भासे । जैसा वर्ण तैसा दिसे । तयासिचि विशिष्ट ऐसें । संत सर्वही ह्मणताती ॥ ३ ॥ त्याची तेथील लक्षणा कीजे । आरक्तासि गुण टाकिजे । मग उर्वरित शुद्ध निर्मळ उरे जें । तेंचि सहजें उपाधिहीन ॥ ४ ॥ तैसें ब्रह्म अतिशुद्ध निर्मळ । स्वप्रकाश व्यापक प्रांजळ । तयासि कल्पित मिळे समेळ । प्रपंचजाळ उपाधि हा ॥ ५ ॥ तें शुद्ध व्यापक सर्वांचा ठाईं । विश्वासि व्यापूनि राहिलें पाहीं । उपाधीचे धर्म शुद्धाचा ठाईं तेही । भासती सर्वही अधिष्ठानपणें ॥ ६ ॥ तिये उपाधीयोगें करून । दोन्ही येकत्र भासती ते विशिष्ट गुण । तें निवडावया लक्षण पूर्ण । कीजे सज्ञान तें ऐसेंचि ॥ ७ ॥ अगा लक्षणें त्रिविधप्रकार । तेंही सांगेन तुज महाथोर । संक्षेपें कीजेल विचार । मन येकाग्र करूनि आईकें ॥ ८ ॥ तरी जहल्लक्षणा अजहल्लक्षणा । तिसरी ते जहदजहल्लक्षणा । त्यांचीही सांगों विवंचना । आइक सज्ञाना रघुवर्या ॥ ९ ॥ अगा जेणेंकरूनि विशिष्ट बोलिजे । त्याचाचि समूळीं त्यागु कीजे । उपाधीवरून लक्षिजे । तेंचि जाणिजे जहल्लक्षण ॥ २१० ॥ ' गंगायां घोषः प्रतिवसति ' । अगा मित्र सांगे मित्राप्रति । गंगामाजी गांवाची वसति । प्राप्तप्राप्ति युक्ती तेथें गेलिया होये ॥ ११ ॥ तेथ गंगाचि उपाधि ग्रामासी । तो गंगेचेनि विशिष्ट परियेसीं । तेथ जहल्लक्षणा कीजे ऐसी । त्यागु गंगेसि करावा ॥ १२ ॥ गंगेमध्यें न घडे ग्रामवस्ती । ह्मणोनि जहल्लक्षणा करिती । समूळ गंगाचि टाकिजेती । तीर लक्षिती ज्ञातेजन ॥ १३ ॥ समूळ गंगेचा त्यागु केला । तीरीं ग्राम जरी लक्षिला । जहल्लक्षणा यया बोला । होये भूपाळा श्रीरामचंद्रा ॥ १४ ॥ आतां अजहल्लक्षणा ऐसी । त्यागु नाहीं उपाधीसी । तद्रूपाचि पदार्थासी । घेईजे त्यासि अजहल्लक्षणा ॥ १५ ॥ ' शोणो धावति ' ऐसें । विशिष्ट येथें बोलिलें असे । ह्मणिजे आरक्त अश्व धांवतसे । त्यागु नसे उपाधीसी ॥ १६ ॥ आरक्तगुणेंसि अश्वयाति । लक्षिजे जेथें महामती । तेचि अजहल्लक्षणा सर्वार्थी । स्वयें बोलती ज्ञातेजन ॥ १७ ॥ आतां सांगों जहदजहल्लक्षण । तेथ त्यागात्यागविवंचन । वाच्यांशु टाकूनि लक्ष्यांशु जाण । घेइजे खूण ययाचिपरी ॥ १८ ॥ येथ शबलांशु तितका टाकिजे । शुद्ध शुद्धांशुचि घेइजे । हें मुख्य लक्षण जाणिजे । विशिष्ट कीजे शुद्धालागीं ॥ १९ ॥ ' सोऽयं देवदत्तः ' ऐसें । त्रिपदी लक्षण ऐसें असे । ' सः अयं देवदत्तः ' या

---

१ ' अन्य ' असा पाठ. २ ' ऋषीश्वर ' असा पाठ. ३ वाणीनें. ४ भ्रमरूप. ५ मलयुक्त. ६ गंगेवर गौळवाडा आहे. ७ तांबडा ( घोडा ) धांवतो. ८ अशुद्ध असलेला भाग. ९ तो हा देवदत्तः

पदत्रयांशीं । लक्षणमिसें शुद्ध घेइजे ॥ २२० ॥ तो ह्मणतां तत्कालदेशविशिष्ट । 'अयं'पदें एतत्कालदेश वरिष्ठ । उभयतां देश काळ दोन्ही स्पष्ट । त्यागु उत्कट करावा ॥ २१ ॥ अन्य देशीं काळीं देवदत्त देखिला । वर्त्तमान देशीं काळीं तोचि भासला । उभयतां देशकाळाचे उपेक्षिला । देवदत्त उरला शुद्ध एक ॥ २२ ॥ अगा शुद्धाचि एका देवदत्तासी । उपाधि देशकाळ परियेसीं । तेथें उभयतां देशकाळासी । त्यजूनि शुद्धासि घेइजे ॥ २३ ॥ तैसेंचि सत् चित् आनंद । हें ब्रह्मवाचक पदत्रय शुद्ध । हें विशिष्ट जाण निर्विवाद । सांगों भेद ययाचाही ॥ २४ ॥ यियें विशिष्ट पदें तिन्ही । ह्मणोनि उच्चारणा आली वाणी । शुद्ध केवळ न बोले कोण्ही । भरंवसेनि जाण रामा ॥ २५ ॥ येथ दृश्य जें कीं मिथ्याभूत । शुद्ध केवळासि तेंचि मिळत । तेणें मिश्रित जालिया वाचा बोलत । तया ह्मणिजेत विशिष्ट ऐसें ॥ २६ ॥ यामाजी दृश्य मिथ्या तें कोण । आणि शुद्ध केवळ तें किंलक्षण । आणि तेथें करावी जे कीं लक्षणा पूर्ण । शुद्ध सज्ञान निवडावें ॥ २७ ॥ हें सर्वही तुजप्रति । बरवें सांगों गा जानकीपती । तरी सत्शब्दें सत्ता ह्मणिजेती । तैसीचि ह्मणती आकाश सत्य ॥२८॥ गगनाची मिथ्याभूत सत्ता । आणि ब्रह्माची जे वास्तव सत्ता । येकत्र जालिया तत्वतां । विशिष्ट रघुनाथा त्या नाम ॥२९॥ ब्रह्म सत्ता तरी सर्वत्र असे । आणि लौकिकीं आकाशसत्ताही भासे । महाप्रळयीं गगन वसे । तें त्याच ऐसें माने जनां ॥ २३० ॥ आकाशसत्ता ते शबल जाण । वाच्या जाली असे तें मळिण । ते टाकिलीया उरे चैतन्य। शुद्ध पूर्ण सत्तारूपें॥३१॥ तैसें चित्शब्दें बोलिजे ज्ञान। ज्ञान तें शुद्ध चैतन्य। दुसरें तें वृत्तिरूपज्ञान जाण । दृश्य मिथ्यापण तयासि असे ॥ ३२ ॥ येणें वृत्तिरूपेंकरून । विशिष्ट वाच्यांश जालें शुद्ध ज्ञान । ययाची करूनि लक्षणा पूर्ण । शुद्ध ज्ञान निवडावें ॥ ३३ ॥ तैसें सुखरूपचि ब्रह्म असे । दुसरें चित्तवृत्तीनें जें ज्ञान प्रकाशे । तेंही तुज सांगेन कैसें । तेंचि विश्वेशें परिसावें ॥३४॥ अगा अंतःकरणवृत्तीचां ठाईं । स्वतःसिद्ध चैतन्य असे पाहीं । तैसेंचि सकळांही विषयीं । चैतन्य सर्वही व्यापलें असे ॥ ३५ ॥ ते वृत्तीसि आणि विषयांसी । सन्निकर्ष होतांचि परियेसीं । तद्विषयिक अज्ञानासी । नाशु त्या लक्षणासि तत्काळ होये ॥ ३६ ॥ हें उभयतां चैतन्य एक जालिया । सुखोद्भव होये आपसया । हें चैतन्यसुख परी विषया यया । केलें साचिया परिछिन्न ॥ ३७ ॥ हें क्षणिकसुख आणि चैतन्यसुख । दोन्ही येकत्र भासती देख । येक लक्षणा करूनि निर्विशेख । आत्मसुख तेंचि घेइजे ॥ ३८ ॥ ह्मणऊनि सत् चित् आणि आनंद । तीहीं पदीं एक ब्रह्मचि शुद्ध । एकेंविण एक जड उपेक्ष्य मंद । प्रतिष्ठितां बाध बहुत असे ॥ ३९ ॥ तथापि वेगळें करितां ऐसा असे । सत्ता ज्ञानाहूनि वेगळी नसे । वेगळी करितां दृश्य होतसे । ज्ञानहीन ऐसें जड जाण ॥ २४० ॥ अगा जितुकें अनात्मक दृश्य जाण । दृश्य तें मिथ्याभूत संपूर्ण । यालागीं सत्ता ज्ञानेंसि भिन्न । न घडे जाण रघुवर्या ॥ ४१ ॥ ज्ञान सत्तेहूनि वेगळें बोलतां । तऱ्ही सत्तेविण कल्पित तत्वतां । जैसी स्वप्नींची स्वप्नावस्था । समूळ सर्वथा मिथ्या कल्पित ॥ ४२ ॥ स्वप्नाचा आश्रय आपण होये । परी भ्रमास्तव भासे पाहे । भ्रम गेलिया तेंही जाय । ह्मणोनि नव्हे सत्य कहीं ॥ ४३ ॥ ह्मणोनि ज्ञान सत्तेहूनि वेगळें । करितां कल्पितपण तया आलें । ह्मणोनि येकचि ज्ञान सर्वमेळें । नव्हे वेगळें कालत्रयीं ॥ ४४ ॥ ज्ञान आनंदेंसि बोलतां भिन्न । तऱ्ही तें उपेक्षणीय जालें ज्ञान । सुखावेगळें प्रवर्ते कोठें कोण । सर्वत्र लक्षण जाण रामा ॥ ४५ ॥ या जनाची प्रवृत्ति ऐसी । सुखालागीं गोडी सर्वांसी । आत्मसुख नेणोनि तरी त्यासी । विषयसुखासि धांवणें ॥ ४६ ॥ सुखावेगळें प्रवर्ते कोण्ही । ह्मणऊनि ज्ञान आनंदेंसि भिन्न न मानीं । येकचि जाण सर्वथा तिन्ही । लक्षणा करोनि पाहें पां ॥ ४७ ॥ आतां ज्ञानाहूनि आनंद भिन्न । तरी ज्ञानेंविण आनंद मंद जाण । मंद तेंचि अप्रकाश हीन । ह्मणऊनि अभिन्न येकरूप ॥ ४८ ॥ आनंदाहूनि सत्ता भिन्न ह्मणतां । आनंद नाहीं उपेक्ष्य सर्वथा । सुखेंविण प्रवृत्ति ताता । पश्वादिसमस्तां न देखिजे ॥ ४९ ॥ सत्तेवेगळा आनंद करिजेत । तरी तोचि विषयानंदु परिकल्पित । विषय मिथ्या तेथें तज्जनित सुख सत्य केवीं होये ॥ २५० ॥ अगा विषयासि जऱ्ही सत्ता असती । तऱ्ही तें नित्य सुख असतें रघुपती । यालागीं त्याची कल्पित स्फूर्ति । जैसी स्त्रियेसि रति स्वप्नीं होये ॥ ५१ ॥ यालागीं तिन्हीं पदांचें वाच्य भिन्न । परी शुद्ध तें येकचि अभिन्न । लक्षणा केलिया केवळ जाण । ब्रह्म निर्वाण रघुराया ॥ ५२ ॥ आतां केवळ तें कैसें बोलावें । वाचा बोलतां बोली न फावे । वाचाविशिष्टातेंचि

१ 'उपाधि ज्ञाला', असा पाठ. २ अस्तित्व. ३ 'जगा' असा पाठ. ४ एकत्र होणें. ५ त्यासंबंधीं. ६ आपोआप. ७ उपेक्षा करण्यास योग्य. ८ त्यापासून उत्पन्न झालेलें.

अनुवादावें । शुद्ध न वदावें निरंश ह्मणउनी ॥ ५३ ॥ अगा वाचेचें बोलणें किती । तेंही परिसें जानकीपती । जाति गुण क्रिया संबंध असती । तेंचि वदती गिरा स्वयें ॥ ५४ ॥ अगा ब्राह्मणक्षत्रियादि वैश्य जाति । गोअश्वादिमृगहस्ती । तेथेंचि जाणा वाचेची प्रवृत्ति । अयोध्यापती ऐसें जाण ॥ ५५ ॥ तैसेंचि नीलकृष्ण रक्तादि गुण । शुभ्र पीत ऐसे नानावर्ण । तेथें वाचा करी प्रवेशन । जाण खूण ब्रह्ममूर्ती ॥ ५६ ॥ तैसीचि क्रिया जेथ असे । वाचक पाठक लेखक ऐसें । गमनचळण व्यापारोद्देशें । तेथें प्रवेश वाचा जाण ॥ ५७ ॥ तैसाचि संबधु जानकीपती । जेथें जेथें असती दिसती । तेथेंचि वाचेची प्रवृत्ति । केवळीं गति असेचिना ॥ ५८ ॥ धनी गोमान् इत्यादि संबंध । देखसी जेथ जेथ प्रसिद्ध । तेथचि वाचेचा अनुवाद । नित्य संबंध प्रवेशोनी ॥ ५९ ॥ या चहूंकरूनि संकेतीं । डित्थडफित्थादिनामव्यक्ति । केवळ अमुका ऐसी नामकीर्ति । तेथेंही वस्ती वाचेची असे ॥ २६० ॥ तथापि येथें देहसंबंध असे । तरीच वाचा संकेतीं प्रवेशे । केवळीं प्रवेशु कैसेनि असे । वाचा प्रवेशे विशिष्टीं ॥ ६१ ॥ यया चौंवेगळें गा रघुनाथा । वाचा न प्रवर्ते सर्वथा । ब्रह्मीं तंव जातिगुणादिकी वार्ता । नाहीं कथा संबंधक्रियेची ॥ ६२ ॥ अथवा नाहीं नामसंकेत । वाची कैसी प्रवेशेल तेथ । तें निर्गुण नित्यानंदभरित । स्वयें प्रकाशत स्वप्रकाशें ॥ ६३ ॥ ऐसें जें सच्चिन्मात्र जाण । दोन पदें बोलतां आनंद पूर्ण । न बोलतांही असे जाण । न संडी येकपण ह्मणोनियां ॥ ६४ ॥ अगा सत्ता तेथ ज्ञान असे । ज्ञान तेथ आनंद भासे । आनंद तेथ सत्ता ज्ञान वसे । सामरस्यें तिन्ही पदें ॥ ६५ ॥ यालागीं सच्चिन्मात्र जें ब्रह्म केवळ । तत्पर असतां सर्वकाळ । सर्वथा न बाधी भवजाळ । नित्य निर्मळ स्वयेंचि ॥ ६६ ॥ अगा सच्चित् पदें कळावया । हें व्याख्यान केलें रघुराया । यालागीं ब्रह्मपर होऊनियां । राहावें त्या नित्यानंदें ॥ ६७ ॥ ग्रंथाचें हृदय न काढितां । वरी वरी कीजे व्याख्यानकथा । ते काळक्रमणूक परी सज्ञान श्रोतां । विश्रांति तत्वतां न पाविजे ॥ ६८ ॥ आबाल गोपाळ समजती । परी श्रोतयांची धाय मती । तैसें व्याख्यान केलिया संतीं न निवती चित्तीं साधु श्रोते ॥ ६९ ॥ आणि आपण तों हेंचि करावें । साधूंचें हृदय तोषवावें । ते साधु संतोपलिया स्वभावें । पूर्णत्व फावे आपणासी ॥ २७० ॥ अगा साधु सन्मुख जालिया । कार्यसिद्धि होये आपणयां । साधु विमुख तें जाय वायां । कष्ट केलिया कल्पकोटि ॥ ७१ ॥ ह्मणोनि म्यां हेंचि केलें । संतांसि मानलें तेंचि वाखाणिलें । यांसि वाखाणितां माने भलें । येरां न कळे ह्मणोनि उबगु ॥ ७२ ॥ ते ययातें पाल्हाळ ह्मणती । स्वयें तन्हीं न कळे ग्रंथोक्ति । हें असो साधुजन निवती । हे ग्रंथव्यक्ति तयांचि लागीं ॥ ७३ ॥ परी इतरांसिही करूं नमन । यथामति कीजेल व्याख्यान । श्रोतां देऊनि अवधान । ग्रंथानुसंधान परिसावें ॥ ७४ ॥ वसिष्ठ ह्मणती गा रघुनाथा । पुनरपि निदिध्यासनाची कथा । उपाय दुसरा याहीपरता । सांगों तत्वतां तो आयिक ॥ ७५ ॥

अजाग्रत्स्वप्ननिद्रस्य यत्ते रूपं सनातनम् । सचेतनं विशुद्धं च तन्मयः सर्वदा भव ॥ ७ ॥

अगा ब्रह्मचि येक दुजें नसे । त्यालागीं नाना करूनि साहासें । जाणावें मानसीं ऐसें । तन्हीं नव्हे तैसें रघुराया ॥ ७६ ॥ अगा ब्रह्म तें स्वतः तूंचि असती । त्या आपणा पावावया आनंदराशी साहास कासया करिसी । सिद्ध असती तुझा तूंचि ॥ ७७ ॥ तरी तेंचि स्वरूप कैसें । ऐकें रघुनाथा सावकाशें । तरी जागृतिस्वप्नसुषुप्तीं न नासे । तेंचि असे स्वरूप तुझें ॥ ७८ ॥ तूं अवस्थात्रयाहूनि वेगळ । तूंचि अवस्थात्रयाचा साक्षी केवळ । तूंचि तुझें स्वरूप निर्मळ । नित्य निखिल सनातन ॥ ७९ ॥ नाहीं स्ववस्थात्रयांतें जाणते । तिन्ही अभिमानी आहेती आइते । विश्वतैजसप्राज्ञ ययांतें । अभिमानियांतें जाण असेत ॥ २८० ॥ हें तरी यथार्थ बोलिलेती । अवस्थांतें अभिमानी जाणती । परी ते येकीतेंचि प्रकाशती । दुजी नेणती सैरक्षपणें ॥ ८१ ॥ अहो स्वप्नावस्थेचें ज्ञान ॥ सर्वथा विश्व नेणे जाण । तें जसें जागृतीचें अभान । नेणे अनुसंधान सुषुप्तीचें ॥ ८२ ॥ प्राज्ञ नेणे जागृति । विश्व नेणे स्वप्नसुषुप्ति । तैजसु नेणे जागरसुषुप्तीप्रति । परस्परें नेणती अवस्थांतरें ॥ ८३ ॥ जो जे वस्तुअवस्थेचा अभिमानी । तो तीतेंचि प्रकाशी भर्वसेनी । दुसरीचें ज्ञान तयाचेनी । कोदंडपाणी न करवे ॥ ८४ ॥ हा जन्हीं येकीतेंचि प्रकाशी । परी आपणा तैसें नेणे परीयेसीं । ना इतरांही अवस्थांसी । निश्चयेंसि नेणतु ॥ ८५ ॥ साक्षी अवस्था तिहींचें ज्ञान । येकला येक जाणे आपण ।

---

१ 'बोलावें' असा पाठ. २ वाचा. ३ 'असत्या' असा पाठ. ४ ह्मणेकरितां ठेवलेली नांवें. ५ 'परी चतुर श्रोतयाची धाय मती' असा पाठ. ६ 'फुकटचि' असा पाठ. ७ श्रम. ८ 'जाणावया' असा पाठ. ९ प्रगट करितात, जाणतात.

येक समयींच अनुसंधान । स्वयेंचि पूर्ण करितु असे ॥ ८६ ॥ भलता येखादा पदार्थ । पूर्वीं जाणत नव्हतों ह्मणत । आतां जाणतों ह्मणतां तेथ । दोन्ही भासत परियेसीं ॥ ८७ ॥ पदार्थ आणि पदार्थातें जाणता । दोहींतें आपण प्रकाशिता । म्यां देखिलें ऐसें ह्मणतां । प्रकाशें देखता आपणचि ॥ ८८ ॥ अभिमानी आणि प्रमाता । यांतेंही साक्षीच प्रकाशिता । ह्मणोनि साक्षी तो तूं रघुनाथा । नित्य अनंता चिद्रूप तूं ॥ ८९ ॥ नित्य निरंतर सनातन । श्रीराम स्वप्रकाश चैतन्यघन । तन्मयचि होय तूं आपण । सर्वदा पूर्ण रघुनाथा ॥ २९० ॥ जैसा तूं वास्तव आहेसी । तैसाचि असें अहर्निशीं । इतुकेनि स्वस्वरूपचि असती । त्या सांगों वर्मासि आणिकाही ॥ ९१ ॥

मा भव ग्राह्यभावात्मा ग्राहकात्मा च मा भव । भावनामखिलां त्यक्त्वा यन्मस्तन्मयो भव ॥ ८ ॥

ग्राह्य जो कीं घटपटपदार्थ । जें जें आपणासि दृश्यत्वें भासत । तद्रूप होऊं नको अकस्मात । आपणा व्यतिरिक्त ह्मणोनियां ॥ ९२ ॥ देहादिदृश्याकार नव्हे ताता । ग्राहक अहंकारविशिष्टप्रमाता । तद्रूपही न होऊनियां तत्वतां । सांडीं कथा ग्राह्यग्राहकांची ॥ ९३ ॥ ययावेगळा तूं होऊन । अखिलही भावना टाकून । स्वस्वरूपीं तन्मय राहोन । सुखसंपन्न सर्वदा असें ॥ ९४ ॥ हेंचि निदिध्यासनाचें वर्म । विजातीयत्यागें केवळ ब्रह्म । आश्रयूनि राहावें निःसीम । प्रपंचउपरम करूनियां ॥ ९५ ॥ तूं जऱ्ही ह्मणसी मन आणि मनाचे संकल्प । निरंतर हें असतां अमूप । तें सांडूनियां कैसें होऊं चिद्रूप । आपेंआप असावें ॥ ९६ ॥ तरी येविषयीं गा रघुनाथा । साहस कासया तुह्मी मानितां । अतिसुखकर हा उपाय करितां । प्रयासकथा कायसी ॥ ९७ ॥ तोही उपाय आतां सांगेन । येक एकाग्र करूनियां मन । अतिशयेंसि सुगम सोपान । आयिक खूण रघुनाथा ॥ ९८ ॥

संकल्पेनैव संकल्पं मनसैव मनो मुने । छित्वा स्वात्मनि तिष्ठ त्वं किमेतावति दुष्करम् ॥ ९ ॥

अगा ऐसा संदेह तुझा चित्तीं । स्वस्थ राहतां ब्रह्माकारस्थिती । तेथ संकल्प अनंत उठती । ते करिती प्रपंचाकारें ॥ ९९ ॥ हा अंतरींच स्वस्थ राहों पाहे । तंव संकल्प हा उगा न राहे । बाहेरि घालोनि लवलाहें । करीं पाहे विषयाकार ॥ ३०० ॥ जरी सावध होऊनि आपण । कीजे संकल्पाचें छेदन । तंव अंतरीं मूळ असे त्याचें मन । संकल्प तेणें कोटि करी ॥ १ ॥ ह्मणोनि निदिध्यासनीं निश्चित । मन आणि संकल्प अंतरायभूत । हें असतां नव्हे स्वरूपस्थ । ऐसें चित्त तुझें मानीं ॥ २ ॥ तरी ययाचा उपाय गा रघुपती । अपूर्व सांगेन तुजप्रति । तेंचि दृढ धरूनिया चित्तीं । करीं सुमती उपाय हा ॥ ३ ॥ तरी असंत संकल्प हा देहाकार । त्यासि ब्रह्माहमस्मिसंकल्पेंकरूनि मार । आणीक नाहीं उपायांतर । संकल्पसंहार जेणें होये ॥ ४ ॥ देहादिविश्वाकारें संकल्प उठी । तयातें कोण वळिंया वळें लोटी । साधनांतर आटाटी । ब्रह्मास्मि जगजेठी वांचूनियां ॥ ५ ॥ विपरीत संकल्पें संकल्प सर्वथा । ब्रह्मास्मि संकल्पेंविण नाहीं तत्वतां । यालागीं संकल्पें संकल्पार्था । पावतीं घाता श्रीरामचंद्रा ॥ ६ ॥ नाहीं संकल्प सरलियावरी । परी मन तों असे अंतरीं । तरी त्याचीही सांगों परी । ऐक निर्धारीं रघुपुंगवा ॥ ७ ॥ अगा संकल्पविकल्पात्मक मन । जें कीं करी प्रपंचानुसंधान । देहादिप्रपंचभावन । करी जाण तें अशुद्ध ॥ ८ ॥ तयासि शुद्धें मनेंकरूनी । जें ब्रह्माकार होये इतर निरसनीं । दोषदृष्टि परतवी विषयांपासुनी । तेंचि भवनिं शुद्ध मन ॥९॥ तेणें मनेंकरूनी रघुनाथा । अशुद्ध मन छेदावें गा सर्वथा । निरंतर करावी ब्रह्माकारता । हेचि छेदकता तयाची ॥ ३१० ॥ याही दोहीं शुद्धीकरुनी । मन संकल्प दोन्ही छेदुनी । स्वस्वरूपीं राहें निर्वाणीं । कोदंडपाणी परमानंदें ॥ ११ ॥ जैसें तप्त लोह शीतल लोहें । कुठारेंकरूनि छेदिजेत आहे । तैसें शुद्ध संकल्प मनेंकरीं पाहें । दहन होये अशुद्धाचें ॥ १२ ॥ तैसें रागद्वेषादिकीं तापलें । तें मन शुद्ध मनें पाहिजे छेदिलें । जें रागद्वेषत्यागें निवालें । सन्मुख जालें आत्मयासी ॥ १३ ॥ अगा इतुकें साधन करावया । दुष्कर काय गा रघुराया । स्वस्वरूपीं नित्य असावया । क्लेश तया काय होती ॥ १४ ॥ अगा जेथ परमानंद निरंतर । नाहीं दुःखाचा लेश कोरें । तेंचि आत्मस्वरूप निर्विकार । तदाकार होऊनि राहीं ॥ १५ ॥ तेथें राहतां कोण दुःख असे । ऐसें विचारूनि सांग मानसें । हें सांडूनि देहाच्या अध्यासें । लोक पिसे राहताती ॥ १६ ॥ शेवटीं देह तरी हा पुरुष नव्हे । देहासि यासि काय संबधु आहे । आश्चर्य करूनि निंदितो पाहे । कैसा होये हा देह ॥ १७ ॥ श्लोकपंचकेंकरूनि हें निरूपण । वसिष्ठ करिती देहनिंदन ।

---

१ 'लागे प्रकाशिता', असा पाठ. २ 'भावनाजाल' असा पाठ. ३ संसार टाकूनि. ४ जिना. ५ विप्ररूप. ६ मीच ब्रह्म आहें ह्या निश्चयानें. ७ दांडगा. ८ 'विकल्प करूनियां' असा पाठ. ९ निश्चयेंकरून.

त्यामाजी श्लोकद्वयें देहव्याख्यान । भिन्नपण देहचैतन्या ॥ १८ ॥ श्लोकत्रयें जनाची निंदा करी । आश्चर्य करितां न माये अंतरीं । वास्तव स्वरूप त्यजूनि स्वीकारी । देहधारी मीचि ह्मणोनि ॥ १९ ॥ ऐसें पांचा श्लोकीं निरूपण । स्वयें करी वसिष्ट आपण । यांमाजी श्लोकद्वयें देहलक्षण । श्रोतीं सावधान परिसिजे ॥२२०॥ हें निरूपण आयिकिल्याचिसाठीं । सुटे देहआत्मयाची गांठी । देहनिरसनें उठाउटी । होय भेटि स्वस्वरूपा ॥ २१ ॥ तेंचि निरूपण आतां । एकाग्र परिसावें श्रोतां । जें कीं वसिष्ठ श्रीरघुनाथा । लोभें तत्वतां बोलिले ॥ २२ ॥

कस्तवायं जडो मूको देहो भवति राघव । यदर्थं सुखदुःखाभ्यामवशः परिभूयसे ॥ १० ॥

अगा कोण गा तुजकारणें । देह आला गा देहपणें । त्या देहाचीं सांगेन लक्षणें । मग जाण ह्मण आपैसी ॥ २३ ॥ अगा देह तरी जड अति । अप्रकाश पाषाणस्थिति । जड तें अमुक्त सर्वार्थी । सीतापती जाण तूं ॥ २४ ॥ जें अजड आणि स्वप्रकाश असे । तेंचि मुक्त जाण सर्वांशें । जड तें अमुक्त जाण ऐसें । हें वर्म विशेषें जाणावें ॥ २५ ॥ आणि या देहाची परिस गति । प्रारब्धाधीन वर्ते सर्वार्थी । जैसी खांबसूत्राची मूर्ति । सूत्रें वर्त्तवी तदधीनपणें ॥ २६ ॥ सूत्रधाराचिया जाणें सूत्रें । वर्त्तती खांबसूत्रीयंत्रें । तैसीं देह सुखदुःखें विचित्रें । भोगी परतंत्रें प्रारब्धें करूनी ॥ २७ ॥ ऐसा हा देह कुश्चित जाण । तोचि आपण ह्मणवील कोण । जड मूढ सुखदुःखाचें भाजन । परिणामीं पूर्ण विकारवंत ॥ २८ ॥ आणीकही अपाड तुज आणि देहासी । तेंही सांगों गा हृषीकेशी । येकही साम्य तुज देहासी । येकेंचि अंशीं असेचिना ॥ २९ ॥ देह जाणतां आपणासि भिन्न । आत्मत्वें नेघे ययातें जाण । मग करितां निदिध्यासन । अतिसोपान रघुराया ॥ २३० ॥ ह्मणोनि ऐकें देहाचें लक्षण । हा तंव आत्मस्वरूपेंसि विलक्षण । जाणतांचि पाविजे आपण । तेंचि निरूपण परियेसीं ॥ ३१ ॥

क्व मांसरुधिरादीनि क्व त्वं चैतन्यविग्रहः । विजानन्नपि देहेऽस्मिन्नात्मबुद्धिं जहासि किम् ॥ ११ ॥

देह तें जाण एवंभूत । मांसरुधिरादिकीं कुत्सित । अस्थि चर्म मज्जा विष्टा मूत्र । लाळयुक्त पूयपंक ॥ ३२ ॥ सर्वदा दुर्गंधीचें बिन्हाड । अंतरीं कृमि जंतु निरंतर । स्रवतातो नवही द्वार । लुती सपूर सर्वांगीं गळे ॥ ३३ ॥ याचीं लक्षणेंही तुजप्रति । तें मागां सांगितलीं गा रघुपती । आतां निरूपितां पुनरुक्ती । विस्तार अति ययासि होये ॥ ३४ ॥ आणि षडूर्मिही महादारुण । इये देहीं वर्त्तती श्रीरामा जाण । क्षुधा तृषा शोक मोह तीक्ष्ण । जरा मृत्यु जाण अतिदुस्तर ॥ ३५ ॥ हें येकयेक बोलतां गा रघुपती । चिळसीस पात्र सर्वार्थी । परिणामीं निधन नश्वर गति । कुत्सित स्थिति सर्वांपरी ॥ ३६ ॥ तरी ऐसा हा देह कोणीकडे । आणि अविचारी चैतन्य हें तुझें नांव घडे । दोहींसि विचारितां साम्य न घडे । पाहतां अपाडें क्षराक्षरत्वें ॥ ३७ ॥ तूं आत्मा अक्षर अविनाशी । ज्ञानस्वरूप आनंदराशि । ऐसें असोनियां देहासी । आत्मत्वें कैसी धरिसी बुद्धि ॥ ३८ ॥ अगा दोहींसि अपाड सर्वांपरी । ऐसें जाणतां गा रावणारी । देहीं आत्मबुद्धि झडकरी । लोक हे दुरी टाकितीना ॥ ३९ ॥ तुजही टाकितां कोण सांकडें । तूं तंव दोहींतें जाणसी गा अपाडें । तूं अक्षर निर्विकार धडफुडें । त्यासि पडिपाडें देह कैसा ॥ २४० ॥ देह तो परिणामी अमंगळ क्षर । जड विकारी आणि नश्वर । ऐसियासि आत्मा येकाकार । सविकार केवीं होये ॥ ४१ ॥ अगा ऐसी देहाच्या ठाईं । आत्मबुद्धि टाकूनि पाहीं । सुखें राहावें आपुलां ठाईं । सर्वदाही स्वस्वरूपीं ॥ ४२ ॥

एतावतैव देवेश परमात्मावगम्यते । काष्ठलोष्टसमत्वेन देहोऽयमवगम्यते ॥ १२ ॥

अगा इतुकियाचि वर्मेंकरूनी । देवाचा देव पाविजे निर्वाणीं । तेंही वर्म तुजलागुनी । कार्मुकपाणी सांगेन ॥ ४३ ॥ जो सर्वांसि स्वप्रकाशें प्रकाशी । त्यातेंचि देव ह्मणिजे गा आनंदराशी । ईशशब्दें प्रकाशाही प्रकाशी । सर्वस्वेंसि सत्तारूपें ॥ ४४ ॥ त्या देवेशा ब्रह्मातें पाविजे । कीं तेंचि होऊनि स्वयें आसिजे । जरी देह हा काष्ठतुल्य देखिजे । ममता नेणिजे ययाचां ठाईं ॥ ४५ ॥ अथवा कीट लोष्टादिमेळ । तद्वत् देखिजे हा समळ । त्याचा ठाईं अनासक्त केवळ । नाहीं मोहजाळ जयापरी ॥ ४६ ॥ तैसा ये देहीं सर्वदा उदास । परकीयत्वें देखे मिथ्याभास । तरीच ब्रह्मींसि वास । सावकाश स्थिति होये ॥ ४७ ॥ देहीं दृढ ममता धरितां । आत्मत्वेंचि देहासि मानितां । कदा न

१ 'स्वस्वरूप' असा पाठ. २ काष्ठसूत्राची. ३ पात्र. ४ भिन्नपणा. ५ 'रूजड' असा पाठ. ६ सहा प्रकारच्या लाटा. ७ 'निंद' असा पाठ. ८ बरोबरीचा. ९ 'टाकितां कठिण कायी । यालागीं देहात्मबुद्धि टाकूनि पाहीं । सर्वदा राहीं' असापाठ.

घडे गा आत्मता । जाण सर्वथा ब्रह्मपणें ॥ ४८ ॥ देह परकीयत्वें अन्य देखणें । हें मिथ्याभूत मनें जाणणें । तरी ब्रह्मसुख पावणें । जाण खुणे रघुनाथा ॥ ४९ ॥

अहो नु चित्रं यत्सत्यं ब्रह्म तद्विस्मृतं नृणाम् । यन्ममेदमविद्याख्यं तत्पुरः परिवल्गति ॥ १३ ॥

ह्मणे अहा कटकटा वोखटें । या जगाचें कृत्य उफराटें । जें सत्य ब्रह्म कदा न वाटे । दिसे प्रकट सर्वांसिही ॥ ३५० ॥ काळत्रयीं जें अबाधित । तेंचि तें नित्यानंदभरित । तेंचि वस्तु जाण पैं त्रिसत्य । ब्रह्म सदोदित अपरोक्ष जें ॥ ५१ ॥ अहो तयाचें विसरोनियां नर । विस्मरणेंचि वर्त्तती निरंतर । आणि परोक्ष असत्य जें नश्वर । हें शरीर अविद्याख्य जें ॥ ५२ ॥ शीर्यते तें शरीर: ऐसें । ययाचें व्याख्यान पैं असे । अवयव गळती पैं आपैसें । स्वयेंचि नाशे विशीर्ण होउनि ॥ ५३ ॥ नूतन पट जैसा दृढ अति । स्वयेंचि त्याचे तंतु विशीर्ण होती । तंतु विशीर्णे पटाची शांति । न फाडिती तऱ्ही फाटे ॥ ५४ ॥ नातरी वृक्षफळ जैसें । तारुण्य जरी अति दृढ असे । तें स्वयेंचि परिपक्व होऊनि नाशे । कोण्ही न स्पर्शे दुर्गंधीनें ॥ ५५ ॥ तैसें स्वयेंचि जें विशीर्ण होत । कृमिगंधीकरूनि जें युक्त । मग स्वयेंचि असे नाशत । उपचारित सहस्र जरी ॥ ५६ ॥ तयातें शरीर ऐसें ह्मणती । आतां देहशब्दाची आइक व्युत्पत्ति । 'दह्यते त्रिविधतापैस्तद्देह' इति । ऐसे बोलती शास्त्रज्ञ जे ॥ ५७ ॥ आधिभूत आधिदैवत आध्यात्मिक । ऐसे त्रिविध ताप देख । येहींकरूनि जाळी सम्यक् । तयासि निश्चंक देह ह्मणती ॥ ५८ ॥ आणि ज्यातें अविद्या ह्मणिजे । जेणें विद्यमान नव्हिजे सहजें । अविद्येपासाव उत्पत्ति पाविजे । अविद्या जाणिजे मूर्तिमंत हेचि ॥ ५९ ॥ ऐसें मिथ्याभूत कुश्चित शरीर । त्यातें मीचि ह्मणोनि वल्गती नर । त्याचें भरण पोषण उपचार । निरंतर करिती भ्रमें ॥ ३६० ॥ अगा हें तों विचित्र सर्वांमाझारी । सत्य सुखरूप वस्तूतें करिती दुरी । अपरोक्षश्लाघ्य सर्वांपरी । आनंदलहरि स्वप्रकाशे ॥ ६१ ॥ ऐसें आत्मसुख टाकुनी । कुत्सित परिणामीं देह मी ह्मणोनि । विष्ठेचा राशी कवटाळुनी । सुख मानी अभिमानी जन ॥ ६२ ॥ अगा देह केवळ हाडाची मोळी । रक्तमांसमज्जादिकांची पोटळी । अतिमोहाची मोहजाळी । दुर्गंधी भली गोठली जे ॥ ६३ ॥ तें आपणा देखतांचि नाशत । नरही द्वारीं लुती निरपैंत । ऐसा देह देखत देखत । मी ह्मणत अभाग्यपणें ॥ ६४ ॥ धन्य त्याची मातापिता । धन्य त्याचा विचार गा रघुनाथा । ऐसें देखोनि देह मी ऐसें ह्मणतां । लाज सर्वथा असेचिना ॥ ६५ ॥ अहो स्वतःसिद्ध आपणचि ब्रह्म असतां । आणि लौकिकीं लाजे मी ब्रह्म ह्मणतां । मज जिव्हा आहे कीं ऐसें पुसों जातां । न लाजे सर्वथा लोकांमाजीं ॥ ६६ ॥ अहो जेणें पुसे तेंचि न कळे । हातीं वस्तु आणि वरते डोळे । पाहे संभवतें वेडावलें । भ्रमण केलें सर्वथा ॥६७॥ तैसें मी ब्रह्म होयें कीं नव्हे । ऐसें जेणेंकरीं जना पुसावें । तेंचि प्रकाशितें तया नेणवे । काय बोलावें नवल त्याचें ॥ ६८ ॥ अगा मुख्य विचारींचि कुष्ट लागला । तेणें मी ब्रह्म ह्मणतां लाजे लोकांला । तो लोकीं ह्मणतांही वेडावला । लाज त्यावेगळा पावतु ॥ ६९ ॥

॥ संमतिवाक्य ॥ उपस्थकुष्ठिनी वेश्या विलासेषु विलज्जति ॥

उपस्थीं कुष्ठ जाला जियेसी । ते वेश्या वेश्यपणा लाजे जैसी । विलास करितां मरणांत तियेसी । तैसें यासि जालें असे ॥ ३७० ॥ मुख्य गुह्य तो आत्मविचार । तेथ संदेहाचा कुष्ठ थोर । जाला ह्मणोनि तो गवार । लाजे फार मी ब्रह्म ह्मणतां ॥ ७१ ॥ ऐसें हें विचित्र भारी । सत्य स्वप्रकाश वस्तु करी दुरी । असत्यीं बांधतां ममतापुरी । देह मी भिकारी आपण ह्मणे ॥ ७२ ॥ असो आणीकही सांगों किती । इया जनांची विपरीत गति । तेंचि आश्चर्य परम जानकीपती । तुजप्रति सांगेन ॥ ७३ ॥

अन्यचित्रं यत्परमं ब्रह्म तद्विस्मृतं नृणाम् । यन्ममेदमविद्याख्यं तत्पुरः प्रवलायते ॥ १४ ॥

अगा मोठें हें आश्चर्य रमाकांता । तें एकाग्र आइकें श्रीरघुनाथा । जें परम सर्वांचें वास्तव ताता । तें ब्रह्म अनंता विस्तारलें ॥ ७४ ॥ अगा सकळांचें कारणभूत । वास्तव आणि निजानंदभरित । तयातेंचि जन हें विसरत । कोटिकल्पांत उपजावया ॥ ७५ ॥ ऐसें विसरूनि गा रघुपती । नश्वर देहातेंचि मी ऐसें ह्मणती । आपण वास्तव आहे तें टाकिती । नव्हे तें धरिती कुत्सित देह ॥ ७६ ॥ आणि देहसंबंधिये जे असती । त्यातेंचि ममकारें आत्मा मानिती । परी सकळ अविद्याख्यस्थिति । प्रबळ होती विस्मरणें ॥ ७७ ॥ अगा जों जों आपणातें विसरिजे । तों तों देहादिकीं सबळ होइजे ।

---

१ 'मरणाची वार्ता निरंतर । आणि असत्य परोक्ष नश्वर । अहो तयातें विसरोनि नर ।' असा पाठ. २ गळतें. ३ बडबडतात. ४ 'भ्रमें नकळे' असा पाठ. ५ कोड. ६ जन्मास येण्यासाठीं.

हेचि खूण सर्वत्र जाणिजे । जाणे तो बुझे येह नेणें ॥ ७८ ॥ ययालागीं गा त्रैलोक्यनाथा । अविद्यक टाकावें सर्वथा । आपुली साधूनि ब्रह्मता । राहीं आतां ब्रह्मानंदें ॥ ७९ ॥

सर्वं ब्रह्मेति यस्यांतर्भावना सा विमुक्तिदा । भेदबुद्धिरविद्येयं सर्वथा तां परित्यज[1] ॥ १५ ॥

अगा जयाची अंतर्भावना । सर्वही ब्रह्म जाणे रघुनंदना । तेचि मुक्तिदाती तुह्मी जाणा । आन भावना बंधरूप ॥ ३८० ॥ देहादिइंद्रियांसहित । जें जें दृश्य प्रपंचजात । तें सर्वही ब्रह्म सदोदित । जाण निश्चित अंतर्बाह्य ॥ ८१ ॥ आणि ब्रह्मावेगळें जें किंचित् । सर्वथा नेणें वस्तुजात । दुजेपणें जें भासत । जाण व्यर्थ मृगजळ ॥ ८२ ॥ ऐसिया निश्चयें अंतर्भावना । सर्वत्र जयाची गा रघुनंदना । तेचि मुक्तीसि कारणा । नाहीं आन रघुवर्या ॥ ८३ ॥ आणि जे कीं भेदबुद्धि । नानात्वें देखिजे त्रिशुद्धी । तेचि अविद्या जाण सुबुद्धी । मूर्ख कुबुद्धि जनासि हे ॥ ८४ ॥ हेचि संसारासि दायक । निरयपात[2] करी सम्यक् । ह्मणोनि त्यजावी सकळिक । कांहीं शेष उरों नेदीं ॥ ८५ ॥ ययालागीं सर्वदा रघुपती । हे भेदभावना त्यजावी सर्वार्थी । जे आकल्पांत देतसे संसृति[3] । निंद्य भूपती सर्वदा ॥ ८६ ॥ हे प्रत्यक्ष विद्या जाण । जे कीं भेदबुद्धिनानात्वदर्शन । हेंचि मुख्य जाण पां भवबंधन । निरयपतन हेंचि असे ॥ ८७ ॥ ह्मणऊनि याचा त्याग कीजे । सर्वत्र ब्रह्मबुद्धयाचि असिजे । सर्वत्र ब्रह्मेतिबोधव्याजें । आनंदें भुंजे[4] सर्वथा ॥ ८८ ॥ ज्यासि सर्व ब्रह्म प्रत्यया आलें । स्वयें ब्रह्मत्वचि जया वाणलें । तयासिचि जगीं पाहिलें । धन्य ऐसें बोलें तयासि मी ॥ ८९ ॥ ह्मणोनि रघुनाथा ऐसें करीं । सर्वदा ब्रह्मभावना अंतरीं । सर्वत्र असों दे रावणारी । तेणें शरीरी नव्हेसी तूं ॥ ३९० ॥ हेंचि सजातीय प्रवाहीकरण । याचें नाम बोलिजे निदिध्यासन । येणेंचि सुटे विपरीत भावन । होय अवसान परब्रह्मीं ॥ ९१ ॥ आणि ब्रह्मावेगळी जे कल्पना । जियेतें भेदबुद्धि ह्मणती सज्ञाना । ह्मणी ते उपजों देसी मना । विपरीत भावना हेचि होये ॥ ९२ ॥ इयेतें सांडूनि सर्वदा पाहीं । ब्रह्मावबोधें सर्वत्र राहीं । नको चिंतूं आन कांहीं । मग देहीं विदेहीं तूंचि ब्रह्म ॥ ९३ ॥ ऐसें सांगतां वसिष्ठऋषि । श्रीराम आनंदले मानसीं । पुढें कथा जाली कैसी । सांगे श्रोतयांसि गुरुकृपें ॥ ९४ ॥ निजानंदें रंगूनि चरणीं । सहज स्फूर्त अनुदिनीं । पूर्ण बोध लाधला मनीं । कृपावलोकें सद्गुरूच्या ॥ ९५ ॥ ह्मणोनि सद्गुरूचा केला । पूर्ण बोध सुखावला । निजानंदें जो रंगला । अनिर्वाच्य सुखरूप ॥९६॥ येथें प्रकरण हें संपलें । जें कीं शुद्धनिरूपण केलें । आयिकोनि संत निवाले । ह्मणोनि बोलें ग्रंथार्थु ॥ ९७ ॥ माझी विनवणी श्रोतियांप्रति । जे प्रीति धरोनियां ग्रंथीं । श्रवण मनन पुढतपुढती । याचेंचि सर्वार्थी करावें ॥ ९८ ॥ इतुकेनिचि कृतकृत्यता । स्वभावें वरितसे चित्ता । न करूनि इतरा उपायार्था । स्वयें ब्रह्मता ब्रह्मपणें ॥ ९९ ॥ नाहीं थोडेनि बहुताची प्राप्ति । तरी बहु क्लेश कासया करिजेती । गृहींचेचि तरु कल्पवृक्ष होती । तरी कां इच्छिती स्वर्गींचे ते ॥ ४०० ॥ अहो लोकांची हेचि विपरीतता । अल्पेंचि कार्यसिद्धि असतां । तरी कां कठिण मानूनियां चित्ता । नाना अर्थी कां प्रवर्त्तती ॥ १ ॥ ऐसे ते अभाग्य सर्वोपरी । तयांसि आत्मप्राप्ति दुरिच्या दुरी । ते निमज्जती संसारसागरीं । भवभय भारी सर्वत्र ॥ २ ॥ असो तयांचें किती बोलावें । संत ते तरताती स्वभावें । ग्रंथाचेनि अनुभवें । सर्वी राहावें हेंचि सार ॥ ३ ॥ अहो या ग्रंथाचेनि श्रवणें । ब्रह्मज्ञान घेतसे धरणें । सिद्धचि ब्रह्मत्व पावणें । पावले खुणे आपुलिये ॥ ४०४ ॥

## इति श्रीयोगवासिष्ठसारे श्रीवसिष्ठरामसंवादे

## शुद्धनिरूपणप्रकरणं षष्ठं संपूर्णम् ।

१ 'परित्यजेत्' असा पाठ. २ नरकपात. 'निरर्थक पातक' असा पाठ. ३ जन्ममरण. ४ उपभोग घेतो.
'बोधरंगें रंगोनि श्रीचरणीं । रंगें स्फूर्ती अनुदिनीं । रंगनाथु नामाभिधानीं । पावे चरणीं सद्गुरूच्या ॥९५॥' असा पाठ.
'ह्मणोनि० । रंगनाथ ऐसें नाम पावला । श्रीमत्कृष्णानंद बोधविला । तेणें बोलिला ग्रंथवाचा ॥ १६ ॥' असा पाठ.

॥ श्री ॥

## प्रकरण ७ वें.

# आत्मार्चनप्रकरण.

जय जय जी श्रीगुरुराया । नमन करूं तुझिया पाया । ग्रंथव्याख्यान तरणोपाया । जीवांचिया करीन मी ॥ १ ॥ तरी जड जीवांचा उद्धारकु । तूंचि तूं परिपूर्ण येकु । जयाचा अवलोकदीपकु । स्वप्रकाशकु । करी जगा ॥ २ ॥ तरी तुझिया कृपावलोकें । ग्रंथ सिद्धी जाईल कौतुकें । येऱ्हवीं येवढा उन्मेष अशेखें । बोलची फिके सर्वही ॥ ३ ॥ ययालागीं जी कृपासागरा । आइकें ज्ञानदानिया उदारा । रिघोनि मद्वाचेच्या वोवरां । प्रकाश पुरा करीं स्वामी ॥ ४ ॥ रिघ ह्मणतांचि परिच्छिन्न । हों पाहे तुझें परिणाम । तुजकरितां सर्वांचें चळण । व्यापक पूर्ण नियंतृत्वें ॥५॥ आणि वाचादिकरणें तूं होसी । तुजविण स्थिति कें या जगासी । यालागीं तूंचि अनुभवासी । निश्चयेंसि येतसे ॥ ६ ॥ तऱ्ही म्या कासयालागीं विनवावें । सर्वही तूंचि होसी गा स्वभावें । वक्ता वदविता श्रोता गौरवें । होसी अनुभवें सकळ तूंचि ॥ ७ ॥ कर्त्ता करविता सद्गुरुनाथा । तेथ वर्णनाची कायसी कथा । गुरुशिष्य-भेद दाविता । लीलावतार विडंबक ॥ ८ ॥ तरी माझें मीपण तुजविण । कोठें पावेल अवस्थान । यालागीं तूंचि येकु आनंदघन । मीतूंपण मूळभ्रांति ॥ ९ ॥ आपुलेंचि ऐश्वर्य बोलावया । ग्रंथमिष करूनि सद्गुरुराया । बोलवीं जी ब्रह्मानंदअभिप्राया । उद्धरावया सर्व जना ॥ १० ॥ येथ माझें विनवणें तुजप्रति । कासयालागीं सद्गुरुमूर्त्ती । तथापि परोपकारार्थ विनंती । आनंदमूर्त्ती केली तुज ॥ ११ ॥ आतां आईकें ग्रंथव्याख्यान । मागें संपलें शुद्धनिरूपण । शुद्ध तें असिलया आत्मार्चन । सर्वदा पूर्ण होतसे ॥ १२ ॥ स्वरूप जाणोनि राहणें । तेंचि मी आत्मार्चन ऐसें ह्मणें । तें वसिष्ठ रघुनाथाकारणें । सांगती ऋणे आयिका ॥ १३ ॥ तेंचि महाराष्ट्रभाषेकरून । यथामती करिजेल व्याख्यान । तें श्रोतां परिसावें सावधान । करूनि मन येकाग्र ॥ १४ ॥ तरी पूर्वप्रकरणीं निरूपण । संपतां श्लोकीं बोलिलें जाण । सर्वब्रह्म हें अंतर्भावन । मुक्तपण देतसे ॥ १५ ॥ आणि भेदबुद्धि तेचि अविद्या । सर्वथा त्यजावी गा सुविद्या । तरी भेदबुद्धि तेचि देहाद्या । होय अविद्या तेचि जाण ॥ १६ ॥ तेचि देहबुद्धी टाकिलिया । स्वयें लाभे आपआपणया । हेंचि ऋषि सांगती श्रीरघुराया । त्या प्रकरणा यथा परिसावें ॥ १७ ॥ हेंही होय निदिध्यासन । आणि स्वस्वरूपाचें वोळखण । तेंचि सांगे ऋषि आपण । ते निर्वाणखूण परियसा ॥ १८ ॥ तेथें विजातीयाचा तिरस्कार । करोनि स्वस्वरूपाचा निर्धार । ब्रह्मींच राहणें तदाकार । साक्षात्कार तोचि होये ॥ १९ ॥ तेंचि निरूपण इये प्रकरणीं । रघुनाथा सांगे वसिष्ठमुनि । या नाम आत्मार्चन ऐसें जनीं । अभिधानीं बोलती यासी ॥ २० ॥ अगा मुख्य जें कां आत्मानुसंधान । तेंचि तें जाण आत्मार्चन । उपचारें बाह्यभजन । तें जाण गौण मंदाप्रति ॥ २१ ॥ शुद्धांतःकरणीं जो गुरुअनुगृहीत । तेणें सर्वदा सेवावा एकांत । तेथें निदिध्यासन यथोचित । करावें निश्चित दृश्यत्यागें ॥ २२ ॥ देहादिदृश्याच्या तिरस्कारें । आत्मस्वरूप आविष्कारे । तद्रूप राहणें जें एकाकारें । जाण निर्धारें आत्मार्चन तें ॥ २३ ॥ तेंचि आत्मार्चन पैं कैसें । ऋषिरायें बोलिलें असे । तेंचि मी संतकृपाविशेषें । सावकाशें सांगेन ॥ २४ ॥ तेंचि कृपा करूनियां संतीं । येकाग्र आइकावें चित्तीं । आइकिलयाचि स्वरूपप्राप्ति । होय सर्वार्थी भाविकां ॥ २५ ॥

यदि देह तिरस्कृत्य चिति विश्राम्य तिष्ठसि । तदी तृणाकृताशेषः स्वयमेको भविष्यसि १ ॥

जरी या स्थूळलिंगदेहातें तिरस्कारुनी । राहासील गा कार्मुकपाणी । स्वस्वरूपीं विश्रामोनी । स्वरूपज्ञानीं अखंड ॥ २६ ॥ तरी तिरस्कार तोही ऐसा । देह तो मी होयें येकाचाचि ठसा । बाणला तोचि वीरविलासा । सांडीं सहसा देहात्मबुद्धी ॥ २७ ॥ देहद्वय तें जड समूळ । याचा द्रष्टा तो आपण निर्मळ । द्रष्टा तो दृश्यासि वेगळ । जो कीं सोज्वळ ज्ञानस्वरूप ॥ २८ ॥ यया देहद्वयाचें जें

---

१ पहाण्याचा प्रकाश. २ वाणी वगैरे कर्में करण्याचीं साधनें. ३ परब्रह्माची ओळख धरून रहाणें. ४ देहाला कारण. ५ गुरूनें उपदेश दिलेला. ६ विश्रांति घेत.

जाणतें । तें मी निखिल ज्ञान येथें । तथें विश्रामोनि देहद्वयातें । सांडीं सर्वार्थें देहात्मबुद्धि ॥ २९ ॥ तें अशेषही प्रपंचजात । तृणतुल्य होईल निश्चित । सत्य न भासे कदाचित् । अनिश्चित प्रतिभासकत्वें ॥ ३० ॥ तेणें काळें मग येकला येकु । तूंचि स्वयें अससी बोधार्कु । विश्व न होनि विश्वात्मकु । अवितर्कु प्रकाश ॥ ३१ ॥ देह तिरस्काराध्याचें लक्षण । तें वर्म तुज अपूर्व सांगेन । करूनियां येकाग्रमन । सावधान परियेसीं ॥ ३२ ॥

येनेदं वेत्सि तज्ज्ञात्वा कुरु प्रत्यङ्मुखं मनः । ततः प्रकाशरूपत्वं द्रक्ष्यसि स्फुटमात्मनः ॥ २ ॥

तऱ्ही हें सकळही दृश्यजात । जें जें इंद्रियग्राह्य समस्त । तें तें सर्वही जाण मिथ्याभूत । स्थूळ भासत जगडंबाळ ॥ ३३ ॥ तें दृश्य जेणेंकरूनि जाणसी । तें मन वोळखोनियां हृषीकेशी । तेंचि मन नेहटावें आत्मयासी । सांगेन तैसी युक्ति करीं ॥ ३४ ॥ अगा इंद्रियांदिकां सर्वां प्रकाशी । प्रत्यक् जाण यां हृषीकेशी । त्या प्रत्यङ्मुख करीं मनासी । तेणें देखसी आपणयां ॥३५॥ प्रत्यक् तेंचि साक्षीचैतन्य । तद्रूप करावें अंतःकरण । आत्मोन्मुख करितांचि मन । चिद्गगन देखसी तूं ॥ ३६ ॥ गगन जैसें कूटस्थ स्थिति । व्यापक निःसंग अतर्क्यगति । तें तैसीच तुझी मूर्ति । येईल प्रतीति तुझी तुज ॥ ३७ ॥ येक मन प्रत्यङ्मुख करितां । आपुली आपणा लाभे ब्रह्मता । चढे सर्व सुखाचे माथां । हें न करितां अनर्थ कोटि ॥ ३८ ॥ अथवा जेणें हें सर्व जाणिजे । तें ज्ञानचि स्वस्वरूप सहजें । तें जाणूनि तदाकार कीजे । मन रघुराजें सर्वदा ॥ ३९ ॥ अहो आपुलें स्वरूप प्रत्यक्ष असे । परी तें भ्रमें व्यवधानिलें असे । मन प्रत्यङ्मुख केलिया आपैसें । ब्रह्म सर्वांशें आपणचि पैं ॥ ४० ॥ तऱ्ही तेंचि आत्मस्वरूप कैसें । जया साक्षी चैतन्य ह्मणिजेतसे । तेंही पुससी तऱ्ही सावकाशें । सांगों विन्यासें रघुराया ॥ ४१ ॥ तया साक्षीस्वरूपाकार । मन करावें गा निरंतर । त्या साक्षीस्वरूपाचा निर्धार । सविस्तर सांगेन ॥ ४२ ॥

येन शब्दं रसं रूपं गंधं जानासि राघव । सोयमात्मा परं ब्रह्म सर्वमापूर्य संस्थितः ॥ ३ ॥

तरी आइकें गा रघुपती । सांगेन ब्रह्मस्वरूप तुजप्रति । जें कीं आयिकतांचि येतसे प्रतीति । एकाग्रमती घेइजे जरी ॥ ४३ ॥ जेणें हा पैं शब्द चळे । जेथूनि उठती शब्दउमाळे । उठिल्या शब्द जेणें कळे । जाण निराळें परब्रह्म तें ॥ ४४ ॥ इंद्रियें इंद्रियवृत्ति विषय जाण । यांतें जाणतें जें चतुर्थ मन । या समस्तां येक समयीं जें करी प्रकाशन । हे सर्वत्र खूण साक्षि याची ॥ ४५ ॥ तैसेंचि रसीं राहोनियां रसगोडी । जे कीं स्वसाक्षित्वें निवडी । गोडीसहित रस निवडी । जाण परवडी तेंचि येकी ॥ ४६ ॥ तैसेंचि स्वरूपातें प्रकाशिता । चक्षु दिसे बाह्य पाहतां । परी चक्षूंसहित रूपाचा ज्ञाता । मनादि तत्वतां प्रकाशे जेणें ॥ ४७ ॥ तैसेंचि घ्राणेंद्रियें गंधप्रतीति । जेणें स्पष्ट येतसे व्यक्ती । तेंचि परब्रह्म गा विश्वमूर्ती । जाण निश्चिती हेचि खूण ॥ ४८ ॥ इंद्रियचतुष्टयाचे विषय । मूळीं बोलिले जे उपाय । तें उपलक्षण अनुमेय । परी सर्वेंद्रियमेळे सूचिलें ॥ ४९ ॥ ह्मणोनि सर्व इंद्रियांच्या राहाटी । तुज सांगों गा जगजेठी । चित्त देईं माझिये गोष्टी । श्रवणें भेटि निजात्मया ॥ ५० ॥ तरी त्वगिंद्रियाचें स्पर्शन । स्पर्शनीय ज्ञातृत्व जाण । यातें जाणे तो चिदानंदघन । परिपूर्ण परमात्मा ॥ ५१ ॥ आणि वाचा वदे जे जे अर्थ । अर्थेंसि जेणें वाचा प्रकाशत । त्या वागिंद्रियातें जे जाणत । त्यातें निश्चित जें प्रकाशी ॥ ५२ ॥ तैसेंचि हाताचे क्रियाजाळ । घेणें देणें इत्यादि सकळ । ययातें जें प्रकाशी निर्मळ । जाण अढळ परमात्मा ॥ ५३ ॥ आणि गुह्याचें जें गुह्यपण । गुदउत्सर्गकर्माचरण । जेणें जाणसी तें चैतन्य । आनंदघन परमात्मा ॥ ५४ ॥ चरणाची जे चरणगति । चरण जेणेंकरूनि रूळती । चरणादि प्रकाशी सर्वार्थी । तोचि निश्चित परमात्मा ॥ ५५ ॥ शिश्नक्रियारतिविलास । रतिसुख जें सविलास । जेणें होती इत्यादि प्रकाश । तोचि परेश परमात्मा ॥ ५६ ॥ मनाचें जें मंतव्यपण । संकल्पविकल्पात्मक जाण । हें जेणें जाणिजे अनुसंधान । तेंचि चैतन्य निश्चयेंसी ॥५७॥ तरी इतुक्याही इंद्रियव्यापारीं । येक मनचि होय साहाकारी । मनेंसहित सर्वांचा प्रकाश करी । जाण निर्धारीं परमात्मा ॥ ५८ ॥ ऐसें सर्वेंद्रियवृत्तींकरूनी । जो जो पदार्थ घेइजे जनीं । त्यासि मन भांवसेनी । ऐसें नेणोनि ज्ञाता ह्मणिजे ॥ ५९ ॥ परंतु परस्पराध्यासें । मनाचि ध्यासे ऐसें दिसे । परी याच्याही प्रकाश करितसे । नेणती भ्रमांशें कोण्ही जन ॥ ६० ॥ अगा तें स्थूळ दृष्टीनेंचि पाहाती ।

१ ज्ञानरूपी सूर्य. २ इंद्रियांनीं घेतां येण्याजोगें. ३ अति मोठें. ४ पलीकडचें पाहणारें. ५ चिदाकाश; विचाररहित स्थिति. ६ आनंद. ७ अनुमान करण्यास योग्य. ८ वाणीनें. ९ जाणतेपणाचा धर्म. १० मदत करणारें.

ह्मणोनि सूक्ष्मद्रष्टासाक्षी नेणती । त्या नेणण्यासाठीं संसृति पावती । कोटिकल्पांतीं सुटेचिना ॥ ६१ ॥ तेंचि साक्षियातें अपरोक्ष जाणतां । स्वप्नींही नायकिजे संसारवार्त्ता । परमानंदीं निमग्नता । ते न येती द्वैता स्वप्नीं कदा ॥ ६२ ॥ यालागीं तुवां तैसें न करावें । मी सांगेन तैसा पाहावें । तेणेंचि आपणा स्वभावें । पावसी गौरवें निश्चयेंसि ॥ ६३ ॥ तन्ही जें जें इंद्रियें प्रकाशिती । तेथेंचि साहाय होय चित्तवृत्ति । बुद्धि निश्चयातें असें करिती । प्रगट होती विषयपदार्थ ॥ ६४ ॥ इतुकियांचें अनुसंधान करितां । जाणे जो जीवशब्दप्रमाता । तयासहितही प्रकाशी समस्तां । जाण तत्वतां तोचि साक्षी ॥ ६५ ॥ इंद्रियें आणि पदार्थजाता । मन बुद्धि प्रमाता निश्चिता । यांतें जाणे तो साक्षी तत्वतां । जाण रघुनाथा परमात्मा ॥ ६६ ॥ तोचि साक्षि निजानंदघन । तोचि आत्मा ब्रह्म परिपूर्ण । तोचि परमेश्वर निर्गुण । जाण खूण रघुवर्या ॥ ६७ ॥ इतुकिया विशेषणांचें व्याख्यान । आइक एवंभूत लक्षण । यांचें कीजेल निरूपण । तेंचि विवरण परियेसीं ॥ ६८ ॥

॥ संमतिस्मृति ॥ यच्चाप्नोति यदादत्ते यच्चात्ति विषयानिह । यच्चास्य संततो भावस्तस्मादात्मेति कथ्यते ॥

जें कीं सर्वदेशीं काळीं । सर्वही पावला सर्वमेळीं । त्या व्यक्तिरिक्त पावण्याची शैली । कोण्हे काळीं असेचिना ॥ ६९ ॥ जों जों जेथें अर्पू बैसे । तंव तें जेणें पात्रविलेंचि असे । आपण अर्पावें हें नसे । पूर्वींच असे प्राप्त तया ॥ ७० ॥ गगन हें घटीं पाहिजे । तंव तथें आधींचि असिजे । ज्या ज्या पदार्थासि मेळविजे । तंव तें सहजे असे तेथें ॥ ७१ ॥ तैसें जें जें तया अर्पू जाइजे । तंव आर्पितेंचि त्यामाजी सहजें । यालागीं सर्वत्र तेणेंचि पाविजे । आत्मा जाणिजे येणें न्यायें ॥ ७२ ॥ आणि सर्वत्र जें कीं घेतें । ज्याविण घ्यावया नाहीं रितें । तोचि आत्मा जाण निरुतें । आणि भोक्ते सर्वत्र जें ॥ ७३ ॥ सर्वत्र देशीं काळीं वस्त्वंतरीं । विषय भोगी सर्व प्रकारीं । भोक्ता ऐसी जे दुजी सरी । नसे पृथ्वीवरी आत्मेंविण ॥ ७४ ॥ ह्मणोनि सर्वत्र भोगी विषयांतें । रसरूपादिक निश्चितें । आत्मा ह्मणणें जाण तयातें । भोगी विषयांतें ह्मणोनियां ॥ ७५ ॥ आणि ज्याचें कीं अस्तित्व संतत । कोण्हे देशीं काळीं नव्हे उपहत । सर्वत्र जें कीं असे विस्तृत । तेंचि निश्चित आत्मरूप ॥ ७६ ॥ यालागीं यासि आत्मा ह्मणिजे । जयाविण कांहीं नेणिजे दुजें । सर्वत्र परिपूर्ण जाण सहजें । तस्मात् बोलिजे आत्मा यासी ॥ ७७ ॥ आणीक दुसरें व्याख्यान । तेंही तुजप्रति सांगेन । तन्ही सुषुप्तीचा ठाईं सर्वही जाण । उपसंहारण जेथें असे ॥ ७८ ॥ सर्वही इंद्रियें आणि विषयजात । दृश्यमात्र जें जें विश्व समस्त । जयाचा ठाईं लयो पावत । जाण निश्चित तोचि आत्मा ॥ ७९ ॥ यालागीं सर्वही तेणें पावलें । सुषुप्तिप्रलयीं जें लया गेलें । जेथें सकळही सामावलें । जाण निराळें आत्मरूप तें ॥ ८० ॥ तैसेंचि स्वप्नावस्थेच्या ठायीं । जागृतीसि जे पदार्थ भोगिले पाहीं । ते वासनाद्वारा सर्वही । अंगिकार पाहीं करितसे ॥ ८१ ॥ जागृतीचे जे जे पदार्थ । ते स्वप्नीं वासनेकरूनि घेत । ह्मणोनि आत्मा ऐसें बोलिजेत । जाण निश्चित रघुराया ॥ ८२ ॥ तोचि आत्मा जागृतीसी । इंद्रियद्वारा विषयांसी । भोगितसे समस्तांसी । ह्मणोनि यासि आत्मा ह्मणती ॥ ८३ ॥ तेंचि तुर्यावस्थेच्या ठायीं । अनुस्यूत भाव तयाचा सर्वही । तेवांचूनि दुजें नाहीं । अवस्थातिहींमाजी अखंड ॥ ८४ ॥ एवं सर्वत्र सर्व तेणें पाविजेलें । सर्वत्र सर्व तेणें घेतलें । सर्वत्र सर्व विषय भोगिले । आणि निराळें सर्वत्रपणें ॥ ८५ ॥ ऐसें आत्माशब्दाचें निरूपण । सांगितलें तुजलागून । आतां परशब्दाचें निरूपण । सावधान परियेसीं ॥ ८६ ॥ तरी निरतिशय जयाच्या ठायीं । ज्याहूनि अतिशय कोठेंचि नाहीं । सर्वांचें जें अधिष्ठान पाहीं । ब्रह्मादिकांही श्रेष्ठ तें पर ॥ ८७ ॥ बृहत् ब्रह्म ह्मणिजे । बृहत्शब्दें थोर जाणिजे । त्याहूनि थोर नाहीं दुजें । यालागीं ह्मणिजे परब्रह्म ॥ ८८ ॥ ब्रह्मपदाचें दुसरें व्याख्यान । तेंही सांगों तुजलागून । जेणें बुझसी संपूर्ण । ब्रह्म परिपूर्ण पूर्णत्वें ॥ ८९ ॥

॥ संमतिश्रुति ॥ अव्यावृत्तानुगतं वस्तु ब्रह्मेति भण्यते ॥

कोण्हापासाव नाहीं परतलें । सर्वत्र तेंचि असे संचलें । दुसरें नाहीं तयावेगळें । कोठूनि व्यावर्त्तलें ह्मणाल ॥ ९० ॥ आणि पदार्थ जेथ साच नाहीं । तेथ तें परतेल कोठोनि कायी । ह्मणोनि सर्वत्र तेंचि पाहीं । अनपायी परब्रह्म ॥ ९१ ॥ आणि जें कोठें नाहीं अनुगत । तेंचि तें बोलें अननुगत । येक वस्तु जरी भासत । तदंतर्गत तें अनुगतार्थ ॥ ९२ ॥ घटमठादि साच असती । तरीच तेथें गगनाची

---

१ अज्ञानामुळें जन्ममृत्यूंच्या फेऱ्यांत पडणें. २ याप्रकारचें. ३ प्राप्त झाला; पोंचला. ४ असलेलेंच. ५ निश्चयें करून. ६ समजशील.

अनुगति । घटमठादि नसतां अननुगति । तेंचि तें सर्वार्थी येक जाण ॥ ९३ ॥ रज्जु जैसा सर्पीं अनुगत । ऐसें ह्मणतांचि अनर्थ होत । सर्प नाहीं साच दिसत । तेथ अनुगत कोणामाजी ॥ ९४ ॥ नातरी शुक्ति रजतीं अनुगत ह्मणतां । हेंही असंबद्धचि सर्वथा । रुपें विचारें विचारितां । नये हाता प्रयत्नेंही ॥ ९५ ॥ तैसें विश्वीं ब्रह्म अनुगत । ह्मणणें हें परम अनुचित । विश्व विवर्त्तरूपें असें भासत । नाहीं यथार्थ ब्रह्मेंविण ॥ ९६ ॥ यालागीं ब्रह्मेंवांचूनि दूसरें । न देखिजे साचोकारें । अव्याकृत अननुगत हें खरें । यालागीं निर्धारें ब्रह्म जाण ॥ ९७ ॥ आणि परब्रह्म यातेंचि ह्मणिजे । थोराचा थोर नियंता जाणिजे । ब्रह्मादिनियंता ज्यातें नेणिजे । तोचि सहजें परमेश्वर ॥ ९८ ॥ इत्यादि विशेषणीं इहीं । परब्रह्म बोलिजे पाहीं । तोंचि जाणतें सर्वांहीं । जाण निःसंदेहीं रघुनाथा ॥ ९९ ॥ येणेंचि गा सर्वही जाणिजे । अंतर्बाह्य येणेंचि सुझे । साक्षीचैतन्य तेंचि सहजें । जाणोनि राहिजे सर्वथा ॥ १०० ॥ बाह्य सांडोनियां मनोवृत्ति । करावी सर्वदा प्रत्यक्‌स्थिती । प्रत्यक् तेंचि सर्वार्थी । करीं वृत्ति एतद्रूप ॥ १ ॥ हे सांगितली ब्रह्मखूण । हेचि ओळखूनि राहें पूर्ण । सर्वदा येथेंचि ठेवूनि मन । बाह्यस्फुरण टाकावें ॥ २ ॥ हेचि प्रत्यङ्मुखस्थिति । अभ्यासावी गा श्रीरघुपती । तेथ राहणें ते जीवन्मुक्ति । नाहीं विप्रतिपत्ति रघुराया ॥ ३ ॥ हेंचि जाणपण आत्मार्चन । जें करी निरंतर आत्मानुसंधान । स्वस्वरूपीं अवस्थान । येर तें गौण बाह्यभक्ति ॥ ४ ॥ आणीकही जाणावयाचि खूण । सांगेन आत्मयाचें लक्षण । तद्रूप राहोनि आत्मार्चन । करीं भजन सुखवरी ॥ ५ ॥

यत्र भावा हि स्पंदंते निर्मियंते च येन वा । तमेवात्मानमानंदरूपं जानीहि राघव ॥ ४ ॥

अगा सकळ देहआदिकरूनी । मनबुद्धिअहंकारादिश्रेणि । किंबहुना जें श्रवणीं नयनीं । भासे मनीं दृश्यटवाळ ॥ ६ ॥ यया सर्वांतें भाव ह्मणती । हे सर्वही जिये ठायीं भासती । तें परब्रह्म जाण आनंदमूर्त्ती । आत्मा ह्मणती तयातें ॥ ७ ॥ आणि जेणें याचा निर्णय कीजे । हे घट पट ऐसें संज्ञा जाणिजे । हेयउपादेयत्वें घेईजे सांडिजे । तेंचि सहजें परमात्मा ॥ ८ ॥ किंबहुना जेणें हें सर्वही जाणसी । ज्याच्या ठाईं भासलें देखसी । तोचि आनंदरूप परियेसीं । आत्मा ऐसी संज्ञा जया ॥ ९ ॥ तऱ्ही सूक्ष्मविवेकदृष्टी । विचारूनि पाहसी जें जगजेठी । तेंचि होय आत्मेनसि भेटि । निश्चय पोटीं दृढ धरीं ॥ ११० ॥ हेंचि आत्मयाचें वोळखण । वोळखोनि तदाकार करीं मन । विश्वनिरासें संपूर्ण । पावती खूण जाणसी ॥ ११ ॥ तेंचि निरसन कैसें कीजे । तेंहि सांगों तुज श्लोकव्याजें । तेणेंकरूनि बुझिजे । खूण जाणिजे रघुराया ॥ १२ ॥

यद्ज्ञेयमिदं तत्वं नेति संत्यज्य युक्तिभिः । प्राप्यावशिष्टचिन्मात्रं सोहमस्मीति भावय ॥ ५ ॥

अगा अहंकारादिकरुनी । जें जें ज्ञेय तुजलागुनी । मनादिइंद्रियें ज्याचेनी । जाणती भरंवसेनि तें तें ज्ञेय ॥ १३ ॥ अगा नेत्रीं जें जें देखिजे । तें तें सर्वथा ज्ञेय जाणिजे । मनें जें जें कांहीं कल्पिजे । निश्चय कीजे बुद्धीनें साच ॥ १४ ॥ श्रवणें जें कांहीं गुह्यमान । तें तें रघुनाथा ज्ञेय जाण । त्वचा कीजे जें जें स्पर्शन । रसास्वादन रसनादिकीं ॥ १५ ॥ वाचा जें जें कांहीं बोलिजे । घ्राणें गंध आस्वादिजे । करचरणें आपादिजे । घेइजे देइजे जें जें कांहीं ॥ १६ ॥ तें तें सर्वही ज्ञेय जाण । ज्ञेय तितुकें दृश्य पूर्ण । दृश्य ज्ञेय तें मिथ्या जाण । कल्पित भान अधिष्ठानीं ॥ १७ ॥ तें श्रुतिमुखें 'नेति नेति' । इतुकियाचा निषेध करिती । तें तें त्यजावें सर्वार्थी । सद्युक्तिकरूनियां ॥ १८ ॥ तया ज्ञेयालागीं श्रुति । 'नेति नेति' ऐसें ह्मणती । दृश्य तें वस्तु नव्हे गर्जती । व्यतिरिक्त गति ब्रह्मची पैं । ॥ १९ ॥ सर्व ज्ञेयाहूनि विलक्षण । सर्वा निषेधाचें अधिष्ठान । तेंचि तें परब्रह्म जाण । बोलती खूण स्वयें श्रुति ॥ १२० ॥ जें जें ज्ञेय गा तुजलागुनी । तें तें त्यजावें युक्तीकरुनी । त्यजितां उर्वरित जें निर्वाणीं । कोदंडपाणी तेंचि ब्रह्म ॥ २१ ॥ त्या युक्ति कोण कैसिया । त्याही तुज सांगों गा श्रीरघुराया । जो जाणे अवस्थात्रया । खूण आत्मयाची जाणे तो ॥ २२ ॥ आणि आत्मेनि जें जें जाणिजे । स्वप्रकाशें जें प्रकाशिजे । तें तें ज्ञेय जाण सहजें । तें तें त्यजिजे हेचि खूण ॥ २३ ॥ यदर्थी संमति श्रीभागवतीं । श्रीभगवंत बोलिले उद्धवाप्रति । तेंचि हंसरूपें ब्रह्मयाप्रति । उपदेशिती सनकादिकां ॥ २४ ॥

संमतिश्लोक ॥ यावन्नानार्थधीः पुंसो न निवर्त्तेत युक्तिभिः । जागर्त्यपि स्वपन्नज्ञः स्वप्ने जागरणं यथा ॥

---

१ प्राप्ति; जाणें. २ मागाहून गेलेलें, प्रविष्ट झालेलें. ३ समजतें. ४ या रूपाचें. ५ मन, बुद्धि, अहंकार, इत्यादि परंपरा. ६ घेणें व सोडणें या रूपांनीं. ७ श्लोकाच्या रूपानें. ८ वास घ्यावा. ९ कर्म करावें.

जोंपर्यंत युक्तीकरूनि पुरुषासी । नानाधी न निवर्ते निश्चयेंसी । तंव अज्ञान न तुटे गा पारियेसीं । जाण तो राशि अज्ञानाचा ॥ २५ ॥ आणि ब्रह्मीं जे नानात्व देखती । ते मृत्यु उपरी मृत्युचि पावती । ऐसें स्वयें बोलतसे श्रुति । आयिक भूपती रघुनाथा ॥ २६ ॥

॥ संमतिश्रुति ॥ मृत्योः स मृत्युमाप्नोति य इह नानेव पश्यति ॥

ते अर्थावरपडे होती । नानापरींचीं दुःखें भोगिती । चौऱ्यांयशीं लक्ष जन्म पावती । कोटिकल्पांतीं सुटेचिना ॥ २७ ॥ अगा तो जागाचि परि निजेला । जो नानात्वें विश्व देखों लागला । नाहो निद्रितासि जगदाभास निमाला । हा तंव विश्वाला देखतु असे ॥ २८ ॥ तरी निद्रिस्तुही स्वप्नीं विश्व देखतु । उभयतां भेदु नाहीं निश्चितु । तरी तो निजेला हा जागतु । भेदु बहुत दोघांजणा ॥२९॥ तरी निद्रिस्तुही स्वप्नीं जागा असे । जागृतीचा व्यवहार करितसे । ह्मणोनि उभयतां भेदु नसे । दोघे पिसे भ्रांतिवळें ॥ १३० ॥ ह्मणोनि नानाकारें विश्व देखतु । स्वप्नस्थाकारें असे भ्रांतु । आतां युक्तीही सांगेन जाण तूं । परिस मातु रघुराया ॥ ३१ ॥ ह्मणोनि त्यजावी नानाबुद्धि । निरसितां उरे शेष अवधि। तोचि युक्ती करूनियां साधीं । युक्ति सुबुद्धी त्या ऐसिया ॥ ३२ ॥

॥ संमति श्लोक ॥ यो जागरे बहिरनुक्षणधर्मिणोऽर्थान् भुंक्ते समस्तकरणैर्हृदि तत्सदृक्षान् ।
स्वप्ने सुषुप्त उपसंहरते स एकः स्मृत्यन्वयात् त्रिगुणवृत्तिदृगिंद्रियेशः ॥

जे स्थूळ पदार्थ देहादिकरुनी । जेकीं कीं अनुक्षणधर्मी भरंवसेनीं । परिणामवंत नाशवंत तत्क्षणीं । दिसती नयनीं दृश्यपणें जे ॥ ३३ ॥ बाल्यतारुण्यादि जरा । परिणाम क्षणाप्रति नश्वर खरा । ऐसेया पदार्थातें वीरा । भोगी करणद्वारा जागृतीसि जो ॥ ३४ ॥ त्या बाह्यस्थूला समस्ता अर्था । तत्वतां तोचि आत्मा जाण सर्वथा । जो कीं जागृतीसि भोगिता । घेई सर्वथा युक्तीकरुनी ॥ ३५ ॥ तोचि स्वप्नीं सीताकांता । जागृतीऐसिया भोगी पदार्था । ते वासनामय अंतरीं चित्ता । भोगी तत्वता जागराऐसा ॥ ३६ ॥ तोचि येकु सुषुप्तीचां ठाई । सर्वांचा उपसंहार करूनि सर्वही । स्वस्वरूप येकसा पाहीं । अनपायी साक्षिभूत ॥ ३७ ॥ तोचि अवस्थांचा द्रष्टा । येकला येकुचि जाण वीरश्रेष्ठा । येथ आशंका असती स्पष्टा । तिहींचा द्रष्टा येकुचि कैसा ॥ ३८ ॥ तंव सर्वही इंद्रियें जागृति देखती । स्थूळ पदार्थातें इंद्रियें घेती । तियेसिच जागृती ह्मणती । द्रष्टे पण निश्चिति इंद्रियां आलें ॥ ३९ ॥ तैसेंचि मन प्रकाशी स्वप्नावस्था । तत्संस्कारबुद्धि जे कीं रघुनाथा । तेचि प्रकाशी सुषुप्त्यवस्था । आत्मा देखतां येथ कैंचा ॥ १४० ॥ तरी अवस्थात्रयाचा द्रष्टा । येकुचि आत्मा कैंचा ऋषिश्रेष्ठा । तऱ्ही आत्मा इंद्रियांचा ईशु सुभटा । करी उत्कटा प्रकाशसिद्धि ॥ ४१ ॥ नाहो इंद्रियें आणि प्रकाशक । विश्व तैजस प्राज्ञ हे देख । हे अवस्थांचे अभिमानी सम्यक । अवस्थां सकळिक प्रकाशिती ॥ ४२ ॥ येथें आत्म्यासि कैंचें द्रष्टेपण । ऐसें ह्मणसी तरी आइकें वचन । विश्व प्रकाशी जागृति जाण । तरी तो स्वप्न प्रकाशीना ॥ ४३ ॥ तो जागृतीचाचि अभिमानी । परी न प्रकाशी अवस्था दोन्ही । इतुकें सामर्थ्य त्यालागुनी । कार्मुकपाणी असेचिना ॥ ४४ ॥ जो जिये अवस्थेचा अभिमानी । तोचि प्रकाशी तियेलागुनी । दुसरीचें ज्ञान अन्यांचेनी । भरंवसेनि न करवे ॥४५॥ अभिमानी आणि अवस्थात्रयासी । येकु आत्माचि स्वयें प्रकाशी । येके काळेंचि सर्वांसी । स्मृत्यन्वयेंसि जाणतु ॥ ४६ ॥ पहिलें स्वप्न देखिलें ऐसें ह्मणे । सुषुप्तिकाळीं स्वसुख भोगणें । तेंचि सुख सांगणें जागेपणें । विषय भोगणें जागृतीसी ॥ ४७ ॥ ऐसें तिहीं अवस्थांचें ज्ञान । एक समई येकला करी पूर्ण । आणि अभिमानी विश्वतैजस प्राज्ञ । जाणे संपूर्ण इंद्रियांसहित ॥ ४८ ॥ तैसेंचि बाल्यतारुण्यादिजरा । त्यामाजी भोगिलेंही सुखसंभारा । दिनघटिकादि सर्व पसारा । जाणे रघुवीरा एक समई जो ॥ ४९ ॥ ऐसिया सुखेंकरूनि श्रीरामा । जाण अवस्थादिकांचा द्रष्टा आत्मा । ज्यातें प्रकाशी दृश्यगरिमा । त्यावी उपरमा नेतिमुखें ॥ १५० ॥ ऐसिया सद्युक्तीकरून । दोन्ही भिन्न केलीं संपूर्ण । द्रष्टा तो आत्मा सर्वज्ञ । दृश्य जाण प्रकाश्य तें ॥ ५१ ॥ ऐसिया सद्युक्तीकरूनि रघुपती । श्रुति नेति मुखें निषेधिति । तें तें त्यजावें गा सर्वार्थीं । पावसी अंतीं अवशिष्टातें ॥ ५२ ॥ उरेल जें चिन्मात्र निरंजन। तें सर्वनिषेधें प्राप्त जाण। स्वयेंचि भेटे ज्ञानघन। जाणतें जाण सर्वांचें जें ॥५३॥ जेथें ज्ञेयमात्र कांहीं न भासे । केवळ ज्ञानमात्रचि प्रकाशे । तेंचि ब्रह्म पावणें ऐसें । जाण विश्वासें सर्वेश्वरा ॥५४॥

---

१ अनेकत्वयुक्त बुद्धि. २ स्वप्नामधील आकारांनीं. ३ क्षणोक्षणीं बदलणाऱ्या धर्मांनीं युक्त. ४ इंद्रियांनीं. ५ अपायरहित. ६ हे उत्तम वीरा! ७ स्मृति असल्यामुळें. ८ दिसणाऱ्या पदार्थांचा मोठेपणा.

तोचि मी असें अनुसंधान । दृढ धरूनियां राहे संपूर्ण । 'भावय' शब्दें हेचि खूण । भावना अज्ञान कोण्ही ह्मणेल ॥ ५५ ॥ भावना शब्दाचा ऐसा अर्थ । एक पदार्थी अन्य भाविजेत । पाषाण देव ऐसें ह्मणिजेत । मृत्पिंड भावित गणेशगौरी ॥ ५६ ॥ धातूचिया मूर्ति पाहीं । तेथें भावी देवो देवी सर्वही । दर्भमुष्टीचा यजमानही । भाविती सर्वही अन्य पदार्थी ॥ ५७ ॥ आणि येकेंचि मूर्तीमाजी जाण । महिषचंडिका आसन । त्रिशूळादिआयुधाभरण । छत्रव्यजनचामरादिक ॥ ५८ ॥ हें येकेचि पितळेचा ठाईं । इहीं चिन्हीं येकचि मूर्ति पाहीं । महिषावयवादिसर्वही । भावी कांहीं त्याचि-मध्यें ॥ ५९ ॥ यंयाचें नाम भावना ह्मणिजे । तैसें हें तों नव्हे सहजें । आपणाचि आत्मा शुद्ध जाणिजे । तेथें भावना कीजे कोणें कोणाची ॥ १६० ॥ ऐसा हा व्याकरणार्थ । स्वयेंही सिद्ध करी वेदांत । श्रीवसिष्ठाचाही हा मनोगतार्थ । मीही तदन्वयार्थ बोलिलों ॥ ६१ ॥ ह्मणोनि ह्मणे गा श्रीरघुपती । सर्वनिषेधें उरे जे चिन्मूर्ति । तेचि निर्धारूनि स्वयें स्थिति । विश्वमूर्ती तद्रूपें राहीं ॥ ६२ ॥ याचेंचि नाम गा आत्मार्चन । स्वस्वरूपें राहणें संपूर्ण । इतर तें ययाचें साधन । जाण खूण रघुराया ॥ ६३ ॥ जें कीं सर्वांचा निषेध करूनी । ज्ञानमात्र उरे जें कोदंडपाणी । तें भिन्न नव्हे गा तुजहूनी । ऐकें आणखीं सांगेन तें ॥ ६४ ॥

ज्ञानं न भवतो भिन्नं ज्ञेयं ज्ञानात्पृथक् न हि । अतो न त्वितरं किंचित्तस्माद्भेदो न विद्यते ॥ ६ ॥

अगा ज्ञान जयातें ह्मणिजे । जें सर्वांतें प्रकाशक बोलिजे । तें तुजविण भिन्न न देखिजे । तूंचि सहजें ज्ञानस्वरूप ॥ ६५ ॥ आणि ज्ञानें करूनि जें गमिजे । तयातें ज्ञेय ऐसें ह्मणिजे । ज्ञेयही ज्ञानेंसि नव्हे दुजें । ज्ञेय तें जाणिजे निखिल ज्ञान ॥ ६६ ॥ भ्रममात्र जो ज्ञेयाकार । भासे जो कीं जगडंबर । त्याचें अधिष्ठान साचार । ज्ञेय परिकर तेंचि ज्ञान ॥ ६७ ॥ अगा पदार्थी जो चैतन्यांशु । आणि इंद्रियवृत्तीमाजी जो परेशु । येकत्र जालिया होय प्रकाशु । अन्यथा भासु व्यक्तीसि नये ॥ ६८ ॥ एवं घटपटपदार्थजाति । चैतन्यचि अधिष्ठान सुमती । पदार्थ मृगांभतुल्य असती । चैतन्यमूर्ति अखंड ॥ ६९ ॥ इंद्रियवृत्ति आणि पदार्थ । दोन्ही अप्रकाशत्वें मिथ्याभूत । उभयतां चैतन्य अनुस्यूत । जाण निश्चित दनुजांतका ॥ १७० ॥ एवं प्रकाशक उभय प्रकाशिता । चैतन्य सर्वत्र गा रघुनाथा । आभास टाकूनियां तत्वतां । पाहें उभयतां काय असे ॥ ७१ ॥ अगा जडीं नसतां चैतन्य । कदापि नव्हे तयाचें भान । इंद्रियवृत्तीमाजी नसतां चिद्घन । पदार्थभान कदा न करी ॥ ७२ ॥ जड जडातें कदा न प्रकाशी । यालागीं चैतन्यचि आपआपणा प्रकाशी । मध्यें आन भासे तेंचि निश्चयेंसीं । भ्रांति आ-पैसी रघुराया ॥ ७३ ॥ एवं ज्ञेय आणि ज्ञान । उभयतां जाण चैतन्यघन । तेंचि तूं रघुनाथा आपण । वांचूनि येक भिन्न परस्परें ॥ ७४ ॥ ज्ञेय ज्ञान आणि आपण । हेही शब्दाचीच भिरवण । वांचूनि एकचि निखिल चैतन्य । अनुभवें जाण रघुनाथा ॥ ७५ ॥ अगा स्थूळदृष्टी जे बाह्य देखती । त्यांचे कोटि कल्प न तुटे भ्रांति । सूक्ष्मदृष्ट्या अनुभवें पाहाती । चैतन्यस्थिति तयां बाणे ॥ ७६ ॥ आप-णही सर्वांचा ज्ञाता । तो तंव ज्ञानस्वरूपचि तत्वतां । ज्ञानाचि येतसे ज्ञेयार्था । ह्मणोनि एकार्था स्वयेंचि येत ॥७७॥ या कारणास्तव गा रघुपती । दुसरें नाहीं गा त्रिजगतीं । इतर असंत भेदप्रतीति । निश्चयार्थी जाणरामा ॥ ७८ ॥ सुवर्णाची केली अंबिका । महिषत्रिशूळादि आयुधें देखा । नानारूपें काय सुवर्णी येका । भेदलेखा होईल ॥ ७९ ॥ नातरी घृताचे थिजलेपणें । नानाकणिकीं अनेकपणें । भेदलें काय आन होणें । घृताकारणें आलें तेथें ॥१८०॥ नाना पटाचिया कुसरी । अनेक चौकडियांच्या भरोवरी । परी येकुचि पटू सर्वांपरी । गोष्टी दुसरी असेचिना ॥ ८१ ॥ नानाकुसरी नानाप्रकार । केले तरी नाना भेदांतर । सर्वत्र येकाचि तंतु निर्धार । नाहीं विचार आन कांहीं ॥ ८२ ॥ पाहातां भ्रांतीचिया दृष्टी । नाना विचित्र रंग भासती पटीं । तेथें तो अनेकत्व प्रगटी । नाहीं भेटि तंतूविण ॥ ८३ ॥ जो कीं नानाप्रकारांतरीं । येकाचि तंतु दिसे अंबरीं । त्यासि भेदु पळे दुरिच्या दुरी । तत्व निर्धारीं तो राहे ॥ ८४ ॥ तैसें एकाच ब्रह्माचा ठाईं । जेथें ज्ञानादि भासती पाहीं । तैसेंचि हें विश्व विचित्र सर्वही । मनपायी ऐसें भासे ॥ ८५ ॥ परी तें अज्ञानासीचि रघुनाथा । ज्ञानियासि नाहीं गा तत्वतां । अविचारीं भेदसिद्धि ताता । विचारीं सर्वथा असेचिना ॥ ८६ ॥ ह्मणोनि विचारें पाहातां रघुपती । आपणेंविण न भासे त्रिजगतीं । तेथें नाहींच अन्यव्यक्ति । जाण निश्चितीं विबुद्धनाथा

---

१ श्लोकांतील 'कल्पना कर' या पदानीं. २ मातीचें ढेंकूळ. ३ मूठभर दर्भांचे ठिकाणीं कल्पिलेला. ४ उघड करून सांगितलेला अर्थ. ५ मृगजळाप्रमाणें. ६ चैतन्याचा [illegible] ठेवून असलेले. ७ देवीची मूर्ती. ८ भिन्नपणा. ९ वस्त्रांत.

॥ ८७ ॥ भेदु तो तंव पारमार्थिक असे । पारमार्थिकज्ञानेंही न नासे । भेद ज्ञानें नासता तऱ्ही प्रत्यक्ष दिसे । यालागीं जसे औपाधिक हा ॥ ८८ ॥ अज्ञानउपाधीकरून । ब्रह्मीं भेद भासे जाण । अज्ञान नासल्या चैतन्यघन । ब्रह्म परिपूर्ण पूर्णत्वें ॥ ८९ ॥ केशांतरीं ठेविला स्फटिक । दिसे भेदाबळा सम्यंक । उपाधि गेलिया येका येक । शुद्ध देख भासतसे ॥ १९० ॥ जपाकुसुमाची संगति । शुभ्रचि स्फटिक पावे आरक्ति । निळेन निळेपणाची व्यक्ती । उपाधीनें भासती रघुराया ॥ ९१ ॥ तैसें सर्व अज्ञानगत । नानात्वेंचि भेद भासत । उपाधिनिरासें सदोदित । जाण निश्चित अद्वयब्रह्म ॥ ९२ ॥ ह्मणोनि भेदु नाहींच सर्वथा । भेद प्रतीति होतसे भ्रांता । तो भेदु टाकूनि घेईं येकात्मता । मग तूंचि तूं सर्वथा सर्वत्र ॥ ९३ ॥ अगा तूं ऐसें जरी ह्मणसि रघुपती । विष्णुविरिंचिशिवादि मजहूनि भिन्न दिसती । आणि त्यांची कर्तृत्वेंही भिन्न भासती । भेदुव्यक्ति तेणें येतसे ॥ ९४ ॥ तरी आयिक रघुनाथा उत्तर । तद्रूपें करिसी तूंचि व्यवहार । बाहेरि नामरूपाचेंचि वोडंबर । असे अंतर एकत्वें एकु ॥ ९५ ॥

ब्रह्माविष्णुशिवेंद्राद्या यद्यत्कुर्वंति सर्वतः । तदहं चिद्वपुः सर्वं करोमीत्येव भावय ॥ ७ ॥

अगा ब्रह्मा करी विश्वोत्पत्ति । विष्णु पालन करितसे स्थिति । रुद्र संहारी प्रलयांतीं । इंद्रादिक करिती तें आयिका ॥ ९६ ॥ सस्यादिवृद्धि पर्जन्यद्वारा । मघवा करितसे गा रघुवीरा । सूर्य प्रकाशी चंद्र तारा । औषधिसंभारा पोषिती ॥ ९७ ॥ अग्नीनें पचवावें सर्व अन्न । कृतांतें करावें सर्व हरण । वायूनें प्राणादिकांचें चलन । तृषाहरण जलादिकीं ॥ ९८ ॥ तैसेंचि अष्टौलोकपाळ । करिती जो व्यवहार सकळ । आणीकही शेषादि नागकुळ । पृथ्वीतलधारणादिका ॥ ९९ ॥ इत्यादि सर्वत्र जें जें करिती । तद्रूपें तूंचि येकु जानकीपती । ऐसेंचि अनुसंधान विश्वमूर्ती । सर्वदा चित्तीं धरावें ॥ २०० ॥ जो कीं ज्ञानरूप तूं आपण । तया स्वरूपाचा ठाईं सर्व निर्माण । ऐसी अनुभवें जाणोनि खूण । राहावें संपूर्ण रघुराया ॥ १ ॥ अगा अपूर्णत्व बाणल्या आपुलें । तेथें आपणचि कर्तें भोक्तें सर्व जालें । आपणचिविण काये उरलें । सांग वहिलें रघुपुंगवा ॥ २ ॥ आपुलिया अनुभवेंकरुनी । पाहें रघुराया विचारुनी । आपुलेंविण जनीं वनीं । नाहीं त्रिभुवनीं आपणाविण ॥ ३ ॥ येथें ब्रह्मादिक दुसरेपणें । कर्तव्यालागीं भासे उरणें । सर्वत्र तुजवांचूनि दुजेपणें । न देखिजे कोण्हे प्रकारेंकरुनी ॥ ४ ॥

अहं सर्वमिदं विश्वं परमात्माहमव्ययः । न भूतं नास्ति नो भावी मत्तोऽन्यदिति भावय ॥ ८ ॥

अगा जें कीं इदमाकारास्पद । दृश्य जें कीं विश्व विशद । तें सर्वही मीचि हा बोध । अनिर्बाध जो कीं उपजे ॥ ५ ॥ ययाचेंचि नाम आत्मार्चन । सर्व विश्व मीचि हें अनुसंधान । परमात्मा जो चिदैकघन । तो मीचि पूर्ण पूर्णत्वें ॥ ६ ॥ आणि कालत्रयीं जया व्ययो नाहीं । तो मी निर्वेदु अव्ययो पाहीं । मजविण कोण्ही पदार्थ नसेही । मीचि मी सर्वही सर्वपणें ॥ ७ ॥ आणि मजआधीं हें विश्व नव्हतें । ना आतांही नाहीं दिसतें । पुढेंही नव्हेल मागुतें । मीच मी सर्वार्थें येकला येक ॥ ८ ॥ मजविण आणीक कांहीं । आत्मत्वीं दुजी मातु नाहीं । ऐसेंनि अनुसंधानें राहीं । अनुभवें नाहीं पाहातां दुजें ॥ ९ ॥ भावयशब्दें भावना । हे पूर्वींच निवेदिली लक्षणा । भावयशब्दें याचि अभिधाना । येथें जाणा आलासे ॥ २१० ॥ भावयशब्दाचा अर्थ जाण । तद्रूपचि राहणें परिपूर्ण । ऐसें जें सर्वदा सर्वत्र अनुसंधान । आपणाविण दुजें न देखे ॥ ११ ॥ अर्थापेक्षा अर्थेन । पदाचें सर्वत्र कीजे जाण । येथें ऐसेंचि व्याख्यान । पाहिजे पूर्ण रघुराया ॥ १२ ॥ भावनाशब्दें भावना कीजे । तरी ब्रह्मस्थिति न बोलिजे । तियेतें उपासना ह्मणिजे । वर्म सहजें जाण रामा ॥ १३ ॥ येथें बोलिजतसे ब्रह्मस्थिति । उपासनापर न कीजे व्युत्पत्ति । येथें ऐसेंचि व्याख्यान सर्वार्थीं । केलिया स्थिति सर्व पूर्ण सोभे ॥ १४ ॥

एकं ब्रह्म चिदाकारं सर्वात्ममुखमण्डितम् । निष्कं भूरि वाऽशेषमिति भावय यत्नतः ॥ ९ ॥

ययालागीं तूं रघुनाथा । येणेंचि अनुसंधानें राहें तत्वतां । एक ब्रह्म मी नाहीं अन्यथा । हेंचि ताता अनुसंधावें ॥ १५ ॥ तेंचि तूं ब्रह्म तदाकार । ज्ञानस्वरूप निर्विकार । सर्वात्मक अखंड निर्धार । निष्कंपतर जाण तूं ॥ १६ ॥ जयासि नाहीं चळविकार । तेंचि निष्कंप निर्विकार । तेंचि तें परब्रह्म साचार । ब्रह्म प्रचुर अप्रमेय ॥ १७ ॥ आणि सर्वात्मक तें ऐसें ।

---

१ उपाधि संबंधाचा. २ जास्वंदीच्या फुलाची. ३ विष्णु, ब्रह्मदेव, शिव वगैरे. ४ धान्यें वगैरे वाढविणें. ५ इंद्र. ६ लौकर. ७ ध्यानांत ठेवावें. ८ अतिशय कंपरहित. ९ विपुल.

सर्वही सर्वत्र तेंचि असे । नामरूपादि वरी वरी भासे । विचारें वसे तेंचि तें कीं ॥१८॥ जैसें षड्रसांचें लोपिजे जीवन । त्या जीवना कटूवम्लत्वें घेती जीवजन । तयां षड्रसांचें होतसे भान । परी नेणती जळ जाण सर्वात्मक ॥ १९ ॥ नेणत्यां षड्रसांची प्रतीति । ज्ञानी ते सर्व उदकचि देखती । स्वादुरस-भेदें जळचि जाणती । जळाची स्थिति रसात्मक ॥ २२० ॥ नातरी हेमामाजी कटककुंडल । नाम-रूपचि भासे सकळ । परी येक सुवर्णचि केवळ । जाण निर्मळ सर्वात्मकें ॥ २१ ॥ नातरी शर्करेचा परिवार । अश्वकुंजरचतुरंगभार । परी सर्वात्मक ते शर्करा साचार । जाण विचार तेथ कैंचा ॥ २२ ॥ घृतकणिकीं अनेकपण । एक घृतासिचि भासे पूर्ण । परी घृताचिवांचूनि नाहीं आन । सर्वात्मक जाण ययापरी ॥२३॥ नाना तरंगलहरी अनेकाकार । भासतां तेंही एकचि नीर । अवयवसमुदाय एकचि शरीर । समुदाय अक्षरें येकी वाचा ॥ २४ ॥ नानारागीं येकुचि गीत । नाना शब्दीं एकचि अर्थ । तैसें ब्रह्म हें सदोदित । आन भावीत ते भ्रांति ॥२५॥ तैसें सर्वात्मक ब्रह्म जाण । विश्व हें नामरूपचि अभिधान । परी तें ब्रह्मचि परिपूर्ण । तूंचि तूं निर्वाण परब्रह्म ॥२६॥ तैसें अखंड जें कीं देशींकाळें । खंडेना जें कीं वस्तुमेळें । तेंचि तें अखंड निराळें । अवस्थाकाळें पालटेना ॥ २७ ॥ तैसें भूरिशब्दें बहुवाचक । जें सर्वत्र पूर्णव्यापक । अशेष शब्दें तेंचि सम्यक । नाहीं आणीक दुजें कांहीं ॥ २८ ॥ अथवा दुसरें व्याख्यान ऐसें । पृथ्वीचे परी अशेष असे । ह्मणिजे समग्रपणें तेंचि तें वसे । आन नसे स्वतंत्र ॥२९॥ काष्ठ पाषाण तृण वृक्ष लता । सानूंचि शिखरें पर्वता । रत्नादिमणि धातु सर्वथा । हें सर्व वस्तुता पृथ्वीच जैशी ॥ २३० ॥ तैसें जें भासे पदार्थाकार । दृश्यमात्र जें कीं मनोहर । तें अशेषही निर्विकार । ब्रह्म साचार रघुनाथा ॥ ३१ ॥ नानाप्रयत्नेंकरुनी । ऐसी स्थिति साधी कोदंडपाणी । दुजें न भासे आपणावांचुनी । राहे निर्वाणीं तेणें बोधें ॥ ३२ ॥ हे बाणवयाचे उपाय कोटि । मागां सांगितले गा जगजेठी । त्यांकरुनि होई या सृष्टीं । तुजविण गोठी नाहींच करीं ॥ ३३ ॥ अगा ऐसा अनुभव बाणलिया । तेंचि आत्मार्चन रघुराया । नाहीं विश्वीं आपणावांचूनियां । अनुभव यया नाम बोलिजे ॥ ३४ ॥

नाहं न चान्यद्वस्त्वस्ति ब्रह्मैवास्ति निरंतरम् । आनंदपूर्णं सर्वत्रेत्यनुद्वेगमुपास्यताम् ॥ १० ॥

ययालागीं गा श्री रघुपती । हेंचि अनुसंधान असों दे चित्तीं । मी तंव अहंपणें नयें व्यक्ती । नव्हे सर्वार्थीं अन्य वस्तूही ॥ ३५ ॥ मी नव्हे आणीक वस्त्वंतर । किंचित् कदाचित् नव्हे सर्वत्र । एक ब्रह्मचि निरंतर । बाह्यांतर मीचि येकु ॥ ३६ ॥ निरंतर ह्मणिजे अखंडदंडायमान । सर्वदा कालत्रयीं अबाध्य जाण । देशीं काळें नाहीं खंडन । परिपूर्ण पूर्णत्वें ॥ ३७ ॥ तेंचि तें आनंदघन सर्वत्र । जेथें दुजें नाहीं वस्तुमात्र । तेंचि उपासावें निरंतर । ह्मणिजे साचार तद्रूप राहे ॥ ३८ ॥ रात्रिदिवस त्रिकाळीं सर्वदा । यातें अनुद्वेग ह्मणिजे प्रबुद्धा । दृश्यत्यागें प्रपंचबाधा । करूनि बोधा राहावें ॥ ३९ ॥ तेंचि आत्मबोधाचें लक्षण । तेंही तुजप्रति गुह्य सांगेन । येकाग्र करूनियां मन । जेणें समाधान पावसी ॥ २४० ॥

ग्राह्यग्राहकसंबंधे सामान्ये सर्वदेहिनाम् । योगिनः सावधानत्वमेतदर्चनमात्मनः ॥ ११ ॥

सर्व प्राणियांच्या ठायीं । ग्राह्यग्राहकभाव असे पाहीं । सामान्यकारें सर्वही । अनपायी असताचि असे ॥ ४१ ॥ ग्राह्य जें कीं विषय जात । ग्राहका जीवाचे जे जे भोग्य पदार्थ । ग्राहक तो प्रमाता निश्चित । तेणें घेइजेत सर्वही स्वयें ॥ ४२ ॥ हे सामान्यकारें सर्वांसिही असे । परी याचें अंतर नेणिजे भ्रंशें । योगी तो येथें सावधान वसे । तेंही कैसें आइक रामा ॥ ४३ ॥ तरी ग्राह्यगाहक तें दृश्यजात । तें साक्षी चैतन्य प्रकाशित । परी तो साक्षी आपण हें निश्चित । बोळखत योगी ॥ ४४ ॥ जेणें या सर्वांतें प्रकाशणें । तया साक्षियातें जाणणें । आणि सर्वही प्रकाशी जेणें । तें ज्ञान जाणे आपणचि ॥ ४५ ॥ जेथ जाणणयाची सावधानता । तेंचि आत्मार्चन गा श्रीरघुनाथा । साक्षी आपण तोचि सर्वथा । त्यातेंचि तत्वतां वोळखणें जें ॥ ४६ ॥ प्रकाश्यकातें वोळखणें । ग्राह्य तें ग्राहकपणें जाणणें । तेंचि आत्मार्चन मी ह्मणें । जाण या खुणे रघुनाथा ॥ ४७ ॥ आणि ग्राह्य जें कीं ह्मणिजे । तेंही वास्तव ग्राहकचि सहजें । ग्राहकेंविण देखिजे । तरी तेंचि बोलिजे वस्तुदृष्टि ॥ ४८ ॥ हें तंव मागां तुज

---

१ उदक. २ कडू, अंबट इत्यादि रूपांनीं. ३ गोड, कडू, अंबट, खारट, तिखट व तुरट अशा सहा रसांचें. ४ हत्ती, घोडे, रथ व पायदळ अशीं सैन्याचीं चार अंगें. ५ शिखरें. ६ निराळा पदार्थ.

सांगितलें । तें तुजविण ज्ञान नाहीं वेगळें । ज्ञेय ज्ञानेंसि नव्हे निराळें । एकचि भलें पदत्रय ॥ ४९ ॥ ह्मणोनि ज्ञान तेंचि तूं रघुपति । ज्ञेय तेंचि ज्ञान सर्वार्थीं । परस्परें तिन्ही भिन्न नव्हती । एकचि असती तत्वदृष्ट्या ॥ २५० ॥ ऐसें जें साधनत्वें देखणें । तेंचि आत्मार्चन मी ह्मणें । तेंचि तें सर्वदा करणें । जाण ये खुणे त्रिदशाधिपा ॥ ५१ ॥ इये स्थितीनें असतां । कर्त्ता नव्हे कर्म करितां । सर्व तोचि जाला सर्वथा । नायके वार्ता दुजयाची ॥ ५२ ॥ ऐसें साधनत्वें सर्वदा असतां । वरपडें नव्हिजे संसृतिपंथा । तोचि जाण ब्रह्म तत्वतां । सावधानता कायसी तेथें ॥ ५३ ॥ ऐसें ऐकतांचि सद्गुरुवचन । श्रीरघुनाथ स्वयें संपूर्ण । ब्रह्मानंदें वोसंडलें पूर्ण । प्रपंचभान अस्तवलें ॥ ५४ ॥ त्या सुखाची सुखगोष्टि । ब्रह्मानंदें हेलावे सृष्टि । व्युत्थानानंतरें जगजेठी । करील गोष्टी पुढां कैसी ॥ ५५ ॥ येथें संपलें प्रकरण । तें कीं बोलिजे आत्मर्चन । निजानंदें रंगोनि पूर्ण । मी तूंपण नुरवूनियां ॥ ५६ ॥ सहजानंदसद्गुरुनाथ । पूर्ण कृपे कृपावंत । त्याचेनि सत्ते ग्रंथार्थ । प्रगट झाला सहजत्वें ॥ ५७ ॥ पुढतंमुढतीं हेचि विनवणी । प्रीति पावो सद्गुरुचरणीं । विनवणी सर्वेचि अर्पूनी । पूर्णपणीं पूर्णत्वें ॥ २५८ ॥

## इति श्रीयोगवासिष्ठसारे श्रीवसिष्ठरामसंवादे आत्मार्चनप्रकरणं

## सप्तमं संपूर्णम् ॥



॥ श्रीः ॥

## प्रकरण ८ वें.

# आत्मनिरूपण.



श्रीगणेशायनमः ॥ श्रीसद्गुरूंचिया कृपादृष्टी । होय अपरोक्ष वस्तूचि भेटि । तेथें शब्दब्रह्मवाक्सृष्टि । पावे पुष्टि काय नवल ॥ १ ॥ यालागीं सर्वदा सर्व काळीं । मन रातलें स्नेहें श्रीगुरुचरणकमळीं । घेवोनि तेथिंची सुखनव्हाळी । आनंदमेळीं निमग्न मी ॥ २ ॥ परमानंदाचिया प्राप्ती । सहज इतर विषयीं होय विरक्ति । यालागीं सर्वही नावडती । सर्वदा तृप्ति परमानंदें ॥ ३ ॥ तैसा निमग्न सद्गुरुचरणीं । ह्मणोनि इतर पदार्थांतें न गणीं । तेही दुजेपणें न देखें न नयनीं । येकुयेकपणीं श्रीसद्गुरु ॥ ४ ॥ अहो मायबाप कुलदेवता । गुरु गुरुत्वें पूज्य तत्वता । न मने माझिया चित्ता । येकु येकुलता सर्वत्र गुरु ॥ ५ ॥ अहो इष्टदेवतांच्या नमनीं । वंद्यत्वें गणेश शारदा भवानी । परी देखें येकुचि सद्गुरु नयनीं । दुजेपणीं मुकलों मी ॥ ६ ॥ कां मातेलागीं जैसें बालक । भुले देखे सर्वत्रचि एक । तैसें मन माझें सम्यक । श्रीगुरुचि एक सर्वत्र देखणें ॥ ७ ॥ सद्गुरूचेनि प्रसन्नपणें । पुरुषासि एक ज्ञान होणें । ज्ञानें येणें ब्रह्म पावणें । तरीच निवणें परमानंदें ॥ ८ ॥ तैसें नव्हेचि मजलागीं । ज्ञान ज्ञेय ज्ञाता न विभागीं । एक सद्गुरुचि चहूंभागीं । न देखें जगीं दुजें कांहीं ॥९॥ ज्ञान ज्ञेय आणि ज्ञाता । तो सद्गुरुचि एक तत्वतां । ह्मणोनि आनें मोहर माझिया चित्ता । नव्हे आतां काय करूं ॥ १० ॥ असो हें तंव बोलावें किती । गुरुज्ञान ज्ञाते जाणती । येर तें शब्दज्ञानी नेणती । आत्मप्राप्ति जयां नाहीं ॥ ११ ॥ सद्गुरुमहिमा काय जाणती । शब्दें गुरुशिष्यत्व लोकीं मिरविती । अंतरीं नरत्वें गुरुसि देखती । तयां प्रतीति ते शब्दवरी ॥ १२ ॥ असो तो वंदूनि सद्गुरुरावो । केला ग्रंथारंभासि प्रस्तावो । येथें नाहीं मज प्रयास भावो । ग्रंथसरावो करावया ॥ १३ ॥ अहो ग्रंथ करावयाचे प्रयास । येव्हडें कासया हे मज साहास । सिद्ध करूनि सद्गुरु परेश । मुखीं घांस घाली माझ्या ॥ १४ ॥ जैसें प्रयासेंकरूनि जननी । दधि मंथूनियां काढी लोणी । ते आइतें घाली अपत्यवदनीं । गिळितां त्यालागूनि कोण प्रयास ॥ १५ ॥ तैसा मंथूनियां हा शब्दसिंधु । मुख्यार्थ काढूनि नवनीतबोधु । घाली मन्मुखीं स्वतःसिद्धु । अतिअगाधु गोडपणें ॥ १६ ॥ तो गिळूनियां नवनीतगोळा । धाऊनि ढेंकर देतसें वेळोवेळां । नाम ग्रंथ जाला । ढेंकरमेळा पदप्रबंधु ॥ १७ ॥ ह्मणोनि यालागीं प्रयास नाहीं । ग्रंथ हा आइताचि सिद्ध पाहीं । तो संतांसि रिझवावया सर्वही । उद्योग पाहीं यया ग्रंथाचा ॥ १८ ॥ आतां माझें इतुकेंचि करणें । जें सन्मुख करावे संतजन । तयांचें हेंचि वर्म जाण । बोबडे वचनें बोलावें ॥ १९ ॥ अहो वांकुडें पाऊल घाली बाळ । आणि बोबडे बोल बोले रसाळ । देखोनि संन्यासियांसि कळवळ । स्नेहकल्लोळ नसंवरे ॥ २० ॥ ते सन्मुख होवोनियां तयाप्रति । स्नेहें घेवोनियां लाडविती । जऱ्ही कुरूप तयाची व्यक्ति । आणि वक्रोक्ति वक्र चालणें ॥२१॥ तैसा मी वांकुड्या पिसाट बोलीं । संतकृपा येकाकार करी भली । ते संतोषती यया बोलीं । ग्रंथनव्हाळी त्यांलागीं हे ॥ २२ ॥ तेचि परिसा वांकुडे बोले । परमानंदें जे अतिरसाळ । ते देवोनियां मनासि बोल । ग्रंथ सखोल परिसिजे ॥२३॥ इतुकीचि माझी कृत्यतकृता । जें हातासि ये तुमची प्रसन्नता । तेणें सर्वदा तुमची सन्मुखता । होवे निजात्मता निजभावें ॥ २४ ॥ माझिया श्रीगुरुरायें मजलागूनी । तुह्मी संत दिधलेती माहेर जोडूनी । त्या तुह्मांसि रिझवावयालागुनी । ग्रंथनिर्माणीं बोबड्या बोले ॥२५॥ वरीवरी जऱ्ही बोबडे बोल । तऱ्ही प्रमेय असे अतिसखोल । तें घेतां अतिरसाळ । सप्रेमळ निवती सुखें ॥ २६ ॥ तो बाह्य देखे जना सकळ । जैसा इक्षुदंड वक्र आणि काळा । परी अंतरीं रसगौल्यतेचा मेळा । रसुरसाळा अति प्रिय ॥ २७ ॥ त्याची जंव जंव आटणी कीजे । तंव रसपाक ते शर्करादि निपजे । तये गोडियेचा पारु नेणिजे । ते जाणती सहजें रसज्ञ जेकां ॥ २८ ॥ तैसा ययाचा पदच्छेद कीजे । जंव जंव ययाच्या

---

१ रममाण झालें. २ इतर. ३ लक्ष्य, ध्यानांत ध्यावयाचा पदार्थ. ४ दृप्त होऊन. ५ सर्वसंगपरित्याग केलेल्यांस देखील. ६ आवरत नाहीं. ७ वेड्या. ८ आटविणें. ९ शब्द तोडणें.

अंतरीं रिघिजे । तंव तंव प्रमेय गोड पाविजे । तेथें ज्ञातेनि निविजे परमानंदें ॥२९॥ ययालागीं ग्रंथाचें निर्माण । केलें सन्मुख व्हावया सज्जन । संत सन्मुख ते कृतकृत्यता पूर्ण । नाहीं आन त्रिसत्य ॥ ३० ॥ इतुकें बोलतांचि सज्जनीं । माथा डोलविला संतोषोनी । ह्मणती प्रसन्न झालों तुजलागुनी । ग्रंथनिर्माणा प्रवर्ते आतां ॥ ३१ ॥ ऐसा लावूनि महाप्रसादु । तेणें उल्हासला बोधु । संतप्रसादें ग्रंथा वबोधु । अतिअगाधु परियेसा ॥ ३२ ॥ तरी मागां आत्मार्चनप्रकरण । संपलें संपूर्ण गोडपण । तेथें आक्षेप करी रघुनंदन । आत्मा किंलक्षण बोलिजे ॥ ३३ ॥ आधीं आत्मा किंलक्षण जाणावें । तरीच आत्मार्चन करावें । हे आशंका करितां अंतर्भावें । श्रीवसिष्ठा मनीं तंव कळों सरलें ॥ ३४ ॥ आणि ऐसें आत्मार्चन करितां । येथें भेदु भासतसे जी तत्वता । एकीं अर्चनीय देवता । दुसरा कर्त्ता एक आपण ॥ ३५ ॥ तरी जीवब्रह्मांसि ऐक्य तें कैसें । हेंही सांगावें सावकाशें । तंव गुरु ह्मणती अपूर्व ऐसें । सांगों विश्वेशें ऐकावें ॥ ३६ ॥ वसिष्ठ ह्मणती गा श्रीरघुनाथा । बरवी आशंका केली ताता । तरी आत्मा एवंभूत ऐक आतां । सांगेन तत्वता जैसा असे ॥ ३७ ॥ तरी पूर्वप्रकरणीं आत्मलक्षण । आणि[1]तदाकारें करणें अंतःकरण । तो साक्षात्कारु निदिध्यासन । सर्वही गुरुखूण सांगितली ॥ ३८ ॥ तथापि दृढीकरणार्थ निरूपण । केलेंचि आत्मयाचें कीजेल जाण । आणि जीवचि ब्रह्म हे खूण । सांगों निर्वाण ब्रह्मात्मैक्य ॥ ३९ ॥ तऱ्ही देहेंद्रियसंघातेंकरून । आत्मतत्व न कळे भ्रमत्वें जाण । जीव तोचि परमात्मा पूर्ण । केल्या निरसन उपाधीचें ॥ ४० ॥ उपाधीकरितां भ्रमती । शुद्ध आत्मा ऐसा नेणती । ह्मणोनि प्रश्न तुझा रघुपती । तरी आइक स्थिति सांगेन ॥ ४१ ॥ ऐसी प्रतिज्ञा स्वीकारुनी । वसिष्ठ निरूपिती कोदंडपाणी । सांगों आत्मनिरूपण इयें जनीं । प्रकरणाभिधानीं[3] पावलें ॥ ४२ ॥ तेंचि आत्मनिरूपण आतां । सांगिजेल परिसावें श्रोतां । आत्मनिरूपण श्रवण करितां । होय तत्वतां स्वयें तो ब्रह्म ॥ ४३ ॥ ह्मणोनि एकाग्र आयिकिजे । आत्मा एवंविध ऐसा जाणिजे । तो तंव विशिष्टचि बोलिजे । स्वरूप घेइजे लक्षुनी ॥ ४४ ॥

तस्मिन्देहेंद्रियादीनां संघाते स्फुरति स्वतः । अहं सोऽहमयं भावः स जीवो मलगुंठितः ॥ १ ॥

तरी तेंचि आत्मयाचें स्वरूप जाण । जया उपाधिमेळें आलें जीवपण । उपाधिनिरासें ब्रह्म पूर्ण । हेचि खूण परियेसीं ॥ ४५ ॥ तरी हें जयाच्या ठाईं । देहेंद्रियादिसमूह पाहीं । भासती जाण जेथें सर्वही । तोचि निःसंदेही जीव जाण ॥ ४६ ॥ ते सकळही जीव गा रघुनाथा । ब्रह्मीं भासती तत्वतां । आणि देहेंद्रियादिसंघाता । भासणें ताता जयाचे ठायीं ॥ ४७ ॥ हें समष्टिव्यष्टिरूपें असे । यालागीं देहेंद्रियें देह जीवीं भासे । तो जीव हें विश्वासें । रघुवंशें जाणावें ॥ ४८ ॥ मनादि इंद्रियें, देहद्वय संपत्ति । स्वतांचि जेथें हे सर्व स्फुरती । तेची जाण जीवाची व्यक्ति । श्रीरघुपती निश्चयें ॥ ४९ ॥ हें न कळे तरी आयिकें दुसरें । जाणतें वर्म सांगों निर्धारें । तरी 'अहं सोहं अयं' जेथें स्फुरे । जाण तें खरें जीवतत्व ॥ ५० ॥ तरी अहं हें देहातें ह्मणे । सोहंशब्दें करण आणि मनें । अयंशब्दें हा आत्मपणें । अपरोक्षगुणें स्फुरतसे ॥ ५१ ॥ परी हें समूळ गुंठित जाणावें । कां जें अहंकार मिश्रित स्वभावें यालागीं समलत्व ह्मणावें । वर्म जाणावें अयोध्यापती ॥ ५२ ॥ हा मलत्यागु केल्या तेंचि ब्रह्म । याचेंही सांगों तुज वर्म । जीवपणें अहं सोहं इत्यादिभ्रम । नुरे संभ्रम जीवत्वनाशें ॥ ५३ ॥

सर्वमेव चिदाकाशं ब्रह्मेति घननिश्चये । स्थितिं याते शमं याति जीवो निःस्नेहदीपवत् ॥ २ ॥

हें सर्वही जगजाळ । सच्चिदानंद ब्रह्मचि केवळ । ऐसा दृढ निश्चय अढळ । स्थिति निर्मळ पावे जीव ॥ ५४ ॥ असंदिग्धपणें[8] ब्रह्मावबोध । जगत्रीं जाला जया विशद । मिथ्या हें जग पावोनि बाध । ब्रह्म निर्विवाद स्फुरे जया ॥ ५५ ॥ तैसोंचि [illegible] असंडस्थिति । अहं सोहं हे भाव लपती । न देखे भिन्नत्वें कैंची विश्वस्थिति । तरीच शांति जीवत्वा ॥ ५६ ॥ सर्व स्फुरतां ब्रम्हभावो । मग जीवा जीवत्वें कैंचा ठावो । स्नेहाभावें दीपाचा अभावो । तैसा जीवभावो मळनाशें ॥ ५७ ॥ जंव देहादिक सत्यत्वें भासती । अहं सोहं अयं हे व्यक्ति । तंवचि जीवपणाची स्थिति । जाण रघुपती निश्चयें ॥ ५८ ॥ उपाधिनाशें जीवाची शांति । जीव नाहींच होय गा रघुपती । जळ आटलिया प्रतिबिंबव्यक्ति । त्रिजगतीं पाहतां न दिसे ॥ ५९ ॥ घट नाशलिया घटाकाश । मठ भंगलिया

---

१ शंका. २ देह व इंद्रियें हीं एकत्र झाल्यामुळें. ३ प्रकरणाच्या नांवांत. ४ अनेकत्वानें व एकत्वानें. ५ हा. ६ मलयुक्तता. 'शबल' असा पाठ. ७ सृष्टिरूपी जाळें. ८ संशयरहित. ९ प्रतिबिंबाचा स्पष्टपणा.

मठाकाश । नुरे जैसा प्रतिभासं । दर्पणास नेलिया ॥ ६० ॥ तैसें मुख्य उपाधि नाशिलिया । उपाधिगत जीव जाय लया । मग ब्रह्मचि येक येकलिया । उरे रघुराया उपाधिहीन ॥ ६१ ॥ मुख्य उपाधि जो जीवाचा । अंतरसूक्ष्म जो नेटाचा । तोही सांगों आइक याचा । विवेक साचा रघुनाथा ॥ ६२ ॥ तन्ही मन बुद्धि आणि अहंकार । येकचि परी पावले भेदांतर । उपाधीकरितां व्यापार । तदनुसार नांवें पडती ॥ ६३ ॥ येका अंतःकरणाच्या वृत्ति । व्यापाररूपें चतुर्धा विभागती । मन बुद्धि चित्त अहंकार म्हणती । तेथें चिच्छक्ति जीवत्वें बिंबे ॥ ६४ ॥ बुद्धिप्रतिबिंबतें जें चैतन्य । जया उपाधिवशें आलें जीवपण । तेणें विभागलेंनि अहंसोहंपण । उठी अयंपणें त्रिपुटी हे ॥ ६५ ॥ अहंकारें देहोहं म्हणतु । सोहंकारें मनबुद्धियोग उठितु । बुद्धीनें आपणा 'अयं' मानितु । उपाधि स्वतंत्र विविध ऐसा ॥ ६६ ॥ हें त्रय नसावें गा रघुनाथा । भासती जो विश्वव्यक्ति समस्ता । जीवत्व व्हावें तेणें कारितां । हें नाशतां जीवा नाशु ॥ ६७ ॥ टवळाचें स्नेह जेव्हांचि सरे । तेव्हांचि दीप कोठें उरे । दर्पण नेलिया मुख वोसरे । मुख तें उरे उपाधिहीन ॥ ६८ ॥ तो जीव नाशलिया रघुनाथा । उरे शुद्ध ब्रह्मचि तत्वतां । तेणेंचि होय आत्मनिश्चयार्था । आलें पंथा अनुभवाच्या ॥ ६९ ॥ ऐसियाँ खुणे सांगेन तुज । तेणें आत्मा कोण हें बूझ । तो जाणतां कृतकृत्यता सहज । सरे व्याज भवभयाचें ॥७०॥ अगा सर्वही ब्रह्मचि असे । जीव तोही ब्रह्मत्वेंचि वसे । परी माथिलेंचि जीवत्व घेऊनि बैसे । आणी पिसें नेणपणाचें ॥ ७१ ॥ जैसा उत्तम उत्तमत्वा टाकुनी । भ्रमें अधमत्व आपणा मानी । संन्यासी अंत्यज होय स्वप्नीं । नाठवे मनीं उत्तमत्व ॥ ७२ ॥ तैसा स्वयें ब्रह्म असोनी । भ्रमें आपणा जीवत्व आणी । तेणें भ्रंशे स्वस्वरूपापासुनी । शोच्य सर्व गुणी जीवपणें ॥ ७३ ॥

स्वमहत्वं यथोपेक्ष्य कश्चिद्विप्रो दुरीहया । अंगीकरोति शूद्रत्वं तथा जीवत्वमीश्वरः ॥ ३ ॥

अगा कोण्हीएक ब्राह्मण । आपुलें शुद्ध महत्व उपेक्षून । आपुलिया विस्मरणेंकरून । शूद्रपण अंगिकारी ॥ ७४ ॥ शूद्रपणाचीं कर्में करी । तेणें शूद्रपण आपणा निर्धारी । सहस्रीं सांगतांही क्षणभरी । सोय पुरी न धरीच ॥ ७५ ॥ तैसा कर्ता भोक्ता येणें अध्यासें । ईश्वरासि जीवपणाचें पिसें । तेंचि घरुनियां बैसे । नेणें सर्वांशें ईश्वरत्वा ॥ ७६ ॥ आपुलें सत्ताप्रकाशसुख । ब्रह्मत्व सांडी स्वयें अशेख । ईश्वरत्व ऐश्वर्यादि सम्यक । विसरे देख जीव भ्रमें ॥ ७७ ॥ देहादिकाचेनि अध्यासें । ईश्वरासि जीवपणाचें पिसें । येऱ्हवीं तो स्वयेंचि शुद्ध असे । आत्मा ऐसें जाण रामा ॥ ७८ ॥ आणि वास्तव तरी शरीर नव्हे । परी स्वसंकल्पें शरीरभावे । तें शरीर मानी गा स्वभावें । तेणेंचि गौरवें श्लाघतु ॥ ७९ ॥

असत्यमेव संकल्प्य भ्रमेणेदं शरीरकम् । जीवः पश्यति मूढात्मा बालो यक्षमिवोत्थितम् ॥ ४ ॥

अगा असत्य जें कीं शरीर । जागृतिदशेचें भ्रमसार । स्वयें संकल्पूनि नश्वर । तदनुसार वर्तती ॥ ८० ॥ असत्य देह तें जाण ऐसें । नश्वर परिणामीं तरी प्रत्यक्ष दिसे । हें निरूपितां सावकाशें । विस्तारु असे ग्रंथासि पैं ॥ ८१ ॥ क्षणक्षणा परिणाम पावतु ॥ बाल्य तारुण्य वार्धक्य भोगितु । इतर शरीरांचा नाश देखतु । नश्वरार्थु प्रत्यक्ष सिद्ध असे ॥८२॥ आणि शरीरभ्रम जागृतीसि दिसे । स्वप्नीं तो आणीकचि भासे । सुषुप्तीसि तरी कांहींच न दिसे । तरी साच कैसें म्हणावें गा ॥ ८३ ॥ ऐसें असत्य जें कीं शरीर । तेणें नसतेंचि संकल्पी साचार । त्यातेंचि म्हणे मी साकार । भ्रमें थोर घेऊनि बैसे ॥ ८४ ॥ हें मनसंकल्पीं तरी साच भासे । मन नसतां कोठेंचि न दिसे । यालागीं मनःसंकल्पित हें सर्वांशें । भासतसे मिथ्याध्यासें ॥ ८५ ॥ ऐसें असत्य हें शरीर । तें भ्रमें संकल्पूनि साकार । आपण असोनि निर्विकार । भ्रमें शरीर आपणा मानी ॥ ८६ ॥ स्वस्वरूपाचें विस्मरण करुनी । विपरीताध्यास होय भरंवसेनी । विपरीत तें देह कोदंडपाणि । नसतें संकल्पूनि आपण म्हणे ॥ ८७ ॥ तो जीवशब्दें जाण निश्चितु । अतएव मूढ ऐसें म्हणिजतु । तया सत्य संकल्पूनि मी म्हणतु । अविवेकयुक्त म्हणोनियां ॥ ८८ ॥ अगा सत्कर्माचें अनुष्ठान । नाहीं घडलें ईश्वरभजन । स्वप्नींही नेणे साधुसेवन । तो श्रीगुरुचरण काय देखे ॥ ८९ ॥ तया कैंची चित्तशुद्धि । मळिणत्वें विषयाकार बुद्धि । ते काय पावती स्वरूपसिद्धि । म्हणौनि मूढधी नांव पावे ॥ ९० ॥ आत्माशब्दें बुद्धि जाण । तियेचें

१ प्रतिबिंब. २ चार प्रकारांनीं. ३ मी देह आहें. ४ जाण. ५ नसलेलेंच. ६ शोकास योग्य. ७ टाकून. ८ सर्व. ९ भ्रमामुळें. १० निराळ्याच प्रकारचा. ११ भोपेंत. १२ मनानें कल्पना केलेलें. १३ मूर्ख.

सत्कर्मीं नाहीं शोधन । ह्मणोनि सर्वदा ते मळिण। मूढपण यया नाम ॥ ९१ ॥ आत्मा बुद्धीचा प्रकाशकु । बुद्धिदर्पणीं भासे बोधार्कु । बुद्धिमालिन्यें आत्मावलोकु । नव्हे निष्टंकु रघुराया ॥ ९२ ॥ जैसें दर्पणाचेनि मळिणपणें । मुखासि वक्रविकार होणें । अतिमालिन्यें न भासणें । दर्पणेंचि करणें प्रकार नाना ॥ ९३ ॥ मुख मुखीं शुद्धचि असे । वक्रादिविकारभावही नसे । परी दर्पणाचिसारिखें भासे । शुद्ध दिसे जैसें तैसें ॥ ९४ ॥ ह्मणोनि दर्पणचि साहाणे लाविती । तेणें भासे शुद्ध मुखप्रतीति । परी दर्पणापराधें साहाणे न तोडिती । मुख सर्वार्थीं रघुराया ॥ ९५ ॥ तैसी बुद्धिदर्पणासि सत्कर्मादिकीं । शुद्धता कीजे बरवी येकी । तरीच आत्मोपलब्धि अति निकी । होय निष्टंकी रघुपुंगवा ॥ ९६ ॥ तैसें बुद्धीचें नव्हे शोधन । ह्मणोनि राहिलें मळिणपण । अविवेकें राहे निमग्न । तैसें मूढपण बुद्धीचें ॥९७॥ तिये बुद्धीसि मळिणत्व जाण । कदापि न घडे स्वस्वरूपदर्शन । ह्मणोनि देहचि देखे विपरीत भान । यक्षाचें भय पूर्ण बाळका जैसें॥९८॥बागुल साच तरी नाहीं । परी बाळें नसताचि कल्पिला पाहीं । साच मानूनि तो कांपे देहीं । किंबहुना पाहीं देहांतु पावे॥९९॥स्वयें आपणातें विसरे । कल्पित बागुल आविस्फुरे । तेणें आंगा आणी वारें । भयें मरे नसतेनी ॥१००॥ तैसें आपण असतां सुखरूप । नसता देहाचा करी आरोप । देहपणें देहदुःख अमूप । भयरूप मरणवरी ॥ १ ॥ अगा आपलें विसरोनि आत्मपण । मिथ्या भ्रमें देहारोपण । करूनि तदनुसार वर्त्ते आपण । काय अज्ञान वाणूं त्याचें ॥ २ ॥ यदर्थीं दृष्टांत सांगेन । आयिक रघुनाथा तुजलागून । जेणें वर्म याचें संपूर्ण । बुझसी जाण रघुनाथा ॥ ३ ॥

मृत्स्नेभके यथेभत्वं शिशुरध्यस्य वल्गति । अध्यस्यात्मनि देहादीन्मूढस्तद्वद्विचेष्टते ॥ ५ ॥

अगा मृन्मयकुंजराचा ठाईं । बाळक इभत्व आरोपी पाहीं । मग तद्रूपें पळे दिशा दाही। विश्रांति कांहीं न पवे तो ॥ ४ ॥ जेव्हां मिळेल येखादा सांगता । बाळा हा हस्ती नव्हे रे तत्वतां । हे मृत्तिकाचि प्रत्यक्ष दिसतां । कुंजरभ्रांति तया असेचिना ॥ ५ ॥ तेव्हां सावध होवोनियां पाहे । ह्मणे हें मृत्तिकाचि आहे । हस्ती ह्मणणें भ्रमु आहे । जाणोनि राहे सुखरूप ॥ ६ ॥ तैसें आत्मयाचे ठाईं । नसतें कल्पूनि देहादि जें कांहीं । मूढ चेष्टे तदनुसार सर्वही । विस्मय पाहीं रघुवर्या ॥ ७ ॥ देहानुसारें चेष्टा करी । कर्त्तृत्व भोक्तृत्व घे मस्तकावरी । स्त्रीपुत्राधीन सर्वांपरी । देहबुद्धी वारी होतसे ॥ ८ ॥ विचारितां देह तरी साच नसे । तेथें नाथिलें कल्पूनि मानसें । तेंचि आत्मत्व घेऊनियां बैसे । तदनुध्यासें वर्त्त आपण ॥ ९ ॥ तुह्मी ह्मणाल सर्वही आत्माचि असे । सर्व दृश्य तें मिथ्या भासे । तऱ्ही साच तेंचि कां न दिसे । मिथ्याचि कैसें लोक घेती ॥ ११० ॥ हें तंव कुंजरदृष्टांतें निरूपिलें । परी तें नाहीं तुह्मासि कळलें । तरी आयिका आतां सांगेन भलें । जेणें उकले भ्रमजाळ ॥ ११ ॥ तरी मृत्तिकेचा जो हस्ती । ते तरी मृत्तिकाचि सर्वार्थीं । परी सावयवत्वें भासे हस्ती । नामप्रतीति अवयवांची ॥ १२ ॥ नामाचिसारिखी आकृति । आकृतीनें नामाची प्रतीति । हें तंव प्रत्यक्ष भासे सर्वार्थीं । सांगणें किती फाडोवाडें ॥ १३ ॥ मस्तकाकार मस्तक दिसे । तेणेंचि मस्तक नाम निर्देशे । कर्ण कर्णापरी भासे । कर्ण ऐसें नाम ठेविती ॥ १४ ॥ नासिक शुंडादंड प्रबळ । चरण चरणत्वें नेत्र गोल । विचारितां मृत्तिकाचि केवळ । कैंचा मेळ अवयवांचा ॥ १५ ॥ नाथिला आकारु नाथिलें नाम । मृत्तिकेचा ठाईं केव्हडा भ्रम । तें सत्य मानी तो नराधम । अति निःसीम अज्ञानी ॥ १६ ॥ प्रत्यक्ष मृत्तिकाचि दिसे । तेथें नाम रूप मानी कुंजराध्यासें । तेणें आपणा लाविलें पिसें । कोणते दशे आणील तो ॥ १७ ॥ नाना चित्रपट भासे दृष्टी । तेथ अनेका कल्पी सृष्टि । अश्व हस्ती पदाति कोटि । सैन्य परिपाठी चतुर्विध ॥ १८ ॥ तेथ नाना अवयव नानानामें । येक सुखी दुःखी संभ्रमें । येकें व्यवहारें येकें नियमें । येकें निःसीमें ध्यानारूढ ॥ १९ ॥ कूप विहीरी तडाक नदी । आंत जळचरसमृद्धि । अग्नि आणि नानाऔषधि । आधि व्याधि येकालि कल्पी ॥ १२० ॥ किंबहुना पटाचा ठाईं । तोही येकुला येक पाही । तेथें नानास्वरूपें कल्पूनिही । येकुचि यहीं रूपीं भासे ॥ २१ ॥ नानाकुड्यादिकाचें चित्र । मूर्ख कल्पी अति विचित्र । रज्जुसर्पशुक्तिरजतसूत्र । निळिमा सर्वत्र आकाशीं ॥ २२ ॥ इत्यादि दृष्टांत सांगों किती । तूं तंव सर्वज्ञ गा रघुपती । तैसें आत्मत्वीं देहादिव्यक्ति । भासे पंक्ति नामरूपाची ॥ २३ ॥ तें नाथिलेंचि कल्पूनि आपण । करितसे तदनुसार वर्त्तन । तोचि आत्मा अज्ञानेंकरून । वास्तवें देहभान भावित ॥ २४ ॥ हेंचि जऱ्ही विचारेंकरून । वास्तवें जऱ्ही जाणे आपण । तऱ्ही तया

---

१ स्पष्ट, निश्चित. २ वांकडें तिकडें आहेसें दिसणें. ३ बुद्धिरूप आरशास. ४ आत्मज्ञान. ५ हत्तीच्या दृष्टांतानें. ६ विस्तारानें. ७ पायदळ. ८ मालिका; प्रकार. ९ मानसिक दुःखें. १० शारीरिक दुःखें.

नव्हे सुखदुःखभान । कैंचें अज्ञान भ्रम कैंचा ॥ २५ ॥ अगा नाथिलेंचि कल्पुनी । दुजेपणातें सत्यत्वें स्वयें मानी । सुखदुःख पावे भ्रमेंकरुनी । संसारदैन्य भोगितसे ॥ २६ ॥ तेंचि सद्गुरूचिया कृपाभरें । फिटलें अज्ञानाचें भेंडरें । तरीच आत्मविचारु संचरे । लाभे निर्धारें आपणयां ॥ २७ ॥ तेंचि सदृष्टांतें सांगेन । आयिकें श्रीरामा चित्त देऊन । जेणें निरसे हें भवअज्ञान । द्वैतभान नाहींच होय ॥ २८ ॥ अहो प्रबोधिलिया जैसें । स्वप्नडिंब नाहींच भासे । स्वयें येकला येकुचि असे । कैंचें पिसें द्वैताचें २९

चित्रसर्पः परिज्ञातो न सर्पभयदो यथा । जीवसर्पः परिज्ञातस्तथा न सुखदुःखदः ॥ ६ ॥

तरी चित्रसर्प जंव भासतु । तंव प्राणांतु भयें असें कांपतु । दुःखें होय व्याकुळितु । नेणे मातु मिथ्यत्वाची ॥ १३० ॥ तोचि वास्तव नाहींसा कळला । तेव्हां भयरूप नेणो काय जाला । दुःखत्यागें सुख पावला । उरगें जाला काय नेणो ॥ ३१ ॥ तैसा हा जीवसर्प गा रघुपती । अज्ञानी जीवत्वें देखती । कर्त्ता भोक्ता ऐसें ह्मणती । अनुभविती सुखदुःखें ॥ ३२ ॥ आपण कोण्हीयेक जीव असे । भ्रमें दुःख भोगी देहाध्यासें । तंव तंव जन्मांतर पावतसे । उसंतु नसे क्षणभरी ॥ ३३ ॥ तोचि सद्गुरुकृपालेशें । तेणेंचि विवेकें विचारूं बैसे । ह्मणे देहादिक मज दृश्य असे । मी वेगळा असें द्रष्टेपणें ॥ ३४ ॥ जीव ऐसें आपणा ह्मणतां । या देहेंद्रियांचा प्रकाशिता । तो मी येथें कोण तत्वतां । मन तंव सर्वथा मी नव्हे ॥ ३५ ॥ मनातें स्वयें असें देखतु । बुद्धि तेही मीचि स्वयें प्रकाशितु । तरी मी ऐसें जो ह्मणतु । कोण हेतु कोणा ठाईं ॥ ३६ ॥ तरी मी ह्मणतां अहंकार । तोही मज दृश्य निरंतर । बुध्यादिकांचा साक्षी साचार । अतिथोर थोरपणें मी ॥ ३७ ॥ ऐसा तो मी कोण येथें । जीव मी ऐसें ह्मणे कोणातें । ऐसा विचारितां विचारु तेथें । मुरे जेथें तो आपण ॥३८॥ हें जाणणेंचि जाणतां । तंव जीवसर्प गेला गा रघुनाथा । दीपेंकरूनि तम पाहतां । प्रकाशु होता येतसे जैसा ॥ ३९ ॥ जैसा निद्रिस्तु निद्रा धरूं जाये । तंव जागेपणा वरपडा होय । स्वप्नीं डिंब जंव पाहों पाहे । तंव स्वयेंचि लाहे जयापरी ॥ १४० ॥ तैसें आपुलें जीवत्व पाहों जाये । तंव साक्षित्वचि होता ये । स्वसुखें सुखरूप लाहे । दुःख काय कैंचें तेथें ॥४१॥ जीवपणाचें जें सुखदुःख । तें तत्काळ हारपे तेथें देख । आपला आपण येकला येक । नेणें वेश सस्यक जीवत्वाचा ॥ ४२ ॥ हें अज्ञानकृत जीवडंवाळ । आपण नेणोनि शुद्ध निर्मळ । होतां सुखदुःखें व्याकुळ । अतितळमळ शाठ्यतेची ॥ ४३ ॥ ऐसें विचारमात्रेंचि रघुराया । पावे आपण आपुल्या ठाया । गेली समूळ अविद्यामाया । सद्गुरुपायां सेवितांचि ॥ ४४ ॥ यालागीं आपणचि आत्मा असे । तें नेणोनि आंगीं जीवपणाचें पिसें । अविचारें आरंबळतसे । विचारें वसे । स्वस्वरूपीं ॥४५॥ इत्यादि खुणा गा रघुपती । तुज करितसें आत्मव्यक्ति । हें जाणोनि राहें ब्रह्मसंवित्ति । मग नेणपणाची भ्रांति कदा नव्हे ॥ ४६ ॥

स्रजि सर्पोयथाध्यस्तो मालायामेव लीयते ॥ आत्मप्रोतोत्थितो भेद आत्मनेव विलीयते ॥ ७ ॥

अगा जैसा माळेचा ठाईं । सर्प अध्यस्त भासे पाहीं । वास्तव तंव सर्वथा नाहीं । स्रजिच तेही जैसी जे स्वरूपें ॥ ४७ ॥ ते येकली येक आपुल्या रूपें । स्रजिचि असे निजस्वरूप । तेथें व्यर्थचि भासिजे सर्प । अज्ञानरूपें अध्यासु जो ॥४८॥ अधिष्ठानीं तंव दुजें नाहीं । आणि तेथें आरोपी जें दुजें कांहीं । यया नाम गा अध्यारोप पाहीं । आपण तें ठायीं भाविती ॥४९॥ अगा माळेनें सर्प देखिला नाहीं । ना ते आपण सर्प जाली कायी । ना आला गेला मातु ते कहीं । नेणे स्वप्नींही कोण्हे काळीं ॥ १५० ॥ तेथें भ्रमेंकरूनियां गा रघुनाथा । सर्पारोप करिती तत्वतां । माळा ते नोहे सर्प तत्वतां । व्यर्थ वार्त्ता वाढविती ॥५१॥ तेचि विचारूनि पाहिजे । तंव सर्प कोठेंचि न देखिजे । माळा ते माळाचि जाणिजे । आरोप सहजें मिथ्याभ्रमु ॥५२॥ सर्प माळेचा ठाईं आरोपित । तोमाळेचिमाजी लयो पावत । व्यर्थ आला गेला ह्मणिजेत । असे निश्चित माळाचि येकी ॥ ५३ ॥ तैसें आत्मयाचा ठाईं । देहादि भासे भेद पाहीं मन बुद्धि इंद्रियें सर्वही । अहंकारु पाहीं नानाकार ॥ ५४ ॥ इत्यादि चित्रविचित्र गा रघुपती । आत्मयाचा ठाईं भेद देखती । नव्हता भ्रमु कल्पिती । वास्तव स्थिति नेणोनियां ॥५५॥ तोचि सद्गुरूचिया कृपादृष्टी । विवेकें प्रवेशे भेदाच्या पोटीं । तंव तो पावे लय उठाउठी । होये भेटी आपआपणयां ॥ ५६ ॥ रामा येव्हडा जो भेदु देखिला । त्यासि ब्रह्मांड थोडें वसावयाला । तो सांग पां कोठूनि आला ॥ मागुता गेला कोण्हे ठाईं ॥ ५७ ॥ येक मुंगीचाही मागु दिसतु । आला गेला असे कळतु ।

---

१ भय. येथें 'भिरुरें' असा पाठ आहे. २ स्वप्नांतील आभास. ३ चित्रांतील सांप. ४ साप. ५ विश्रांति. ६ दुःखी. ७ जीवाची उपाधि. येथें 'जगडाळ' असा पाठ आहे. ८ दुःख पावतो. ९ माळव. १० गोष्ट. ११ रहाण्यास.

आणि भेदु तो कोठें हारपतु । साग मातु रघुराया ॥ ५८ ॥ येऱ्हवीं भेद आलेपणें दिसे । ना गेला हें ही कोण्हा न भासे । तरी याचा विचारु हाचि असे । जाण सर्वांशें मिथ्या प्रभु ॥ ५९ ॥ अगा अधिष्ठानाचेनि नेणपणें । अध्यस्ताचा आरोप करणें । लीन होये अधिष्ठानें । जालेगलेपणें दोन्ही मिथ्या ॥ १६० ॥ येऱ्हवीं द्वैतभास उठिला । तो विचारेंचि लया गेला । जेथें भासला तेथेंचि निमाला । आत्मा उगला जैसा तैसा ॥ ६१ ॥ द्वैतारोप आत्मयाचा ठाईं । पाहतां निमाला तेथेंचि पाहीं । यालागीं द्वैताध्यस्त सर्वही । मिथ्या पाहीं तिहीं काळीं ॥६२॥ मिथ्या तें तंव नाशोनि जाये । परी आत्मा जैसा तैसाचि पाहें । गंधर्वनगर पावे लये । गगन आहे गगनीं जैसें ॥ ६३ ॥ शुक्तिका सत्यत्वें वर्त्तमान । तेथें रजत उद्भवे नाशे आपण । दिसे मालवे जैसें स्वप्न । अधिष्ठान आपण जैसें तैसें ॥ ६४ ॥ यालागीं सर्वही अधिष्ठान । अध्यस्ताभासु तो भ्रम पूर्ण । आयिक यदर्थीं निदर्शन । आत्मखूण जेथें बुझसी ॥ ६५ ॥

नैकमप्यंगदाद्यं च यथैकं हेमसंस्थितम् । उपाधिभिरनेकोऽपि तथात्मैकः स्वरूपतः ॥ ८ ॥

आणीक दृष्टांत गा रघुनाथा । तो तुज सांगैन तत्वतां । जेणें बुझसी वास्तवार्था । आयिक आतां येकाग्र तूं ॥ ६६ ॥ तऱ्ही अनेक जैसे अलंकार । अंगदें कंकणें पदक हार । मुद्रिकादिनानाप्रकार । अति मनोहर नामरूपें ॥६७॥ त्रिताक कुंडलें भवरिया । बोळ वांकी आकाराया । तें येकचि सुवर्ण गा रघुराया । तयाविण या ठाव कैंचा ॥ ६८ ॥ येका सुवर्णाचा ठाईं । नाना अलंकार कल्पिले पाहीं । विचारें अलंकार भिन्न नाहीं । येकचि सर्वही हेम जैसें ॥ ६९ ॥ त्या लेणियांचेनि संकल्पें । हेमीं अलंकाराभास लोपे । विचारें सुवर्ण येकचि रूपें । नानात्वें विकल्पें कल्पिताती ॥ १७० ॥ तैसा उपाधीक करूनि गा रघुनाथा । आत्मा पावे अनेकता । परी स्वरूपें आत्माचि तत्वतां । विश्व हें भ्रांताप्रति भासे ॥ ७१ ॥ देहादि प्रपंचेंकरून । येकासिच नानात्वें मानी जन । येथें भ्रमेंवांचूनि नाहीं आन । विचारें संपूर्ण आत्मस्वरूप ॥७२॥ आणीकही दृष्टांत तुजप्रति । सांगेन ऐकें मंगळमूर्ती । अनेकीं येक हे प्रतीति । येकीं भ्रांति अनेकपणाची ॥ ७३ ॥

शरीरावयवा यद्वद्विकाराश्च यथा मृदः । अद्वैतं द्वैतवद्भाति तथा स्थावरजंगमम् ॥ ९ ॥

अगा येकचि हें शरीर पाहीं । नानाअवयवाकार भासे सर्वही । परी येकासारिखा येक नाहीं । नामें तयांही तदनुसार ॥ ७४ ॥ नेत्र श्रोत्र आणि नासिक । हस्त चरण अंगुल्यादिक । अनेक आकार नामें देख । परी होय सकळीक देहचि येकु ॥ ७५ ॥ ऐसीं अनेकांचीं येकाकारें । भासत असतीं अतिनिर्धारें । कीं येकचि मृत्तिका घटमठाकारें । नानाप्रकारें येक भासत ॥ ७६ ॥ घटशरावादिअनेकपात्रें । घडुलें रांजणादि विचित्रें । तें मृत्तिकेविण नव्हती स्वतंत्रें । बहुता प्रकारें येक भासे ॥ ७७ ॥ तैसें हें स्थावरजंगमादिक । विश्व अद्वैतीं भासे अनेक । तें द्वैत नेणोनियां लोक । सत्यचि अनेक मानिती ॥ ७८ ॥ अद्वैतचि द्वैतासारिखें । भासे तैसेंचि अज्ञानी देखे । तेणेंचि भोगी जन्मदुःखें । पशुवेषें वर्त्ततु असे ॥ ७९ ॥ अगा श्वानसूकरादिपशुयाति । भिन्न परस्परें सृष्टि देखती । तैसीच जाण त्यांचीही गति । तरी नराकृति धिक् त्याची ॥ १८० ॥ नराकृति म्हणणें । आणि पशुज्ञानेंकरूनि वर्त्तणें । धिक् जिणें तें लाजिरवाणें । परी निवृत्ति मनें न धरिती ॥ ८१ ॥ असो काय बोलावे अवगुण । जन्मजन्मांतरीं तैसेचि जाण । स्वप्नींही सेविले नाहीं गुरुचरण । कैसें ज्ञान भासे त्यांसी ॥ ८२ ॥ असो ते भावने ऐसेचि धांवती । म्हणोनि असो त्यांची गति । दृष्टांत ऐकें लक्ष्मीपती । आत्मस्थिति बुझसी जेणें ॥८३॥

मणितोयघृतादर्शेष्वेकमप्याननं यथा । भात्यनेकमिवात्मापि तथा धीष्वनुबिंबितः ॥ १० ॥

अगा आत्मा येकुचि संतत । तो अनेक मानिती उपाधिगत । उपाधि वशें नाना भावीत । आइक दृष्टांत विबुद्धनाथा ॥ ८४ ॥ स्वच्छ मणि आणि उदक । घृत आणि आदर्श येक । या उपाधीचा ठाईं मुख । दिसे आणिक अज्ञानिप्रांसि ॥ ८५ ॥ विचारें पाहतां गा रघुपती । मणीच्या ठाईं भासे मुखव्यक्ति । तेंचि भासे पैं जळाप्रति । आदर्शीं स्फुर्त्ति तेंचि होये ॥ ८६ ॥ येकचि मुख उपाधिवशें । अनेकरूपें नेणत्या भासे । परी तें उपाधीऐसेंचि दिसे । अनारिसें भासेना कीं ॥८७॥ नीळ आरक्त मणीच्या ठायीं । नीळ आरक्तचि मुख पाहीं । घृतीं पीतादिवर्णीं कांहीं । उदकीं पाहीं उदकाऐसें ॥ ८८ ॥ दर्पणु जरी

१ नाहींसा झाला. २ द्वैताचें ठिकाणीं आरोप केलेलें. ३ रुपें. ४ समजशील. ५ खरा अर्थ. ६ हीं अलंकारांचीं नावें आहेत. ७ अलंकारांच्या. ८ मडक्याच्या अथवा घराच्या स्वरूपानें. ९ डेरे. १० चतुष्पाद प्राण्यासारखा. ११ मनुष्याचें स्वरूप.

मळिण असिला । तरी मुखीं मळिणाकारू भासला । उपाधिदोष प्रगटला । नाहीं भेद्ला बिंबासिपैं ॥ ८९ ॥ हें सर्वही जन जाणती । भासतां मुखीं मळिणस्थिति । तरी दर्पणु साहाणे लाविती । परी ना तोडिती मुख साहाणे ॥ १९० ॥ मुख तें मुखीं मुखाचिपैं । परी तें उपाधीसारिखें भासे । वक्रकुरूपादिक ठसे । आणिक दिसे अनेकपणें ॥९१॥ हें उपाधिकरूनि गा रघुपती । भासे मुखाची आकृति । जितुका उपाधि तितुकी व्यक्ति । जानकीपती जाण तूं ॥ ९२ ॥ तैसें बुद्धिआंत प्रतिबिंबतु । आत्मा येकाचि अनेक भासतु । जन तोचि मानूनि निश्चितार्थु । असे भ्रांतु ह्मणौनी ॥ ९३ ॥ बुद्धिभेदेंकरूनि अनेकपण । आत्मयासि आलें गा जाण । जैसें घटाचें अनेकपण । सूर्यासि पूर्ण आणितसे ॥ ९४ ॥ तैसें शुद्धासि मळिणपण । उपधिवशें आलें पूर्ण । स्वयें प्रकाशक विद्घन । नित्य निरंजन शुद्धबुद्ध ॥९५॥ तेंही दृष्टांतमुखें सांगेन । आइक श्रीरामा सावधान । करूनि येकाग्रमन । श्लोकार्थखूण जाण बापा ९६

धूलिधूमांबुदैर्यद्वन्मलिनीक्रियते नभः । परामृष्टस्तथैवात्मा विशुद्धः प्राकृतैर्गुणैः ॥ ११ ॥

अगा वाहाटुळिया धुळी । नभ धूंसर केलें रजमेळीं । शुद्धचि मळिण तिये काळीं । केलें धुळी आपणाऐसें॥९७॥जो गगनाकडे पाहों जाये । त्याचे नेत्रीं धूळिचि सामाये । एवं धूळिच गगन होये । नसता पाहें दोष आला॥९८॥कां धूम चढे गगनावरी । तेव्हां धूममयचि होय नभ जरी । तें शुद्धातेंचि मळिण करी । अपूर्व परी उपाधीची॥ ९९ ॥नातरी गगनभरि अंबुदें निबद्ध । तेणें मळिणें पावलें शुद्ध । गगनीं दाटलें बाध । शुद्धत्वीं विशुद्ध ऐसें भासे ॥ २०० ॥ नातरी वायु असे स्वयें शुद्ध । दुष्ट गंधादिकीं कीजे दुर्गंध । तैसा आत्मा शुद्धबुद्ध । गुणीं अशुद्ध ऐसा भासे॥१॥प्रकृतीचे तिन्हीगुण । सत्व रज तम हे जाण । येहीं स्वस्वकृत्यें कीजे मळिण । स्वतः जो निर्गुण गुणी कीजे॥२॥सत्वगुणें सात्विक ह्मणती । सात्विककर्त्ताभोक्ता ऐसी प्रतीति । रजसें पावे रजोवृत्ति । कर्तृत्वादिस्थिति गुणान्वयें ॥३॥ तामसगुणें तामस जाला । तामसपणातें स्वयें आला । एवं गुणाधीन ऐसा भासला । मळिण केला स्वकल्पना ॥ ४ ॥ अपाड गुणा आणि आत्मयासी । जैसें तमा आणि तरणीसी । पृथ्वी आणि गगनासी । चंद्रा राहूसि अंतर जैसें ॥ ५ ॥ दोनिलक्ष गांवें चंद्रमंडळ । राहु अर्वाक असे सबळ । पन्नाससहस्र त्याचें मंडळ । येकत्र मेळ तयां कैंचा ॥ ६ ॥ येके नक्षत्रीं वास दोहींसी । चंद्रमंडळाआड येणें राहुसी । यालागीं राहुग्रहण होय जगासी । राहु चंद्रसूर्यासि मळिण करी ॥ ७ ॥ अपाड असतांही मळिण भासे । राहुग्रस्त ह्मणती जन पिसे । आत्मागुणाधीन तैसें । माने ऐसे नेणतां तत्व ॥८॥ विचारीं गा रघुराया । अपाड गुणा आणि आत्मया । परी मळिण भासे नेणोनियां । विचारें तयां संगु कैंचा ॥ ९ ॥ आत्मा तो असंगी अनावृत । शुद्धबुद्ध नित्य मुक्त । अकर्त्ता अभोक्ता अनासक्त । नित्य सदोदीत निरंजन ॥ २१० ॥ ऐसा तो जरी मळिण भासे । हें तो प्रत्यक्ष जाण पिसें । तैसाचि चंचळ ऐसा दिसे । देह वशें तेंही आयिका ॥ ११ ॥

॥ संमतिश्लोक ॥ ॥ आद्यंतवति देहेऽसौ तथाभूत इवेक्षते । वीचिवत्यंभसि स्तंभो यथा भात्यचलश्चलः ॥

आदिअंत जयासि असे । जन्ममरण पावे जें सर्वस्वें । तें देहनामें बोलिजलें असे । नश्वर सर्वांशें क्षणिकत्व ॥ १२ ॥ ऐसिया नश्वर देहाचा ठाईं । एवंभूत आत्मा लक्षिती पाहीं । भाविती तेथें देहगुण सर्वही । चळणत्व देहीं तेंचि त्यासी ॥१३॥ देहविकारें विकारवंतु । देहचलनें असे चळतु । देहमरणें असे मरतु । देहत्वें जीतु ऐसेंचि ह्मणती ॥१४॥ जैसा जळामाजी स्तंभ असे । तो तरी अचळ सर्वांशें । परी वीचिसंगें चंचळ भासे । लोक पिसे साच मानिती ॥ १५ ॥ जैसा अभ्राचा वेगु चंद्रासी । प्रतिभासे अर्भकासी । तैसा देहधर्म आत्मयासी । कल्पिती भ्रमासि नेणोनियां ॥ १६ ॥ नाहीं देहेंद्रियासि तरी जडता । यावेनि संगें आत्मयासि तद्रूपता । अनात्मधर्म आत्मयाचे माथां । भाविती नेणतां ह्मणतां तुह्मी ॥१७॥ तरी देहेंद्रियें असंत न दिसती । तें तंव आत्मत्वेंचि दिसती । यालागीं यांसि आत्मा ह्मणती । असे प्रतीति सर्वां जनां ॥ १८ ॥ जरी असत्य आत्मव्यतिरिक्तें । आणि असती मिथ्याभूतें । तरी सत्य ऐसीं कां भासतें । हेंचि निरुतें सांगिजे ॥ १९ ॥ तरी आइक याचें उत्तर । जें कीं बोलिजेल सपरिकर । जेणें संदेहसागराचा पार । पैलतीर पाविजे ॥ २२ ॥ तरी सत्याचिया संगती । असत्यही सत्यवत भासती । सत्य रश्मीमृगांभप्रतीति । सत्यव्यक्ति दिसे त्याची ॥ २१ ॥ साच

१ 'शहाणें' असा पाठ. २ निराळेपणा. ३ दृष्टांत देऊन. ४ धुळीच्या रंगाचें. ५ मेघ. ६ आपापल्या कर्मांनीं. ७ काळोखास. ८ सूर्याला. ९ योजनें (४ कोस = योजन). १० अशा प्रकारचा. ११ लाटांबरोबर. १२ आत्म्याहून इतर. १३ सविस्तर.

शुक्तिकेचा ठाई । असत्य रजत भासे पाहीं । तें सत्यसंगें संत सर्वही । भासे देहीं देह त्याचें ॥ २२ ॥ यदर्थीं आइकें निश्चयें वचन । रघुनाथा परिसें सावधान । करूनियां येकाग्रमन । जेणें समाधान पावसी ॥ २३ ॥

अग्निसंगाद्यथा लोहमग्नित्वमुपगच्छति । आत्मसंगात्तथा गच्छत्यात्मतामिंद्रियादिकम् ॥ १२ ॥

जैसें अग्निसंगेंकरून । लोह अग्नित्व पावे जाण । जड अप्रकाश जें मळिण । तें दैदीप्यमान स्वयें होये ॥२४॥ तैसें देहेंद्रियादिजडजात । मळिण अप्रकाश मिथ्याभूत । आत्मसंगें करूनि यथार्थ आत्मता निभ्रांत पावती ॥ २५ ॥ अगा सत्याचा ठाईं जें भासे । तें असत्यही सत्यासारिखें दिसे । अधिष्ठान नेणोनि लोक पिसे । सत्य ऐसें त्यातें ह्मणती ॥२६॥ अधिष्ठानाचें होतां ज्ञान । तरी सर्वही भासमात्र दृश्य जाण । अधिष्ठान नेणतां भिन्न भिन्न । भासे पूर्ण असुरांतका ॥ २७ ॥ अधिष्ठानाचिसारिखें । अध्यस्त भासे तेणेंचि लेखें । यालागीं त्यासिच सत्यत्वें देखें । लोक निकें तेंचि मानिती ॥ २८ ॥ शुक्तीचां ठाईं रजत अध्यस्त । तें सत्यत्वेंचि लोक मानीत । मा नेणतयाचिसाठीं भ्रांत । नाहींच करीत सत्य वस्तु ॥ २९ ॥ तैसा आत्मा तो नित्य अधिष्ठान । तेथ देहेंद्रियादि मिथ्या भान । तें चैतन्यसंगें भासती चेतन । मुख्यत्वें पूर्ण तेंचि मानिती ॥ २३० ॥ देहेंद्रियादि सत्य मानितां । आत्मस्वरूप कैंचें भ्रांता । यालागीं नेणती तत्वतां । स्वयें आत्मता आपुली ॥ ३१ ॥ तंव श्रीराम ह्मणती जी गुरुमूर्ती । जे देहेंद्रियादि आत्मा मानिती । ते ज्ञान जालेया आत्मा देखती । कोण्हे रिती सांगिजे ॥३२॥ तंव वसिष्ठ ह्मणती गा रघुनाथा । सांगों यथार्थाचीही व्यवस्था । प्रत्यक्ष दृश्य भासत असतां । आत्मा तत्वतां कैसा जाणिजे ॥ ३३ ॥ अगा दृश्य भासे भरोवरी । आत्मा निर्धारिजे तेणेंकरीं । हे थोर पाहाती कुसरी । रावणारी सांगेन ॥ ३४ ॥ जैशी दृश्य शाखा साधिलिया । सूक्ष्म शशि दिसतसे शाखेवरूनियां । तैसें देहेंद्रियां करूनियां । पाहें आत्मया सूक्ष्म दृष्टी ॥३५॥ आणीकही दृष्टांत सांगेन । आइकें येकाग्र करूनियां मन । जेणें होईल समाधान । तेंचि निरूपण परियेसीं ॥ ३६ ॥

अदृश्यो दृश्यते राहुर्गृहीतेन यथेंदुना । तथांनुभवमात्रात्मा दृश्येनात्मावलोक्यते ॥ १३ ॥

राहू सर्वदा अदृश्य सर्वांसीं । कोण्ही कदा न देखे त्यासी । परी दृश्य चंद्रें त्या अदृश्यासी । सर्वस्वेंसी देखती ॥ ३७ ॥ राहू सर्वदा असे गगनीं । परी त्यातें कोण्ही कदा न देखती नयनीं । चंद्रमंडळासमान आल्या ग्रहणीं । सर्वही जनीं देखिजे ॥ ३८ ॥ ग्रहणीं राहु सर्वांसि दिसे । ग्रहण सरल्या कोण्हा न दिसे । दृश्य चंद्र तो अदृश्य प्रकाशे । नवल ऐसें भरताग्रजा ॥ ३९ ॥ यालागीं न दिसे तेंहीं राहुमंडळ । दृश्य चंद्रें होय प्रत्यक्ष सकळ । तैसें अनुभवमात्रेंच केवळ । आत्मा निर्मळ प्रत्यक्ष जाला ॥ २४० ॥ तो प्रत्यक्ष असतांही जनासी । भ्रमें अप्रत्यक्ष होय सर्वांसी । तेंचि दृश्य देहेंद्रियांसी । प्रत्यक्ष बुद्धीसि करिताती ॥ ४१ ॥ देहेंद्रियादिदृश्य समस्त । हे तंव जड अप्रकाशमंत । ययासि चळण ज्ञातृत्व । आणी अस्तित्व सत्ता जे कीं ॥ ४२ ॥ जडासि प्रकाश जऱ्ही घडे । तऱ्ही घटपटांसि प्रकाश कां न घडे । यालागीं दृश्याचा प्रकाशकु पुढें । जाण निवाडें परमात्मा ॥ ४३ ॥ आणि देहेंद्रियांचें अस्तित्व । आत्मेनविण न घडे वास्तव । सत्यावेगळें असत्य । नव्हे तें सत्य कदाकाळीं ॥ ४४ ॥ आणि जडासि पाषाणाचेपरी । चळण नव्हे अवसरीं । जडासि चळण आत्मेनकरीं । होय निर्धारीं जाण तूं ॥ ४५ ॥ येणें दृश्यप्रकारें करून । आत्मा साधिजे चिदेकघन । सत्ताप्रकाशक सुखपूर्ण । तेणेंचि वर्त्तन सर्व दृश्याचें ॥ ४६ ॥ अविचारें सर्व नेणणें असे । विचारें जैसें तैसें भासे । ह्मणौनि आत्मा विचारें प्रकाशे । जाणिजेत असे बुद्धजनीं ॥ ४७ ॥ शुक्तिकेचा ठायीं रजत दिसे । तें अदृश्य परी प्रत्यक्ष भासे । शुक्तिका कोण्हासिही न दिसे । सत्यचि ऐसें रजत मानिती ॥ ४८ ॥ त्याचि दृश्य रजतेंकरून । शुक्तिका फावे प्रत्यक्ष जाण । त्या रजता लावितां चंदन सांगें अवसानें कोठें त्याचें ॥ ४९ ॥ तें चंदन काय रजतासि लागे । कीं शुक्तिका शोभे चंदनसंगें । दृश्येंचि अदृश्य फावों लागे । नवल सांगों काय तुज ॥ २५० ॥ तैसें देहादिकदृश्यजात । याचा निर्धारु कीजे अंव निश्चित । तंव आत्माचि होये हस्तगत । मिथ्याभूत देहादिभ्रमु ॥ ५१ ॥ ययालागीं गा रघुनाथा । दृश्येंसि द्रष्टा आत्मा ये हाता । पूर्ण विचारेंचि तत्वतां । नाहीं अन्यथा यया बोला

---

१ देह, इंद्रियें वगैरे सर्व जड पदार्थ. २ स्थान. ३ हे राक्षसनाशका रामा! ४ यांची देखील. ५ कौशल्य. ६ समोर न दिसणारा. ७ घट (घागर) व पट (वस्त्र) यांस. ८ आत्मामुळें. ९ परिमाण. १० प्राप्त. ११ खोटा असलेला.

॥ ५२ ॥ यया उपपत्ति सांगों किती । इतुकेनिच जाणावें विश्वमूर्त्ती । विचारीं घालितां चित्तवृत्ति । आत्मसंवित्ति स्वयें फावे ॥५३॥ तुझिया प्रश्नाचें उत्तर । तें सांगितलें सविस्तर । परिसें निरूपण सुंदर । जेणें निर्धार दृढ होये ॥ ५४ ॥ तऱ्ही ऐसें असतांही गुरुराया । लोक नेणें कां पां आत्मया । देहादि आत्मत्वें घेती स्वामिया । आत्मतत्व नेणोनियां किमर्थ हें ॥ ५५ ॥ तंव वसिष्ठ ह्मणती गा रघुपती । सांगेन याचीही निरुक्ति । परस्पराध्यासें तेंचि होती । लोक नेणती तयास्तव ॥ ५६ ॥ जडाचिया संगती । अजडासि जडत्वप्राप्ति । जडासि अजडप्रतीति । ऐसी भ्रांति भ्रांतासि पैं ॥ ५७ ॥ ययास्तव आत्मयासि नेणती । आत्मा जडसंगें जड मानिती । तेंचि सांगेन श्लोकसंगति । विश्वमूर्त्ती आयिक तूं ५८

आत्मनो जडसंगात्स्यादनात्मत्वं जडस्य तु । स्यादात्मसंगादात्मत्वं जलाग्न्योःसंगवन्मिथः ॥ १४ ॥

आत्मयासि जडसंगती । अनात्मत्व आलें गा रघुपती । आणि जडासि अजड संगती । आत्मप्राप्ति आली दिसे ॥ ५९ ॥ जड जें कीं अंतःकरण । त्यामाजी बिंबलें चैतन्य । तेणेंचि आलें त्या जडपण । सामग्री पूर्ण तैसीच ॥ २६० ॥ बुद्धि अहंकार इत्यादिक । स्थूळलिंगदेह सम्यक । आत्मयासि हें लागलीं देख । जडत्वादिक तेणें आलें ॥ ६१ ॥ नेणोनि आत्मानात्मविभाग । देहचि आत्मयासी ह्मणती सांग । तैसेंचि बुद्धिमंतांतें चांग । आत्मांग आरोपिती ॥६२॥ येणें आत्मयासि जडपण । जडसंगेंचि जालें जाण । तैसेंचि आत्मसंगती आत्मपण । देहादिकां पूर्ण आलें दिसे ॥ ६३ ॥ देहेंद्रियांतें प्रकाशिता । ते नेणोनियां आत्मसत्ता । देहेंद्रियांतेंचि तत्वतां । आत्मा सर्वथा ह्मणताती ॥ ६४ ॥ येक प्राणातेंचि आत्मा ह्मणती । येक लिंगदेहीं[१] आत्मप्रतीति । येक स्थूळदेहातेंचि ह्मणती । येक भाविती इंद्रियांसी ॥ ६५ ॥ येकासि मन ये आत्मप्रत्यया । येकासि बुद्धि आत्मा गा रघुराया । ऐसें जडातें आत्मा ह्मणोनियां । राहिले वायां नेणपणें ॥ ६६ ॥ परस्परें याच्या संगतीं । जडीं होय आत्मप्रतीति । आणि आत्मयासि जडसंगती । जड बद्ध ह्मणती नेणोनियां ॥ ६७ ॥ जैसें प्रकाशमंता अग्नीसी । जड संगें शीतलता आली त्यासी । हातीं धरिलियासी तयासी । उष्मा सर्वांशी असेचिना ॥ ६८ ॥ तैसेंचि अग्नीचेनि संगें । जळही उष्ण हों लागे । तें अग्निच होय सर्वांगें । जाळी वेगें दुसरियासी ॥ ६९ ॥ दोन्ही महद्भूतें तरी होती । परी अग्नि तो तैजसु गा रघुपती । जळ तें असे जडस्थिति । तैजसगति अजड जाण ॥ २७० ॥ यांसि येरयेरा संगती । परस्परें जडाजड पावती । परी लोक तेंचि घेऊनि बैसती । नेणें सर्वार्थी म्हणोनियां ॥ ७१ ॥

असत्यजडचिध्वंशनयनाच्चिद्रपुर्जडम् । महाजलगतो वह्निर्यथा रूपं स्वमुज्झति ॥ १५ ॥

देहादिइंद्रियेंअहंकारमन । असत्य जडें दृश्य जाण । यांचेनि संगें चिद्वपुचैतन्य । स्वयें जडपण पावलें दिसे ॥ ७२ ॥ जडसंगें जडचि भासे । असत्यसंगें असत्य दिसे । दृश्यसंगें दृश्याऐसें संगदोषें भासे तद्रूप ॥७३॥ अगा शुद्ध वस्तु जे कीं असे । तें इतरसंगें तद्रूपचि भासे । निजस्वरूप टाकिलें ऐसें दिसे । जड ऐसें भासत ॥ ७४ ॥ शुद्ध स्फटिक शुभ्रवर्ण । आरक्त कुसुमीं आरक्त जाण । कज्जलसंगेंवर्ण कृष्ण । निळें नीळपण दाखवी ॥७५॥ परी आपुली शुभ्रता टाकून । उपाधिसंगें नाना वर्ण । तैसा आत्मा शुद्ध ज्ञानघन । जडसंगें जाण जडचि भासे ॥७६॥ जैसा वैश्वानर प्रकाशमंत । बहु जलें स्वरूप टाकित । महान्हृदीं[२] टाकिल्या उज्झितं[३] । टाकी निश्चित स्वस्वरूप ॥७७॥ जड जळाचिये संगति । अग्नि आपुलें रूप टाकिती । तैसा आत्मा देहेंद्रियसंगती । तद्रूपगति पावलासे ॥ ७८ ॥ नातरी जळ स्वच्छ गोड असे । तें उंसीं मधुरपण उल्हासे । क्षारीं क्षारता पावतसे । तीक्ष्णसंगें वसे तिक्त[४] होउनी ॥ ७९ ॥ कटुसंगें कडुचि होत । आम्लीं आम्लपण दावित । तैसा आत्मा उपाधिगत । असे भासत देहादिरूपें ॥ २८० ॥ तो तैसाचि नेणोनि भाविती । शुद्धीं जडाची होय प्रतिती । जड रूपाचि मानूनि राहाती । नाहींच करिती आत्मयासी ॥८१॥ ऐसें जडपण मिश्रित । आत्मा होवोनियां निश्चित । तो प्रयत्नें निवडूनि घेइजेत । सुअजडप्राप्त ऐसें होये ॥८२॥ स्वयें आत्मा जडसंगती । जडचि होऊनि ठेला गा रघुपती । तो प्रयत्नें घेइजे गा सुमती । विवेकसंपत्तीकरूनियां ॥ ८३ ॥ आणि या उपाधीचा ठाईं । आत्मा निश्चित असे पाहीं । तो प्रयत्नकरूनि साधूनि घेई । ऐकें येकाग्रही दृष्टांतमुखें ॥ ८४ ॥

इक्षौ गुडस्तिले तैलं काष्ठे वह्निर्दृषद्ययः । धेनावाज्यं वपुष्यात्मा लभ्यते चैव यत्नतः ॥ १६ ॥

अगा जडीं अजडाची प्राप्ति । अतिप्रयत्नें होय सुमती । तें दृष्टांतमुखें तुजप्रति । सांगेन

---

१ आत्याचें ज्ञान. २ स्पष्ट अर्थ. 'निर्गुति' असा पाठ. ३ सूक्ष्मदेहांत. ४ आपोआप. ५ जाणत नाहींत. ६ मोठ्या डोहांत. ७ टाकलेला. ८ तिखट.

निगुती ते ऐक ॥ ८५ ॥ जैसा इक्षुदंडाचे ठायीं । प्रयत्नें गूळ पाविजे पाहीं । कां तीळ गाळिलिया तैलही । प्राप्त पाहीं होतसे ॥ ८६ ॥ तैसेंचि काष्ठाच्या ठायीं । अग्नि स्वतःसिद्ध असे पाहीं । तो मथन केलिया सर्वही । प्राप्त ते ठायीं रघुनाथा ॥ ८७ ॥ कां दृषद् जो कां पाषाण । त्याचें करूनियां चूर्ण । अग्निपाकें लोह संपूर्ण । प्राप्त जाण प्रयत्नें जैसें ॥ ८८ ॥ कां धेनूचा ठाईं आज्य असे । तें दोहनमथनादिकीं प्रत्यक्ष दिसे । तैसा आत्मा सिद्ध देहीं वसे । प्राप्त सर्वांशें ज्ञानयत्नें ॥ ८९ ॥ चकारें एवकारें निर्धारिलें । प्रयत्नेंविण अलभ्य जाणविलें । असे जैसें तैसें संचलें । प्रयत्नें भलें प्राप्तसिद्ध ॥९०॥ येकैक काय सांगों तुजप्रति । देहीं आत्मयाची होय प्रतीति । पदार्थमात्रीं गा महामती । आत्मप्राप्ति स्वतःसिद्ध ॥ ९१ ॥ सर्व व्यापकपणें आत्माचि असे । पदार्थाकार भ्रमें भासे । तेंचि विचारितां सर्वांशें । आत्माचि असे सर्वत्र येकु ॥ ९२ ॥ तेंचि दृष्टांतेंकरूनि सांगेन । ऐक रघुनाथा सावधान । जेणें बुझसी गा संपूर्ण । सर्वत्र खूण आत्मयाची ॥ ९३ ॥

स्फटिकात्मनि नीरध्रे स्थितं खं वीक्ष्यते यथा । तथा सर्वपदार्थेषु चिद्रूपः परमेश्वरः ॥ १७ ॥

जैसा निरंध्रेंही जो स्फटिकमणि । त्यामाजी आकाश असे व्यापुनी । आकाश नसतां छिद्रपणीं । न पावे घणीं भेदिलियाही ॥ ९४ ॥ सच्छिद्र व्योमधर्म असे । नमेंविण सच्छिद्र कोण्ही नसे । ह्मणौनि आकाश सर्वत्र वसे । त्याविण नसे रिता ठावो ॥ ९५ ॥ ह्मणौनि स्फटिकाच्या पोटीं । आकाश देखिजे लोकीं दृष्टी । तैसी सर्व पदार्थांच्या पोटीं । होय भेटी आत्मयाची ॥ ९६ ॥ अगा चिद्रूप जो कीं परमेश्वर । तो पदार्थमात्रीं वर्ते निरंतर । हें विचारें जाणिजे दृढतर । अविचारें साचार नेणती ॥ ९७ ॥ नाहो ज्ञानस्वरूप आत्मा असे । तरी पदार्थमात्रीं कां चित्कळा नसे । तरु पाषाणादिकीं न प्रकाशे । ज्ञान कां नसे सर्वत्र जडीं ॥ ९८ ॥ तरी ऐक याचें उत्तर । शुद्धीं प्रकाश होतसे फार । जड मळिण तो विचार । नाहीं प्रकार प्रकाशाचा ॥ ९९ ॥

दर्पणे बिंबितो ह्यर्कः प्रकाशं कुरुते यथा ॥ तथा प्रकाशयत्यात्मा स्वच्छधीष्वनुबिंबितः ॥ १८ ॥

जैसा सूर्य सर्वां पदार्थांतें प्रकाशी । परी सूर्यकांतीं बुद्धीसी । जडमळिणीं पाषाणीं तैसी । उपलब्धि ऐसी न पाविजे ॥ ३०० ॥ कां चंद्रप्रकाशें सोमकांत । चिरें पाहे होय द्रवीभूत । तैसें मळिण पाषाणजात । असती वर्तत अतिकाठिण्यें ॥ १ ॥ तैसें सर्व इंद्रियांपरिस । अंतःकरणबुद्धि ते शुद्धांश । तेथें स्वप्रकाशें प्रकाशे परेश । घटपटादि वोस बुद्धिहीन ॥ २ ॥ घट पट आणि पाषाण । तेथें नाहीं बुद्धिअंतःकरण । ह्मणौनि अतिजड ते मळिण । ज्ञानप्रकाशन तेथ कैचें ॥ ३ ॥ अगा अंगणीं दर्पण ठेविला । रविकिरणें प्रकाशिलें तयाला । तोही शुद्धपणें आणिकाला । गृहांतिल्यांला प्रकाशी ॥ ४ ॥ तेंचि खापर अथवा पाषाण । रविसन्मुख ठेविलया कोण गुण । तैसा बुद्धीं प्रकाशे आत्मा पूर्ण । सर्वत्र असणें शुद्धाशुद्धीं ॥ ५ ॥ परी शुद्धाअशुद्धासारिखें । प्रकाश भासे उपाधिवशें । येऱ्हवीं तो समसमान असे । न्यून नसे कोण्हे अर्थी ॥ ६ ॥ परी आत्मा अंतरींच प्रकाशतु । ऐसा तूं धरूं नको हेतु । असे अंतर्बाह्यगतु । सांगेन दृष्टांतु तो ऐक पां ॥ ७ ॥

बहिरंतः स्फुरज्जोतीरत्नकुंभप्रदीपवत् ॥ स्वप्रकाशात्तथैवात्मा स्वच्छधीष्वनुबिंबितः ॥ १९ ॥

रत्नाचिया कुंभाभीतरी । दीप ठेविला अंतरीं । तो अंतर्बाह्य प्रकाश करी । ज्योति सर्वांपरी स्फुरतसे ॥ ८ ॥ रत्नकुंभाचिया स्वच्छता । अंतर्बाह्य सर्व प्रकाशता । तैसा स्वच्छ बुद्धीमाजी बिंबतां । प्रकाशी सर्वथा परमात्मा ॥ ९ ॥ बुद्धीच्याही अंतरीं । आत्मा प्रकाशे स्वप्रकाशकरीं । ह्मणौनि बाह्यअभ्यंतरीं । ज्ञानेंकरीं प्रकाशतु ॥ ३१० ॥ एवं आत्म्यावेगळें कांहीं । बाह्याभ्यंतर दुजें नाहीं । सर्वत्र येकला तो पाहीं । दुसरें नाहीं तयाविण ॥ ११ ॥ अहो विश्व हें प्रत्यक्ष दिसतां । येकु आत्माचि कैसा ह्मणतां । विचारूनि सांगा जी महंता । हें तंव चित्ता आन वाटे ॥ १२ ॥ यदर्थी आइक उत्तर । सांगों हाही प्रकार । विश्व आभासमात्र गोचर । नव्हे साचार वस्तुबुद्ध्या ॥ १३ ॥

यत्र स्थितेयं विश्वश्रीः प्रतिभामात्ररूपिणी ॥ रज्जौ भुजंगवद्भाति स्वयमात्मा सदोदितः ॥ २० ॥

जें कीं सर्वत्र येकचि प्रकाशित । जें कीं सच्चिदानंद अपरिमित । त्याच्या ठायीं विश्व भासत । जाण तें कल्पित रघुराया ॥ १४ ॥ प्रतिभामात्रचि रूप जगाचें । परी वास्तव तें परब्रह्माचें । रविरश्मीकरीं भास जळाचे । कां कोल्हेरीचे असिवार ॥ १५ ॥ नाना रज्जुचा ठाईं भासु । भासे लटिकाची

---

१ श्लोकांतील 'च' आणि 'एव' (चैव) या पदांनीं. २ भोकें नसलेला. ३ आकाशाचा गुण. ४ प्राप्ति. ५ आळ्यांत, ६ आपल्याच प्रकाशामुळें. ७ इतर, चमत्कारिक. ८ लांकडाचे; खेळांतील. ९ घोडेस्वार.

आभासु । वास्तव विचारितां शुद्धांशु । सावकाश रज्जुचि येकी ॥ १६ ॥ नाना गगनीं जैसी निळिमा । तेणें नीळत्वाच गमे व्योमा । ते भासमात्र गा सुरोत्तमा । नभंगरिमा जैसी तैसा ॥ १७ ॥ तैसें भ्रमें-करूनि विबुद्धनाथा । ब्रह्मीं विश्वाची आभासता । आत्माची देहेंद्रियां भाता ॥ भासे अन्यथा भासु जाण ॥ १८ ॥ तेंचि तें आत्मस्वरूप जाण । जें कीं देहेंद्रियांहूनि विलक्षण । वरी भासे तो भास पूर्ण । जाण हे खूण सर्वत्र ॥ १९ ॥ ते सदोदितशब्दें परिपूर्ण । आत्माची जाण चैतन्यघन । निद्रितासि जसें कां स्वप्न । देहादिभान तैसें भासे ॥ ३२० ॥ तैसें आत्मयाचां ठाईं । देहेंद्रियादिभास पाहीं । तें ज्ञानें विचारितां सर्वही । आत्माची पाहीं सदोदित ॥ २१ ॥ पेसा आत्मा तो किम् लक्षण । तेंहीं तुज सांगों पूर्ण । येकें येकाग्र करूनि मन । समाधान जेणें होये ॥ २२ ॥ तें सार्धसप्तश्लोकींकरून । सांगों आत्मा याचें लक्षण । मग पूर्ण तेंचि विवरण । श्रोतां संपूर्ण परिसिजे॥ २३ ॥ अपरोक्ष जाणतां आत्म-लक्षण । तद्रूपें राहातां संपूर्ण जाण । वरितसे गा तयास लागून । तेही खूण सांगों मग ॥ २४ ॥ प्रस्तुत आत्मा तो किम लक्षण । सांगों देइजे अवधान । आयिकतांचि समाधान । आनंद पूर्ण कोंदतसे ॥ २५ ॥

आद्यंतरहितः सत्यश्चिद्रूपो निर्विकल्पकः । आत्मा संपूरिताकाशो जीवस्याद्यः परात्परः ॥ २१ ॥

जया आत्मयासि पाहीं । आदि अंत मध्य नाहीं । तो अनादिभूत सर्व देहीं । आधिकोई कोण त्याची ॥ २६ ॥ तयासि नाहीं कार्य लेख । यालागीं आदि नाहीं देख । सर्वां कारणांचें कार्य अशेख । नाहीं अनेक जिये ठायीं ॥ २७ ॥ जे वस्तु उपजलीच नाहीं । त्याची कोण पां माय कायी । जनकाभावें आदि नाहीं । अनादि पाहीं सर्वदा जें ॥ २८ ॥ आदि नसतां नाहीं मध्य । मध्याभावें अंत असाध्य । उत्पत्ति हीना कैंचें बाध्य । सर्व साध्य आदिअंतां ॥ २९ ॥ वंध्येची कन्या तरुणांगी । गगनाच्यामध्यें कोण विभागी । ते जैसी पाहे सवेगीं । नित्य निःसंगी सर्वज्ञ जें ॥ ३३० ॥ यालागीं मध्यनाहीं जयासी । आदिविण अंत कोठें कल्पिसी । ह्मणौनि आद्यंतहीन परियेसीं । सत्य सर्वांशीं येणें होये ॥ ३१ ॥ अगा जयासि आदि असे । तें सर्वथा काळांतरीं नासे । लोकांतही असे पेसें । उपजलें नाशतसे सर्वथा ॥ ३२ ॥ यदर्थीं भगवंत आपण । गीतेसि बोलिले श्रीकृष्ण । तेंचि आइक संमति-वचन । समाधान जेणें होय ॥ ३३ ॥

संमतिश्लोक ॥ जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च । तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि ।

जें उपजे नाशे गा रघुपती । तें असत्य जाण सर्वार्थीं । आद्यंतहीन जें विश्वमूर्ती । सत्य त्रिज-गतीं तें जाण ॥ ३४ ॥ यालागीं सत्य तें जाणिजे । सत्य तें चिद्रूप सहजें । असत्य तें जड ह्मणिजे दृश्यव्याजें भासत ॥ ३५ ॥ ब्रह्म तें सर्वांचें साक्षी जाण । ह्मणऊन सत्यरूप ज्ञानघन । संकल्पविकल्प विहीन । निर्विकार पूर्ण ह्मणौनियां ॥ ३६ ॥ जें जीवात्मयाचेंही आदिभूत । तें आकाश व्यापूनि संतत तेंचि परब्रह्म सदोदीत । जाण निश्चित तमालश्यामा ॥ ३७ ॥ पर जें कीं ब्रह्मादिक । त्याहून पर जें येकायेक । नातरी परशब्दें माया सम्यक् । तत्साक्षी देख परात्पर ॥ ३८ ॥ आणीक लक्षण रघुपती । आइकावीं एकाग्रमति । जेणें बाणे आत्मस्थिति । श्रवणसंपत्ति जालिया ॥ ३९ ॥

आत्मा विशुद्धश्चैतन्यस्वरूपः शाश्वतो विभुः । निर्विकारः स्वयंजोतिःस्वभावोऽर्कप्रकाशवत् ॥ २२ ॥

व्यापकपणें आत्मा बोलिजे । हें पूर्वींही बोलिलें श्लोकव्याजें ॥ व्यापक तें अतिशुद्ध जाणिजे । तेथ नेणिजे अज्ञानपंकु ॥३४०॥ जेथ अज्ञान निःशेष नाहीं । तोचि शुद्ध आत्मा पाहीं । अथवा गुणद्वय-विहीनही । शुद्ध निश्चयीं आत्मरूप ॥ ४१ ॥ नानावृत्तींचें उपशमन । मी पूर्ण हेंही अनुसंधान । सरे तेंचि विशुद्ध खूण । निश्चयें जाण रघुनाथा ॥ ४२ ॥ जेथ निःशेष जडाचें निवर्तन । तेंचि तें अतिशुद्ध जाण । शुद्ध तेंचि चैतन्यघन । निखळ ज्ञानस्वरूपचि ॥ ४३ ॥ जड चितुकें दृश्यजात । अजड तें ज्ञानघन निश्चित । तेंचि चैतन्यस्वरूप बोलिजेत । अबाधित काळत्रयीं ॥४४॥ जें ज्ञान बाधे काळेंकरुनी । तेंचि वृत्तिरूप भरंवसेनी । हें अबाधित अखंडपणी । स्वरूपपणीं प्रकाशत ॥४५॥ अथवा चैतन्य आणि स्वरूप । दोनी पदें केलिया एवंरूप । अर्थ होतसे पैं तद्रूप । चैतन्यरूप तें ज्ञान ॥ ४६ ॥ जें स्वरूपरू-पेंचि ज्ञान । तें चैतन्यरूपव्याख्यान । आपुल्या स्वरूपींचें अवस्थान । स्वस्वरूपपण तया नाम ॥४७॥

---

१आकाशांत. २ आकाशाच्या मोठेपणा. ३ प्रकाशक. ४ साडे सात श्लोकांनीं. ५ श्रेष्ठपण. ६ दिसणाऱ्या पदार्थांच्या मिषानें. ७ शांत होणें. ८ राहणें.

ज्ञानस्वरूप अजड असे। तेंचि शाश्वत जाण सर्वांशें । जड तितुकें नाशत असे। अशाश्वत ऐसें नाम त्याचें ॥ ४८ ॥ अजड आणि स्वप्रकाशपण। आत्मयासी शाश्वत बोलणें। काळत्रयीं अबाधित पूर्ण। शाश्वतपण आत्मयासी ॥ ४९ ॥ जो कीं शाश्वत निरंतर। तोचि जाण विभु सर्वेश्वर। अशाश्वत तें नश्वर। नियंतृत्व थोर कैचें त्यासी ॥ ३५० ॥ पुत्राहूनि पिता आदि असे। ह्मणौनि नियंतृत्व तेथ वसे। यालागीं सर्वांहूनि शाश्वत असे। तेथ सर्वांशें विभुत्व जाण ॥ ५१ ॥ आणि जे कीं विकारवंत वस्तु असे। ते तंव नाशिवंत सर्वांशें। अंशमंत तें विकारी वसे। आन नसे यया बोला ॥ ५२ ॥ आत्मा निरंश सर्वांपरी। निरंश तें सहज अविकारी । सांश तें परिणमे नानापरी। ह्मणौनि निर्विकारी निरंतर ॥ ५३ ॥ पयादिक सांश असे। ह्मणौनि दध्याकारें परिणमतसे । विकारनामें अन्य रूपांशें। विकार ऐसें या नाम ॥ ५४ ॥ अंशशब्दें परिणामवादी। सूक्ष्मबिंदुप्रमाणअवधि। ज्यासि असे तें परिणामी सर्वादि। जळपृथ्व्यादि सावयव जें ॥५५॥ तैसा आत्मा नव्हे अंशमंतु। अंशाभावें नव्हे परिणामवंतु। यालागीं निर्विकार बोलिजेतु। सदोदीतु निरंशें ॥५६॥ विकारवंत आकारा येईल। आकारु तो सर्वथा नाशील। या लागीं विकारी ह्मणाल। तो नित्य निर्मळ अविकारी ॥ ५७ ॥ नातरी कोण्ही परिणामवादी बोलती। आत्मपरिणाम विश्व ह्मणती। आणि विश्वाची उत्पत्तिस्थिति। करी स्वशक्ती ऐसा प्रवादु ॥५८॥ तरी जया सद्गुरुकृपा नाहीं पूर्ण। तया नाहीं आत्मयाचें अपरोक्ष ज्ञान। त्याचे हे जल्पवाद जाण। नव्हे खूण अनुभवाची ॥५९॥ दुसरियासि जिंकावयाकारणें। नाना परिच्या युक्ति बोलणें। तया जल्प ऐसें ह्मणणें। निश्चय करणें शास्त्रें ऐसा ॥३६०॥ जिगषिमेकथाजल्प ऐसें। शास्त्रींही बोलिजेसे। ह्मणौनि बोलिलें वायिसें। सिद्धांतऐसें नव्हेती पै.॥६१॥ तरी आइक आतां गा रघुपती। आत्मा अविकारी जाण सर्वार्थीं। याचा परिणाम विश्व ह्मणती। ते तंव नेणती शास्त्रानुभव ॥६२॥ शास्त्रश्रवण अनुभव जयासी। ते जाणती अपरिणामी निरंशी। विश्व हें अभ्रजाळ जैसें आकाशीं। नाथिलियासि कोणें नेमिलें ॥ ६३ ॥ अंबरीं निळिमा कैंची तेथ । शुद्ध गगनासि निळें मानित। तें भ्रांतीवांचूनि ईषत्। नाहीं निश्चित रघुनाथा ॥६४॥ शुक्तिकेचां ठाईं रजत। तें कोणें नेमिलें संतत। कीं शुक्तिका परिणमली तेथ। काय अर्थ बोलावा पैं ॥ ६५ ॥ शुक्तिका जैसी तैसीच असे। तेथ उगेंचि रजत भासतसे। तिसी बल नाहीं कर्तव्य न दिसे। कोणा मिसें बोलावें पैं ॥६६॥ तरी शुक्तिचेनि अज्ञानें। रजताकार शुक्तिकेसि होणें। नसतेंचि रजत भासणें। जाण ये खुणे भ्रमाचिये ॥ ६७ ॥ तेंचि शुक्तिकेचें ज्ञान जालिया। तें प्रत्यक्ष अनुभविलिया। कैंचें रजत कैंची माया। जाण रघुराया येणें न्यायें ॥ ६८ ॥ तैसेंचि रज्जूच्या ठायीं सर्पबुद्धी। हे तंव अज्ञानाची समृद्धि। निद्रेमाजी स्वप्नबुद्धी। जाण सुबुद्धी भ्रमुचि तो ॥ ६९ ॥ तैसें निर्विकार वस्तूच्या ठायीं। जगदाभास भासे पाहीं। तें अज्ञानावांचून दुजें नाहीं। ज्ञानें सर्वही मिथ्याभूत ॥ ३७० ॥ ह्मणौनियां आत्मा निर्विकार। कोण्हे काळीं देशीं नाहीं विकार। स्वप्रकाश निरंतर। प्रभाकर सप्रभ जैसा ॥ ७१ ॥ रात्रिदिवस दोनी नेणोनी। स्वप्रकाशें प्रकाशे जैसा तरणि। तैसा आत्मा अज्ञानादि नेणोनि। स्वप्रकाशेंकरूनि शोभतु ॥ ७२ ॥ आत्मयासि दृष्टांतु देणें। हें तंव न घडे सर्वस्वपणें। तैसेंचि नाहीं ह्मणौनि बोलणें। दृष्टांत देणें अलौकिकु ॥ ७३ ॥ अथवा स्वयं शब्दें स्वतः सिद्ध। आत्मस्वरुप अगाधबोध । ज्योतिप्रकाशें निर्बाध। अति शुद्ध शुद्धाहुनी ॥ ७४ ॥ अहो पराचेनि जें प्रकाशें। त्यासि बोलिजे परप्रकाश ऐसें। परप्रकाश तें जड दृश्य असे। जड तें सर्वांशें मिथ्याभूत ॥ ७५ ॥ तैसें नव्हे आत्मस्वरूप। तें स्वप्रकाशैकचि द्रूप। स्वयंज्योति अमूप। जाण निष्कंप अचळपणें ॥७६॥ यालागीं आत्मा विशुद्ध चैतन्यघन। स्वस्वरूप नित्य निरंजन। सत्य समर्थ नियंता पूर्ण। आणि अगुण निर्विकारत्वें ॥७७॥ स्वतःसिद्ध स्वयंज्योति। अनादि आइता प्रकाशमूर्ति। अचळ अढळ स्वयंज्ञप्ति। आइक सुमती चिन्ह आणीक ॥ ७८ ॥

आत्मानुभवमात्रात्मा सर्वगः सर्वसंश्रयः। प्रकाशानंदचैतन्याव्यतिरिक्तोऽनलोष्णवत् ॥ २३ ॥

अनुभवमात्रचि आत्मा असे। परी बोलिजे घेइजे ऐसा नसे । इंद्रियग्राह्य नव्हे सर्वांशें। दृश्य नसे जिये ठाईं ॥ ७९ ॥ दृश्य जेथें अणुमात्र न स्फुरे। वृत्तिमात्रज्ञानस्वरूपीं मुरे । ग्राह्यग्राहक जेथें वोसरे। त्रिपुटी सरे ज्ञेयज्ञानाची ॥ ३८० ॥ अज्ञानवृत्ति निःशेषही। मावळूनि जाती सर्वही। वस्तूवेगळें आन कांहीं । नसे जे ठायीं तो अनुभव जाण ॥ ८१ ॥ अथवा जें कीं स्वरूपज्ञान। तयासि

१ सत्ता चालविणारा. २ अंश ( भाग ) असणारें. ३ विकार पावलें. ४ बडबड. ५ जिंकण्याच्या इच्छेनें प्रतिपक्ष्यांस कांहीं तरी थापा मारणें. येथें 'जिगीषुनिमिषा कथाजल्प' असा निरर्थक पाठ आहे.

बोलिजे अनुभव पूर्ण । निखिल ज्ञानेंविण नसे आन । तेंचि चैतन्य अनुभवनामें ॥ ८२ ॥ तन्मात्रचि आत्मा असे । अनुभवमात्रचि बोलिजेतसे । तेंचि स्वरूप जयाचें ऐसें । आन नसे द्वैतलेश ॥ ८३ ॥ या नांव अनुभवमात्रचि ह्मणिजे । वस्तूवेगळें दुजें नेणिजे । कल्पित तें परिच्छिन्न सहजें । आत्मा जाणिजे सर्वगतु ॥ ८४ ॥ ज्या ज्या दिगंतरा जाय आपण । तों तत्पूर्वीं तेथेंचि असे गगन । तैसें आत्मस्वरूप सर्वत्र व्यापून । असे भरून सर्व देशीं ॥ ८५ ॥ कां वस्तु जे जे निर्माण होये । ते आधींच व्योमें व्यापिली आहे । सर्व देशीं काळीं नित्य पाहें । तैसा आहे सर्वगत आत्मा ॥ ८६ ॥ आत्मा सर्वगत ययापरी । ह्मणिजेतसे गा रावणारी । सर्वाश्रय तेणेंचिपरी । त्याभीतरी जग सकळ ॥ ८७ ॥ प्रकाशानंद चैतन्यघन । अव्यतिरिक्तपणेंचि येकपण । ययाचेंही सांगों विवरण । ब्रह्म पूर्ण जेणें भासे ॥ ८८ ॥ प्रकाश आणि आनंद । तिसरें ज्ञान विशद । येहीं तिहीं पदीं अगाध । नाहीं भेद वाच्यपणें ॥ ८९ ॥ अथवा प्रकाशशब्दें सत्ता । घटसन् पटःसन् हें असतां । ऐसी आहेपणाची सर्वसत्ता । तेंचि तत्वतां प्रकाशरूप ॥ ३९० ॥ प्रकाशशब्दें सत्ता रघुपती । ते वाखाणिली गा तुज प्रति । आकाशसत्तेसि एकत्व पावती । वाच्य होती येणे अर्थें ॥ ९१ ॥ तैसेंचि निरतिशय जो आनंद । विषयसुखेंसि एकत्व विशद । पावल्या वाच्यप्रसिद्ध । तत्त्यागें शुद्ध तेंचि उरे ॥ ९२ ॥ तिसरें चैतन्य तें ज्ञान । स्वप्रकाशैकनिरंजन । वृत्तिज्ञानें वाच्य जाण । तेणेंसि भिन्न तेंचि शुद्ध ॥ ९३ ॥ ऐसें सत्ता आनंद प्रकाश । यिहीं तिहीं पदीं येकुचि परेश । अभेदपणें ब्रह्म उदास । भिन्नाभास असेचिना ॥ ९४ ॥ जैसें अग्नि आणि उष्णता । वेगळें न निवडे गा सर्वथा । अग्नीचें नाम उष्णता । भिन्न तत्त्वता असेचिना ॥ ९५ ॥ उष्णता तोचि अग्नि । अग्नि तोचि उष्णता जनीं । परस्परें भिन्न नव्हती दोन्ही । येकपणीं येकचि तें ॥ ९६ ॥ नाना वायु आणि गति । येक वायुचि जैसा गा सुमती । अवकाश आणि आकाशस्थिति । भिन्न नव्हती कदाकाळीं ॥ ९७ ॥ नाना आर्द्रता आणि नीर । दोन्ही येकत्र अंबु सर्वत्र । द्रुति आणि पुष्पसार । मनोहर येकत्वें ॥ ९८ ॥ पर्जन्य आणि धारा । गंध आणि कापुरा । दीपप्रकाश येक वीरा । नाहीं दुसरा भिन्नभावो ॥ ९९ ॥ तैसें प्रकाश आनंद चैतन्य । पदत्रयीं आत्मा येकुचि जाण । तेंचि तें ब्रह्म परिपूर्ण । नव्हे भिन्न वाच्यपदीं ॥ ४०० ॥ आतां आणीकही लक्षणें । सांगों श्रीरामा तुजकारणें । तें आइकतांचि एकाग्रमनें । बुझसी जेणें आत्मस्थिति ॥ १ ॥

चित्तवर्जितचिन्मात्रः परमात्मावभासकः । सबाह्याभ्यन्तरो व्यापी निष्क्रियो निष्कलाश्रयः ॥ २४ ॥

तरी दृश्यविवर्जित चैतन्यमात्र । दृश्यदेहादिविश्वविचित्र । त्याचें नाम रूप त्यजूनि सर्वत्र । ज्ञानमात्र जें निर्विशेष ॥२॥ चित्तकल्पित चैतन्य बोलिजे । तयातेंचि दृश्य ह्मणिजे । चित्त कल्पनेविना जें सहजें । तेंचि जाणिजे आत्मरूप ॥ ३ ॥ तेंचि तें सर्वावरिष्ठ व्यापक । परमात्मा जो अवभासक । जयाचेनि भासें भासे सकळीक । येकानेक जेथें नाहीं ॥ ४ ॥ द्रष्टा दृश्याचा जाणता । एक काळेंचि सर्व भासविता । तोचि आत्मा जाण प्रकाशता । होय तत्वतां प्रकाशकु ॥ ५ ॥ जयाचेनि हें सर्व भासे । जयाचेनि हें सर्व प्रकाशे । तो अवभासकु आत्मा असे । हें रघुवंशें जाणावें ॥ ६ ॥ बाह्य जें कीं घटपटादिस्थूळ । अंतरीं अहंकार मन बुद्धि सकळ । कामक्रोधादिवासनाजाळ । अंतर्बाह्य सकळ विश्वनामें ॥ ७ ॥ यया सर्वांचा जो अवभासकु । तोचि बोलिजे आत्मा येकु । ऐसा असोनि निष्कलंकु । सर्वाश्रय मुख्य अधिष्ठान हें ॥ ८ ॥ आणीकही लक्षणें रघुपती । आत्मयाचीं सांगेन तुजप्रति । तेंही आइकें येकाग्रचित्तीं । विश्वमूर्ती अवधारीं पां ॥ ९ ॥

य आत्मा चिन्मयः स्वच्छः प्रवृद्धोऽपचयच्युतः । हेयग्राह्योज्झितो देशकालजात्याद्यसंगतः ॥ २५ ॥

जो कीं आत्मा चैतन्यमूर्ति । केवळ ज्ञानमात्रचि रघुपती । ह्मणोनि तयातें स्वच्छ ह्मणती । स्वयंज्योति स्वप्रकाशें ॥ ४१० ॥ निर्मळपणेंचि स्वच्छपण । नाहीं अज्ञानादि जेथें मालिन्य । उपाधिगुणकार्य आणि त्रिगुण । नाहीं तें पूर्णचि बोलिजे ॥ ११ ॥ उपाधिहीनासि व्यापकपण । उपाधि तितुका परिच्छिन्न । ह्मणोनि तोचि एक परिपूर्ण । नाहीं न्यून अंतर्बाह्य ॥ १२ ॥ व्यापका कैंचा वृद्धिनाशु । धाढावया रिता नाहीं देशु । क्षय पावणें तरी नव्हे सांशु । नित्य अविनाशु निरुपाधिपणें ॥ १३ ॥ तें जैसें तैसें सर्वदा असे । जग भासतां न वचे अंशें । वृद्धि न पवे जगनाशें । परिपूर्ण असे अखंडपणें ॥ १४ ॥ यालागीं वृद्धि अपचय दोन्हीं । मावळलीं जियेस्थानीं । तें अखंडदंडायमान जनीं वनीं ।

---

१ मर्यादायुक्त. २ दिशेकडे. ३ वेगळें करतां येत नाहीं. ४ प्रकाश, आनंद व चैतन्य या तीन पदांनीं. ५ प्रत्यक्ष दिसणारा देह आणि अनेक प्रकारचें जग. ६ उपाधि व गुण यांचा परिणाम.

सर्वत्र सर्वपणीं शोभत ॥ १५ ॥ आणि घेवों जातां इंद्रियें नेघवे । टाकितां स्वतःसिद्धपणें न टाकवे । सांडणें मांडणें न संभवे । न झेंपावे बुद्धयादिकां ॥ १६ ॥ अगा सांडणें मांडणें दोन्ही । न संभवती अये स्थानीं । घेतां दृश्यत्वें भासे नयनीं । परी विकारपणीं जो उदास ॥१७॥ साकारभास जो असे । तो इंद्रियांदिकीं घेवों येतसे । हें निर्गुण निरंश सर्वांशें । सर्वत्र प्रकाशे स्वप्रकाश ॥ १८ ॥ ह्मणोनि ग्राह्य नव्हे सर्वथा । त्यजूं जातां स्वयेंचि आइता । अपरोक्ष परिपूर्ण सर्वांतरता । नये त्यजितां त्याज्य-बुद्धी ॥ १९ ॥ आणि घेवों जातां दुजें नाहीं । परिच्छिन्न नव्हे कोण्हे काळींही । त्यजूं जातां तेंचि सर्वही । त्यजावें काइ सर्वहीपणें ॥ ४२० ॥ ह्मणोनि घेवों जातां कैसें घ्यावें । निरंशपणें घेतां न पावे । सांडूं जातां तेंचि सर्वत्र फावे । स्वयेंचि आहे येकलें येक ॥ २१ ॥ जें आपणाहूनि व्यतिरिक्त । बाह्य. सांश आणि आकारवंत । परिच्छिन्न तेंचि त्यजिजेत । आत्मा एवंभूत सर्वथा नव्हे ॥ २२ ॥ आत्मा अपरोक्ष सर्वांतर । स्वस्वरूप निरंश निर्विकार । व्यापक निर्गुण निराकार । त्याग साचार कैसा होये ॥ २३ ॥ हेयग्राह्याहूनि वेगळें । तेंचि तें परब्रह्म निराळें । जें संग न पावे देशें काळें । कोण्हा न कळे असंगपणें ॥ २४ ॥ देश काळ ज्यातें पावती । आत्मा अक्षयी आण सर्वार्थी । देश काळादि ब्रह्मीं कल्पिजेती । अविकल्पमूर्ति परब्रह्म ॥ २५ ॥ तसेंचि जाति वर्ण आश्रमाचार । ते ब्रह्मीं नाहींत जे विकार । ब्रह्म तें निर्गुण अविकार । तेथें नानाकार असतीचना ॥ २६ ॥

संमतिश्लोक ॥ न वर्णा न वर्णाश्रमाचारधर्मा न मे धारणाध्यानयोगादयोऽपि ॥

यालागीं येथें ग्राह्यादिसमस्त । आत्मा येणेंसि व्यतिरिक्त । वर्त्ते सर्वभूतांतरगत । स्वयें अलिप्त असंगपणें ॥ २७ ॥

ब्रह्मांडे च यथा वायुः सर्वभूतगतस्तथा । स एव भगवानात्मा तनुमुक्तो व्यवस्थितः ॥ २६ ॥]

वायु जैसा ब्रह्मांड व्यापुनी । राहिला असे जनीं वनीं । परी संग न पवे तयाचेनी । अंतर्बाह्य-पणीं वर्ततांही ॥ २८ ॥ कां जैसें आकाश सर्वगत । अंतर्बाह्य असोनि व्यतिरिक्त । तैसा आत्मा असं-गत । असे अलिप्त सर्वांपरी ॥ २९ ॥ यालागीं हेयग्राह्य देशकाळ । जातिगुणादिकर्ममेळ । त्याव्यति-रिक्त असंग निर्मळ । न पवे मळ संबंधाचा ॥ ४३० ॥ पंचभूतगुणी जो आत्मा । तोचि षड्गुणैश्वर्य आण रामा । षड्गुण तेही वीरोत्तमा । सांगेन गरिमा तयांची ॥ ३१ ॥

संमतिश्लोक ॥ ऐश्वर्यस्य समग्रस्य धर्मस्य यशसः श्रियः । ज्ञानवैराग्ययोश्चैव षण्णां भग इतीरणा ॥

समग्रही ऐश्वर्य धर्म जाण । यश श्री लक्ष्मी वैराग्य ज्ञान । हे षड्गुण जेथ संपूर्ण । तो श्रीभग-वान् परमात्मा ॥ ३२ ॥ तेंचि भगवन्नामें ब्रह्म पूर्ण । हेचि षड्गुण अंगिकारून । विराजे परब्रह्म आपण । नव्हे सगुण षड्गुणेंही ॥ ३३ ॥ तोचि व्यापकपणें परिपूर्ण । मुक्तीच्या ठायीं उपलब्ध जाण । उपाधिरहित केवळ चिदेकघन । भासे पूर्ण मुक्तीसि पैं ॥ ३४ ॥ नाहीं मुक्तीच्या ठायीं लाभे जरी । तरी अन्यत्र कायि आत्मा अवसरीं । आत्मा सर्वत्र असेचि परी । मुक्तीभीतरीं केवळ लाभे ॥ ३५ ॥ जागृतिस्वप्नीं आत्मा असे । परी तो देहेंद्रियसमुदायें न भासे । तो केवळ सुषुप्तीसि लाभतसे । जाण तैसें मुक्तावस्थेसी ॥ ३६ ॥ केवळचि सर्वत्र व्यापूनि असे । परी उपाधियोगें विशिष्ट भासे । मुक्तीसि केवळ उरतसे । आन नसे दुजें तेथें ॥ ३७ ॥ आतां मुक्तावस्था ते जाण ऐसी । बाणलिया तुझिया मनासी । केवळचि उपलब्धि कैसी । ते अनुभवासि येयील तुज ॥ ३८ ॥ तरी अगा मुक्तिअवस्थेचें लक्षण । तें एवंविध रघुनाथा जाण । भासतांही प्रपंचभान । बाधित पूर्ण ज्ञानें होये ॥ ३९ ॥ देहादि-प्रपंचजात । तें वस्तुज्ञानें होय बाधित । अपरोक्ष स्वस्वरूप जाणत । वासना चित्त नाशोनियां ॥ ४४० ॥ जेथें जें जें कांहीं दृश्यमान । श्रुतदृष्टकल्पितभाव्य जाण । तितुकें आरोपित मायामय पूर्ण । बाधोनि समान ब्रह्मचि भासे ॥ ४१ ॥ अंतर्बाह्य एक चैतन्य । दुसरें न भासे ब्रह्मेंविण । परमा-नंदाचें आस्वादन । भोक्तेनविण जेथें उरे ॥ ४२ ॥ तेचि मुक्ति जाण पां रघुनाथा । जेथ केवळ लाभे आत्मसत्ता । नेणें देहादिदुःखवार्त्ता । तेचि तत्वतां मुक्ति जाण ॥४३॥ केवळ मुक्तीच्या ठायीं ह्मणसी । तरी सर्वत्र चित्कला परियेसीं । तेही तुज येईल प्रतीतीसी । सांगेन मानसीं दृढ धरीं ॥ ४४ ॥

---

१ टाकण्यासारखें अथवा घेण्यासारखें या दोहोंहून वेगळा. २ सर्व पदार्थांमध्यें असणारा. ३ प्राप्ति. ४ आरोपित. ५ ऐकिलेलें, पाहिलेलें, कल्पिलेलें व पुढें होणारें. ६ उपभोग.

यैव चिद्भुवनाभोगभूषणे व्योम्नि भास्करे । धराविवरकोशे च सैव चित्कीटकोदरे ॥ २७ ॥

तरी पृथ्वीच्या ठायीं तेंचि ज्ञान । केवळपणें वर्त्ते परिपूर्ण । ज्याच्या ठायीं पृथ्वी कल्पित जाण । तें चिद्घन जाणावें जें ॥ ४५ ॥ तेंचि ज्ञानस्वरूप श्रीरघुपती । व्योमीं अंतरिक्ष सूर्याप्रति । भोगस्थान स्वर्ग ह्मणती । तेथही अनुगत आत्मयाची ॥ ४६ ॥ अथवा भोगीं विरागीं आत्मस्वरूप । पृथ्वी पातालीं अमूप । तेंचि तें सर्वत्र व्यापक निष्कंप । चित्स्वरूप देखतसे ॥ ४७ ॥ तेंचि सर्वत्र भासे जेथ । तें तें येक दोन्ही नामें बोलिजेत । परी वस्तुत्वें नाहीं ईषत् । तेंही संक्षिप्त परियेसीं ॥ ४८ ॥ तया ज्ञानाची रघुपती । धराविवरीं असे व्यावृत्ति । कोशीं भांडारसंपत्ति । सर्वत्रीं वर्त्तती व्यापकपणें ॥ ४९ ॥ तेंचि पशुपक्षिकीटकोदरीं । व्यापूनि राहिलें सर्वांतरीं । ज्ञानेंविण गोष्टि दुसरी । नाहीं खरी तिहीं लोकां ॥ ४५० ॥ ज्ञान तेंचि ब्रह्मपूर्ण । यया बोला नाहीं आन । जें ज्ञान तेंचि चैतन्य । नित्य निरंजन परब्रह्म ॥ ५१ ॥

न बंधोऽस्ति न मोक्षोऽस्ति ब्रह्मैवास्ति निरंतरम् । नैकमस्ति न च द्वैतं संवित्स्फारं विजृंभते ॥ २८ ॥

ऐसियासि कैंचें मुक्त बंधन । सर्वाद्य सर्वही चिद्घन । निश्चळ अखंड कोंदून । परिपूर्ण पूर्णत्वें ॥ ५२ ॥ दुसरा पदार्थ साच असावा । तेणें बंधु केलासा कळावा । दुजें नसतां बंधुभावा । नये रोणिवा मोक्षाच्या ॥ ५३ ॥ अज्ञानें बंधु आत्मयासी । तरी अज्ञान साच आहे कोण्हे देशीं । जन्मपत्रिका वंध्यापुत्रासी । कोण तो ज्योतिषी करितसे ॥ ५४ ॥ अज्ञानाचीं मायबापें कवण । आणि कोणें केलें पाणिग्रहण । हें विचारितां विचारण । पांगुळवाणें होऊनि ठाके ॥ ५५ ॥ जें उपजतां निमतां न दिसे । तें मिथ्याभूत मध्येंचि भासे । तैसें अज्ञान कोणे दिसे । उपजे नाशे सांगिजो ॥ ५६ ॥ अविद्या याचें नाम जाण । येणें नामें नव्हे विद्यमान । सत्य रूपासि बंधन । अघटमान सर्वार्थी ॥ ५७ ॥ स्वप्नींचा शस्त्र आपणा । जागृतीसि आणी बंधना । मृगांभतारूं बुडवी सधना । अमृता मरण जरी मारी ॥ ५८ ॥ राजा वंध्यापुत्रें जरी बांधिला । सिंह शशविषाणीं बोधिला । प्रतिबिंबें पराक्रमु केला । बिंब ग्रासिला पुरुषार्थे ॥ ५९ ॥ साउली पुरुषाचें करी भक्षण । अंधकार करी भानूतें ग्रसन । शीतें अग्नीचें आच्छादन । अज्ञानें बंधन आत्मयास तैसें ॥ ४६० ॥ कार्पासतूला अग्नीसि जाळी । तरी आत्मयासि अज्ञान आकळी । ह्मणौनी बंधन नाहीं कोणे काळीं । असतां मेळीं उपाधीच्या ॥ ६१ ॥ जेथ बंधन जया नाहीं । तेथ मुक्त ह्मणणें तया कायी । यालागीं बंध मोक्ष दोन्ही नाहीं । सबाह्य सर्वही व्यापकपणें ॥ ६२ ॥ अपरिच्छिन्नासि बंधन न घडे । तेंचि मुक्ति होय बंधन विघडे । हें तंव दुजेंविण अद्वैत फुडें । बंधमोक्षासांकडें । कदा नव्हे ॥ ६३ ॥ पुनरपि आत्मयाचें लक्षण । श्रीरामा आइक पूर्ण । जो येक ना अनेक चैतन्य । चिन्मात्रघन परमात्मा ॥ ६४ ॥ अगा तें येक ना अनेक । द्वैत ना अद्वैत देख । ना तें नव्हे व्याप्य व्यापक । कांहींयेक स्वप्रकाश ॥ ६५ ॥ येक ह्मणतां दुजें भासे । गणितेंनसि दुजें असे । यालागीं येक नव्हे ऐसें । अनेक भासे तरी माया ॥ ६६ ॥ ह्मणौनि येकानेकाविरहित । येक परब्रह्म सदोदीत । ज्ञानमात्रचि विजृंभित । नाहीं द्वैत अणुमात्रीं ॥ ६७ ॥ तें ज्ञानमात्रचि निरंजन । येक ब्रह्मस्वरूपचि निर्वाण । तेथ दुजें भासे तें भ्रमस्वप्न । कल्पित जाण आरोपमात्र ॥ ६८ ॥ अहो शुद्ध ब्रह्माचां ठांई । आरोपित भासे द्वैत पाहीं । तेंचि विचारूनि पाहातां सर्वही । ब्रह्मेंविण नाहीं दुजी मातु ॥ ६९ ॥ हें सार्धश्लोकाचें व्याख्यान । येणें बोलिलें आत्मलक्षण । आत्मा एवंभूत पूर्ण । तुजलागून सांगितलें ॥ ४७० ॥ आतां आत्मयाची व्यापकता । ज्ञानें दृढ बाणे तत्वतां । तेंही सांग सांगों आतां । श्रीरघुनाथा आइक तूं ॥ ७१ ॥

ब्रह्म चिद्ब्रह्म भुवनं ब्रह्म भूतपरंपरा । ब्रह्माहं ब्रह्म मच्छत्रुर्ब्रह्म मन्मित्रबांधवाः ॥ २९ ॥

जें कीं चित्स्वरूप परब्रह्म । तेंचि तें नित्य येक सम । नाहीं अणुमात्र एक विषय । परात्पर परम परब्रह्म ॥ ७२ ॥ ब्रह्म स्वर्गमृत्युपाताळ । ब्रह्म पर्वतादिकुळाचळ । भूर्भुवःस्वर्गलोकपाताळ । ब्रह्म निर्मळ चौदा भुवनें ॥ ७३ ॥ यया भूतांची जे परंपरा । ते सर्व ब्रह्मचि गा रघुवीरा । सकळ संसाराचा पसारा । ब्रह्मरूप खरा तूं ॥ ७४ ॥ किंबहुना श्री रामा जाण । ह्मणे मीच ब्रह्म चैतन्य । ऐसें स्वप्रतीतीनें जाणे जाण । ह्मणे शत्रुगण परब्रह्म ॥ ७५ ॥ पुत्रमित्रकलत्रादिसर्व । येक ब्रह्मचि असे स्वयमेव । देहेंद्रियादिदृश्यभाव । ब्रह्म तें सर्व सर्वरूपें ॥ ७६ ॥

---

१ पृथ्वीच्या पोटांत. २ खजीन्हे ३ राज्यांत. ४ ससाच्या शिंगानें. ५ ग्रास केला. ६ मोजून पाहिलें असतां. ७ मालिका. ८ पुत्र, मित्र, स्त्री, आप्त वगैरे सर्व संबंधी. ९ देह, इंद्रियें वगैरे दिसणारे पदार्थ.

चिच्चेत्यकलनाबंधस्तन्मुक्तो मुक्तिरुच्यते । चिच्चेत्यखिलमात्मेति सर्वसिद्धांतसंग्रहः ॥ ३० ॥

तंव रघुनाथ ह्मणती श्रीगुरुमूर्ती । एवं चैतन्यचि सर्व त्रिजगतीं । तयासि बंधमोक्ष कां ह्मणती । कोणे अर्थी तें सांगिजे ॥ ७७ ॥ वसिष्ठ ह्मणती गा रघुनाथा । चैतन्य बंध ना मुक्त सर्वथा । परी दृश्यतादात्म्यें पावे बद्धता । तेंचि मुक्तता दृश्यनाशें ॥७८॥ तें चैतन्यचि दृश्यसंगती । बाधा पावतसे गा रघुपती । दृश्यनाशें तेंचि मुक्ति । ऐसें बोलती विबुधजन ॥ ७९ ॥ अथवा चैतन्य आणि दृश्यचित्त । येकत्र जालिया बिंबत । तया नाम बंध बोलिजत । चित्तव्यतिरिक्त तेंचि मुक्ति ॥ ४८० ॥ चित्तचैतन्याचिये गांठीं । बद्धकळा असे गा जगजेठी । चित्तसंगें जीवत्वेंसि उठी । देहोहं पुष्टि थोरावतु ॥ ८१ ॥ चैतन्यासि जो चित्ताध्यासु । तोचि बंधु गा सावकाशु । ध्यास गेलिया स्वप्रकाशु । स्वयें परेशु आपणाचि ॥ ८२ ॥ चित्ताचेनि अध्यासें । चैतन्यासि देहपणाचें पिसें । तेंचि तुटलिया चित्ताध्यासें । स्वयें प्रकाशे ब्रह्मरूप ॥ ८३ ॥ त्याचें नाम चिदचिग्रंथि । तेणेंचि दृढ होये संसृति । ग्रंथिनाशें सच्चित्शक्ति । ब्रह्ममूर्ति स्वयेंचि असे ॥ ८४ ॥ तिचेंचि नाम मुक्ति बोलिती । हाचि सिद्धांत जाण रघुपती । मग दृश्यादृश्य चिन्मूर्ति । नाहीं व्यक्ति आन कांहीं ॥ ८५ ॥ चित्त चैतन्य सर्व पदार्थ । अखिलही दृश्य तें आत्मा निश्चित । चैतन्यावांचूनि ईषत् । नाहीं पदार्थ कोण्हीही ॥ ८६ ॥ जें जें आइकसी देखसी । जें कीं दृश्यमात्र हृषीकेशी । देशविदेशपृथ्वीआकाशीं । ब्रह्मचि चौपाळीं सर्वत्र ॥ ८७ ॥ सर्व वेदशास्त्रांचा मथितार्थ । 'सर्वं खल्विदं ब्रह्म' हा फलितार्थ । ब्रह्मेंवेगळा कोण्ही पदार्थ । नाहीं निश्चित जाण तूं ॥ ८८ ॥

चिदिहास्तीहचिन्मात्रमिदं चिन्मयमेव च । चित्त्वं चिदहमेवेति लोकाश्चिदिति संग्रहः ॥ ३१ ॥

अपरोक्ष परोक्ष तें ब्रह्मचि असे । इहपरत्र ब्रह्मचि वसे । परि इहपरत्रादि दोन्हि नसे । कोंदलें असे चैतन्य येक ॥ ८९ ॥ जगज्जाल सर्व ब्रह्मसंवित्ती । ब्रह्मरूपचि जाण त्रिजगतीं । चैतन्यांवेण नाहीं स्थिति । सांगों किती बोलवरी ॥ ४९० ॥ आतां येकें बोलेंचि इतुकें जाण । जितुकें दृश्य तें चैतन्यघन । अंतरबाह्य चैतन्य पूर्ण । अणुमात्र न्यून असेचिना ॥ ९१ ॥ आतां किती सांगों रघुनाथा । तूं तंव ज्ञानस्वरूपचि तत्वतां । मी हीं ज्ञानस्वरूपचि सर्वथा । मी तूं हे कथा अज्ञानाची ॥ ९२ ॥ मी तूं जो इत्यादि व्यवहार । चित्स्वरूप ब्रह्म केवळ निर्विकार । आणि तिन्ही लोक चराचर । ब्रह्म निरंतर चिद्रूपें ॥ ९३ ॥ सिद्धांतसंग्रह इतुकाचि । खल्विदं ब्रह्म हेंचि । ययाहूनि मातु दुजेयाची । देहादिदृश्याची असेचिना ॥ ९४ ॥ आणीकही आइक हेचि स्थिति । ब्रह्मेंविण नाहीं कोण्हीच व्यक्ति दृश्या दृश्य सर्वही संवित्ति । आइक रघुपती श्लोकार्थें ॥ ९५ ॥

यदस्ति यद्भाति तदात्मरूपं यच्चान्यतो भाति न चान्यदस्ति । स्वभावसंवित्प्रतिभाति केवला ग्राह्यं ग्रहीतेति मृषा विकल्पः ३२

आतां बहु काय बोलों गा रघुपती । जें जें आहे तें तें चैतन्यस्थिति । भासे तितुकें ब्रह्मसंवित्ति सर्वत्र सर्वत्रीं आत्मचि येकु ॥ ९६ ॥ आत्मयाव्यतिरिक्त दृश्य भासे । तेंही जाण पां आत्माचि असे । असे नाहीं जे जाण मानसें । तेंचि सर्व उल्हासे आत्मपणें ॥ ९७ ॥ नेणोनियां अन्य बोलती । परी द्रष्टादृश्यदर्शनस्फूर्ति । स्फूर्तीसहित सुखसंविंत्ति । भिन्नस्थिति स्वप्नींही नाहीं ॥९८॥ भासता भासन आणि भास्य । व्याप्य व्यापक व्यापनांश । ज्ञान ज्ञेय ज्ञाता परेश । सर्व सर्वस्व चिदानंदु ॥९९॥ यया उपपत्ति गा रघुनाथा । मागें निरूपिलिया बहुता । ययालागीं जाण सर्व आत्मसत्ता । आन तत्वता असेचिना ॥५००॥ अगा ज्ञानाच्या ठायीं सर्व भासे । आहे नाहीं हें ज्ञानींच दिसे । सर्वही दृश्यमात्र ज्ञानींच वसे । ज्ञानेंविण नसे रितें कांहीं ॥ १ ॥ इंद्रियें आणि देहाहंकार । सर्व चिन्मात्र जाण निरंतर । स्वभाव मन बुद्धि साचार । चिदेकसार प्रकाशत ॥२॥ सुवर्ण जैसें कटकाकारें । येक सुवर्णचि आविष्करे । तरी दुजें तेथें न शिरे । नानाकारें तेंचि भासे ॥३॥ कापुराचें टवळें वाति । दिवी दिवा कापुरमिती । तेथें काय दुजें बोलती । कापुरीं वस्ती कापुराची ॥४॥ जळावरील लहरिजळ । लहरि नामें बोलती बाळ । परी एक तुसतेंचि जळ । कल्पित मेळ लहरीपणें ॥ ५ ॥ आकाशीं गंधर्वनगर दिसे । तें भ्रमें मात्र क्षणेक भासे । येऱ्हवीं गगन असे । नसतें पिसें नगराकारें ॥ ६ ॥ खांबसूत्रींचिया प्रतिमा । अनेकी भासती गा पुरुषोत्तमा । परी तें येक काष्ठचि गा श्रीरामा । नाहीं गरिमा अन्य वस्तूची ॥ ७ ॥ एकैक

१ दिसणाऱ्या पदार्थाचे ठायीं एकवृत्ति झाल्यानें. २ चोहींकडे. ३ 'हें सर्व ब्रह्मच आहे.' ४ सुखाचें ज्ञान. ५ कडीं वगैरे अलंकाराच्या आकारानें. ६ प्रगट होतें; दिसतें. ७ अज्ञान; मूर्ख पुरुष. ८ भोरीपांतील.

सांगावें तुज किती । सर्वत्र येकचि जाण संविति । तेथ ग्राह्यग्राहक भासती । मृषा भ्रांति विकल्पाची ॥ ८ ॥ हा नाथिला भेद रघुनाथा । लोक कल्पिती गा वृथा । दृश्यभासें मी येक भोक्ता । भिन्न तत्वतां देखताती ॥ ९ ॥ येकचि वस्तूचां ठाईं । भिन्न भाव कल्पिती पाहीं । त्यांचें अज्ञान किती कायी । वर्णू येहीं नानाशब्दें ॥ ५१० ॥ साखरेचे हस्ती घोडे केले । तयावरी राउत बैसविले । वहन स्वार अळंकारिले । तेही वेगळे अलंकार नाना ॥ ११ ॥ तेही नानापरीचें असती । चित्रविचित्र नेत्रीं भासती । चतुरंग नानाकृति । मुखीं घालिती तो शर्करा सर्व ॥ १२ ॥ तेथें अश्व गज नाढळती । स्वार आभरणादि न भासती । चवी वेगळालिया नेणिजेती । नाहीं भ्रांति दुजेपणाची ॥ १३ ॥ तेथें शर्करेवांचूनि आणीक कांहीं । ना दुजें भासे गोडीचां ठाईं । तैसें विश्वभ्रम पाहीं । विचारें सर्वही ब्रह्मचि असे ॥ १४ ॥ कां पटाच्या ठायीं चित्र लिहिलें । तेथ चतुरंग सैन्य भासलें । आंधारीं पाहातां काय जालें । विचारें भेटलें पटेंविण काये ॥ १५ ॥ कां भिंतीवरील चित्रविचित्र । अश्व कुंजर पदाति सर्वत्र । अग्नि उदक आणि क्षेत्र । प्रसाद विचित्र नानापरी ॥१६॥ येक अश्वारूढ गजस्कंधांतर । उष्ट्र खर मृग वेसर । शिवालयही मनोहर । मध्यें थोर देवो देवी ॥ १७ ॥ तेथही नानासेवा करिती । प्रदक्षिणा नमस्कार घालिती । येक ते समाधिस्थ असती । येक ते पढती वेदशास्त्रें ॥ १८ ॥ एवं विचित्रें नानावर्णें । भूषणें वस्त्रें विचित्राभरणें । नानाकार जातिगुणें । भासे संपूर्ण पाहातया ॥ १९ ॥ तेंचि हातेंकरूनि पाहिजे । कां मूळीं दृष्टि घालिजे । तरी येक भिंतीवांचूनि नेणिजे । वर्णादि सहजें असतीचना ॥ ५२० ॥ तैसें येक मात्र निरंजन । परब्रह्मचि ज्ञानघन । विश्वभास तो भ्रम जाण । सिद्धांत संपूर्ण इतुकाचि ॥२१॥ येक ब्रह्मचि सर्वही असे । ऐसें साक्षात् श्रुति बोलतसे । तेही आइकें सावकाशें । जेणें भासे सर्वही ब्रह्म ॥ २२ ॥

संमतिश्रुति। एको देवः सर्वभूतेषु गूढः सर्वव्यापी सर्वभूतांतरात्मा। कर्माध्यक्षः सर्वभूताधिवासः साक्षी चेता केवलो निर्गुणश्च ॥

बुद्ध्यादिदृश्याचा प्रकाशकु । तोचि बोलिजे देव येकु । जेथें नाहीं विश्वावलोकु । भाव अनेकु जेथें मावळे ॥ २३ ॥ ब्रह्माविष्णुरुद्रादिक । ऐसे देव बोलिजेती अनेक । यांची व्यावृत्ति करूनि देख । बोलिजे येक ब्रह्मासि पैं ॥२४॥ 'दीव्यतीति देव' ऐसें । येणें स्वप्रकाशें बोलिजेतसे । स्वप्रकाश त्या देव ऐसें । नाम शब्द वसे द्वितीय पद ॥ २५ ॥ तो आपुलांचि ठाईं असे शोभत । ह्मणौनि 'सर्वभूतेषु' बोलिजेत । सर्वभूतीं जो प्रकाशत । सर्वां प्रगटित स्वप्रकाशें ॥ २६ ॥ सर्वभूतांचे ठायीं प्रकाशे । तरी सर्वां प्रगट न दिसे । तो सर्वांतरीं गूढ असे । इंद्रियीं न भासे ह्मणौनि गूढ ॥ २७ ॥ परि गूढ तितुकें परिच्छिन्न। येक वस्तूमाजी जाय लपोन। तरी याचें आयिकतां निवर्त्तन। श्रुतिवचन सर्वव्यापी हें ॥२८॥ तरी आकाशाचेपरी । सर्वव्यापी असे सभराभरी । तें परिच्छिन्न कोण्हेपरी। होईल सर्वां प्रकारीं न घडे हें ॥२९॥ ह्मणौनि सर्व व्यापूनि असे। परिच्छिन्नत्व तया कदा नसे। तरी काय बाह्य व्यापितसे। अंतर नसे कोणाचें तें ॥ ५३० ॥ तरी आइक याचें उत्तर । सर्व भूतांचा आत्मा अंतर । देहेंद्रियबाह्यप्रकार । सर्वांचें अंतर जें आत्मरूप ॥ ३१ ॥ तरी प्रमातयाचेपरी । जडपणेंचि असे अंतरीं । ना तो कर्माध्यक्ष सर्वांतरीं । प्रेरणा करी बुद्ध्यादिकांचें ॥३२॥ बुद्ध्यादि इंद्रियांचा नियंता । सर्वज्ञपणें सर्वां चाळिता । रवीचेपरी प्रकाशिता । चळणकरिता सर्वजनां ॥ ३३ ॥ तरी कुलालाचिये परी । इतरपणें भांडादि करी । निमित्त होऊनि भरोवरी । चक्रादिफेरी निराळेपणें ॥ ३४ ॥ तैसें विश्व आणि कर्में दोन्ही । आत्मेन असती भिन्नपणीं । आत्मा वेगळेपणें राहोनी । करी चाळणी सूर्यऐसी ॥ ३५ ॥ यदर्थी अति भेदु भासतु । येकत्वासि विघातु होतु । ऐसें नव्हे परीयसा सिद्धांतु । सर्वभूताधिगतु निवासपणें ॥ ३६ ॥ सर्व भूतांचा अधिवास । त्याचा ठायीं सर्वभूतांश । भिन्न नव्हे तो परेश । अथवा निवास भूतीं त्याचा ॥ ३७ ॥ तंतूचा निवास पटामाझारी । मृत्तिका वर्ते घटांतरीं । सुवर्ण जैसें अलंकारीं । लहरीमाझारी जळ असे ॥ ३८ ॥ सुगंध प्रवेशे कापुरीं । कीं कापुर प्रवेशे द्रुतीमाझारी । आकाश अवकाशाभीतरी । भेद कुसरी तेथ कैंची ॥३९॥ तैसें सर्व भूतें आणि परमात्मा । येकत्वें एकपणाची महिमा । नाहीं भिन्नपणाची सीमा । भूतें उपरमीं ब्रह्मीं जाती ॥ ५४० ॥ तरी कीये आत्मा तद्रूप राह-तसे । भूतेंचि आत्मा होय ऐसें । तरी आइका हें ऐसें नसे । आत्मा असे सर्वांचा साक्षी ॥ ४१ ॥ साक्षी करी ना करविता । स्वयें भोगी ना भोगविता । देता ना तो देवविता । साक्षी आइता द्रष्टेपणें

१ स्वार. २ हत्ती, घोडे, रथ आणि पायदळ या सैन्याच्या चारही अंगांनीं युक्त. ३ हत्ती. ४ हत्तीवर बसलेले. ५ जो प्रकाशतो तो देव. ६ कुंभाराप्रमाणें. ७ भांडीं वगैरे. ८ शेवटास, परिणामीं.

॥ ४२ ॥ जैसा सूर्य साक्षित्वें वर्ततु । अलिप्तपणें सर्वां चेष्टवितु । स्वयें चेष्टेना प्रवर्त्तवितु । सर्वां जाणतु साक्षित्वें ॥ ४३ ॥ अयस्कांताचिया सन्निधी । जड लोहा चेष्टाबुद्धि । तैसें आत्मयाचे वेधीं । सर्वभूतादि वर्तती ॥ ४४ ॥ तैसा सर्वनियंता सर्वसाक्षी । तद्रूप नव्हे भूतपक्षी । सर्वज्ञातृत्वें सर्वसाक्षी । सर्वांसि अलक्षी ह्मणती तया ॥ ४५ ॥ तरी दीप जैसा साक्षी होये । गृहव्यापार तेणें सिद्धी जाये । परी तो जडरूपचि आहे । आपणा काये जाणतुसे ॥ ४६ ॥ तरी 'चेता' येणें पदेंकरून । तो ज्ञानस्वरूप चैतन्यघन । जडत्व नाहीं त्यालागून । तो चिद्गगन चिन्मात्र ॥४७॥ तो स्वयंवेद्य स्वप्रकाश । दीप प्रकाश्य परी परप्रकाश । तैसा नव्हे हा विश्वाभास । ज्योतिप्रकाशस्वयंभूत ॥४८॥ नाहो चेता ह्मणतां विकारा । विकारी तें नश्वर सर्वांपरी । तरी हेंही न घडे कुसरी । अविकारी केसें होये ॥ ४९ ॥ तन्हीं केवलपदें बोले श्रुति । अविकारांश ते केवलास्थती । प्रपंचलहरीं नव्हे विकृति । ह्मणौनि बोलति केवल तया ॥५५०॥ जेथें विकारमात्र नुदेजे । तेंचि केवल ब्रह्म जाणिजे । विश्वस्वप्न जेथें नेणिजे । विकार नुदेजे विचारितां ॥ ५१ ॥ यालागीं जें कीं निर्विकार । तेंचि केवलशब्दें साचार । तरी निर्विकारही गुण थोर । सगुणनिर्धार येणें गुणें ॥ ५२ ॥ तरी त्या निर्गुण ऐसें बोले श्रुति । गुणवंत नव्हे तें सर्वार्थी । निर्विकार निर्गुण चैतन्यमूर्ति । व्यक्ताव्यक्तिरहित जें ॥५३॥ यालागीं येकावांचून दुजी गोष्टि । पाहतां न दिसे ये सृष्टी । ह्मणोनि समष्टिव्यष्टि । ब्रह्मपुष्टि ब्रह्म हें ॥ ५४ ॥ ब्रह्मावांचूनि दुसरें । अणुमात्र नाहीं हें खरें । नामरूप हें भ्रम संचरे । वास्तव निर्धारें ब्रह्म येक ॥ ५५ ॥ यदर्थी आणीकही श्रुति । येकत्वचि प्रतिपादिती । तेहि आयिकें आनंदमूर्ति । संमतिश्रुति सांगेन ॥ ५६ ॥

संमतिश्रुती॥ एकमेवाद्वितीयं ब्रह्म नेह नानास्ति किंचन ॥ सदेवसौम्येदमग्र आसीत् ॥ आत्मा वा इदमेकमेवाग्र आसीत् ॥

नेहनानास्तिकिंचन । येणें नानात्व दूषिन्नलें जाण । येक परब्रह्म निर्वाण । दुजेपणें तृण तेंही नाहीं ॥ ५७ ॥ आदिअंतीं येकाचि असे । दुजें सर्वथा तें कांहींच नसे । आत्मेनविण आन न भासे । तेंचि तें ऐसें सर्वत्र सर्व ॥ ५८ ॥ जें भासे तें भ्रम गा रघुपती । जैसें इंद्रजाळ नानाव्यक्ति । गगनीं गंधर्वनगरें भासती । रश्मीप्रति मृगांभ जैसें ॥ ५९ ॥ शुक्तीचां ठायीं रजत भासे । सुवर्णी कटककुंडलठसे । रज्जु सर्पधारामाळामिसें । अनेक दिसे जयापरी ॥ ५६० ॥ चंद्राचां ठाईं द्विचंद्रता । प्रतारकु लोकां समस्तां । पिसांचीं पारवीं तत्वतां । दावी पाहातां भ्रम अनेक ॥ ६१ ॥ ऐसीं उदाहरणें नेणों किती । बोलावीं गा श्रीरघुपती । मागांही अनेका उपपत्ति । मंगळमूर्ती दाविल्या तुज ॥ ६२ ॥ ब्रह्माच्या येकत्वीं श्रुति । यदर्थी गा अनंता असती । त्या सांगतां प्रथु आति । विस्ताराप्रति जाईल ॥ ६३ ॥ सर्वा श्रुतींचें तात्पर्य ऐसें । ब्रह्माव्यतिरिक्त अणुमात्र नसे । विश्व हें ब्रह्मींच उल्हासे । मध्यें भासे भ्रमजाळ ॥ ६४ ॥ एवं ब्रह्मावेगळें कांहीं । अणुमात्र दुजें नाहीं । ऐसें जाणोनि सर्वदा राहीं । न देखें कांहीं आपणाविण ॥ ६५ ॥ ऐसें निरूपितां वसिष्ठमुनि । तंव श्रीराम ब्रह्मपणीं । सर्वत्र पाहे ज्ञानें-नयनीं । न देखे जनीं दुजें कांहीं ॥ ६६ ॥ तेणें सुखें सुखावोनी । तटस्थ राहिला कोंदोनी । आन न देखे जनीं । ब्रह्मांड भरोनि पूर्णानंदु ॥६७॥ न देखे शरीरइंद्रियादिक । न देखे मनबुद्ध्यादि आणिक । अहंकार प्रमाता एकानेक । न देखे लोक आपणेंविण ॥ ६८ ॥ न देखे सकळ विश्वरचना । धरा पर्वत गिरि द्रोणी नाना । आकाशादि भूतें नयना । न देखे मनापासूनि ॥ ६९ ॥ आत्मरूपाव्यतिरिक्त । नै देखे कांहीं पदार्थजात । ब्रह्मानंदें उचंबळेत । राहे तटस्थ निर्विकल्पें ॥ ५७० ॥ तया ब्रह्मसुखाची मर्यादा । नेणिजे तया परमानंदा । कदापि नेदे हे देहबाधा । परमपदा प्राप्त जाला ॥ ७१ ॥ अंतर्बाह्य नेणें कांहीं । आपुणेंसि बुडाला ब्रह्मानंदडोहीं । सुखेंचि सुख हेलावे पाहीं । तें जाणती सर्वही अनुभवी जे ॥ ७२ ॥ जया सुखाचिया आवडी । ब्रह्मादिइंद्रपदांची कीजे कुरवंडि । तेथें विषयसुखें काय बापुडीं । असंख्य कोडि स्फुलिंगें ज्याचे ॥ ७३ ॥ ऐसिया सुखीं निमग्न । निमज्जोन्मज्जतां बुडौन । स्वयें राहे होऊनि निर्वाण । वसिष्ठ धन्य ऐसें म्हणे ॥ ७४ ॥ मुहूर्त एका जालें व्युत्थान । आंगीं भरलें सुखावतरण । इंद्रियां नाहीं इंद्रियपण । विकळ ज्ञान सुखा भरी ॥७५॥ जलनिधींसि भरतें उतटे । तें सर्वांही सरितांसि दाटे । तैसें अंतरीं सुख जें कोंदाटे । सर्वत्र प्रगटे पूर्ण द्वारां ॥ ७६ ॥ तेणें सुखें सुखावलीं । म्हणोनि विषयांवरील धांव मोडली । तेणेंचि सुखें स्फुंजाळलीं । तटस्थ ठेलीं सुखावशेषें ॥ ७७ ॥ अतिप्रयासेंकरून । देहस्मृति धरी रघुनंदन । देहावरी आला

---

१ लोहचुंबकाच्या. २ उदय पावत नाहीं. ३ 'येथें अनेक असें कांहीं नाहीं.' ४ दोन चंद्र आहेत असा भ्रम. ५ 'ज्ञानी नयनीं' असा पाठ. ६ ठिणग्या. ७ बुड्या मारीत व वर येत असतां.

ऐसा देखोन । विधलें आलिंगन वसिष्ठें प्रेमें ॥ ७८ ॥ मग म्हणे श्रीरामा परियेसीं । स्वरूपलक्षण निरूपिलें तुजपासीं । एवंभूत जाणूनि आत्मयासी । राहें स्थितीसि तदाकारें ॥ ७९ ॥ ऐसें बोलतांचि मुनि । रघुनाथ लागे गुरुचरणीं । म्हणे धन्य धन्य तुमची वाणी । सुखाची खाणी श्रवणमात्रें ॥५८०॥ श्रीवसिष्ठा तुम्हिया उपकारा । उत्तीर्ण नव्हिजे जी दातारा । अर्पिलियाही संभारा । नानाउपचारा देहादिकां ॥ ८१ ॥ म्हणोनि घाली लोटांगण । पुनः पुनः करितसे नमन । वसिष्ठें धरिला आलिंगून । म्हणे धन्य धन्य वंश तुझा ॥ ८२ ॥ जिये वंशीं ब्रम्हनिष्ठ पुत्र । धन्य तयाचें कुळशीलगोत्र । तूंचि स्वयें ब्रम्ह तेथें काय विचित्र । बोलेल वक्र किती माझें ॥ ८३ ॥ अगा आत्मस्वरूप जाणोनी । राहिजे तद्रूप निर्वाणीं । तरी ते जीवन्मुक्ति भरंवसेनी । कार्मुकपाणी जाण तूं ॥ ८४ ॥ तरी तेचि जीवन्मुक्ति आतां । लक्षणेंसहित रघुनाथा । सांगेन तें आइकें सीताकांता । जे कीं तत्वतां तुज बाणली ॥ ८५ ॥ हेंचि उत्तरप्रकरणीं । निरूपिती जे श्रीवसिष्ठमुनि । श्रवण करील कोदंडपाणी । तेंचि श्रोताजनीं परिसिजे ॥ ८६ ॥ ऐसा बोलोनि उत्तरार्थु । उगाचि राहिला तटस्थु । निजानंदें रंगूनि स्वार्थु । आला कृतार्थु ग्रंथार्थें ॥ ८७ ॥ सर्वही ग्रंथीं ब्रम्हनिरूपण । तें वाखाणि थोर समाधान । ब्रह्मानंद जातसे उलटून । सुखसंपन्न सुखत्वें ॥ ८८ ॥ निरूपणामाजी विवरितां । तत्काळ समाधीच वरी चित्ता । यया ग्रंथाचें लेखनही करितां । निदिध्यासन स्वयेंचि होये ॥ ८९ ॥ विजातीय प्रपंचाचें निरसन । सजातीय ब्रह्माचें प्रतिपादन । करितां उभयतां निरूपण । समाधान निदिध्यासाचें ॥ ५९० ॥ एवं ग्रंथ लिहितां विवरितां । ब्रह्मसुखीं होय निमग्नता । ह्मणोनि ये ग्रंथीं वर्ततां । सुखसंपन्नता ब्रह्मानंदें ॥ ९१ ॥ येथें संपलें हें प्रकरण । गोडाहूनि गोड निरूपण । ऐकोनि तोषती सज्जन । निजानंदें रंगले ते ॥ ९२ ॥ सद्गुरूचेनि प्रसादें । प्रकरण संपलें ब्रह्मानंदें । श्रोते ऐका स्वानंदें । मन अगाध निर्मळ करुनी ॥ ९३ ॥ श्रोतयांसि हेचि विनंती । ग्रंथावगमन पुढतपुढती । केलिया ब्रह्मसुखउन्नति । नेणत्याही प्राप्ति समाधानाची ॥ ९४ ॥

## इति श्रीयोगवासिष्ठसारे श्रीवसिष्ठरामसंवादे आत्मनिरूपण प्रकरणं अष्टमं संपूर्णम् ॥



१ 'तेथें विनवी रंगनाथु ।. झालों कृ०' असा पाठ. २ 'उलथोन' असा पाठ. ३ 'तें सज्ञान ब्रह्मानंदें' असा पाठ. ४ 'तेणें तें ऐक तूं' असा पाठ.

॥ श्रीः ॥

## प्रकरण ९ वें.

# जीवन्मुक्तिप्रकरण.

श्रीगणेशायनमः । श्रीसरस्वत्यैनमः । श्रीमत्सद्गुरवेनमः । वंदितां श्रीसद्गुरुचरण । होय भवभयविध्वंसन । अज्ञान निःशेष नाशोन । सुखसंपन्न ब्रह्मानंदें ॥ १ ॥ यालागीं मुळीं हेंचि करावें । अखंड[१]सद्गुरुतेंचि भजावें । इतुकेनि कैवल्यपद पावावें । ब्रह्म अनुभवावें सिद्धचि ॥ २ ॥ जैसी कां भोजनें तृप्ति होये । बळपुष्टि वाढे क्षुधा जाये । तैसें सद्गुरुभजनें सर्व पाहें । जाणतां सर्व हें अनुभविये ॥ ३ ॥ ह्मणोनि म्यां हेचि बुद्धि केली । जीवें धरिली सद्गुरुमाउली । तेणेंचि कृतकृत्यता जाली । मावळली संसृति माझी ॥ ४ ॥ वरकड नेणेंचि मी उपावो । ह्मणोनि धरिला धरीं सद्गुरुरावो । तेथेंही येक सद्भावो । आन भावो नेणेंचि कांहीं ॥ ५ ॥ कांहीं सेवा नेणेंचि सद्गुरूची । तथापि कृपा असाधारण त्याची । कृपेचिसाठीं होली अज्ञानाची ॥ आणि स्वस्वरूपाची प्राप्ती जाली ॥ ६ ॥ ऐसें बोलतां श्रोतयांप्रति । तंव हृदयीं आविर्भवली सद्गुरुमूर्ति । आनंदेंकरूनि तातेंचि प्रार्थी । तेणें प्रेमाची जाति उदया आली ॥ ७ ॥ ऐकें जी दीनोद्धारणा । मायबापा कृपाघना । तोडूनि माझी देहभावना । आनंदघनामाजी बुडविलें ॥ ८ ॥ माझें कर्म क्रिया करण । तूंचि जालासि चिदैकघन । आतां कर्म करावें काण । माझें मीपण बुडविलें तुवां ॥ ९ ॥ मी जें जें पाहुं बैसें दृष्टी । तें तें तूंचि होऊनियां उठी । घाचा बोले जे जे गोठी । शब्द परिपाठी तूंचि तूं ॥ १० ॥ शब्दाच्या आदिअंतीं । शब्दशब्दार्थ भारती । अवघा तूंचि गा आनंदमूर्ति । ऐसी व्यक्ति मजलागीं ॥ ११ ॥ श्रवणीं जें कीं आयकों जाये । तंव आयिकतें ऐकणें तूंचि आहे । आइकण्या आद्यंतीं तूंचि पाहें । व्यक्ति नये आन कांहीं ॥ १२ ॥ चरण करितां गमनक्रिया । तरी करविता तूंचि गुरुराया । हस्तीं देणें घेणें तूंचि दया । चाळक स्वामिया तूंचि देखें ॥ १३ ॥ किंबहुना सर्व क्रियाजात । क्रियाजातीं तुजचि देखत । तें देखणें देखतें निश्चित । तुजव्यतिरिक्त असेचिना ॥ १४ ॥ अहो गुरूचा नेणोनि महिमा । ह्मणोनि वरपडे जालेति[२]भ्रमा । महिमा जाणतांचि उपरमा । संशयगरिमा जातसे ॥ १५ ॥ ऐसा तूंचि तूं सर्वांपरी । मजमाजी बाह्याभ्यंतरीं । नांदसी पुरवूनि उरी । काय करीं मी कर्मक्रिया ॥ १६ ॥ सर्वही करणें न करणें । तूंचि होऊनि चाळिसी करणें । ऐसें केलें मजलागीं येणें । नुरेचि मीपणें तुझा ठाईं ॥ १७ ॥ एवं कांहीं सेवाही न करितां । चरणदर्शनमात्रेंचि होतां । कांहीं नाकळे तत्वतां । स्वयें पुरुषार्था मेळविलें ॥ १८ ॥ गुरुपाचा पुरुषार्थ हाचि । निःशेष निवृत्ति होये दुःखाची । आणि प्राप्ति निरतिशय सुखाची । व्यक्ति हेचि पुरुषार्था ॥ १९ ॥ सर्व दुःखरूप संसार । जयामाजी जन्ममरण दुर्निवार । त्याची निवृत्ति सविस्तर । तोचि निर्धार दुःखनिवृत्ति ॥ २० ॥ अज्ञानपूर्वक भवशांति । तेचि दुःखाची निःशेष निवृत्ति । सुखामाजी सुखउत्पत्ति । होय प्राप्ति ब्रह्मानंदु ॥ २१ ॥ सर्व आनंदाचें आकारस्थान । तेंचि ब्रह्मानंद सुख जाण । होतांचि सद्गुरूचें दर्शन । प्राप्त आपण न साधितांही ॥ २२ ॥ नाहीं हें तंव न घडे सर्वथा । सद्गुरूचें दर्शन होतां । दुःखनिवृत्ति[३]सुखप्राप्तता । होय हे कथा अघटमान ॥ २३ ॥ जंव चिदचिद्ग्रंथी नाहीं सुटला । संशय राशि नाहीं छेदिला । कर्माकर्मक्षय नाहीं आला । ब्रह्मानंदु त्याला कैंचा लाभे ॥ २४ ॥ जंव[५]चिदचिद्ग्रंथि हा असे । संशयसंभावनादि वसे । जंव कर्माकर्म न नासे । तंव न निरासे दुःखनिवृत्ति ॥ २५ ॥ दुःखाची नाहीं जंव निवृत्ति । तंव कैंची होय सुखाची प्राप्ति । ययालागीं हें सर्वार्थीं । कदाकल्पांतीं घडेना कीं ॥ २६ ॥ एवं हें होये सद्गुरूचेनि दर्शनें । घडे हा विस्मय मानी मनें । तरी आइका सांगेन तुह्मांकारणें । वर्म जेणें बुझाल ॥ २७ ॥

---

१ संसार, जन्ममरण. २ प्रगट झाली. ३ वाणी. ४ अनेक क्रिया. ५ चित् व अचित् ( ज्ञान व अज्ञान ) यांच्या घोंटाळ्यांतून.

तुझी सद्गुरूचा नेणा महिमा । ह्मणोनि वरपडे आलेति भ्रमा । महिमा जाणतांचि उपरमा । संशय-गरिमा जातसे ॥ २८ ॥ तऱ्ही ये अर्थी श्रुति असे प्रमाण । येथें विप्रतिपत्ति नाहीं जाण । तेंचि आयिका श्रुतिवचन । जेणें समाधान पावाल ॥ २९ ॥ येक सद्गुरुदर्शनमात्रेंचि । शांति हृदयग्रंथ्यादि त्रयाची । तेचि आइका श्रुति निर्वाणींची । जे उपनिषदाची विधात्री पैं ॥ ३० ॥ ते श्रुति ऐकतांचि क्षणीं । संशयमात्राची होये धुणी । ते श्रुति परिसोनि श्रवणीं । मनन मनीं करावें ॥ ३१ ॥ तेचि श्रुति आतां सांगेन । आइका एकाग्र करूनि मन । जेणें सर्व संशय नाशोन । समाधान ब्रह्मानंदें ॥ ३२ ॥

संमतिश्रुति ॥ भिद्यते हृदयग्रंथिश्छिद्यंते सर्वसंशयाः । क्षीयंते चास्य कर्माणि तस्मिन्दृष्टे परावरे ॥

हृदयशब्दें अंतःकरण । तेंचि अचित् जड मांळण । त्याचा ठाईं आभासतें चैतन्य । जें कीं ज्ञान स्वप्रकाश ॥ ३३ ॥ जया ते प्रमाता हें अभिधान । जें अहं प्रत्यय प्रत्यक्ष जाण । तें अंतःकरणेंसि येकपण । पावतां पूर्ण ग्रंथि दोघां ॥ ३४ ॥ तया परास्परांध्यासें । चित्ताचें जडपण आत्मत्वीं दिसे । आत्मप्रकाशु चित्तीं आभासे । एवं ग्रंथि बैसे जडाजडीं ॥ ३५ ॥ मन तेंचि मी ऐसा अध्यासु । आत्मयासि जाला असे सोसु । तेणें देहादि हा सर्वाभासु । संसारपाशु पडे जेणें ॥ ३६ ॥ जोंवरी चित्तीं अध्यासु मीपणाचा । तोंवरी आत्मयासि संसारबंधु साचा । मग कोटि यत्न करितां याचा । मोक्ष कैंचा होईल ॥ ३७ ॥ तेंचि सद्गुरूचें दर्शन होतां । आत्मानात्मविवेक करी चित्ता । ह्मणे मी आत्मा अकर्ता अभोक्ता । भिन्न चित्ता द्रष्टेपणेंसी ॥ ३८ ॥ मनादिद्दश्य मजहूनि भिन्न । मी आत्मा तयाचा साक्षी संपूर्ण । ऐसें जाणतांचि होय दहन । स्वयेंचि जाण चिदचिद्ग्रंथि ॥ ३९ ॥ आपणासि साक्षित्व असतां । अनर्थपरंपरा होतसे वृथा । स्वप्नींही न आइके संसारकथा । दर्शनें होतां सद्गुरूचें ॥ ४० ॥ तैसेंचि असंभावनादिसंशयजाळ । जें कीं पडलें होतें महाप्रबळ । आत्मसाक्षात्कारीं सबळ । अतिमळ विघ्नरूप ॥ ४१ ॥ साधनचतुष्टयादिसंपत्ति । जालियाही नव्हे आत्मप्रतीति । नानासंशय तेथें उठती । जे कीं देती योनि नाना ॥ ४२ ॥ ते संशय कोण कोण । हें तुजप्रति सांगेन । करूनियां सावधान मन । देऊनि अवधान आयिकिजे ॥ ४३ ॥ हा आत्मा स्थूळदेहीं असे । किंवा सूक्ष्मदेहीं वसे । किंवा त्याहूनि वेगळा असे । किंवा सूक्ष्मांशें वर्त्ततो ॥ ४४ ॥ किंवा मध्यम परिमाण । ईश्वरवि-श्वाहूनि आन । जडरूप अथवा ज्ञान । चिदचिद्रूप अभिधान ह्मणावें कीं ॥ ४५ ॥ प्रपंच सत्यमिथ्या-पणें । कर्में अथवा ज्ञानें मोक्ष साधणें । ऐसे संशय स्वबुद्धी जन । बहुविध व्यसन करिताती ॥ ४६ ॥ बहुविध शास्त्राभ्यासु करितां । व्युत्पन्न जाले ताता । बहिर्मुखास अनुभव सर्वथा । जाण निश्चितता इयापरी ॥ ४७ ॥ तेंचि श्रीगुरूचे चरणदर्शनें । महावाक्यादिश्रवणमननें । संशय छेदिजती प्रमाणें । अपरोक्षपणें आत्मानंदु ॥ ४८ ॥ तैसींच कर्माकर्में पूर्वसंस्कार । आहेति तों नव्हे आत्मसाक्षात्कार । बुद्धि नव्हे आत्माकार । शुद्ध विचार तोही नुपजे ॥ ४९ ॥ संचित प्रारब्ध क्रियमाण । असें हें त्रिविध कर्म जाण । याचा क्षय नव्हतां संपूर्ण । नव्हे दर्शन आत्मयाचें ॥ ५० ॥ पूर्वींल्या कर्मांसि माझीं ह्मणे । त्यांचें फळ असे मज भोगणें । क्रियामाण करी अहंकर्तेपणें । हेंचि नागवणें आत्मप्राप्ति ॥ ५१ ॥ तेंचि सद्गुरूचेनि दर्शनें । संचितें माझीं नव्हे ह्मणे । तीं भस्म होतां वेगळेपणें । ब्रह्मगुणें स्वयें असतां ॥ ५२ ॥ माझीं ऐसी हे वासना । लिंगदेहीं होती जाणा । तव त्याचेनि फळभोग दारुणा । पावे यातना संसार कीं ॥ ५३ ॥ तें वासनालिंगरूपशरीर । सद्गुरुदर्शनें भस्मसार । जालें तेव्हांचि कर्मनिर्धार । जाला समग्र शुभाशुभाचा ॥ ५४ ॥ तैसींचि आपुलिया प्रतीती । क्रियमाण भिन्नत्वें देखती । तेथें अहंकर्तेपणीं न येती । ह्मणोनि नाशती तेंही कर्में ॥ ५५ ॥ जेथिंचा कर्त्ताचि आपण नव्हे । तेथील फळभोगु कोणासि काये । ह्मणोनि क्रियमाणासि वेगळा होये । प्रारब्ध पाहे देहावरी ॥ ५६ ॥ देहाच्या माथां प्रारब्ध कर्म । आपण अभोक्ता परब्रह्म । ऐसा पावोनि उपशम । स्वयें निःसीम आत्मा जाला ॥ ५७ ॥ पर जें कीं ब्रह्मादिसकळ । तें अवर जयासि केवळ । तेंचि ब्रह्म निर्मळ । देखिल्या सकळ इत्यादि लाभे ॥ ५८ ॥ आणीक करितां उपायांतर । केव्हांपि न घडे अल्प प्रकार । ब्रह्म देखिजे जें परावर । तऱ्हींच संसार भस्म होये ॥ ५९ ॥ आणीक उपाय करितां सृष्टीं । जाती अनेक कल्प-कोटि । परी न तुटे संसारगांठी । ब्रह्मासि भेटी कदा नव्हे ॥ ६० ॥ सकळ उपायांचा शिरोमणि । तो ब्रह्मसाक्षात्कार इये जनीं । जालिया संसारश्रेणी । भवसेनि तुटोनि जाती ॥ ६१ ॥ तें ब्रह्मदर्शन

१ मोठा संशय. २ असंभावना वगैरे अनेक संशय. ३ फसणें. ४ वासनायुक्त असलेली सूक्ष्म देह. ५ कनिष्ठ. ६ संसार परंपरा, पुनः पुनः जन्मास येणें.

होतांचि क्षणीं । चिद्‌चिद्ग्रंथि जाये तुटोनी । संशयराशि जाती नाशोनी । क्षयो निर्वाणीं कर्माकर्मी ॥ ६२ ॥ ऐसा अर्थ बोलतसे श्रुति । परी माझी ते येथें युक्ति । न तुटतां चिद्‌चिद्ग्रंथि । ब्रह्मप्राप्ति कैसी होये ॥ ६३ ॥ जंव असंभावनादिसंशयजाळ । छेदिलें नाहीं जंव सकळ । तंव असंशय ब्रह्म निर्मळ । नव्हे केवळ प्राप्त कदा ॥६४॥ तैसींच कर्माकर्मे जंव असती । तंव तें वासनारूपें परिणमती । वासनाजाळ तेथें ब्रह्मप्राप्ति । कदाकल्पांतीं घडेना कीं ॥ ६५ ॥ ह्मणोनि सद्गुरूचेनि दर्शनें । ग्रंथ्यादित्र-याचें भस्म होणें । मग ब्रह्मचि उरे ब्रह्मपणें । तें स्वयेंचि आपण अनुभवावें ॥ ६६ ॥ अहो सद्गुरूचेनि दर्शनें । घडती यया श्रवणमननें । निदिध्यासनें परिपाक होणें । गुरुखुणें साक्षात्कार ॥६७॥ साक्षात्कार तें आत्मदर्शन ॥ जेथें निःशेष जालें दृश्यनिरसन । ब्रह्माकारें वृत्ति स्थिरावोन । समाधान नित्यानंदें ॥ ६८ ॥ ययाचें नाम आत्मदर्शन । हें तंव गुरुदर्शनाउपरी जाण । तत्पूर्वी हें न घडे संपूर्ण । नाहीं छेदन चिदचिद्ग्रंथीचें ॥ ६९ ॥ आतां हेंहीं जरी तुह्मी न मना । ब्रह्मदर्शनचि जरी ह्मणा । तरी तेंही मानलें माझिया मना । ग्रंथ्यादिदहना पावती जेणें ॥ ७० ॥ तरी ब्रह्म तेंचि सद्गुरुनाथु । येथें संशय धरी तो परम भ्रांतु । तया आंतप्रति हे मातु । गुह्य येकांतु बोलोंचि नये ॥ ७१ ॥ ये अर्थी श्रुति प्रमाण । सद्गुरु तोचि ब्रह्म पूर्ण । स्वयें अनुभवही तैसाचि जाण । श्रुतिवचन परिसिजे ॥ ७२ ॥

संमतिश्रुति ॥ यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ । तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशंते महात्मनः ॥

भक्तिशब्दें परम प्रीति । निरंतर अनुराग जो चित्तीं । हेचि मुख्य भक्तीची व्यक्ति । इतर बोलती ते बाह्यसेवा ॥ ७३ ॥ ते भक्ति देवाचां ठाईं जैसी । देवशब्दें ब्रह्मचि ऐसी । व्याख्या केली निश्चयेंसी । तेचि मानसीं दृढ धरिजे ॥ ७४ ॥ तया ब्रह्मपणाचां ठाईं जे भक्ति । तैसीच सद्गुरूच्या ठाईं अनन्यगति । गुरूनें उपदेशिलें तें प्रकाशती । अर्थसंगति ब्रह्मान्वयें ॥ ७५ ॥ गुरूनें अनुगृहीत पुरुषासी । प्रकाशती अर्थ ब्रह्मरूपेंसी । तरी गुरूवेगळें ब्रह्म तयासी । कोण्हे देशीं उरलें असे ॥ ७६ ॥ ब्रह्मातें इतर जड तो न प्रकाशी । तें स्वसंवेद्य प्रकाश ऐसी । वेद बोले वचनासी । तन्ही गुरूनें खुणेसि कैसें प्रकाशिलें ॥ ७७ ॥ गुरूवेगळें तन्ही न प्रकाशे । जड तें ब्रह्मातें प्रकाशी कैसें । यया-कारणें ब्रह्म स्वसंवेद्य ऐसें । होय सर्वांशें येणें बोलें ॥ ७८ ॥ सद्गुरु साक्षात्ब्रह्ममूर्ति । तन्हीच स्वप्रकाश करी शिष्याप्रति । सद्गुरु सेविल्या सर्व निवृत्ति । ब्रह्मप्राप्ति तेचि तया ॥ ७९ ॥ ह्मणोनि साक्षात् ब्रह्ममूर्ति । सद्गुरु होय निश्चितार्थी । येथेंही जे आन भाव धरिती । ते नरका जाती कोटिकल्प ॥ ८० ॥ सद्गुरुऐक्य आपणेंसी । हेंचि बहु बोले हृषीकेशी । 'आचार्यं मां विजानीयात्' ऐसी । संमति कैसी श्रीभागवतीं ॥ ८१ ॥

संमतिश्लोक ॥ आचार्यं मां विजानीयान्नावमन्येत कर्हिचित् । न मर्त्यबुद्ध्या सेवत सर्वदेवमयो गुरुः ॥

सर्वदेवमयचि गुरुमूर्ति । सर्वदेव त्याचे उदरस्थिति । मी तोचि गुरु हें निश्चितीं । स्वयें श्री-पति बोलिले ॥ ८२ ॥ आणीकही श्रीभागवतीं आपण । भगवंत बोलिले स्वमुखेंकरून । श्रीगुरु तोचि मी आपण । नाहीं भिन्न सर्वथैव ॥ ८३ ॥ संसारताप शमावयालागीं । परमामृत भोगिजे अंतरंगीं । ते तिन्ही गुरु तयालागीं । श्लोक प्रसंगीं सांगेन ॥ ८४ ॥

संमतिश्लोक ॥ स वै सत्कर्मणां साक्षाद्द्विजातेरिह संभवः । आद्योऽग यत्राश्रमिणां यथाऽहं ज्ञानदो गुरुः ॥

कां यया संसाराचे ठाईं । जन्मम ह्र ज्यापासाव पाहीं । तो आदिगुरु पिता पाहीं । पूज्य तोही गुरुत्वें ॥ ८५ ॥ तैसेंचि द्विजपण जेव्हां आलें । सत्कर्माचें जन्म जेथें जालें । उपनयन अध्ययन करविलें । गुरुत्व बोलिलें तयासी ॥ ८६ ॥ जो साक्षात् जाणावा ईश्वर । प्रथमापरीस पूज्य थोर । आतां ब्रह्मपद पूज्यतर । महाथोर थोराहुनी ॥ ८७ ॥ सर्वही जे आश्रमवंत । ब्रह्मचर्यादिसंन्यासांत । त्यांसि ज्ञानदाताचि साक्षात् । सदोदीत परब्रह्म ॥ ८८ ॥ तो पूज्याहुनी पूज्यतर । साक्षात् परब्रह्म निर्विकार । जयाच्या कृपाकटाक्षें संसार । भस्मसार होऊनि जाये ॥ ८९ ॥ जे कीं ज्ञानप्रद गुरूतें । उपासूनि येकाग्रचित्तें । संसार तरती बुद्धिमंतें । तेचि श्लोकार्थें परियसा ॥ ९० ॥

संमतिश्लोक ॥ नन्वर्थकोविदा ब्रह्मन्वर्णाश्रमवतामिह । ये मया गुरुणा वाचा तरंत्यंजो भवार्णवम् ॥

अगा यया जन्माचां ठाईं । ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्र पाहीं । तैसेंचि चाऱ्ही आश्रमही । तयां-मध्यें तोही अर्थकोविद ॥ ९१ ॥ अर्थ ह्मणिजे आपुलें प्रयोजन । तें साध्य मुख्य ब्रह्मस्वरूप पूर्ण ।

१ तीन प्रकारच्या संशयांचें. २ गोष्ट. ३ स्वतःच जाणलें जाणारें. ४ अतिपूज्य. ५ ब्रह्मचर्य, गृहस्थाश्रम, वानप्रस्थ आणि संन्यास. ६ अर्थ जाणण्याविषयीं कुशल.

तेंचि साधावें गा निर्वाण । आणिक कारण कोण पुरुषा ॥ ९२ ॥ तेथें कोविद ह्मणजे अत्यंतकुशळ । तत्सुखसाधनीं अतितळमळ । नावडती विषय अमंगळ । प्रवर्ते केवळ आत्मसुखीं ॥ ९३ ॥ यदर्थींही भगवद्वचन । श्रीभागवतीं असे प्रमाण । तेंचि आइकिजे कुशळपण । करी वर्णन बुद्धिमंताचें ॥ ९४ ॥

संमतिश्लोक ॥ एषा बुद्धिमतां बुद्धिर्मनीषा च मनीषिणाम् । यत्सत्यमनृतेनेह मर्त्येनाप्नोति मामृतम् ॥

असत्य मर्त्य जें शरीर । क्षणभंगुर अतिनश्वर । तेणेंकरूनि पावे जो सर्वसार । निर्विकार मत्स्वरूपा ॥ ९५ ॥ मोक्षरूप जें कां अमृत । सत्य चिद्धन मी निश्चित । त्या मातें जो येणें पावत । बुद्धिमंत तोचि जाण ॥ ९६ ॥ सकळ बुद्धिमंतांमाझारीं । बुद्धिमंतु तोचि अवधारीं । कुशळामाजी कुशळ भारी । अतिचतुरि चतुरपणें ॥ ९७ ॥ ह्मणोनि तेंचि निश्चयेंसि जाण । या मनुष्यांमध्यें कुशळपण । त्याहींमाजी उत्तम वर्ण । आश्रमधन भाग्यें पावला ॥ ९८ ॥ इतुकी सामग्री भाग्येंकरुनी । लाधली तो भाग्याचा जनीं । आत्मसुख साधी तो भरंवसेनी । धन्य जननी तयाची ॥ ९९ ॥ त्यामाजी जपतपादि जे करिती । ते कुशळ परी तैसे नव्हती । जे सद्गुरूतें शरण जाती । अनन्यगती ते अतिकुशळ ॥१००॥ तो गुरुरूपेंचि मी जाण । जन्मजन्मांतरीं नानाभजन । करूनि केलें मज समर्पण । तेव्हां मी पूर्ण आभारलों ॥ १ ॥ तया आभारलियासाठीं । मीगुरुरूपें प्रगटें सृष्टीं । मग भाग्यें होय मजसी भेटी । सांगें गोष्टी महावाक्याच्या ॥ २ ॥ ते माझी गोष्टि आइकूनि कानीं । मग मद्रूपेंचि वर्त्तती जनीं । उपदेशमात्रेंचि भरंवसेनी । संसारश्रेणि भस्म करिती ॥ ३ ॥ ते आत्मसुखेंचिकरूनियां जाण । भवार्णव तरती संपूर्ण । न देखती संसारदैन्य । सद्गुरुचरण सेवितांचि ॥ ४ ॥ यालागीं ज्ञानप्रदा गुरूहुनी । अधिक नाहीं सेव्य कोणी । संसारदैन्य ज्याचे दर्शनीं । जनीं स्वप्नीं न दिसे ॥ ५ ॥ ह्मणोनि पूर्वद्वयापरीस । ज्ञानदाता सेव्य सावकाश । तो मीचि हेंही तुह्मांस । सांगें श्रीसुदाम्यास ह्मणे हरि ॥ ६ ॥ ज्ञानप्रदागुरूहूनि दुसरा । नाहींच गा यया संसारा । आणि सज्जनापरीस खरा । धर्म साचोकारीं असेचिना ॥ ७ ॥ गुरुवचनाहूनि आणीक धर्म । थोर नाहीं गा येणेंसि सम । महाधर्मांचेंही निजधाम । तेंचि परम गुरुभजन ॥ ८ ॥ सद्गुरुभजनाची सरी । नानाधर्म न पावती निमिषभरी । ह्मणोनियां निजमुखें श्रीहरि । बोले थोरी गुरुसेवेची ॥ ९ ॥ चाऱ्ही आश्रम अवलंबितां । तेथील उचित सर्व धर्मही करितां । मी सुखी नव्हे पैं तत्वतां । सद्गुरु सेवितां जैसा होये ॥ ११० ॥ तेंचि श्लोकाचिये संगती । स्वमुखें बोलिले श्रीपति । तें आइकावें एकाग्रमति । भांतिं श्रोतीं अर्थीकरूनियां ॥ ११ ॥

संमतिश्लोक ॥ नाहमिज्याप्रजातिभ्यां तपसोपशमेन च । तुष्येयं सर्वभूतात्मा गुरुशुश्रूषया यथा ॥

इज्याशब्दें इज्यादिकर्में । जिये ठायीं वर्त्तती स्वधर्में । तो गृहस्थाश्रमु अतिनियमें । चालवितां संभ्रमें न तोषें मी ॥ १२ ॥ तैसेंचि प्रजाति ह्मणिजे उत्कृष्ट जन्म । जें ब्रह्मचर्याख्य अतिधर्म । चालितांही मीं परम । न पवें काम आनंदाचा ॥ १३ ॥ तैसेंचि तपादिनानाक्लेश । वानप्रस्थादि असोस । ते आचरतांही मी परेश । न पवें संतोष सर्वथा ॥ १४ ॥ उपशमशब्दें संन्यासपण । उपशमादि मुख्यत्वें धर्म जाण । ते आचरतांही दारुण । संतोष पूर्ण मज नव्हे ॥ १५ ॥ सर्वभूतांचा आत्मा जऱ्ही मी । संतोष न पवें आश्रमधर्मीं । तो गुरुसेवनेंकरूनि सुखोत्तमीं । पहुडें संभ्रमीं परमानंदें ॥ १६ ॥ यालागीं गुरुभजनापरता । धर्म नाहीं जाण सर्वथा । ऐसें बोलिला जगत्पिता । ह्मणोनि तत्वतां सद्गुरुचि ब्रह्म ॥ १७ ॥ परी अभाग्य जन जे असती । ते मनुष्याकारें मनुष्य मानिती । व्यक्तीसाठीं परमार्थ हरविती । अढळ भ्रांति दृढ आली ॥ १८ ॥ अहो भ्रमेंकरूनियां मनुष्याकार । जऱ्ही दिसे साकार । तऱ्ही तें ब्रह्म निर्विकार । नाहीं विचार आन येथें ॥ १९ ॥ जैसी जळाची जळगार ॥ गोठोनि जाली जऱ्ही साकार । तऱ्ही साकारत्वें निर्विकार । नाहीं विचार आन कांहीं ॥ १२० ॥ जऱ्ही ते विरोली न विराली । तऱ्ही ते जळरूपेंचि स्थिरावली । तैसी सद्गुरुमूर्ति साकारली । ते ब्रह्मावेगळी कैसी बोलावी ॥ २१ ॥ नाना सुवर्णाचें पेंडुकें केलें । तऱ्ही पाषाणपणा नाहीं आलें । तैसें सद्गुरुरूप साकारलें । नये बोलों बोलें मनुष्यपणीं ॥ २२ ॥ ना शर्करेचा पुरुष केला । नाना अवयवीं विस्तारिला । तऱ्ही तो काये साखरपणा टाकूनि गेला । असे संचला शर्करारूपें ॥ २३ ॥ तेथें नामरूपाचीच मिरवणी । नाहीं आन शर्करेवांचुनी । तैसा सद्गुरु निर्वाणीं । सगुणपणीं

---

१ क्षणांत नाश होणारें. २ ऋणी झालों. ३ खरोखर. ४ उत्कंठा. ५ अतिशय. ६ पाण्याची गार, बर्फ. ७ विरघळली. ८ गोळा, अनेक प्रकारांची एक रास.

शोभतु ॥ २४ ॥ आणि जगाचि ब्रह्म असे जेथ । तेथ सद्गुरु नव्हे काय निमित्त । यालागीं गुरुचि ब्रह्म सदोदीत । लोक भ्रांत ते न मनिती ॥ २५ ॥ असो जनाची जनमति । मजलागीं सद्गुरुचि ब्रह्ममूर्ति । जे तद्वाक्यें बोधले असती । तेचि देखती ब्रह्मत्वें गुरु ॥ २६ ॥ जयासि बोध नाहीं जाला । स्वयें ब्रह्मभाव नाहीं बाणला । ते काय जाणती सद्गुरूला । नाहीं मोडला भ्रांतिफांटा ॥ २७ ॥ असो त्याचें काय काय बोलावें । सद्गुरु परब्रह्मचि स्वभावें । अंधासि सूर्य सूर्यत्वें न भावे । तऱ्ही काये सूर्य नव्हे जनासि या ॥ २८ ॥ नेणोनि परीसासि पाषाण मानी । तो टाकूनि देतो उपेक्षुनी । तऱ्ही तो काये परिसपणापासुनी । जाय उठोनि देशांतरा ॥ २९ ॥ तैसा गुरु ब्रह्मत्वें न मानिती । तऱ्ही ब्रम्हीं ब्रम्हत्वें ते व्यक्ति । त्याचे दर्शनमात्रेंचि ब्रह्मप्राप्ति । दिव्य लोकांप्रति देईन मी ॥ १३० ॥ माझें दिव्य सद्गुरुचरण । त्याचें केलें ज्यां स्पर्शन । तें दिव्याचें दिव्य संपूर्ण । नाहीं आन सर्वथा ॥ ३१ ॥ यालागीं साक्षात् ब्रह्ममूर्ति । सद्गुरु होय निश्चितार्थी । त्यांचे दर्शनमात्रेंचि नाशती । चिदचिद्ग्रंथि संशयकर्मे ॥ ३२ ॥ इतुकियालागीं निरूपण । साधूनि सद्गुरूसि ब्रह्मपण । सर्व लाभे तद्दर्शनेंकरून । श्रुत्यर्थे पूर्ण ठायीं ठेविलें ॥ ३३ ॥ ऐसें सद्गुरूसि प्रार्थून । साष्टांगें घातलें लोटांगण । तंव करिती कोण्ही आक्षेपन । तें निर्वचन परिसावें ॥ ३४ ॥ नाहो मंगलाचरणानिमित्त । सद्गुरूसि वंदितां येकचित्त । ग्रंथविस्तार बहुत । केला दिसत बहु प्रकारें ॥ ३५ ॥ हा तंव नव्हे ग्रंथविस्तार । हेंचि ग्रंथाचें ग्रंथसार । बोलिजे सद्गुरूचें ऐश्वर्य फार । हेंचि थोर थोराहुनी ॥ ३६ ॥ म्या तंव करूनियां ग्रंथमिस । सद्गुरुमहिमा बोलें सावकाश । गुरूचें ऐश्वर्य निर्दोष । अतिअसोस मी बोलें ॥ ३७ ॥ तेंचि ग्रंथाचेनि मिसेंकरुनी । गुरूचें ऐश्वर्येचि वाखाणीं । काये करीं पुढें जाउनी । मजलागुनी सर्वत्र तेंचि ॥ ३८ ॥ बुद्बुद् जऱ्ही ठायींच स्थिरावला । अथवा वेगें पुढें गेला । तरी तो नव्हे जळावेगळा । न पडे निराळा जळेंविण ॥ ३९ ॥ मंगलाचरण आणि ग्रंथार्थु । अवघा सद्गुरूचा ऐश्वर्यार्थु । सर्वत्र येकुचि परमार्थु । दुजी मातु असेचिना ॥ १४० ॥ येक निर्विकल्पसमाधि । जे कीं निरीहस्थिति निरवधि । तेणेंचि राहावें परमानंदीं । तेचि अवधि परम सुखाची ॥ ४१ ॥ तैसें न करितां समाधान । करावें सद्गुरूचें वर्णन । वाखाणावें ऐश्वर्य पूर्ण । हेंचि समाधान निर्विकल्प ॥ ४२ ॥ निर्विकल्पीं जे आनंदप्राप्ति । तेचि सद्गुरुवर्णनीं घडे स्थिति । याहूनि येथें सुखोपायगति । प्रयास न लगती योगाचे ॥ ४३ ॥ योगाचेनि बळेंकरून । करावें निर्विकल्प समाधान । निरोधोनि इंद्रियांदि मन । स्वरूपस्थ पूर्ण करावें ॥ ४४ ॥ हें सर्व न करितां आटाआटी । मनोवृत्ति न करोनि उफराटी । सद्गुरुदर्शनेंचि सुखकोटि । वर्णनीं भेटि परमानंदाची ॥ ४५ ॥ सद्गुरूचें ऐश्वर्य वर्णितां । लाभे आपुली निजात्मता । नलगे त्यजणें इंद्रियार्था । इंद्रियें सर्वथा कोंडणें नलगे ॥ ४६ ॥ अहो सर्वत्र असे जें सर्वपणें । त्यालागीं कासया समाधि करणें । उघड्या नेत्रींच भोगणें । नलगे घालणें आसनादिक ॥ ४७ ॥ जे सर्वत्र स्वरूप न देखती । जे स्वयें ब्रह्म जाले नसती । साधकपणें आपणा देखती । तयासि प्राप्ति समाधिसाधनें ॥ ४८ ॥ अथवा सर्व जिहीं ब्रह्म देखिलें । स्वयें ब्रह्म असती जालें । परी दुःखदर्शनासि भ्याले । ह्मणोनि निराळे निर्विकल्पें ॥ ४९ ॥ येरव्हीं सर्वत्र जें ब्रह्म देखती । स्वयेंही ब्रह्म जाले असती । तें सविकल्पें निर्विकल्पें राहाती । किंचिदर्थी नव्हती न्यून ॥ १५० ॥ ब्रह्मचि स्वयें जालें आपण तेथ । ब्रह्माहूनी अधिक कोण । ब्रह्म ब्रह्मेसि तरी नव्हे न्यून । तें परिपूर्ण सर्वावस्थां ॥ ५१ ॥ यालागीं जे जे अवस्थे राहिजे । ते ते ब्रह्मत्वेंचि असिजे । तेथें न्यूनाधिक काय बोलिजे । ब्रह्मचि सहजें नित्यरूपें ॥ ५२ ॥ यालागीं तो निर्विकल्प असो । अथवा सत्कर्माचरणीं वसो । सविकल्पें अथवा उगाचि बैसो । परी गुरुभजनीं पैसो बुद्धि त्याची ॥ ५३ ॥ तऱ्ही हाचि हा सर्वत्र आपण । करणीं अकरणीं नव्हे न्यून । ह्मणोनि मुख्य समाधि गुरुभजन । तेंचि आपण सर्वदा करीं ॥ ५४ ॥ यालागीं हें मंगलाचरण । आणीं ग्रंथाचेनि निरूपणें । दोन्हीं ब्रह्मत्वें समाधान । नव्हे न्यून समाधीसी ॥ ५५ ॥ यालागीं विस्तार ह्मणों नये येथ ॥ याचिसहित हा सर्वग्रंथ । येणें सद्गुरुऐश्वर्य बोलिजेत । ब्रह्म सदोदित ग्रंथ हा ॥ ५६ ॥ ऐसें करोनियां गुरुस्तवन । तेंचि ब्रह्मरूप मंगलाचरण । करोनि करीं ग्रंथनिर्माण । श्रोतीं सावधान परिसिजे ॥ ५७ ॥ आतां ऐका ग्रंथव्याख्यान । मागां संपलें आत्मनिरूपण । जें गोडाहूनि गोड प्रकरण । तेथें

१ शंका काढणें. २ बुडबुडा. ३ निरिच्छपणा. ४ फार काळ पर्यंत. ५ त्रास. ६ थोडेसें देखील. ७ पसरो. ८ सत्कर्मांत. ९ दुष्कर्मांत.

आत्मनिरूपण इतुकें केलें ॥ ५८ ॥ वास्तव आत्मस्वरूप जाणोन । तद्रूपें राहावें स्थितीकरून । सर्वत्र बाणे चिदानंदघन । परिपूर्ण पूर्णानंदें ॥ ५९ ॥ ऐसी सर्वत्र स्थिति बाणलिया । जीवन्मुक्ति साधे साधका तया । मग जीवन्मुक्तिही होऊनियां । स्वच्छंदेंकरोनियां वर्ततु असे ॥ १६० ॥ तेचि जीवन्मुक्तिस्थिति कैसी । तेचि जीवन्मुक्तलक्षणेंसी । वसिष्ठ सांगती रघुनाथासी । तेंचि श्रोतियांसि सांगेन मी ॥६१॥ तें महाराष्ट्रभाषेकरून । यथामती कीजैल व्याख्यान । तें श्रोतीं परिसिजे सावधान । करूनियां मन एकाग्र ॥ ६२ ॥ तन्ही आत्मबोध बाणलया दृढ । तेचि जीवन्मुक्ति अति रूढ । त्या जीवनमुक्ताचें लक्षण प्रौढ । अतिसुदृढ वसिष्ठ बोले ॥ ६३ ॥ त्यामाजी श्लोकद्वयेंकरून । बोले श्री. वसिष्ठ बोधलक्षण । आत्मबोध तोही किंलक्षण । तेंही निरूपण परिसिजे ॥ ६४ ॥ मग तया जीवन्मुक्ताचें लक्षण । तेंही कीजेल निरूपण । श्रोतीं परिसिजे सावधान । परिसतां पूर्ण बाणे मुक्ति ॥६५॥

तत्वावबोध एवैकः सर्वाशातृणपावकः । प्रोक्तः समाधिशब्देन न तु तूष्णीमवस्थितिः ॥ १ ॥

तन्ही तत्वबोधुचि येकु । सर्वही आशातृष्णातृणाचा पावकु । समाधिशब्दें तोचि येकु । असम्यक् तूष्णींपणें ॥ ६६ ॥ आतां तत्व तें काय ह्मणिजे । बोध तो कासया बोलिजे । तेंहि सांगों तुज सहजें । श्लोकव्याजें परियेसा ॥ ६७ ॥ अनारोपितरूपतत्व ऐसें । वेदांतीं सिद्धांत केला असे । तेंही रघुनाथा परियेसें । सावकाशें सांगेन ॥ ६८ ॥ तरी जें जें कांहीं दृश्यजात । देहेंद्रियादिसमस्त । श्रुत दृष्ट जें मनोजृंभित । स्थूळसूक्ष्मांत विश्वनामें ॥ ६९ ॥ तें सर्वही ब्रह्मीं आरोपित । ऐसें जाण रामा सुनिश्चित । आरोपित शब्दाचा अर्थ । तुज यथार्थ सांगितला ॥ १७० ॥ अधिष्ठानवस्तु साच असे । तयाच्या अज्ञानें आन भासे । तें आरोपित जाण विश्वासें । रघुवंशें घेईजे ॥ ७१ ॥ जैसें शुक्ति नेणोनि रजत । कीं रज्जु नेणोनि सर्प भासत । ते ते पदार्थ आरोपित । जाण निश्चित वस्तूचा ठाईं ॥ ७२ ॥ तैसें ब्रह्माचा ठाईं जगज्जाळ । आरोपित आहे हें सकळ । ब्रह्म तें अनारोपित निर्मळ । अति निष्कळ स्वतःसिद्ध ॥ ७३ ॥ तया ब्रह्मासि तत्व बोलिजे । तयासीच अपरोक्ष जाणिजे । तयातेंचि अवबोध ह्मणिजे । ज्ञान सहजें तेंचि जाण ॥ ७४ ॥ एवकारें येक बोधचि घेतला । तोचि वन्हिरूपें असे बोलिला । तो जाळी आशातृष्णा सकळा । प्रज्वळ जाला प्रत्यक्‌वृत्ति ॥ ७५ ॥ आशाशब्दें वासनाजाळ । तयाचे संस्कारही सकळ । स्वरूपाआड जे जे समळ । बोलिले सबळ सर्वशब्दें ॥७६॥ तत्वबोध प्रज्वळलिया वन्हि । सर्वही आशा तृणप्राय होउनी । त्याही बोधें सर्व जाळुनी । केलें निर्वाणीं स्वयेंरूप ॥ ७७ ॥ बोधु तोचि समाधि जाण । यया बोला नाहीं आन । परी तूष्णींपणें राहून । समाधिमिरवण येक करिती ॥ ७८ ॥ येकांती तूष्णींभूत बैसला । आणि अंतरीं बोध नाहीं जाला । तो वाउगाचि शीण केला । नाहीं बाणला तत्वबोध ॥ ७९ ॥ येक तो तत्वावबोधें असुनी । विचारतांही जनीं वनीं । वेगळा देहादिकांहुनी । न मिळे मिळणी अहंकाराचे ॥ १८० ॥ जनीं असोनियां जनपणें । नाहीं जयासि जग होणें । जगचि जयासि ब्रह्मपणें । तयें खुणे परिस पां ॥ ८१ ॥

चिदाकारमिदं सर्वं जगदित्येव भावयन् । यस्तिष्ठत्युपशांतस्थः स ब्रह्मकवचः सुखी ॥ २ ॥

चित्‌शब्दें ब्रह्म पूर्ण । तदाकार सर्वही जन । देखोनि राहे शांतान्तःकरण । ब्रह्मकवच जाण तोचि पुरुष ॥ ८२ ॥ ब्रह्माकार जग देखणें । तें जाणिजे ऐसिये खुणे । येणें समानाधिकरणें । येकत्व ह्मणे बोलला ॥ ८३ ॥ तन्ही येकत्वीं समानाधिकरण असे । यथ नाहीं अनारिसें । तसेंचि बाधित देखिलें असे । सिद्धांतमिसें वेदांतीं ॥ ८४ ॥ 'यश्चोरः स स्थाणुरेव'[1] । हें समानाधिकरणचि बरवें । बाधुचि करी स्वयमेव । परी ऐक्यभाव न बोले ॥ ८५ ॥ चोरास्थाणूसि ऐक्यवाद । सर्वथा तत्वें न बोले वेद । तेथें चोराचा करूनि बाध । स्थाणुचि सिद्ध प्रतिपादी ॥ ८६ ॥ तैसेंचि रज्जु सर्पाचां ठाईं । तैसीच जाण रजतशुक्तिकाही । समानाधिकरणेंचि पाहीं । इतर बाधूनिही स्थापिलें येका ॥ ८७ ॥ तैसें ब्रह्माकार जग बोलतां । जगाचा बाधुचि तत्वतां । करूनि बोलिलें निश्चयार्था । वास्तवता ब्रह्मासी ॥ ८८ ॥ जरी जगब्रह्मासि ऐक्य बोलावें । तरी हें सर्वथा न संभवे । जग जड नश्वर स्वभावें । ऐक्य ह्मणावें ब्रह्मेंसि कैसें ॥ ८९ ॥ अशेषें केलें प्रतिपादितां । दोहींसिही अपाड तत्वतां ।

---

१ दोन पदांची विभक्ति एकच असून त्या परस्परांचा वाक्यांत एकमेकांशीं संबंध असतो, तेथें त्या पदांचें 'समानाधिकरण' आहे असें ह्मणतात. उदा०—'जो चोर तोच स्थाणु (ठोंबा).' या वाक्यांत 'चोर' आणि 'स्थाणु' या पदांचें समानाधिकरण आहे.

यालागीं न घडे एकात्मता । बोधें पूर्णता वस्तूसि बोलें ॥ १९० ॥ तैसें चिदाकाराचें व्याख्यान । जग बोध ब्रह्मचि पूर्ण । विश्वचि ब्रह्म हें खूण । सर्वत्र जाण आणावी ॥ ९१ ॥ एवं व्याख्यानमथितार्थ ऐसा । सर्व जग ब्रह्मरूपचि ठसा । देखें ह्मणूनि रघुवंशा । शांति मानसा स्वयें आली ॥ ९२ ॥ सर्व मग आपणचि असे । तेथें त्या शत्रु मित्र कोण भासे । आपणाविण दुजें न दिसे । ह्मणोनि असे शांतबुद्धि ॥ ९३ ॥ तोचि ब्रह्मकवच बोलिजे । ब्रह्मचि कवच जया सिराजे । कवच दुजें नाहींच कीजे । असे सहजें तेंचि तें ॥ ९४ ॥ जो कीं ब्रह्मपणें सर्वदा असे । आपणाविण दुजें न दिसे । तो सुखी हें बोलतां पिसें । लागेल ऐसें दुजेपणें ॥ ९५ ॥ जो कीं सच्चिदानंदानंद परिपूर्ण । तोचि तो एकला एकपरी जाण । तयासि सुखी ऐसें प्रशंसणें । भिन्नपणें कोण करी ॥ ९६ ॥ ऐसा जीवन्मुक्त जो जाला । तो कोण्हे लक्षणीं पाहिजे लक्षिला । तेंही लक्षण असे बोलिला । वसिष्ठ भला ज्ञातारावो ॥ ९७ ॥ तेंचि अष्टादशश्लोंकेंकरून । बोले जीवन्मुक्ताचें लक्षण । त्याचेंही कीजैल व्याख्यान । श्रोतीं सावधान परिसावें ॥ ९८ ॥

सर्वातीतपदालंबी पूर्णेंदुशिशिराशयः । यस्तिष्ठति सदा योगी स एव परमेश्वरः ॥ ३ ॥

तरी सर्वातीत जे संत वस्तु । तोचि अवलंबु जया निश्चितु । पूर्ण चंद्राचियापरी संततु । शीतळार्थु मनींचा ॥ ९९ ॥ आशय जयाचा शीतळ । नेणे द्वैतबुद्धीची तळमळ । ब्रह्मपदीं सुनिश्चळ । तोचि अढळ योगेश्वर ॥ २०० ॥ तऱ्ही तो जाण नित्यमुक्त । देहाकार परमेश्वर संत । तयासि विश्रांति सुनिश्चित । सदोदीत परब्रह्म ॥ १ ॥ तोचि तो जीवन्मुक्त जाण । यया बोला नाहीं आन । आणीक आयिक तयाचें चिन्ह । जो कीं पूर्ण ब्रह्मानंदें ॥ २ ॥

ब्रह्मोपनिषदां तत्वं भावयेदंतरात्मनि । भ्रमतो भुक्तिभाजोपि मुक्तिभाजो न संशयः ॥ ४ ॥

अहो अंतरात्मा जो शुद्धबुद्धि । तेणें शोधूनियां उपनिषदाब्धि । तत्प्रतिपाद्य जें ब्रह्म निरवधि । ते तत्वावबोधी बुद्धि[1] नेहटी ॥ ३ ॥ जें का उपनिषदार्थीं गर्जत । उपनिषदैकगम्य जेथ । तें परब्रह्म सदोदित । तेथें बुद्धि निश्चित सदा जयाची ॥ ४ ॥ स्वरूपानुसंधानीं सुनिश्चळ । ह्मणोनि नाहीं संसारतळमळ । कर्मकर्तृत्वादिक जे मळ । तेथें कर्तृत्वें सकळ न स्पर्शती ॥ ५ ॥ तो बाह्यदृष्टी भोक्ता ऐसा दिसे । परी तो अकर्तेपणें अभोक्ता असे । कर्माकर्म तया न स्पर्शें । भोगपिसें येथें कैंचें ॥ ६ ॥ कर्माकर्म दोषजनित जें सकळ । जेहीं देहजत असे संसारफळ । तें पुण्य तऱ्ही अमंगळ । भवजाळ जेणें होये ॥ ७ ॥ ऐसें पुण्यापुण्यात्मक । दोषरूप जें कर्म सकळीक । तें कांहीं न स्पर्शें तया देख । दृष्टांत श्लोक परिस पां ॥ ८ ॥

यथा पर्वतमादीप्तं नाश्रयंति मृगद्विजाः । तद्वद्ब्रह्मविदो दोषा नाश्रयंति कदाचन ॥ ५ ॥

जैसा पर्वतासि सर्वत्र वन्हि । लागलिया वडवाग्नि । मृग पक्षी वनौकें तत्क्षणीं । पर्वत नयनीं न पाहाती ॥ ९ ॥ ते क्षणीं आश्रित हें काय बोलावें । दिशादिशा पळती स्वभावें । तैसें ब्रह्मविदासि दोषीं न स्पर्शावें । स्पर्शतां स्वभावें भस्म होती ॥ २१० ॥ पर्वता ऐसी अचळ स्थिति । तेथें ज्ञानाग्निज्वाळे तेजोमूर्ति । देखोनि दोषवनौकें दिगंताप्रति । जाती भस्मांतीं लंघूनियां ॥ ११ ॥ कदाचित् कोण्हेकाळीं । दोष न स्पर्शती त्याच्या कपाळीं । ब्रह्मविदपर्वतें ज्ञानानळीं । प्रदिप्तज्वाळीं प्रकाशतां ॥ १२ ॥ अहो आत्मविदा दोष न स्पर्शती । तेथें विस्मय कोण गा रघुपती । परोक्षज्ञानियासिही नातळती । तेथें हे स्थिति काय बोलावी ॥ १३ ॥

संमतिश्लोक ॥ परोक्षमपियज्ज्ञानं शब्ददैशिकपूर्वकम् ॥ बुद्धिपूर्वकृतं पापं कृत्स्नं दहति वह्निवत् ॥

परोक्ष जें कीं शाब्दिक ज्ञान । गुरुमुखें जालें ज्यास संपूर्ण । तेणें बुद्धिपूर्वक केल्या वृजिनं । बाधक त्यालागून घडेना कीं ॥ १४ ॥ परोक्षज्ञानेंचि सर्वातीत । अहंइंद्रियादिकां व्यतिरिक्त । बाणलिया पापातें असे जाळित । ज्ञानसामर्थ्य ऐसें असे ॥ १५ ॥ कापुसातुल्य तें जयापरी । अग्नि जाळूनि भस्म करी । तैसें परोक्ष ज्ञान पापा संहारी । रावणारी जाण तूं ॥ १६ ॥ तेथें अपरोक्ष जो कीं ज्ञानाग्नि । तो ब्रह्मविदाच्या दोषालागुनी । जाळी तेथें कार्मुकपाणी । विस्मय मनीं कोण धरी ॥ १७ ॥ जेव्हांचि अपरोक्ष ज्ञान उदयातें पावलें । तेव्हांचि सकळ दोष त्याचे जळाले । भावनाभ्रांतिभूत पळालें ।

१ शोभतें. २ ज्ञान्यांचा राजा. ३ 'सिजे जी' असा पाठ. ४ 'दांत' असा पाठ. ५ 'भोक्ता' असा पाठ. ६ अरण्यवासी. ७ ब्रह्मज्ञानी हाच पर्वत त्यास. ८ ज्ञानाच्या वणव्यानें. ९ ज्ञान्यास. १० पाप.

ज्ञानानळें दाहिलें होत्सातें ॥ १८ ॥ तंव श्रीराम ह्मणती श्री गुरुमूर्ती । ज्ञानियांच्या ठाई दोष भासती । आणि कामक्रोधादिकही दिसती । ते कोण्हे अर्थी सांगा स्वामी ॥ १९ ॥ वसिष्ठ ह्मणती श्रीरघुनाथा । तेथें रागादि नाहींत गा सर्वथा । परी लौकिक दाविती विपरीतार्था । तेंचि आतां सांगेन २२०

असंत इव संतोपि कोपयंति परं नरम् । निजकर्मगुणोदारं परिपाकं परीक्षितुम् ॥ ६ ॥

आपण तरी स्वतां संत । परी असंतासारिखें दावीत । बलात्कारें कोपवित । कोपयुक्त करिती परां ॥ २१ ॥ कदाचित् ऐसें करी । जेणें परातें क्रोध अंतरीं । उपजे तैसी परीक्षा करी । चित्त अंतरीं केलें असे ॥ २२ ॥ दुसऱ्यासि क्रोध उपजविला । तऱ्ही तो अपमानील आपणाला । त्याच्या विरुद्धवचनीं चित्ताला । क्षोभ लाभे होईल कीं ॥ २३ ॥ निजकर्माचें जें उदारपण । त्याच्या परिपाकपरीक्षेलागून । विरुद्ध दावी जेणें हे जन । विषाद पूर्ण मानिती ॥ २४ ॥ त्याच्या असत्कारें न कुसमुसे । सत्कारेंकरूनि न संतोषे । समानत्वें अतिहर्षे । नाहीं विशेषें रागद्वेषादि ॥ २५ ॥ जऱ्ही संतें सत्कारिला । असंतें असत्कारु केला । तऱ्ही चित्त न पवे हर्षविषादाला । नाहीं देखिला शत्रुमित्र ॥ २६ ॥ आत्मत्वें सर्वत्र असतां स्थिति । नेणें सुहृद्‌अमित्रव्यक्ति । उदास द्वेष्य बंधु नेणती । आणि न देखती आपपर ॥ २७ ॥ दुसरेपणें आत्मांनात । नाहीं तया प्राप्ताप्राप्त । तो समबुद्धि निश्चित । असें भगवंत पार्था सांगे ॥ २८ ॥

संमतिश्लोक ॥ ॥ सुहृन्मित्रार्युदासीनमध्यस्थद्वेष्यबंधुषु । साधुष्वपि च पापेषु समबुद्धिर्विशिष्यते ॥

यालागीं तऱ्ही तो ऐसा असे । परी अज्ञानासि आनचि भासे । तो लीलेकरूनि परीक्षामिसें । आपणा ऐसें जगा दावी ॥ २९ ॥ मनीं जनसंग न करावा । जनीं अपमानचि व्हावा । प्रतिष्ठेचा उबगु जीवा । नाहीं बोलावा देहबुद्धी ॥ २३० ॥ देहबुद्धि जेथें दृढ असे । तोचि मानालागीं उल्हासे । जो आत्मानुभवें संतोषे । तृप्त असे निरंतर ॥ ३१ ॥ तोचि जीवन्मुक्त जाण । ययां बोला नाहीं आन । परी संस्कारेंही गुणादिदर्शन । जेथें जाण दिसतसे ॥ ३२ ॥ जऱ्हीं अज्ञान असे नाशलें । परी प्रारब्धरूपें शेष राहिलें । तेणें रागादिक भासले । असतीं देखिले जीवन्मुक्तीं ॥ ३३ ॥

ज्ञात्वाप्यसर्पं सर्पोत्थं यथा कंपं न मुंचति । विध्वस्ताखिलमोहोपि मोहकार्यं तथात्मनि ॥ ७ ॥

अंधकारीं रज्जु देखिला । तो सर्पबुद्धी दृढ मानिला । निर्धारूनि जंव पाहिला । तंव रज्जुचि संचला रज्जुपणें ॥ ३४ ॥ रज्जु प्रत्यक्षही देखोनी । परी भयकंप न सोडी तिये क्षणीं । तें पूर्वसंस्कारेंकरुनी । राहे क्षण दोनी जयापरी ॥ ३५ ॥ दोरीचें अज्ञान तरी गेलें । सर्पबुद्धीसि ही उबडलें । परी भयकंपादि राहिले । संस्कारें भले दृढ असती ॥ ३६ ॥ तेव्हां सर्पदर्शन तरी नाहीं । परी भयकंपु राहिले त्याचे देहीं । तेणें मागता सर्पभ्रमु कहीं । नुपजे कांहीं कंपादिक ॥ ३७ ॥ कारण नाशल्या अज्ञान । कार्य भयकंप राहे जाण । परी तें येक दोनच क्षण । अतिलंबन नाहींच कीं ॥ ३८ ॥ तैसें जीवन्मुक्ताचें मोहजाळ । निःशेषही नाशलें अखिळ । तथापि मोहकार्य प्रांजळ । संस्कारें सकळ देहांत राहे ॥३९॥ तेंचि अज्ञानशेष बाधित करुनी । राहिलें आत्मविदाच्या मनीं । इतुकेनि भवश्रेणि । भरंवसेनि बाधीतना ॥ २४० ॥ नाहो कारण नाशोनि जाये । मग कार्य चिरकाळ कोठें रीहे । येक दोनच क्षण होये । परी यावद्देह राहे हें कैसें ॥ ४१ ॥ हें बोलिलें तें यथार्थ । संस्कार राहे क्षण दोनपर्यंत । परी जितुका भ्रम तितुकें गणित । जाण निश्चित संस्काराचें ॥ ४२ ॥ सर्पभ्रमु घटिकाभरि जाला । तऱ्ही भयकंप क्षण दोन राहिला । अज्ञानकृत देहादि भ्रमाला । किती कल्प जाला हें न कळे ॥ ४३ ॥ इतुकिया काळसंबंधीं । संस्कारें राहे प्रारब्धावधि । हे क्षणाहूनि अल्प अवधि । संस्कारबुद्धि अति अल्प ॥ ४४ ॥ यालागीं ज्ञानियाचे ठाईं । मोहकार्य देखिलें असे पाहीं । परी तो न बाधिजे तेणें ही । साक्षित्वें सर्वही वर्ततां ॥ ४५ ॥ सर्वातीतपणें प्रकाशत । सर्व साक्षी होऊनियां राहात । सूर्य जैसा साक्षित्वें अलिप्त । तैसा वर्तत असोनि देहीं ॥ ४६ ॥ मिथ्याभूत देखे दृश्यजात । तथापि राही क्रिया करित । इंद्रजाळ मिथ्याही जाणत । पाहे विपश्चित कौतुकेंकरीं ॥ ४७ ॥ संस्कारें साच ऐसेंही दिसे । शुभाशुभविषादसंतोषें । परी तें असत्य ऐसें मानसें । दृढ विश्वासें मानलें जाण ॥४८॥ तेणें रागादिकीं जऱ्ही कार्य केलें । तऱ्ही त्या आत्मानुवृत्त्या बाधिलें । इतुकेनि तया काय आलें ।

---

१ 'तंव वसिष्ठ' असा पाठ. २ उलटा अर्थ. ३ 'क्षोभला भला' असा पाठ. ४ दुःखी होतो. येथें 'विसकुसे' असा समानार्थक पाठ आहे. ५ मिळालेलें व न मिळालेलें. ६ त्रास. ७ सर्पाच्या भ्रांतीनें. ८ अनेक जन्म. ९ भ्रमेला असा पाठ.

किंवा बाणलें कर्तेपण ॥ ४९ ॥ यदर्थी वार्तिककार । करिता जाला दृढ निर्धार । रागादिकीं भ्रमपूर । नये अविचार कामवशें ॥ २५० ॥

संमतिवार्तिक ॥ रागादिदर्शनं यच्च ज्ञानिनोऽपि हि चोद्यते । बाधितस्यैव तत्सूते सदप्युक्ते न दूषणम्

यालागीं कामक्रोधादिक । दिसती जीवन्मुक्तीं सम्यक । परी तयासि नव्हती बाधक । आत्मोन्मुख¹ ह्मणोनियां ॥ ५१ ॥ कामक्रोधरूपें होये मनोवृत्ति । ते·क्षण एक ज्ञानातें आवरिती । तंव सवेंचि ब्रह्माकार होये वृत्ति । ते बाधी सर्वार्थी इतरांसी ॥५२॥ ह्मणोनि रागादिकीं आंवरिलें । जऱ्ही ज्ञान न झांके कांहीं केलें । ज्ञान तेथें बंधन कोणा बोलें । सर्वथा न मिळे जीवन्मुक्ता तया ॥ ५३ ॥

स्फटिकः प्रतिबिंबेन यथा याति न रंजनम् । तज्ज्ञः कर्मफलेनांतस्तथा नायाति रंजनम् ॥ ८ ॥

तेंचि दृष्टांतमुखेंकरुनि । आइक आतां कोदंडपाणी । स्वयेंचि शुद्ध स्फटिक मिळणी । पदार्थ कोण्ही मिळेना ॥५४॥ स्फटिकसंनिधि ठेविलें । जपाकुसुम² तेथेंचि बिंबलें । बाह्यही स्फटिका आरक्त केलें । परी अंतरीं भेदलें नाहींच कीं ॥ ५५ ॥ अंतरीं शुभ्राचा शुभ्रचि असे । बाह्यपणीं आरक्त भासे । तोही अज्ञानें आरक्त दिसे । येरव्हीं वसे जैसा जैसा ॥ ५६ ॥ वास्तव पाहतां बाह्यही नाहीं । तो अंतर्बाह्य शुद्धचि पाहीं । तैसा ज्ञाता कर्में करूनिहीं । न लिंपे कहीं तत्फळें कदा ॥ ५७ ॥ तो कामरोगादिकें³ कर्में करू । परी कर्मफळीं न भेळे भीतरू । बाह्य कर्ता दिसे तोहि संचारू । अज्ञाना निर्धारू मानतसे ॥ ५८ ॥ संस्कारें तया विपरीतचि कळे । आनचि देखती तयाचे डोळे । हें जगामध्यें भ्रममेळें । असो तो बोले भलतेंचि ॥ ५९ ॥ तो कर्मकर्त्ता ऐसा आवडे । परी तो अकर्त्ता सर्वांपाडें⁴ । आपुलिया साक्षित्वा निवाडें । घडफुडें⁵ जाणतसे ॥ २६० ॥ यालागीं जऱ्ही तो कर्में करी । तरी न बुडे कर्मफळसागरीं । तो अकर्त्ता सर्व प्रकारीं । अंतर्मुखें करी लिंपेना ॥ ६१ ॥

अंतर्मुखतया तिष्ठन्बहिर्वृत्तिपरोपि सन् । परिश्रांततया नित्यं निद्रालुरिव लक्ष्यते ॥ ९ ॥

सर्वदा जो अंतर्मुख राहिला । तरी कर्त्ता नव्हे यया बोला । तो बाह्यवृत्तीवरी जरी आला । दृष्टांत भला परियेसीं ॥ ६२ ॥ निद्रेंहूनि जो उठला । परी निद्रासुखें असे भरला । कां निद्रा प्रारंभतां तयाला । सुखकल्लोळामाजी असे ॥ ६३ ॥ त्याचें मन निद्रासुखें भरलें । संस्कारें बाह्यकर्म असे उरलें । परी आसक्ति नाहीं ना क्षोभलें । मन मुरालें परमसुखें ॥६४॥ आतां अंतर्मुख या शब्दाचा अर्थ । तोही सांगों पां यथार्थ । सर्वांचें अंतर ब्रह्म सदोदित । बाह्य तें निश्चित दृश्य स्फुरे ॥ ६५ ॥ वस्तूवेगळें जें जें भान । तें तें बाह्यप्रपंच दृश्य जाण । अहंकारबुद्ध्यादिक मन । आणि सर्वही जन स्थूळसूक्ष्म ॥६६॥ हे सर्व बाह्य पदार्थ । ते ते ब्रह्माहूनि व्यतिरिक्त । ह्मणोनि ते नाशिवंत । असती असंत सर्वदा ॥ ६७ ॥ यालागीं सर्वांचें जें अंतर । तें परब्रह्म साचार । बाह्यत्यागें तयासमोर । होये निरंतर ते अंतर्मुखता ॥ ६८ ॥ बाह्य देखोनि प्रातिभासिक । परी अधिष्ठानीं दृष्टि सम्यक् । बैसे जरी निष्टंक । अंतर्मुख तेंचि जाण ॥ ६९ ॥ बाह्यइंद्रियव्यापारेंकरुनी⁶ । मन परिश्रांत जालें भ्रमणीं । विश्रांति पावलें अधिष्ठानीं । नुठे तेथूनि उठवितांही ॥२७०॥ ऐसा स्वस्वरूपीं असता । बाह्य व्यापारेंही व्यापारतां । तो तेथिचा नव्हे गा सर्वथा । अनुभवपंथा आश्रायिला ॥ ७१ ॥ जैसा निद्राभरें जो दाटला । पूर्ण निद्रिस्तु तरी नाहीं जाला । तो अंतर्मुखें असे सुखावला । बाह्य व्यापाराला व्यापारें ॥ ७२ ॥ बाह्य व्यापारवर्त्तनादि करी । परी सुखें सुखावला अंतरीं । तैसा ज्ञानी अंतःसुख सेजारीं । पहुडूनि करी बाह्य व्यापार ॥ ७३ ॥ इतुकेनि सुख नाहीं भंगलें । आपुलें आत्मत्व नाहीं गेलें । असंगपण नाहीं उगवलें । कोणें नेलें पूर्णत्व ॥ ७४ ॥ कर्म करूनि तो अकर्त्ता । भोग भोगोनि तो अभोक्ता । इंद्रियमेळेंकरूनि वर्त्ततां । न भैळे असंगता जयाची ॥ ७५ ॥ त्या जीवन्मुक्ताची स्थिति सांगणें । तें एकेक किती बोलणें । तो आत्मसुखें तोषळेंपणें । काय नेणे वर्तलें देहीं ॥ ७६ ॥ तो देहीं असोनि देहातीतु । कर्में करूनि तत्फळें अलिप्तु । निर्विकार असंग सदोदीतु । आनंदभरितु पूर्णत्वें ॥ ७७ ॥ नाहो जयाची द्वैतबुद्धि गेली । अद्वैतबुद्धि स्थिरावली । तयासिही कर्त्तव्यता उरली । हे तंव बोली अघटमान ॥ ७८ ॥ अहो दुसरें जेथें न स्फुरे । तेथ कर्म कैचें करणें उरे । द्वैतबुद्धीनें निर्धारें । कर्म सपुरें घडों शके ॥ ७९ ॥ ऐसिया आक्षेपासि उत्तर । देता श्रीवसिष्ठ चतुर । सांगे याचाही प्रकार । होऊनि एकाग्र ऐक रामा ॥२८०॥

---

१ आत्म्याकडे वृत्ति जडलेला. २ जास्वंदीचें फूल. ३ इच्छा आणि प्रीति यांनीं. ४ सर्वांपेक्षां. ५ बरोबर. ६ कर्मेंद्रियांनीं संयोग केल्यामुळें. ७ निरिच्छपणा. ८ कधीं न होण्यासारखी.

जेवीं द्वैतदृष्टि अन्ही गेली । ज्ञप्तिकस्थिति बाणली । तन्ही कर्तव्यता असे उरली । संस्कारें भली प्रारब्धशेषें ॥ ८१ ॥ अज्ञान जन्ही निःशेष सरे । तन्ही प्रारब्धबोधितशेषसंस्कारें । तेणें इंद्रियप्रमुख व्यवहारे । प्रारब्ध खरें चेष्टवी ॥ ८२ ॥

अद्वैते स्थैर्यमायाते चित्ते च प्रशमं गते । योगिनः कर्म कुर्वंति पश्यंति स्वप्नवज्जगत् ॥ १० ॥

अद्वैतब्रह्मस्थिति अढळ जाली । द्वैतबुद्धि निःशेष विराली । तन्ही योगिये कर्मकल्लोळीं । पोहती मेळीं अनुभवाचिये ॥ ८३ ॥ जगस्वप्न संभ्रमटवाळ । ते देखती जैसें मृगजळ । संस्कारें सकळ । कर्म प्रांजळ करिताती ॥ ८४ ॥ कर्ता कर्म आणि करण । हे त्रिपुटी न स्फुरतां कर्माचरण । जीवन्मुक्तासि घडे जाण । द्वैत स्वप्न देखताती ॥ ८५ ॥ परी यथार्थ न मानिती व्यवहार । आग्रहें न करिती कर्माचार । अहंकर्तृत्वादिसंचार । गेला समग्र आत्मत्वें ॥ ८६ ॥ यथाकाळीं विधि पाळिती । निषेधातें निषेधें गाळिती । उभयतां गुणागुण न देखती । अर्भकस्थिति हेतूविण ॥ ८७ ॥ विधि पाळिलिया गुण होईल । निषेधें दोष मज जडेल । ह्मणौनि प्रवृत्तिनिवृत्तिटवाळ । नसोनि सकळ प्रवृत्ति दिसे ॥ ८८ ॥ सहस्र जन्मांचिया भरोवरी । तत्कर्मेचि केलीं सहस्रवरी । निषेध गाळी त्याभीतरीं । तेणें पुरी चित्तशुद्धि जाली ॥ ८९ ॥ तेणेंकरूनि जालें ज्ञान । ज्ञानोत्तरकाळीं तेंचि आचरण । संस्कारशेषेंचि जालें जाण । करी ह्मणौनि तेंचि सदा ॥ २९० ॥ जैसी चेष्टा बाळकाची । स्वभावें येकें मोडी येकें रची । परी उभयतां फळाची । नाहीं इच्छेची सोय जया ॥ ९१ ॥ तैसें ज्ञानीही कर्मं करिती । परी कर्मीं कर्मफळाची नाहीं आसक्ति । करितांही न मोडे जयाची स्थिति । असंगगति अखंड ॥९२॥ येक ज्ञानी कर्में करिती । एक ते निर्विकल्पेंचि असती । येक ते कांहींच न करिती । राज्यभोग पावती भूमिकाभेदें ॥ ९३ ॥

संमतिश्लोक । प्रारब्ध कर्मनानात्वाद्बुद्धानामन्यथाऽन्यथा । वर्तनं तेन शास्त्रार्थे भ्रमितव्यं न पंडितैः ।
स्वस्वकर्मानुसारेण वर्त्तते च यथायथा । अविशिष्टः सर्वबोधः समामुक्तिरितिस्थितिः ।

त्या ज्ञानाचीया सप्तभूमिका । असती गा रघुनायका । त्यामाजी प्रथम तीन देखा । अज्ञानभूमिका जाणाव्या ॥ ९४ ॥ जो प्रस्थान करी गमनासी । तो गेलाची ह्मणती काशियेसी । तैसा प्रवर्तला जो शुभेच्छेसी । ज्ञान तयासि प्राप्तचिकीं ॥ ९५ ॥ ह्मणौनि जन्ही तिनी भूमिका । तन्ही ज्ञानभूमीच सकळिका । ताटीं बैसतसे वो जेविला देखा । हे प्रतीति लोकां होताचि कीं ॥ ९६ ॥ चौथीपासूनि सातवरी । जीवन्मुक्तिभूमिका अवधारीं । परी भूमिकांच्या भेदांतरीं । सर्वांपरी ज्ञानचि भेदे ॥ ९७ ॥ ज्ञान तें अखंड येक विध । तेथेंचि दिसती भूमिकाभेद । भूमिकाभेदें ज्ञान विशद । न पवे बाध रघुनाथा ॥ ९८ ॥ सुखदुःखाचें भान न व्हावें । अखंड निरतिशय सुख भोगावें । ऐसिये भरे जो हांवे । तेणें साधावें सप्तभूमींतें ॥ ९९ ॥ जो सप्तभूमि पावला । तो दुःखादि दर्शना मुकला । सुखें सुखरूपचि जाला । न पवे दुःखाला देहवरी ॥ ३०० ॥ तो परें प्रबोधिलियाही नुमजे । सुखें पहुडला सुखसेजे । येर सुखदुःखादि सुझे । परी आनंदसेजे न संडी ॥ १ ॥ दोघांसि संसृति निमाली । नाहीं स्वात्मसुखाची हानि जाली । येका सुखदुःखें दर्शना आलीं । भूमिकामेळीं रघुराया ॥ २ ॥ भूमि चौथी आणि पांचवी । व्युत्थानकाळीं सुखदुःखें अनुभवी । येरव्हीं ब्रह्मानंदसुखानुभवीं भोगिजे सर्वां ज्ञानवंतीं ॥ ३ ॥ षष्ठी सप्तमी भूमिकेसी । सर्वथा नेणे सुखदुःखें कैसीं । परें बोधिलियाही जयासी । देहस्मृतीसि न येती ॥ ४ ॥ तुरीय पंचमी भूमिकेसी । सुखदुःखदर्शनें नेमेसी । होती परी अनुभवबळें तयांसी । ऐक्यतेसि न मिळे ॥ ५ ॥ अज्ञानी जैसा लुढोनि जाये । तैसा ज्ञानी सर्वथा नोहे । सर्वांचा साक्षी होऊनि राहे । आपणांवरी तें सुखदुःख नेघे ॥ ६ ॥ विषयसुखें ना सुखावे । दुःखें करूनि ना दुःखावे । अप्राप्तिची चाड न पवे । परिपूर्ण स्वभावें ह्मणौनियां ॥ ७ ॥ प्रारब्ध भोग देहाचे माथां । आपण विदेही अकर्ता अभोक्ता । ऐसा स्वानुभवें सर्वां रिक्तता । निःसंगता भोगितु ॥ ८ ॥ यालागीं दोघांचें सुख येक । दोन्ही पूर्णानंद सम्यक् । परी विशेष तो इतुकाचि देख । भानसुखदुःख इतरांसी ॥ ९ ॥ ऐसे आइकोनि भूमिका भेद । भेदें वर्तनही कळलें विशद । यालागीं रघुराज अतिप्रबुद्ध । परमानंद पावले ॥ ३१० ॥ आनंदें ह्मणे श्रीगुरुराया । अत्यंत सुख जालें हें आयिकूनियां । परी भूमिकाभेद स्वामिया । आयिकावया उत्कंठित मी ॥ ११ ॥ ते उत्कंठाडोहळे पुर-

१ आत्म्याहून जग निराळें असा भ्रम. २ प्रारब्धकर्माचा क्षय भोगानेंच होतो म्हणून. ३ सर्व इंद्रियें. ४ भ्रमाचें कार्य. ५ सात पाहिल्या. ६ "बैसतसेवो" असापाठ. ७ जन्ममरण. ८ देहावर आल्यावेळीं.

ावया । समर्थ कोण तुजवांचूनिया । तें कृपेकरूनि सांगावया । करीं स्वामिया कृपा मज ॥ १२ ळळे बाळाचे पाळणीं । दुजें समर्थ कोण माउलीवांचुनी । तेचि तूं कृपाळ जननी । अपत्यालागूनि प्रसन्न होई ॥ १३ ॥ स्वयें आपण ज्ञातयां वरिष्ठ । रघुराज वसिष्ठाहूनि श्रेष्ठ । तो होऊनियां निकृष्ठ । सद्गुरु श्रेष्ठ स्वयं करी ॥ १४ ॥ अतिविनयेंकरूनि विज्ञापन । सद्गुरूसि करी प्रसन्न । लीलाविग्रहाचें संपादन । विडंबन स्वयें दावी ॥ १५ ॥ असो ते विनवणीचसाठीं । श्रीवसिष्ठ सप्रेमें उठी । ह्मणे सप्तभूमिकांची परिपाठी । तुज जगजेठी सांगेन ॥१६॥ येकि येकि भूमिका सांगतां । चमत्कार होईल रघुनाथा । ते आपुले ठाई विचारितां । नसेल तत्वतां ते साधावी ॥ १७ ॥ ऐसें उत्तरोत्तर भूमिका साधोन । राहावें स्वस्वरूपीं स्थिरावोन । तें जीवनन्मुक्ति निर्वाण जाण । नाहीं कारण तियेवरी ॥१८॥ ऐसिया भूमिकांचें श्रवण । करीं करूनि एकाग्रमन । हेंचि श्रवणाचें श्रवण । नित्य साधन श्रवणार्थीं ॥ १९ ॥ ऐसें बोलतांचि वसिष्ठमुनि । श्रीराम सर्वांगें सावध श्रवणीं । तेंचि निरूपण श्रोतेजनीं । सावधानीं परिसिजे ॥ ३२० ॥

संमतिश्लोक श्रीराम० । सप्तानां योगभूमीनामायासः क्रियते कथम् । कीदृशानि च चिह्नानि भूमिकां प्रति योगिनः ॥

जिये ठाई योगिये रमती । जे कीं चिदानंदघनमूर्ति । तो श्रीराम वसिष्ठप्रति । करी विनंति विनयवृत्या ॥ २ ॥ ह्मणे जी वसिष्ठा गुरुवर्या । उपाय सांगावा भूमिका साधावया । आणि अभ्यासुही याचा स्वामिया । जेणें आपैतिया होती भूमि ॥ २२ ॥ आणि तया भूमिकांप्रति । चिन्हें कैसीं उदय पावती । तें कृपा करूनि सद्गुरुमूर्ती । मजप्रति सांगिजो कां ॥२३॥ ऐसा प्रश्न करितां श्रीवसिष्ठासी । मनीं संतोषला तो महा ऋषि । ह्मणे सांगेन आयिकें भूमिकांसी । आणि साधनांसि प्राप्तीचिया ॥२४॥

संमतिश्लोक श्रीवसिष्ठउवाच ॥ ज्ञानभूमिः शुभेच्छाख्या प्रथमा समुदाहृता । विचारणा द्वितीया च तृतीया तनुमानसा ॥
सत्वापत्तिश्चतुर्थीस्यात्ततोऽसंसक्तिनामिका । पदार्थाभाविनी षष्ठी सप्तमी तुर्यगा स्मृता ॥
आसामंते स्थिता मुक्तिस्तस्यां भूयो न शोचति । एतासां भूमिकानां त्वमिदं निर्वचनं शृणु ॥

तंव वसिष्ठ ह्मणती तमालश्यामा । राजीवलोचना पुरुषोत्तमा । जानकीवल्लभा निष्कामकामा । उत्तमोत्तमा रघुवर्या ॥ २५ ॥ आनंदरूपा चिदेकघना । लीलाविग्रहा दीनोद्धारणा । ज्ञानसंपत्तिउद्दीपना । रघुनंदना परियेसीं ॥२६॥ तऱ्ही ज्ञानभूमिका सप्त आहेति । आयिक त्यांच्या नामांची वित्पत्ति । तऱ्ही शुभेच्छा ते प्रथमा बोलती । दुसरी रघुपती विचारणा ते ॥ २७ ॥ तनुमानसा तिसरी भूमिका । चौथी ते सत्वापत्ति देखा । पांचवी असंसक्तिनामिका । षष्ठी ऐका रघुवर्या ॥ २८ ॥ साहावी ते पदार्थभाविनी । सातवी तुर्यगा निर्वाणी । तया सप्तांमाजी कोदंडपाणी । कोडिसवाणी मुक्ति वसे ॥ २९ ॥ मुक्तीचा ठाई रघुनाथा । संसारदुःख नाहीं गा सर्वथा । ह्मणोनि भूमिकांची आतां । सांगों तत्वतां कर्तृत्वस्थिति ॥ ३३० ॥ पहिली जे शुभेच्छा बोलती । तियेचें स्वरूप आयिक पां रघुपती । आणि कोण साधनें तेथें असती । तेंही गति अवधारीं ॥ ३१ ॥

संमतिश्लोक ॥ प्रवृत्तश्च निवृत्तश्च भवति द्विविधः पुमान् । स्वर्गापवर्गोन्मुखयोः शृणु लक्षणमेतयोः ।
कियत्तनामनिर्वाणं वरं संसृतिरेव मे । इति निर्णीय कर्ता यः स प्रवृत्त उदाहृतः ॥

तरीं यया जगामाझारी । द्विविध पुरुष गा अवधारीं । प्रवृत्त निवृत्त दोनी परी । असे व्यवहारीं वर्तत ॥ ३२ ॥ आतां प्रवृत्तनिवृत्तांचीं लक्षणें । तें सांगेन ऐकें एकाग्रमनें । तरी सकाम धर्मानुष्ठान करणें । स्वर्गाकारणें आणि इहभोगा ॥ ३३ ॥ तो ह्मणे जे निवृत्तिकर्में करिती । ते व्यर्थचि हा शिणु पावती । कर्में करूनि वृथा दवडिती । नाहीं प्राप्ति विषयसुखाची ॥३४॥ जिये कर्मीं विषयसुख नाहीं । तें कर्म करूनि प्रयोजन काई । यालागीं आत्मा श्रेष्ठ नोहे कांहीं । पुरुषार्थ सर्वही प्रवृत्तिकर्मीं ॥ ३५ ॥ प्रवृत्तेंचि कर्में आचारितां । विषयसुखाची प्राप्ति विशेषता । इहलोकीं आणि स्वर्गाच्या माथां । रंभादिवनिता सुखभोगेंसी ॥ ३६ ॥ नानापरींचीं सुखें भोगणें । तोचि आह्मीं पुरुषार्थ साधणें । यावेगळें तें व्यर्थ शिणणें । काळक्षेपण वृथाचि पैं ॥ ३७ ॥ ऐसा दृढ निश्चय करुनी । सकामें प्रवृत्तिकर्में करी चित्त देउनी । तो तो प्रवृत्त पुरुष गा कार्मुकपाणी । आयिकें करणी निवृत्ताची ॥ ३८ ॥

संमतिश्लोक ॥ चलार्णवयुगच्छिद्रकूर्मग्रीवाप्रवेशवत् । अनेकजन्मनामंते विवेकी जायते पुमान् ॥
असारा बत संसारव्यवस्थालं ममैतया । किं कर्मभिः पर्युषितैर्दिनं तैरेव नीयते ॥

१ पुरविण्यांत. २ अनुक्रमें. ३ नम्रपणानें. ४ प्राप्त. ५ पहिली. ६ लज्जित, गुप्तरूपानें असा भाव. ७ रंभा, उर्वशी वगैरे अप्सरा, ८ वेळ घालविणें.

क्रियातिशय निर्मुक्तं किं स्याद्विश्रमणं परम् । इति निश्चयवान्योंतः स निवृत्त इति स्मृतः ॥
कथं विरागवान् भूत्वा संसाराब्धिं तराम्यहम् ॥

तऱ्ही तो संसारदुःख तें आठवी । संसार देखे जळती अटवि । तेणें पोळत जाये अति जीवीं । ह्मणे न व्हावी मागुती हे दशा ॥ ३९ ॥ तें दुःख मानितसे कैसें । दोन्ही समुद्र उचंबळती जैसे । येका भेणें जों पळों बैसे । तंव दुसरा दिसे पुढें थोरू ॥ ३४० ॥ दोन्हींचां संधीं सांपडला । अतिशयें तळमळूं लागला । तंव पुढें कूर्म जातां देखिला । भयें वळघला तयावरी ॥ ४१ ॥ कूर्में बाहेर काढिली मान । चालिला तियेवरी बैसोन । तेणें बेटीं घातला नेऊन । तेंहीं क्षणीं बुडों पाहे ॥ ४२ ॥ तो कूर्म गेला समुद्राभीतरीं । तो येकला राहिला बेटावरी । तों बुडवावया येती लहरि । येरा सिंयारी भयाची ॥ ४३ ॥ जिकडे पाहे तिकडे उदधि । लहरियांची अतिसमृद्धि । समुद्र गडाडे व्याकुळ बुद्धि । न दिसे संधी पळावया ॥ ४४ ॥ तेथेंही जळचरांचे वळसे । तेणे भयें येताती उमासे । पुढें प्रवेश ना मागें निर्गम नसे । दुःख अतिसोसें पावतु ॥ ४५ ॥ हृदय पिटी रडे आर्ती । दुजें नाहीं जें करी उपशांति । तें दुःख सांगेल कोणाप्रति । तळमळी चित्तीं अद्भुत ॥४६॥ येक उदधि वोलांडुनि आला । तंव दुसरियाचा वेढा पडला । तेथेंही वर्तें दुःखमेळा । नव्हे निराळा कोण्हेपरी ॥ ४७ ॥ मागें संसाराब्धि टाकुनी । तंव पुढांही भवार्णवप्रवेशनीं । मध्येंही दुःख पावे निर्वाणी । विश्रांति क्षणीं असेचिना ॥४८॥ पूर्वजन्मीं जरामृत्युदुःखपरंपरा । पावला येकावरी एक असारा । पुढें होणारांमाजी बाल्यादि जरा । देखे थारा दुःखासी ॥ ४९ ॥ वर्त्तमान असे जिये ठायीं । तंव तेथेंही यमयातना दारुण पाहीं । ते चुकल्या गर्भवासामध्येंही । यातना देहीं अनावर ॥ ३५० ॥ ऐसिया जन्ममरणाच्या कोडी । दिसती संसाराचिया बांदवडी । ऐसी संसाराची घडामोडी । होती कोडी असंख्य कल्प ॥ ५१ ॥ ऐसीं मागील दुःखें स्मरे । विश्रांतिलागीं सर्वदा झुरे । ह्मणे किमर्थ दुःखार्जन पुरे । येणें संसारें साधावें ॥ ५२ ॥ ऐसि या भवार्णवामाझारी । नानापुण्यपापें भरोवरी । करितां सद्बुद्धि तयातें वरी । मग निर्धारी निश्चळ ऐसा ॥ ५३ ॥ असंख्य जन्मांचे अंतीं । विवेकी होय तयाची मति । मग प्रवर्त्ते या विचाराप्रति । ह्मणे संसृति पुरे आतां ॥ ५४ ॥ अनेक उत्तम जन्म जऱ्ही जाले । तऱ्ही येथें दुःखचि भोगिलें । आतां पुरे हें मन विटलें । काय साधिलें इतकां जन्मीं ॥ ५५ ॥ आतां पुरे हें पुन्हा न करीं । मागुता न प्रवर्त्तें संसारीं । प्रवृत्तिकर्मेंही दुःख भारी । सर्वथा न करीं असार हें ॥ ५६ ॥ सार नाहीं जया आंत । तें कर्मादि असार समस्त । बलात्कारें दुःख जोडिजत । आणि कुश्चित सर्वार्थीं ॥ ५७ ॥ ऐसेनिही स्वर्गादिफळ जालें । कां इहलोकींचे विषय फळलें । तेही आगमापायी भलें । काय आलें हातासि तेथें ॥ ५८ ॥ देहवर्त्तमानें विषयो सरे । तेव्हां तेणें दुःखें अतिशयें थोरें । तेचि विषय स्मरस्मरों मरें । आद्यंत विसरें अतिदुःखें ॥ ५९ ॥ अथवा विषय असतां होये देहांतु । तरी तो विषय कोण्हें भोगिजतु । एवं दोहींचिपरी नाडतु । नाहीं अंतु त्या दुःखासी ॥ ३६० ॥ जेणें कर्मफळें दुःख होये । तें फळाचि परी सुफळ नोहे । दुःखरूप फळ पावोनि काये । असार होताहे यालागीं ॥ ६१ ॥ यदर्थीं श्रुतिही असे बोलत । ह्मणे कर्म करूनि जे जे लोक प्राप्त । ते सर्वथा क्षयातें पावत । अंतवंत ह्मणोनियां ॥ ६२ ॥

संमतिश्रुति ॥ ॥ तद्यथेह कर्मचितो लोकः क्षीयते एवमेवामुत्र पुण्यचितो लोकः क्षीयत इति ॥
संमतिश्लोक ॥ ॥ ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशंति ॥

जैसे इहलोकींचे भोग नाशती । ते प्रत्यक्ष आपणातें दिसती । तैसेचि परलोक क्षय पावती । निश्चयार्थीं जाण तूं ॥ ६३ ॥ ऐसीं असार कर्में करुनी । दिवस घालावे शून्यपणीं । जैसीं हरिणें महावनीं । करिती हिंडोनि काळक्षेपु ॥ ६४ ॥ आणि जे आत्मविचार न करिती । ते लोक अंधतमामाजी पडती । जेथ नाहीं सूर्याची गति । ते आत्महनन हें श्रुति स्वयें बोले ॥ ६५ ॥

संमतिश्रुति ॥ ॥ असूर्या नाम ते लोका अंधेन तमसा वृताः ॥ तांस्ते प्रेत्याभिगच्छंति ये के चात्महनो जना इति ॥ न चेदिहावेदीन्महती विनष्टिरिति ॥

यालागीं जे आत्मयातें नेणती । ते आत्महननें नाशु पावती । ह्मणोनि तो आत्मविचाराप्रति ।

---

१ अरण्य. २ 'शिसारी' असा पाठ. ३ जाण्याचीवाट. ४ निवारण. ५ ह्मातारेपण, मृत्यु इत्यादि अनेक दुःखें. ६ मोठाल्या. ७ बंदिखान्यांत. ८ येणारे आणि जाणारे. ९ आत्महत्या.

प्रवर्ते सर्वार्थी नेटेंपाटें ॥ ६६ ॥ ह्मणोनि नित्य नावडे कर्मसंगाति । निःशेष उडाली विषयांची प्रीति । ऐसी वैराग्याची स्थिति । साधनें दिसती यामाजी तीं हीं ॥ ६७ ॥ नित्यानित्यवस्तुविवेक । इहामुत्रार्थफलभोगविरागादिक । तिसरें तें शमादिषट्क । यांत सम्यक दिसतसे ॥ ६८ ॥ चौथी ते जाण मुमुक्षुता । चौथें साधन सीताकांता । वैराग्य बाणलें ह्मणे आतां । हे संसारवेथा तरूं कैसी ॥ ६९ ॥ आतां यया भवार्णवा आंत । विचारितां दुःखचि समस्त । तरी विश्रांति ते काय येथ । विचारस्थ स्वयें होत ॥३७०॥ ऐसा अंतरीं निश्चय असे करितु । ह्मणे हा भवाब्धि उतरूं कवणें हेतु । मुक्त व्हावें ऐसें ईच्छितु । जाण निश्चितु निवृत्त तोची ॥ ७१ ॥ तोची मुमुक्षु तोचि निवृत्त जाण । हेंचि आणावयाचें लक्षण । मुमुक्षुतेचें जें दृढपण । तेंचि जाण शुभेच्छा गा ॥७२॥ हे प्रथम भूमिका गा रघुपती । शुभेच्छा इयेतें ह्मणती । आतां सांगों इची वर्त्तती स्थिति । तेंचि ह्मणती साधनें तिचीं ॥ ७३ ॥ अगा संसाराब्धि कैसा तरेन । यया विचारीं प्रवर्त्तला संपूर्ण । तेंचि शुभेच्छा जाण । आधिक वर्त्तन सांगों तुज ॥ ७४ ॥

संमतिश्लोक ॥ ॥ विरागमुपयात्यंतर्वासनास्वनुवासरम् ॥ क्रियासूदाररूपासु क्रमते मोदतेन्वहम् ॥
ग्राम्यासु जडचेष्टासु सततं विचिकित्सति ॥ नोदाहरति मर्माणि पुण्यकर्माणि सेवते ॥
अनन्योद्वेगकारीणि मृदुकर्माणि सेवते ॥ पापाद्बिभेति सततं न च भोगमपेक्षते ॥
स्नेहप्रणयगर्भाणि पेशलान्युचितानि च ॥ देशकालोपपन्नानि वचनान्यभिभाषते ॥
तदाऽसौ प्रथमामेकां प्राप्तो भवति भूमिकाम् ॥ मनसा कर्मणा वाचा सज्जनानुपसेवते ॥
यतः कुतश्चिदानीय ज्ञानशास्त्राण्यवेक्षते ॥ एवं विचारवान्यः स्यात्संसारोत्तरणं प्रति ॥
स भूमिकावानित्युक्तः शेषस्त्वार्य इति स्मृतः ॥

सर्वत्र विषयीं गेली प्रीति जयाची । हेचि व्यक्ति विरागाची । अंतर्वासना सकळ कर्माची । गेली साची प्रवृत्तिकर्मी ॥७५॥ जंव जंव क्रियेचा त्यागु करी । तंव तंव सुख पावे अंतरीं । ग्राम्यचेष्टा सर्वप्रकारीं । तो अव्हेरी व्यर्थ ह्मणोनि ॥ ७६ ॥ ग्राम्यविचारीं प्रवर्त्तता । सद्विचार प्रवर्ते त्याचिया माथां[1] । ह्मणे हे व्यर्थ काळक्षेपता । पाप सर्वथा व्यर्थ विलापी ॥ ७७ ॥ ईश्वरनिष्ठेवांचून । सर्व व्यर्थ प्रपंचव्यवहरण । ह्मणोनि देतसे उपेक्षून । विचारस्थ पूर्ण स्वयें होवे ॥ ७८ ॥ कोण्हाचेंही वर्म न बोले । प्रांजळपणेंचि स्वयें चाले । निवृत्तिकर्मे जें पुण्य कळे । त्यासिच आतळे करणीयत्वें ॥ ७९ ॥ तेंही कर्म नव्हे कठीण । अतिमृदु दुःखहरण । कोण्हासिही उद्वेग नव्हे दारुण । सुखकारण सर्वांसि जें ॥३८०॥ निरंतर पापाचें भय धरी । पाप न प्रवेशे जयाचे अंतरीं । भोगाची अपेक्षा सर्वांपरी । नाहीं क्षणभरी इंद्रियभोगाची ॥ ८१ ॥ सकळ जनांसि मृदुपण । स्नेहपूर्वक बोले वचन । अति सादरें नम्रतेंकरून । सुंदर पण अर्थगांभीर्य ॥ ८२ ॥ देहकाळासि उचित । तदनुसार बोले वचनामृत । तेव्हां तो जाण निश्चित । जाहाला प्राप्त प्रथम भूमिका ॥८३॥ अथवा मनसा[3] वाचा कर्मणा । शरण जाय जो सज्जना । आणि सद्गुरूचिया चरणा । अनन्यशरण जो जाला ॥ ८४ ॥ पूर्वी सद्गुरुही न सेवितां । परी साधुसंगीं अतिप्रीति चित्ता । अध्यात्मशास्त्रें मेळवूनि अतिप्रयत्नता । विचारु तत्वतां करी स्वयें ॥ ८५ ॥ ऐसा संसारतरणाप्रति । विचार करी अहोराति । तोचि भूमिकावंतु गा रघुपती । येर ते ह्मणती आर्य ऐसें ॥ ८६ ॥ जो कीं सन्मार्गातें भजतां । परी उपजली नाहीं मुमुक्षुता । तोचि आर्य गा श्रीरघुनाथा । मुमुक्षु तो सर्वथा शुभेच्छावंतु ॥ ८७ ॥ तो ह्मणे मुमुक्षुचिपरी येथें असोन । साधावें त्यां कार्य कोण । शास्त्रसज्जनेंसि संसारतरण । साधुसंग पूर्ण वैराग्ययुक्त ॥ ८८ ॥ हें शुभेच्छाभूमीचें लक्षण । आणि सांगितलें साधनवर्त्तन । दुसरी विचारणा ते ऐसी जाण । आइकें खूण पूर्ण प्रज्ञा ॥ ८९ ॥ प्रथम भूमिकेपासून । वैराग्य सर्व भूमींस जाण । पाहिजे गा अतिनिःशेष निर्वाण । हे सर्वत्र खूण जाणावी पां ॥ ३९० ॥ आतां दुसरी भूमिका विचारणा । तेही आइकें गा रघुनंदना । सांगों तियेच्याही लक्षणा । जेणें मना संतोष होये ॥९१ ॥

संमतिश्लोक ॥ शास्त्र सज्जनसंपर्कवैराग्याभ्यासपूर्वकम् । सदाचारप्रवृत्तिर्या प्रोच्यते सा विचारणा ॥

अगा पूर्वोक्तें[4] साधनतुष्टयसंपन्न । वैराग्यवंत अतिनिर्वाण । जालिया सद्गुरूसि शरण । करी सेवन अनन्यभावें ॥ ९२ ॥ ब्रह्मनिष्ठ आणि शास्त्रज्ञ । हेंचि सद्गुरूचें सर्वत्र लक्षण । मागां निरूपण

---

१ शम, दम, उपरति, तितिक्षा, श्रद्धा आणि समाधान. २ संसारापासून मागें फिरलेला. ३ मनानें, वाणीनें व कर्मानीं. ४ वरील ३६८ ओवीत सांगितल्याप्रमाणें.

केलें तुज संपूर्ण । तेंचि खूण जाणावी ॥ ९३ ॥ यदर्थी स्वयें बोलतसे श्रुति । तेही आइक गा रघुपती । तें लक्षणें जाणोनि श्रीगुरूप्रति । शरण होती अनन्याभावें ॥ ९४ ॥

संमतिश्रुति ॥ ॥ तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत्समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठमिति ।
आचार्यवान्पुरुषो वेदेति । नैषा तर्केण मतिरापनेया प्रोक्तान्ये नैव सुज्ञानाय प्रेष्ठेत्याद्याः ॥

संमतिश्लोक ॥ ॥ तस्माद्गुरुं प्रपद्येत जिज्ञासुः श्रेय उत्तमम् । शाब्दे परे च निष्णातं ब्रह्मण्युपशमाश्रयम् ॥

जिज्ञासा वरी जैं अंतःकरण । जें ईश्वर जाणावा सर्वज्ञ प्रयत्न । तेव्हां सद्गुरुचरणा शरण । हस्तीं उपाहरण[1] घेऊन जाये ॥९५॥ तया सद्गुरूचें ऐसें लक्षण । श्रोत्रियशब्दें शास्त्रज्ञ । ब्रह्मज्ञानकें ब्रह्मनिष्ठ जाण । होआवें शरण तयासि पैं ॥ ९६ ॥ जयासि असे सद्गुरु भेटला । तो आत्मवेत्ता बोलिला । सद्गुरूविण तो आंधळा । जाणे कळा सर्वही जर्‍ही ॥ ९७ ॥ ऐसिया शरण जावें सद्गुरूसी । तयातें भजावें सर्वस्वेंसी । तोचि उपासनीय यथार्थेसी । होय भाविकासि निश्चय ॥ ९८ ॥ सज्जनसंपर्कें करूनि भजन । शास्त्रींही ऐसें लक्षण । गुरुमुखें महावाक्यश्रवण । यथालक्षण करावें ॥ ९९ ॥ तेणें नव्हे जर्‍ही साक्षात्कार । उठी असंभावनादिसंभार । तर्‍ही करावा वेदांतविचार । अथवा शास्त्र अध्यात्म जें ॥ ४०० ॥ ऐसें शास्त्रसज्जनसंपर्केंकरून[2] । तें वैराग्यपूर्वक बोलिलें जाण । सदाचारप्रवृत्तीचीखूण । तेही संपूर्ण बोलें ऐसी असे ॥१॥ श्रवण करी यथालक्षण । जें अद्वैत ब्रह्मीं तात्पर्याचें घोरण । सर्वेंचि युक्तीकरूनि अनुचिंतन । हेंचि मनन जाणावें ॥ २ ॥ यद्रूप जो सदाचारप्रवृत्ति । वर्त्ते जयासि सर्वार्थी । कां यथोचित वर्णाश्रम करिती । तरी बहुप्रीति श्रवणमननीं ॥३॥ सर्वांचा संग त्याग करी । सद्गुरूचा संग दृढ धरी । नित्यानित्यविवेक अंतरीं । जागे सर्वांपरी गृहपति[3] जैसा ॥ ४ ॥ गृहाचीं उचितानुचितें[4] । अनुकूळ प्रतिकूळ समस्तें । जाणे जैसा सुनिश्चितें । तैसा पंडित सर्वार्थी ॥ ५ ॥ किंबहुना गा रघुनाथा । प्रथम भूमीची सांगितली कथा । वैराग्यादिक समस्ता । तेचि तत्वतां वर्ते येथें ॥ ६ ॥ जेथें इया चिन्हांची संपत्ति । तेचि विचारणाभूमिका निश्चिती । आतां तिसरीचीही स्वरूपस्थिति । येकाग्रचित्तीं परियेसीं ॥ ७ ॥

संमतिश्लोक ॥ विचारणाशुभेच्छाभ्यामिंद्रियार्थेष्वसक्तता । यात्र सा तनुताभावात्प्रोच्यते तनुमानसा ॥
यथावच्छास्त्रवाक्यार्थे मतिमाधाय निश्चलाम् ।

शुभेच्छाविचारणाभूमीसि आहालें असे । परी येथें अतिशयेंसि दृढ बैसे । ह्मणौनि नव्हे पुनरुक्त ऐसें । क्षीण मानसें होइजे जेथें ॥ ८ ॥ पूर्वभूमीसि श्रवणमनन । तत्परिपाकें करी निदिध्यासन । निदिध्यासनें मन होये जाण । क्षीण ह्मणोनि अभिधान तनुमानसा[5] ॥९॥ अगा जे कीं अध्यात्मशास्त्रें असती । तेथील निश्चित वाक्यें जें बोलती । श्रुत्यर्थ ब्रह्मात्मैक्यें स्वयें येती । तेथें विमळमति निक्षेपी सदा ॥ ४१० ॥ अथवावेदांतशास्त्रींचें महावाक्य । जें कीं बोधी ब्रह्मात्मैक्य । तोचि पूर्णार्थ सम्यक् । परब्रह्म येक सच्चिदानंद ॥ ११ ॥ पूर्वोलिया भूमिकांकरून । शुद्धबुद्धि जाली जे निर्माण । जे कीं विक्षेपनिद्राशून्य । तियेतें ब्रह्मीं लीन स्वयें करी ॥ १२ ॥ विजातीय जें देहादिसमस्त । तें तिरस्कारूनियां प्रपंचजात । परब्रह्मीं बुद्धि निक्षेपित । सावधचित्त होऊनियां ॥ १३ ॥ ब्रह्म ध्येय आपण ध्याता । हे विसरूनियां द्वैतकथा । आपण ब्रह्मेंसि ऐक्यताभ सुखरूपता राहणें जें ॥ १४ ॥ ययाचें नाम निदिध्यासन । द्वैतअभावें स्वरूपीं स्थिर पूर्ण । जालिया तोचि साक्षात्कार संपूर्ण । येथें तें न्यून इतुकेंचि ॥१५॥ बुद्धि स्वरूपीं राहे । मागुती स्वयेंचि उठोनि जाये । देहादि स्फुरत आहे । मागुता होये सावधान ॥१६॥ पुनरपी सावध होऊन । देहादिप्रपंच तिरस्कारून । बुद्धीतें मागुती वळून । ब्रह्मीं सुलीन स्वयें करीं ॥ १७ ॥ मागुती बुद्धि तेथूनि उठी । प्रपंचाकारें होय दृष्टि । ते मागुती वळूनि ब्रह्मीं नेहटी । जाण जगजेठी निदिध्यासन हें ॥१८॥ निदिध्यासन जे अवस्था । तेचि तनुमानसा रघुनाथा । अभ्यासें मन पावे तनुता । ह्मणूनि तत्वतां तनुमानसा ॥ १९ ॥ मनाचें तनुत्व तें ऐसें । प्रपंचादिसंधान न्यून होतसे । ब्रह्माकार परिणमत असे । तनुत्व ऐसें जाण रामा ॥ ४२० ॥ प्रपंचाकारें जें बहुपण । तेंचि मनाचें दुष्टत्व पूर्ण । प्रपंचक्षयें क्षीण जाण । बुझें खूण रघुवर्या ॥ २१ ॥ ऐसें निदिध्यासन करितां । भूमिका पाविजे गा रघुनाथा । तेचि तनुमानसा तत्वतां । होये सर्वथा तिसरी भूमिका ॥ २२ ॥ तंव रघुनाथ ह्मणती गुरुमूर्ती । परियेसीं माझी एक विनंती । गुरुकृपा जालियाही कां बाधिती । ज्य

---

१ गुरूकडे जातांना हातीं घेतलेला समिधादि पदार्थ. २ शास्त्र व गुरु यांच्या संगतीनें. ३ घराचा यजमान. ४ बरी वाईट. ५ ज्या स्थितींत मन लहान होतें ती स्थिति.

बोलिजती असंभवना ॥ २३ ॥ विपरीतभावना । इया कां उठती कोणें कारणां । साक्षात्कारासि अतिदारुणा । होती जाणा विघ्नरूप ॥ २४ ॥ सद्गुरूनें दाविलियाही तत्व । विश्वास जालयाही ब्रह्मभूत ।.मागुतें श्रवणमनन कां करीत । आणि साधीत निदिध्यासन ॥ २५ ॥ हे करावया कोण कारण। वस्तुप्राप्तही उरलें साधन ।.तरी सांग पां हे विवंचून । जेणें अज्ञान फिटे माझें ॥ २६ ॥ तंव वसिष्ठ ह्मणती गा त्रिदशाधिपती । बरवें पुसिलें गा कल्याणमूर्ति । तन्ही आयिक तयाची स्थिति । येकाग्रचित्तीं परिस पां ॥ २७ ॥ तन्ही सद्गुरूनें दाविलें परब्रह्म । जें आत्मस्वरूप निरुपम । आपणेंसि अभिन्न सर्वोत्तम । परात्पर निजरूप ॥ २८ ॥ तेंचि तो तेणेंचि काळें । जाला पाहिजे येकेचि वेळे । पार चित्तसंस्कारें झाकळे । ह्मणौनि बैसले असंभावनी ॥ २९ ॥ श्वेतकेतु आणि भृग्वादिक । ययांसि साक्षात्कार तात्काळिक । जाला परी तैसे विरळे देख । बहुतेक ऐसेचि ॥ ४३० ॥ इतर गुरूचेनि उपदेशें । असंभावनायुक्तचि ज्ञान होतसे । येथें उद्भवती दोष हे आपैसे । संस्कारविशेषें पूर्वकर्मांच्या ॥ ३१ ॥ तेणें असंभावना विपरीतभावना । इया उठती अतिदारुणा । तेणें साक्षात्कार सज्ञाना । नव्हे जाणा अभ्यासेंही ॥ ३२ ॥ हेंचि विशद तुजप्रति । सांगितलें गा रघुपति । आतां असंभावना कां न जाती । तेही गति सांगैन ॥ ३३ ॥ असंभावना विपरीतभावना । न जावया चारी कारणें रघुनंदना। तें सांगेन देयीं अवधाना । समाधाना पावसी जेणें ॥ ३४ ॥ तन्ही विषयासक्ति आणि प्रज्ञामांद्य । कुतर्क विपर्ययाग्रह विपद । हीं चारी कारणें अतितीव्रबाध । करिती बंध साक्षात्कारा ॥ ३५ ॥ तन्ही हेंही सोडवावयाचीं साधनें । तेंही परिसावीं रघुनंदनें । तन्ही शमदमश्रवणमनननिदिध्यासनें । भस्म क्षणें होतीती ॥ ३६ ॥

संमतिश्लोक । अहं ब्रह्मेतिवाक्यार्थे बोधो यावद्दृढीभवेत् । शमादिसहितस्तावदभ्यसेच्छ्रवणादिकम् ॥

अहो विषयासक्ति असतां । तेणें ब्रह्माभ्यासु न करी सर्वथा । केलियाही विषयलोलुपता । साक्षात्कारता केवीं होये ॥ ३७ ॥ यालागीं शमदम करिजेती । जे मागां निरूपिले तुजप्रति । तेचि करावे गा महामती । विषयासक्ति तुटावया ॥ ३८ ॥ दुसरी प्रज्ञामांद्याची तळमळ । प्रज्ञामांद्य मनर्थेचि केवळ । अल्प ज्ञानें करिती कोल्हाळ । मन निश्चळ कदा नव्हे ॥ ३९ ॥ प्रज्ञामांद्यें प्रमाणासंभावना । प्रमाण वेद आणि सद्गुरुराणा । तथेंचि करी असंभावना । ह्मणे होय कीं ना प्रमाण वेद ॥४४॥ श्रीगुरूसि मनुष्यरूपें मानी । निश्चय नाहीं त्याचां वचनीं । प्रज्ञामांद्यें शास्त्रार्थ न मनी । न भेदे ह्मणौनि भुले ऐसा ॥ ४१ ॥ तें प्रज्ञामांद्य तुटावया । श्रवण करावें गा रघुराया । तेणें प्रज्ञामांद्य आपैसया । जाय लया कार्यासहित ॥ ४२ ॥ कार्य जें कीं प्रमाणासंभावना । तेणेंसि लयो पावे गा रघुनंदना । ह्मणौनि करावें वेदांतश्रवणा । गुरुवचना विश्वास होये ॥४३॥ मग महावाक्यगुरूच्या ठाईं । विश्वास बाणे अनपायी । तीक्ष्ण प्रज्ञा होय पाहीं । साधे सर्वही कार्य आपुलें ॥ ४४ ॥ तिसरें विघ्न गा रघुपती । कुतर्क ऐसें जया बोलती । जेणें प्रमेयासंभावना होती । नाशु करिती सर्वस्वाचा ॥ ४५ ॥ प्रमाण जें कीं महावाक्य । जेणें जाणिजे प्रमेय सम्यक् । प्रमेय तेंचि तें परब्रह्म येक । प्रमेय लोक त्यातें ह्मणती ॥ ४६ ॥ तेंचि होय कीं नव्हे ह्मणती । ऐसे कुतर्क नाना करिती । ब्रह्म तें सप्राप्त सर्वार्थीं । साधनें योजिती अनेक त्यासी ॥ ४७ ॥ नानासाधनीं जें नव्हे प्राप्त । तें अनायासें आह्मां अनुभूत । तरी तेंचि होय कीं नव्हे ऐसें ह्मणत । जाण निश्चित कुतर्कु हा ॥ ४८ ॥ याचेंचि नांव प्रमेयासंभावना । येणें साक्षात्कारु नव्हे जाणा । साक्षात्कारु ज्यास असंभावना । आनंदघना केवीं भेटे ॥४९॥ हें तोडावयाचें साधन । करावें युक्तीकरूनि अनुचिंतन । ययाचेंचि नाम मनन । करावें अनुदिन अनाळसपणें ॥ ५० ॥ युक्तीनें विचारितां सूक्ष्मदृष्टी ।' तंव होये सर्वत्र ब्रह्मेसि भेटी । युक्तिविचारें पडे मिठी । ब्रह्मात्मैक्यसृष्टि तैचि भासे ॥ ५१ ॥ तेणें स्वस्वरूपीं निर्धार होये । ह्मणे मज ब्रह्मेसि होयें । ब्रह्म मी तेंचि हें होयें । कुतर्क आहे हा व्यर्थचि सर्व ॥ ५२ ॥ ऐसा निश्चयो दृढ बाणला । परी विपर्ययाग्रह असे उरला । तोही जावया पाहिजे केला । अभ्यास भला निदिध्यासन ॥ ५३ ॥ विपर्ययाग्रह ह्मणिजे ऐसा । तोही ऐकें अंगिरवासा । ब्रह्मेंविण भास तो विपर्यय ऐसा । देहादि ठसा प्रपंचजात ॥ ५४ ॥ देहीं अहमात्मा हा आग्रह करी । पुत्रादिक हे माझे दृढ धरी । तो विपर्ययाग्रह गा असुरारी । त्यालागीं करीं निदिध्यासन ॥ ५५ ॥ देहादिप्रपंच जेथें स्फुरत । तेथें प्रपंचाकार होये चित्त । साक्षात्कारु

१ 'पर परम' असा पाठ. २ आपोआप. ३ स्पष्ट. ४ ज्ञानशक्तीचा मंदपणा. ५ उलटपणाविषयीं आग्रह. ६ भोगांवर प्रीति. ७ नाश न होणारा. ८ 'अनाळसपणें सहा' असा पाठ. ९ दृश्य वस्तूंच्या आकाराचें

केंचा तेथ । ह्मणौनि करिजेत निदिध्यासन ॥५६॥ निदिध्यासनाचें लक्षण । विपरीताचें करावें परिवर्जन । येकनिष्ठ करूनि अंतःकरण । करावें लीन स्वस्वरूपीं ॥ ५७ ॥ येणें विपर्ययग्रह तुटे । आणि हे विपरीतभावना निःशेष आटे । येक स्वरूपींच प्रगटे । त्या नाम गोमटें साक्षात्कार ॥ ५८ ॥ यालागीं गा रघुनाथा । श्रवणाधिसाधन करावें सर्वथा । येणें असंभावनादिसमस्ती । जातातीं तत्वतां मूर्ण अहीं ॥ ५९ ॥ ऐसें आइकोनियां रघुपति । श्रीगुरुचरणीं मस्तक ठेविती । ह्मणे अति सुखावलों सुख मूर्ती । नाहीं चित्तीं संशय कांहीं ॥ ४६० ॥ आतां तिसरिये भूमिकेचें लक्षण । सद्गुरुराया अंगा संपूर्ण । आणि उर्वरितां भुमिकांचें कथन । कृपा करून निवेदावें ॥ ६१ ॥ मग संतोषोनि वसिष्ठऋषि । श्रीरामा आलिंगी प्रेमप्रीतीसी । मग ह्मणे धन्य धन्य तव मातेची कुसी । परब्रह्म आलें पोटासी दीनोद्धारा ॥ ६२ ॥ जेणें धन्य हा सूर्यान्वयं । जेणें धन्य माझें आचार्य । जेणें कुळीचें ज्ञानगौरववर्य । तो रघुनाथ मज शिष्य ॥ ६३ ॥ ऐसें बोलोनि सुखावला । पुनरपि आनंदें बोलों लागला । ह्मणे तृतीय भूमीचा निर्वाळा । तुज कथिला फाडोवाडें ॥ ६४ ॥ जो सर्वदा निदिध्यासन करी । तो तृतीय भूमिकागत निर्धारी । व्युत्थान काळीं राहाटतीपरी । आयिक रावणारी सांगेन ॥ ६५ ॥

**संमतिश्लोक ।** तापसाश्रमविश्रांतैरध्यात्मकथनक्रमैः । संसारनिंदकैस्तद्वैराग्यकथनक्रमैः ॥
शिलाशय्यासनासीनो जरयत्यायुराततम् । वनावलिविहारेण चित्तोपशमशोभिना ॥
असंगसुखसौख्येन कालं नयति नीतिमान् । अभ्यासात्साधुशास्त्राणां संचयात्पुण्यकर्मणाम् ॥
जंतोर्यथावदेवेयं वस्तुदृष्टिः प्रसीदति ॥

तापसांचे जे आश्रम । जे कीं वानप्रस्थादि उत्तम । जेथें तपादिसाधनांचे संभ्रम । करूनि विश्राम पावले ॥६६॥ तये परब्रह्मीं जे निवाले । ते परब्रह्मवेत्ते ह्मणितले । आत्मनिष्ठ तेचि भले । येक वेगळे नामभेदें ॥६७॥ तयांचेनि संगेंकरून । अध्यातमशास्त्र करिती कथन । तेंचि जाणपां निदिध्यासन । दुसरें जाण साधुसंग ॥६८॥ अध्यात्मशास्त्राचें श्रवणकथन । अथवा स्वयें कीजे निर्माण । तें सर्वही जाण निदिध्यासन । ह्मणौनि सज्ञान हेंचि करिती ॥ ६९ ॥ तेंही अध्यात्मशास्त्रं कैसीं । जें निःशेष निवृत्ति संसारासी । उपपादिती वैराग्यासी । आणि ब्रह्मासि आत्मैक्य ॥४७०॥ जे आत्माराम जाले मानसीं । तेही सांगों गा हृषीकेशी । तऱ्ही दोहींचीं लक्षणें ऐसीं । जाण मानसीं सांगेन तें ॥७१॥ निदिध्यासनाचें ऐसें लक्षण । प्रपंचप्रत्ययाचें कीजे तिरस्करण । परब्रह्माचें आत्मैक्यग्रहण । तैसेंच जाण अध्यात्मशास्त्र ॥७२॥ तेथ संसारनिंदनें वैराग्यता । वैराग्यें उपरति इंद्रियार्थां। ब्रह्मनिरूपणें होये तद्रूपता । तेंचि तत्वतां निदिध्यासन ॥७३॥ ह्मणौनि स्वआयुष्य जें विस्तृत । तें येणेंकरूनि असे क्षपितें। हें असतां वनावली हिंडत । सुख पावत नानापरी ॥७४॥ वन देखोनियां अतिप्रीतीं । तेणें संतोष पावे चित्तवृत्ति। ह्मणौनियां वनविहारण करिती । जेणें उपशांति स्वयें होये ॥ ७५ ॥ समाधानासि विक्षेप करी । तैसें वनविहारण न करी । वनीं येकांतीं बैसे शिळेवरी । शयन करी शिळापृष्ठीं ॥ ७६ ॥ अथवा असंगु जो कीं आत्माराम । याचेनि संगें पावे विश्राम । ऐसा तो नीतिमंत पुरुषोत्तम । काळसंभ्रम अतिक्रमी ॥ ७७ ॥ कां साधुशास्त्राचेनि संभ्रमाभ्यासें । अथवा पुण्यकर्माचरणवशें । वस्तुदृष्टि स्वेच्छा होतसे । अवकाशें ये भूमीसी ॥ ७८ ॥ ज्ञानाची सीमा भूमितृतीयेसी । त्याहूनि वाडी नाहीं विवेकासी । मग स्वरूपस्थिति उत्तरभूमीसी । त्याही तुजपासीं सांगेन ॥ ७९ ॥ आणीकही आवांतरभेद असती । तेही सांगेन तुजप्रति । तृतीय भूमीसी अनुभवती । आयिक स्थिति द्विविध त्यांची ॥४८०॥ येक श्रेष्ठ येक सामान्य । ऐसें द्विविध असंगपण । दोन्ही बाणती तया संपूर्ण । आइक चिन्ह सामान्याचें ॥ ८१ ॥ सामान्य असंगता ते कैसी । ते आधीं ऐकें गा हृषीकेशी । जे चिन्हें तनुमानसेसीं तिसरे भूमीसि होताती ॥ ८२ ॥

**संमतिश्लोक ॥** तृतीयां भूमिकां प्राप्य बुद्धोनुभवति स्वयम् । द्विःप्रकारमसंगत्वं तस्य भेदमिमं शृणु ।
द्विविधोयमसंसंगः सामान्यः श्रेष्ठ एव च । नाहं भोक्ता च कर्ता च न बाध्यो न च बाधकः ।
इत्यसंजनमर्थेषु सामान्यासंगनामकम् । प्राक्कर्मनिर्मितं सर्वमीश्वराधीनमेव वा ।

---

१ त्याग. २ उरलेल्या. ३ 'आलंगी' असा पाठ. ४ सूर्यवंश. ५ गुरुपणा. ६ अडचणी. ७ सांगतात. ८ कंटाळा द्वारा. ९ गेलेलें. १० अडथळा. ११ पुण्यकारक कर्मे केल्यामुळें. १२ 'असंग संगता' असा पाठ.

सुखं वा यदि वा दुःखं कैवात्र ममकर्तृता । भोगाभोगा महारोगाः संपदः परमापदः ।
वियोगायैव संयोगा आधयो व्याधयो धियः । कालः कवलनोद्युक्तः सर्वभावान्विनाशयन् ।
तिष्ठतीति विचारो यः सामान्योसावसंगमः ॥

ह्मणे मी सर्वथा नव्हे कर्त्ता । कां जो निष्क्रिय मी असें तत्वतां । क्रिया असतां कर्तव्यता । ते तंव माथां अहंकाराच्या ॥ ८३ ॥ अहो हा अहंकार गळे जयाचा । त्यासि बाधु कोण कर्त्तव्यतेचा । तो क्रिया ना कर्ता तियेचा । अकर्त्ता सर्वांचा अक्रियपणें ॥ ८४ ॥ ऐसें भगवद्गीतेंतही श्रीकृष्ण । अर्जुनाप्रति बोले वचन । अहंकारेंविण कर्तेपण । पापपुण्य लिंपिजेना ॥ ८५ ॥

संमतिश्लोक ॥ ॥ यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते । हत्वापि स इमाँल्लोकान्न हंति न निबध्यते ।

अहंकारेंविण जें क्रियाचरण । तें सर्वथा न दिसे कर्तेपण । यालागीं ह्मणे मी अकर्ता पूर्ण । अक्रिय ह्मणोनि सर्वथा ॥८६॥ तैसाचि ह्मणे मी अभोक्ता । भोग भोगोनि अलिप्तता । सर्वत्र अहंकारु व्यतिरिक्तता । हेचि ज्ञातंता जाणावी ॥ ८७ ॥ नित्य तृप्त ह्मणौनी । अभोक्ता मी जनीं वनीं । मी बंधक नव्हे भर्वसेनी । निर्व्यापार ह्मणौनि कोण्हा न बाधी ॥ ८८ ॥ आणि बाध्य जें कीं दृश्यजात । तेंही मी नव्हे कदाचित । ऐसें पदार्थमात्रीं असंगत । तेंचि निश्चित सामान्य हें ॥ ८९ ॥ हेचि सामान्य असंगता । जाण निश्चित रघुनाथा । करूनि कैसा अकर्त्ता । पुससी तरी आतां सांगेन ॥४९०॥ ह्मणे सुख अथवा दुःख । हें पूर्वकर्मांचे होये देख । हें अनीश्वरवादी मीमांसक । बोलती सकळीक येणें न्यायें ॥ ९१ ॥ ईश्वरवादियाचेनि मतें । ईश्वराधीन वर्ते । सर्वही ईश्वरेंचि करिजेतें । मी कोण तेथें कर्त्ता भोक्ता ॥ ९२ ॥ ह्मणे भोग अभोगविस्तार । हे सकळही रोगांचे संभार । जे कीं परिणामीं संतापकर । दुःख थोर देताती ॥ ९३ ॥ तैसे जितुके संपत्तिजात । तितकेही विपत्ति समस्त । परम आपदा स्वयें मानित । दुःख देत सर्वांपरी ॥ ९४ ॥ संपत्ति अर्जितां दुःखकोटि । होये प्राणासि आटी व्यय होतां मरणेसि भेटी । होये अटाटी दुःखाची पैं ॥ ९५ ॥ तैसाचि प्रिय वस्तुचा जो संयोग । तो व्हावया वियोग । वियोगीं तें अतिदुःख अभंग । नित्य रोग तळमळेचा ॥ ९६ ॥ आधि आणि व्याधि दोन्ही । आधि तो मनोदुःख भरंवसेनि । व्याधि शरिरीं रोग निर्वाणीं । दुःख जनीं वनीं देताती ॥ ९७ ॥ बुद्धिमंत अतिक्लेश देखीती । ते जळजळ न वाहवे चित्तीं । सर्वभाव काळें नाशिजेती । हे विचारस्थिति सर्वदा वर्ते ॥९८॥ सामान्यकारें जे असंगता । तें एवंविचारेंकरूनि गा रघुनाथा । आतां सांगों श्रेष्ठ असंगता । जे आइकतां नित्य आनंद ॥ ९९ ॥

संमतिश्लोक ॥ अनेन क्रमयोगेन संयोगेन महात्मनाम् । वियोगेनासतामंतः प्रयोगेणात्मसंविदाम् ।
पौरुषेण प्रयत्नेन संतताभ्यासयोगतः । करामलकवद्वस्तुन्यागते स्फुटतां दृढम् ।
नाहं कर्तेश्वरः कर्त्ता कर्म वा प्राक्तनं मम । कृत्वा दुरतरे नूनमिति शब्दार्थभावनम् ।
संसारांबुनिधेः पारे सारे परमकारणे । यस्मिन्मौनासनं शांतं तच्छ्रेष्ठासंगमुच्यते ।

अगा पूर्वोक्त अभ्यासेंकरून । करितां असंगसंवर्जन । सत्संगेंकरूनि निर्वाण । करितां विचारण आत्मस्वरूप ॥ ५०० ॥ आत्मविचारणेचा प्रयोग । करी पुरुषप्रयत्न अभंग । निरंतर अभ्यास निःसंग । करितां सांग थोरावला ॥ १ ॥ जैसा कीं स्फुटतर करतळामळ । तसी वस्तु कळे जया सकळ । स्फुट स्वरूपाचे भासे निर्मळ । टाकी तळमळ तेणेंकरुनी ॥ २ ॥ कर्त्तेपणाचें आपुलें माथां । ओझें न घे तो सर्वथा । आणि ईश्वर सर्वांचा नियंता । तोचि कर्त्ता हेंही नव्हे ॥ ३ ॥ अथवा प्राक्तनकर्मेंकरून । नेमें सर्व भोग होती जाण । टाकी शब्दार्थसंधान । राहे निर्वाण स्वस्वरूपीं तो ॥ ४ ॥ प्राक्तनकर्म देहाचां माथां । आणि देहादिकर्में बाधित सर्वथा । ब्रह्मस्वरूप मी कर्माचा भोक्ता । नव्हे तत्वतां ऐसाचि बोधु ॥ ५ ॥ तें स्वस्वरूप कैसें असे । सर्वही जग ज्यामाजी वसे । सर्वांचें कारण सर्वांशें । जें कीं न नाशे काळत्रयीं ॥ ६ ॥ देशें काळें जें अबाधित । जें कीं संसारांबुनिधीचा प्रांत । जें कीं सर्व प्रपंचातीत । स्वप्रकाशमंत परब्रह्म ॥ ७ ॥ ते ब्रह्मस्वरूपीं मौनवृत्ति । शांतासनें राहाणें गा सुमती । श्रेष्ठासंग त्यातें ह्मणती । स्वरूपस्थिति जिये नाम ॥ ८ ॥ प्रपंचाच्या तिरस्कारें । स्वस्वरूपीं राहाणें एकाकारें । तो श्रेष्ठ असंग जाण निर्धारें । रघुवीरें आकर्णिजे ॥ ९ ॥ आणीक श्रेष्ठ असंगाचें लक्षण । आयिक रघुनाथा संपूर्ण । परब्रह्मीं नित्य अवस्थान । सच्चिद्धन तें कैसें ॥ ५१० ॥

---

१ ज्ञातेपणा. २ ईश्वर नाहीं असें ह्मणणारे. ३ या प्रकारच्या विचारानें युक्त. ४ 'असंगसंगवर्जन' असा [illegible]. [illegible] तळहातावरील आंवळा. ६ स्पष्ट. ७ संसाररूपी समुद्राचें तीर.

**संमति श्लोक ॥** यन्नांतर्न बहिर्नाधो नोर्ध्वं नाशासु नांबरे । न पदार्थे नापदार्थे न जडे न च चेतने ॥
आश्रितं भासनं शांतमभासं नभसा समम् । अनाद्यंतमजं कांतं तच्छ्रेष्ठासंग उच्यते ॥
संतोषामोदमधुरः सत्कार्यामलपल्लवः । चित्तनालाग्रसल्लीनो विघ्नकंटकसंकटः ॥
विवेकपद्मो रूढोंतर्विचारार्कविकासितः । फलं फलत्यसंसंगं तृतीयां भूमिकामिमाम् ॥

जें कीं अंतर ह्मणतां परिच्छिन्न । बाह्य ह्मणतां दृश्यमान । एवं अंतर्बाह्यविहीन । परिपूर्ण व्यापक जें ॥ ११ ॥ अध ह्मणतां ऊर्ध्वाभावो । ऊर्ध्व ह्मणतां अधीं अभावो । एवं अध ना ऊर्ध्व नाहीं निर्वाहो । व्यापक पाहा हो गगन जैसें ॥ १२ ॥ महाप्रलयीं जें उदक । कोण करी ऊर्ध्वअधलेख । तेंचि तें सभराभरित येक । नाहीं अनेक कळावया ॥ १३ ॥ ना ते पृथ्वी ना तें अंबर । दिशा विदिशा देशांतर । ना तें नव्हे पदार्थाकार । अपदार्थसार तेंही नव्हे ॥ १४ ॥ जड ना तें चेतन । नाहीं जडाजडीं अवस्थान । दोन्हीं नव्हे जें संपूर्ण । येकलें जाण नित्यपणें ॥ १५ ॥ चेतन जें भावे । जडाजडीं जें न घेपवे । सर्वांचें भासक जें स्वभावें । कोण्हें नाभिभवे अनादिपणें ॥ १६ ॥ सर्वांचें जें आश्रयभूत । ह्मणौनि सर्वांसि न भासत । जैसें मातेसि नेणेना उदरस्थ । तेंचि समस्त प्रकाशी ॥ १७ ॥ तैसें सकळांचें भासक होये । त्यांतें न भासती न नेणती सोये । तें भावावया योग्यही नव्हे । निराकार हें ह्मणौनियां ॥ १८ ॥ विद्यमानेंही न भासे कोणासी । ह्मणौनि अभावन नाम जयासी । आद्यंतविहीन सर्वांसी । विकारासि उदासपणें ॥ १९ ॥ निर्विकारत्वें शांत बोलिजे । निरंशपणें विकार नेणिजे । अपरिणामी गगन सहजें । घेपे दीजे येकलेनी ॥ ५२० ॥ जन्ममरणशून्य अजत्वें । प्रकाशमंत स्वप्रकाशत्वें । तद्रूप राहाणें जें आत्मत्वें । जाण निश्चितें श्रेष्ठासंग ॥ २१ ॥ ऐसा तो परब्रह्ममूर्ति । देहीं असोनि नाहीं देह स्थिति । संतोषामोदमधुरगति । आयिक व्युत्पत्ति यया पदाची ॥ २२ ॥ संतोष ह्मणिजे अतिशय तृप्ति । आणिकाची अपेक्षा न करिती । तेणें होय हर्षाची उन्नति । तेणें घमघमिति मकरंदु जैसा ॥ २३ ॥ तोचि स्वयें ज्ञानकल्पतरु । सत्कर्मफळपल्लवीं ज्या विस्तारु । चित्तनालांतर्गत लीन प्रचुरु । ह्मणौनि विघ्नसंभारु न बाधी जया ॥ २४ ॥ ज्ञानफळें असे फळला । इंद्रियपत्रीं विवेकार्क प्रकाशला । वैराग्यपुष्पीं वोथंबला । अति शोभला पुष्पीं फळीं ॥ २५ ॥ तृतीय भूमिकेच्या आळां । विस्तारु पावला फुलीं फळां हे लक्षणीं । तरणिवंशभूपाळा । तमालनीळा रघुनाथा ॥२६॥ हें तृतीय भूमिकेचें लक्षण । तुजप्रति केलें विस्तारें कथन । आतां चतुर्थ भूमिकेचें निरूपण । सावधान परियेसीं ॥ २७ ॥ पूर्वोक्ता या तिन्ही अवस्था । जागृतस्थानीं त्रैलोक्यनाथा । हे साधनकोटि जाण सर्वथा । नव्हे तत्वतां साध्यभूमि ॥ २८ ॥ परी हें अंतरज्ञानसाधन । ह्मणौनि ज्ञानभूमिका हें अभिधान । हें उपचारें ह्मणिजे जाण । साक्षात् ज्ञान हें नव्हे ॥ २९ ॥ आणि तिहीं भूमिकांसि भेद भासे । ह्मणौनि जागृति ह्मणिजेत असे । आतां चौथीचें लक्षण कैसें । तें येकाग्र मानसें परिसावें ॥ ५३० ॥

**संमति श्लोक ॥** भूमिकात्रितयाभ्यासाच्चित्तेर्थे विरतेर्वशात् । सत्वात्मनि स्थितिः शुद्धे सत्त्वापत्तिरुदाहृता ॥

भूमिकात्रयअभ्यासेंकरून । चित्त अनात्मपदार्थीं उदासीन । विमुख प्रपंचापासून । चित्त प्रसन्न स्वयें होये ॥ ३१ ॥ प्रसन्न जालिया स्वयें चित्त । लीन होऊनि ब्रह्मीं राहात । जें कीं सत्तामात्र निरंजन नित्य । चिद्घनभरित परब्रह्म ॥ ३२ ॥ विषयांचे अरुचीकरुनी । मन उदास होये विटे तेथुनी । मग तीक्ष्ण वृत्ती एकाग्र करुनी । स्वरूप निर्वाणीं वेपतसे ॥ ३३ ॥ तिये येकाग्रवृत्तीकरून । अकस्मात अज्ञान जाये नाशोन । मग ब्रह्मीं पूर्णस्थिति पावोन । जाय चित्तपण वृत्तित्यागें ॥ ३४ ॥ मनासि नाहीं वस्तुग्राहकपण । ह्मणौनि वृत्तीसहित होय लीन । मग स्वसंवेद्य अनुभव पूर्ण । आपणा आपण वोसंडतु ॥ ३५ ॥ सत्वशब्दें परब्रह्म जाण । तेथें मनासि होये विश्रामपण । तिये नाम सत्वापत्ति पूर्ण । हेंचि खूण चतुर्थ भूमिकेची ॥ ३६ ॥ चतुर्थ भूमिका प्राप्त जयासी । तयाचीं अंतर्बाह्य चिन्हें कैसीं । तेंही सांगेन हृषीकेशी । ते निजमानसीं धरावीं गा ॥ ३७ ॥

**संमतिश्लोक ॥** सम्यग्ज्ञानोदये चित्ते पूर्णचंद्रोदयोपमे । निर्विभागमनाद्यंतं योगिनो युक्तचेतसः ॥
समं सर्वं प्रपश्यंति चतुर्थीं भूमिकां गताः । अद्वैते स्थैर्यमायाते द्वैते च प्रशमागते ॥
पश्यंति स्वप्नवल्लोकांश्चतुर्थीं भूमिकामिताः ।

---

१ आंत बाहेर नसलेलें. २ जिकडेतिकडे भरलेलें. ३ घेतां येतें. ४ पराभव पावत नाहीं. ५ वाढ. ६ फुलांतील रस, अध. ७ मनरूपी नाला ( देठी ) मध्ये राहिलेला. ८ सूर्यश्रेष्ठा !

जें कां निर्विभाग निरंजन । आद्यमध्यप्रांतविहीन । स्वयंज्योति स्वप्रकाशमान । चिद्गगन परब्रह्म ॥ ३८ ॥ निःशेष नाशलिया अज्ञान । तेणे चित्ताचें ब्रह्मीं अवस्थान । उदयो पावे अपरोक्ष ज्ञान । होय युक्तीनें तद्रूप ॥ ३९ ॥ येणेंचि हे रघुनाथा । योगी चतुर्थभूमिका पावला तत्वतां । याचे अंतरींचें चिन्ह परिस आतां । होय प्रसन्नता चित्त ज्याचें ॥ ५४० ॥ असंदिग्ध ज्ञान जालें असतां । असंभावनादि गेल्या समस्ता । तेणें चित्त पावे प्रसन्नता । पौर्णिमे कलंकहीन हिमांशु जेवीं ॥४१॥ द्वैतमळ एकसरी । गेलिया आधिकलंकलहरि । तो चित्ता शुद्धांशु पूर्ण करी । शोभे चिदंबरीं प्रसन्नपणें ॥ ४२ ॥ चित्त राहे सर्वदा ब्रह्मपणें । हेंचि अंतरींचें चिन्ह जाणणें । बाह्य जग देखे चित्स्वरूप पूर्ण । समसमान सर्वत्र ॥ ४३ ॥ अद्वैतीं स्थैर्य पावलिया । द्वैत निःशेष जाय लया । तेव्हां स्वप्नाचियापरी लोकां यया । देखे योगिया चतुर्थ भूमिकेसीं ॥ ४४ ॥ सत्वापत्तिभूमिका चौथी । तेथें जग देखे प्रतिभासिकस्थिती । ह्मणोनि इयेतें स्वप्न बोलती । जाण रघुपती निश्चयें ॥ ४५ ॥ हे चौथी भूमिका प्राप्तदशा । मुख्य ज्ञानभूमि हे वीरेशा । करितां पूर्वसंधानअभ्यासा । संप्रज्ञान ऐसा संकेतु इयेसी ॥४६॥ पंचमीपासुनि सातवीवरी । तिन्ही भूमिकांमीतरी । निर्विकल्पाभ्यास करी । तारतम्यावरी जीवन्मुक्ति ॥ ४७ ॥ सातवी विदेहमुक्ति जाण । पुढें नाहीं तियेहून । तिन्ही अवस्था त्या सुषुप्तिघन । विश्वभान नाहीं ह्मणोनी ॥ ४८ ॥ आतां पांचवे भूमिकेचें लक्षण । सांगों रघुनाथा दे अवधान । जेणें होये समाधान । ब्रह्म निर्वाण पाविजे गा ॥ ४९ ॥

संमतिश्लोक ॥ दशाचतुष्टयाभ्यासादसंसर्ग फलेन च । रूढसत्वचमत्कारात् प्रोक्ता संसक्तिनामिका ॥

चहूं भूमिकांचेनि अभ्यासें । सूक्ष्म ब्रह्मानंद भोगितसे । कोण्हाही फळीं संसर्ग नसे । फळ लीच असे जयासीं ॥ ५५० ॥ ते हे असंसक्तिनामिका । पांचवी भूमिका रघुकुळटिळका । इयेचीं लक्षणेंही आइका । ब्रह्मसुखा जे पावती ॥ ५१ ॥

संमतिश्लोक ॥ सत्तावशेष एवास्ते पंचमीं भूमिकां गतः । जगद्विकल्पो नोदेति चित्तस्यात्र विलापनात् ॥
पंचमीं भूमिकामेत्य सुषुप्तपदनामिकाम् । शांताशेषविशेषांशस्तिष्ठत्यद्वैतमात्रकः ॥
सुषुप्तघन एवास्ते पंचमीं भूमिकां गतः । गलितद्वैतनिर्भासो मुदितोंतः प्रबोधवान् ॥
अंतर्मुखतया तिष्ठन्बहिर्वृत्तिपरोपिसन् । परिशांततया नित्यं निद्रालुरिव लक्ष्यते ॥

सकळांचे निरासेंकरून । केवळ सत्तामात्र उरे निरंजन । तद्रूपेंचि तें असे जाण । नेणें भान प्रपंचाचें ॥ ५२ ॥ मन स्वरूपीं जालें लीन । ह्मणोनि न दिसे द्वैतस्वप्न । सुषुप्तीचेपरी स्वरूपीं संलग्न । हेचि जाण पंचमी भूमिका ॥ ५३ ॥ सकळ जें कां विशेषांश । पशु पक्ष्यादिक मनुष्य । ब्राह्मण क्षत्रिय शूद्र वैश्य । स्त्री पुरुष न स्मरे तेथें ॥५४॥ केवळ अद्वैतमात्र समसमान । तद्रूपें राहाणें तेंचि होऊन । ह्मणोनि न स्फुरे विशेष भान । दृश्यक्षीण स्वरूपस्थिति ॥ ५५ ॥ द्वैतमात्र न स्फुरे जेथ । केवळ अद्वैतस्थिति निश्चित । अंतरीं सुखानुभवें डुल्लत । प्रबोधयुक्त ह्मणोनियां ॥ ५६ ॥ अर्धसुषुप्तीचियेपरी । लीन असे ब्रह्मानंदसागरीं । तेव्हां पंचमी भूमिका रावणारी । जाण पुरी बाणलीसे ॥ ५७ ॥ बाह्यदृष्टी वृत्तिरूढ ऐसा दिसे । देखतां ऐकतां कर्ता भासे । परी तो अंतर्मुख असे । शांत सर्वांशीं ब्रह्मदृष्टी ॥५८॥ जैसा निद्राभरें जो दाटला । बाह्य जागृत कळे लोकांला । परी इंद्रियवृत्ति असती परतल्या । त्या सुख पावल्या अंतर्मुखें ॥ ५९ ॥ बाह्य कर्मी परि शांतता । अंतर्गुणें सुखरूपता । यालागीं निद्रालूपणें सर्वथा । तसा तत्वतां भासतु ॥ ५६० ॥ अंतरीं ब्रह्मानंदसुखभरें । बाह्य व्यवहार ऐसा स्फुरे । ते पंचमी भूमिका निर्धारें । ज्ञानद्वारें पावला ॥ ६१ ॥ इहीं लक्षणीं जो आलंकृत । तोचि तो पंचभूमिकागत । आतां षष्ठीचें लक्षण इत्थंभूत । सावचित्त परियेसीं ॥ ६२ ॥

संमतिश्लोक ॥ भूमिकापंचकाभ्यासात्स्वात्मारामतया दृढम् । अभ्यंतराणां बाह्यानां पदार्थानामभावनात् ।

भूमिकापंचकाचेनि अभ्यासें । स्वस्वरूपींच रमती विशेषें । दृढतर स्थिति स्वरूपींच बैसे । तेणें न स्पर्शे पदार्थजाता ॥ ६३ ॥ अंतरीं मनबुद्धिअहंकार । कामक्रोधमदमत्सर । दंभलोभादिवासनासंभार । न स्पर्शे अंतर इत्यादिकां ॥ ६४ ॥ बाह्य घटपटादिकीं समस्त । किंबहुना विश्वपदार्थजात ।

---

१ स्पष्ट. २ 'पुरता कलंकहीन', असा पाठ. ३ मानसिक व्यथेचा कलंक. ४ गाढ झोंप. ५ निरिच्छस्थिति. ६ ज्ञान झालेला. ७ पांच भूमिकांचा अभ्यास केल्यावर.

तें कांहीं न स्मरे किंचित् । स्वयें डुल्लत ब्रह्मानंदें ॥६५॥ हे पदार्थाभाविनी षष्ठी भूमिका । जाण निश्चयें रघुकुळटिळका । पदार्थमात्राचें अभावन देखा । एका येकाहुनी अधिक ॥ ६६ ॥ आतां षष्ठी भूमिका प्राप्त जयासी । तयाचें स्वरूप परियेसीं । ऐकतां चमत्कार चित्तासी । वाटे सर्वांसि रघुराया ॥ ६७ ॥

**संमतिश्लोक** ॥ यत्र नासन्नसद्रूपो नाहं नाप्यनहंकृतिः । केवलं क्षीणमनन आस्ते द्वैतैक्यनिर्गतः ॥
निर्ग्रंथिः शांतसंदेहो जीवन्मुक्तो विभावनः । अनिर्वाणोपि निर्वाणश्चित्रदीप इव स्थितः ॥
अंतःशून्यो बहिःशून्यः शून्यः कुंभ इवांबरे । अंतःपूर्णो बहिःपूर्णः पूर्णः कुंभ इवार्णवे ॥

तरी यिये षष्ठी भूमीचां ठाईं । योगियाचें ऐसें चिन्ह पाहीं । तो असद्रूप नव्हे कहीं । निपट नाहीं ह्मणो नये ॥ ६८ ॥ व्यवहार सर्व करितां दिसे । तरी तो असद्रूप ह्मणतां कैसें । आह्मींच ह्मणौनि निर्धारिजे ऐसें । तरी तो न स्पर्शे व्यवहारासी ॥ ६९ ॥ जो कीं अंतरीं सर्व निर्वासन । तो सर्वथा व्यवहारीं नसे जाण । बाह्य दिसे तया देहपण । परी विदेही पूर्ण निरहंकृती ॥ ५७० ॥ जरी अहंकारवंत ह्मणिजे । तरी अहंकृती न देखिजे । अहंकारशून्य बोलिजे । तरी देखिजे प्रवर्त्तकु ॥ ७१ ॥ देहेंद्रियांचा प्रवर्त्तकु । सत्तामात्र तोचि येकु । अनहंकृति प्रकाशकु । नाहीं तर्कु कोण्ही तेथें ॥ ७२ ॥ तरी तो काय आहे ह्मणसी । क्षीणमन तो परियेसीं । कल्पनाशून्य सर्वांसी । अहंकारासि कैंचा ठावो ॥ ७३ ॥ अहो ज्याचें गेलें द्वैताद्वैत । होऊनि ठेला उभयातीत । द्वैत ह्मणतां सर्वां व्यतिरिक्त । केवळ उर्वरित परब्रह्म ॥७४॥ नेणे बाह्य प्रपंचवार्ता । अंतरीं वासनादि शून्यता । ह्मणौनि तो नेणे द्वैतकथा । पूर्णपूर्णता परब्रह्मत्वें ॥ ७५ ॥ द्वैत असतां अद्वैत बोलावें । तऱ्ही तें त्रिकाळीं न संभवे । यालागीं अद्वैत केवीं ह्मणावें । ह्मणौनि स्वभावें दोन्ही लक्षणें ॥ ७६ ॥ चिदचिद्ग्रंथि तुटला । अहंकारुचि तेथें मावळला । यालागीं तो आत्माराम जाला । ह्मणौनि गळला संदेह त्याचा ॥ ७७ ॥ नाहीं कोण्ही तया भावना । ह्मणौनि न भासे विश्वकलना । तेथ संदेह कोण त्याचिया मना । निर्वासना वर्त्ततु ॥ ७८ ॥ ऐसा योगी जो जीवन्मुक्त । देहीं असोनि देहातीत । अतिनिर्वाणत्वें वर्त्तत । अहंकारातीत ह्मणौनियां ॥ ७९ ॥ देहीं अहंबुद्धि जया नाहीं । तो देहींचा नव्हे कहीं । देहीं निर्वासन सर्वदा पाहीं । ह्मणौनि विदेही मुक्तपणें ॥ ५८० ॥ जैसी चित्रींची दीपकाळिका । नामरूपें भासे लोकां । परी दीपपणाच्या कार्यलेखा । न ये देखा कर्तृत्वें ॥८१॥ अभ्राचेनि वेगें चंद्रासि । वेगु मानिती बाळें जैसीं । तैसें कर्तृत्व जीवन्मुक्तासी । लोक पिसे मानिती ॥ ८२ ॥ बाह्य देहेंद्रियें व्यवहरतां । अंतरीं स्वस्वरूपीं असे स्थिरता । चित्रदीपाचे परी निश्चळता । कां जैसा सविता जन चेष्टवी ॥ ८३ ॥ अंतरीं वासनादि प्रपंच नाहीं । बाह्य देहादिदृश्य न देखे पाहीं । ह्मणौनि अंतर्बाह्यशून्य सर्वही । नभाचे ठायीं घट जैसा ॥८४॥ नभीं घट अंतर्बाह्य रिता । तैसी योगियासि प्रपंचशून्यता । स्वस्वरूपें अंतर्बाह्य पूर्णता । सर्वब्रह्मता बाणलेपणें ॥ ८५ ॥ अंतर्बाह्य वस्तु जयासी । ह्मणउनि पूर्णब्रह्म ह्मणती तयासी । समुद्रजळीं पूर्णता घटासी । जळ चौपासीं सर्वत्र जया ॥ ८६ ॥ ऐसें अंतर्बाह्य परब्रह्म । तेथ अणुमात्र नाहीं विषम । एकाएक परापरम । निरुपम परिपूर्णत्वें ॥ ८७ ॥ ऐसी स्वरूपस्थिति गा रघुनाथा । षष्ठी भूमीसि जाण तत्वतां । तेचि पावालिया स्थिरता । होय तत्वतां सप्तमी तुर्या ॥ ८८ ॥ जिये पावलिये भूमिकेसी । पावणें नाहीं गा सर्वस्वेंसी । जे कां वरिष्ठ सर्वां भूमींसी । नाहीं जियेसि कर्त्तव्य कांहीं ॥ ८९ ॥ मुख्य सुषुप्ति ते सप्तमी भूमिका । षष्ठी पंचमी अर्धोन्मीलिका । चतुर्थी ते स्वप्न देखा । जागरलेखा इतरा तिन्ही ॥ ५९० ॥ परें प्रबोधिलियाही चिरकाळें । प्रबोध नव्हे तुर्यामेळें । अखंड स्वरूपानंदेंसि खेळे । कदा नातळे द्वैतप्रपंचा ॥ ९१ ॥

**संमतिश्लोक** ॥ भूमिषट्कचिराभ्यासाद्भेदस्यानुपलंभतः । यत्स्वभावैकनिष्ठत्वं सा ज्ञेया तुर्यगा गतिः ॥
एषा हि जीवन्मुक्तेषु तुर्यावस्थेह विद्यते । विदेहमुक्तिविषयस्तुर्यातीतमतः परम् ॥

हेचि विदेहमुक्ति पैं जाण । जे हे भवभूमीचें निर्वाण । हे वामदेवशुकादि संपूर्ण । जे अलंकरण सर्वां भूमींचें ॥ ९२ ॥ ऋषभदेवादिसनकादिक । जडभरत विदेही जनक । आह्मी सर्वही व्यासमुख्य । असों सम्यक् सप्तमीसी ॥ ९३ ॥ यया सप्तही भूमिका तुजप्रति । सांगितल्या श्रीरघुपती । हेचि जाण पां सहजस्थिति । जे कविआदि वर्त्तती जिये माजी ॥ ९४ ॥ स्वाभाविक निष्ठा जे रघुपति ।

---

१ ज्या अवस्थेंत पदार्थ भासत नाहींत ती. २ सृष्टीचें आकलन (ग्रहण) करणें. ३ कार्य करण्यास. ४ सूर्य. ५ शेवटची. ६ व्यास ज्यांत मुख्य असे. ७ कवि, हरि, अंतरिक्ष, प्रबुद्ध, पिप्पलायन, आविर्होत्र, द्रुमिल, चमस आणि करभाजन हे.

तोचि तुर्या सातवी निश्चिती । जेथें भेद न स्फुरे सर्वार्थी । स्वस्वरूपस्थिति अखंड ॥ ९५ ॥ ह्मणोनि चतुर्थ पांचवी माझारी । भासक आल्या जगल्लहरि । तो ब्रह्मत्वेंचि कर्मे करी । द्वैतपरी असेचिना ॥ ९६ ॥ ऐसा जऱ्ही कर्मे करी । कां निर्विकल्पें राहे अंतरीं । परी स्वरूपस्थिति क्षणहीभरी । न मोडोनि दुसरी नव्हे भावना ॥ ९७ ॥ कर्म केलें न केलें दोन्ही । बाधकें नव्हतीं तयालागुनी । तो सकळ जाला स्वयें निर्वाणी । प्रकाशी दोन्ही बाध्यबाधक ॥ ९८ ॥ तो देहसंगें संग न पवे । कर्मे करूनि फळें नाभिमंवे । न करितां प्रत्यवायो न संभवे । कोण्या न फावे असंगपणें ॥ ९९ ॥ नोहो तुह्मी ऐसें बोलिलेती । देहीं असोनि न ये देहसंगती । तऱ्ही देह असतां जीवन्मुक्ती । विदेहमुक्ति तंव नाहीं ॥ ६०० ॥ विदेहमुक्ती श्रेष्ठ बोलती । तैसीच जाली जीवन्मुक्ती । तेव्हां विदेहमुक्तीची प्राप्ति । करावी अंतीं जीवन्मुक्तें ॥ १ ॥ जऱ्ही ऐसें असे सर्वथा । तऱ्ही देहसंगें कैसी विदेहता । तेथ वसिष्ठ ह्मणती गा रघुनाथा । भ्रांति चित्ता नको आणूं ॥ २ ॥ दृढ जीवमुक्ती जालिया । तेचि विदेहमुक्ती गा रघुराया । नाहीं प्रयोजन साधावया । अपूर्ण तया काय असे ॥ ३ ॥ जैं कां अपरोक्ष साक्षात्कार । जाला तेव्हांचि तो निर्विकार । देहादिदृश्य सर्व संभार । विरोनि निराकार ब्रह्मचि जाला ॥ ४ ॥ देह नव्हाल्या त्या अधिक येईल । कां देह असलिया ब्रह्मता जाईल । काय तया न्यूनता येईल । किंवा बाधील कर्माकर्म त्यासी ॥ ५ ॥ ह्मणौनि देह असतां नसतां । तो तंव ब्रह्मरूपची तत्वतां । तेंचि तें रघुनाथा । श्लोकार्थता[3] परियेसीं ॥ ६ ॥

अद्यैव मरणं वास्तु कल्पांतानिचयेन वा । तज्ज्ञः कलंक नाप्नोति हेम पंकगतं यथा ॥ ११ ॥

तयाच्या देहासि मरण । आतांचि हो न लगतां क्षण । ना सहस्त्र कल्पांतीं हो निधन । कां स्थिर पण कोटिकल्प[4] ॥ ७ ॥ जऱ्ही कोटिकल्पांतीं देह पडला । अथवा आतांचि क्षणार्धें गेला । तऱ्ही हानि लाभु नाहीं जाला । असे संचला ब्रह्मत्वेंचि ॥ ८ ॥ चिरकाळ राहिल्या पाप जडेल । किंवा कर्तेपण आंगा येईल । किंवा शीघ्र मरणें जाईल । काय होईल न्यूनाधिक ॥ ९ ॥ देह पडला अथवा राहिला । शीघ्र कां कल्पांतीं वेंचला । तऱ्ही कर्म न बाधी तयाला । कर्तृत्वाला नातळे ॥ ६१० ॥ तो प्रपंचीं असो देहसंगें । नातरी कर्मेही करो अनेगें । तऱ्ही तो न मैळे कोण्हे प्रयोगें । साक्षित्व आंगें भोगितु ॥ ११ ॥ जैसें पंकगत शुद्ध सुवर्ण । न मैळे पालटे वर्ण । अथवा कसादिकीं नव्हे न्यून । शुद्धपण सर्वथा त्यासी ॥ १२ ॥ ना तरी पद्मपत्र जळंगत । जळीं असोनि सर्वदा अलिप्त । कां गगन जैसें असंगत । नाहीं खातेजत धूमादिकीं ॥ १३ ॥ तैसा देह राहो अथवा जावो । परी देहातीता कोण संदेहो । तो स्वरूपप्रतीतीचा रावो । नाहीं आनभावो देहांतीं ॥ १४ ॥ तंव ऐसें ब्रह्मपूर्ण । तें जाणे तो तज्ज्ञ जाण । तो देहसंगें कलंक संपूर्ण । नपवे क्षण येकही ॥ १५ ॥ घटीं आवरिलें घटाकाश । तें घटधर्मा नातळे सावकाश । घटीं उदक भरल्या वोल्हांश । न पवे निःशेष सर्वथा ॥ १६ ॥ घटीं शुद्ध गंगोदक भरिलें । तेणें नभ पवित्र नाहीं जालें । मद्य घातल्या विटाळलें । नाहीं बुजालें तंदुळीं ॥ १७ ॥ घृतें घातल्या नाहीं स्रोज्वळलें । दुग्धें नाहीं पुष्ट जालें । अग्नि घातल्या नाहीं जळालें । चंदनें नाहीं निवालें तेंही ॥ १८ ॥ तैसें देहीं सत्कर्म घडो । अथवा प्रपंचसंग वाढो । तीर्थां कां चांडाळगृहीं पडो । अथवा बुडो मणिकर्णिकेशी ॥ १९ ॥

तनुं त्यजतु वा काश्यां श्वपचस्य गृहेऽथवा । ज्ञानसंप्राप्तिसमये मुक्तोसौ विगताशयः ॥ १२ ॥

तो देहातीत स्वप्रकाश । अद्वयानंद पूर्ण परेश । सर्व साक्षीनिर्विशेष । तया दोष देहत्वें कैंचा ॥ ६२० ॥ देहातीत साक्षीपणें । असतां बाधा कोणे गुणें । देह पडतां विधिअविधीनें । काय कारण तीर्थी अतीर्थी ॥ २१ ॥ तो तनु त्यजो काशियेसी । अथवा चांडालगृहवासी । परी तो सर्वथा मुक्त परियेसीं । नाहीं तयासि आन भावो ॥ २२ ॥ आतां अथवा कल्पांतीं । पडो अथवा करू स्थिति । जऱ्ही राहिला सत्संगती । नसतां संगति हानि काय ॥ २३ ॥ शवासि अंकुचंदनादि सोहळा । लेववितां अळंकारमेळा । अथवा चंदनकाष्ठीं जाळिला । कां काष्ठीं दाहिला तरी काये ॥ २४ ॥ तैसें देहसंबंध आत्मयासी । कोण्ही पदार्थ शुभाशुभासी । नव्हती जाण जीवन्मुक्तासी । देहाभिमानियासी होतील ॥ २५ ॥ जेव्हां जाली ज्ञानप्राप्ति । तेव्हांचि मुक्त तो सर्वार्थी । जयाचे वासनेची शांति । होऊनि स्थिति अखंड ॥ २६ ॥ तयाचें मनाचि गा नाशलें । तें मनपणा न ये कांहीं केलें । तयाचे आ-

---

१ पराभव पावत नाहीं. २.हरकत. ३ 'श्लोकार्थे' असा पाठ. ४ अनेक. ५ चिखलांतील. ६ कमळाचें पान. पाण्यांतील. ८ घाणेरडे होतु. ९ ओलावा. १० महाराच्या घरांत. ११ प्रेतास. १२ माळा, चंदन वगैरे उपभोग.

वाणीची सुटले । अंतर्बाह्य आलें ऐसा ॥२७॥ तयासि मन असोनि तो अमन । श्रवणींचि तो अश्रवण । नेत्र असोनि अनयन । चरणविहीन चरणेंसी ॥ २८ ॥ सर्व असोनियां बाधलें । तें असतांचि नाहीं झालें । करूनि अकर्तेपण आलें । नाहीं मळलें साक्षित्व ॥ २९ ॥ यालागीं तेव्हांचि तो मुक्त । त्यासि स्थळास्थळ नलगे शोधित । कैंकट अथवा पुण्यक्षेत्र । सदोदीत ब्रह्म तया ॥ ६३० ॥ जो कीं सर्वत्रचि आपण जाला । पूर्णत्व आपणचि संचला । तया उत्तम मध्यम भाग उरला । कनिष्ट कोणा काळा सांग पां ॥ ३१ ॥ देश काळ सर्वही आपण । तीर्थ अतीर्थ क्षेत्र जाण । देह विदेह परिपूर्ण । सर्वही सर्वातीतपण स्वयेंचि ॥ ३२ ॥ तया काळ अकाळ नाहीं । सर्वही तो आपणचि पाहीं । गति अगति भ्रांति सर्वही । तो पूर्ण पाहीं पूर्णत्वें ॥३३॥ घट फुटलिया घटाकाश । मार्गेंचि गेलिया मिळे आकाश । कीं अमार्गेंचि पडलें वोस । काळें लाभे आकाश अकाळें नाहीं ॥ ३४ ॥ पुण्यकाळीं तीर्थीं घट भंगला । तरीच महदाकाशीं मिळाला । येऱ्हवीं कोणा स्थळासि तो गेला । कीं मध्येंचि राहिला चुकूनियां ॥ ३५ ॥ घट न भंगतां गगन । आन रूप जालें आपण । घटभंगेंचि आकाश जाण । येऱ्हवीं काय आन होये ॥ ३६ ॥ यालागीं तो पूर्वींच ब्रह्म आहे । देहांतीं तो काय आन होये । देहविदेहें तेंचि पाहे । आन काय होईल ॥ ३७ ॥ देह असतांचि ब्रह्म जाला। मग देहसंबंध काय तयाला । मग देह असतां नसतां संचला । ब्रह्मत्वें जाला ब्रह्मचि तो ॥ ३८ ॥ जाला हें शब्दें बोलावें । परी जालेपण तया न संभवे । तो ब्रह्मचि आहे स्वभावें । जाला ह्मणणें उपचारें ॥३९॥ ब्रह्मैव सन् ब्रह्माप्येति । विमुक्तः सन् विमुच्यतेति । ऐसें बोलतसे श्रुति । नाहीं व्यक्ति भेदाची॥६४०॥ ब्रह्म असोनि ब्रह्म होये । मुक्त होतसाता मुक्तचि स्वयें । ऐसें स्वयें श्रुति बोलताहे । उपचार पाहें बोलाचा ॥ ४१ ॥ ब्रह्म जैसें तैसें असे । जालें नाहीं हें सर्वथा नसे । कोण्ही विचार तेथें न भासे । क्रियाफळ ऐसें नाहीं तया ॥ ४२ ॥ चतुर्विध तें क्रियाफळ । येक उत्पत्ति आप्ति केवळ । विकार्य संस्कार्य सकळ । नव्हे फळ सर्वही ॥ ४३ ॥ ह्मणौनि ब्रह्मत्व सिद्धचि आहे । आलें गेलें उपचार हे । देह असतां नसतां नोहे । आपण आहे वस्तुविण ॥ ४४ ॥ अज्ञानें व्यवधान केलें । ह्मणौनि जालें पण या आलें । येऱ्हवीं तेंचि तें संचलें । नाहीं केलें आन कांहीं ॥ ४५ ॥ देह तीर्थीं पडलया कोण स्वार्थ । अतीर्थीं पडलया कोण अनर्थ । हें अज्ञानें कल्पिलया अर्थानर्थ । देहबुद्ध्यर्थ लागलें ॥ ४६ ॥ देहातीता हें सर्वथा नाहीं । जो देहीं विदेहीं सर्वदा ब्रह्मचि पाहीं । यया बोला आन नाहीं । संशय कांहीं न धरावा ॥ ४७ ॥ देहाचिया ठाईं नैराश्यता । देहाचा साक्षी तो तत्वतां । नैराश्यालंकरणें अलंकृतता । चिन्ह तत्वतां आइक त्याचें ॥ ४८ ॥

गोष्पदं पृथिवी मेरुः स्थाणुराकाशमुद्रिका । तृणं त्रिभुवनं राम नैराश्यालंकृताकृते ॥ १३ ॥

जो नैराश्यें अलंकृत अलंकारला । तो गोष्पद मानी ब्रह्मांडाला । आपणाहूनि थोर कोण्हाला । पदार्थाला न देखे ॥ ४९ ॥ ह्मणोनि पृथ्वी मानी गोष्पद । मेरु तो स्तंभतुल्य विशद । आकाश तें बोटीं निबद्ध । जग समृद्ध तृण जैसें ॥ ६५० ॥ किंबहुना प्रपंचजात । शून्यरूप जालें बाधित । असोनिं मिथ्यात्व निश्चित । तें सत्य कदाचित भासेना ॥५१॥ रज्जुसर्पाची सत्यता । तंवचि दृढ माने चित्ता । रज्जुज्ञानें यथार्थता । कदाकल्पांता न येचि ॥ ५२ ॥ जंववरी रज्जुच अज्ञान । तंववरी भुजंगाचि सत्य पण यथार्थ । जालिया रज्जुज्ञान । सर्पपण न सांपडे ॥५३॥ तैसा जगद्भ्रम तंवचिवरी । जंव ब्रह्मज्ञान मति न वरी । साक्षात्कारें जगलहरि । क्षणाभीतरी मालवे ॥ ५४ ॥ ह्मणौनि जग तें तृणतुल्य । तें नाहींचपणें प्रतिभासे केवळ । म्हणौनि आशेची तळमळ । गेली सकळ नैराश्यें ॥५५॥ आणिकही लक्षणें गा रघुपती । जीवन्मुक्तांचीं तुजप्रति । सांगेन तें येकाग्रचित्तीं । विश्वमूर्ती परिसावें ॥ ५६ ॥

अंतःशून्यो बहिःशून्यः शून्यकुंभ इवांबरे । अंतःपूर्णो बहिःपूर्णः पूर्णकुंभ इवार्णवे ॥ १४ ॥

तऱ्ही अंतरीं जो वासनाशून्य । बाह्य नाहीं प्रपंचभान । ऐसें अंतर्बाह्य प्रपंचहीन । तेंचि शून्यपण परियेसीं ॥ ५७ ॥ सूक्ष्मप्रपंच त्या अंतर्वासना । स्थूळ तो नानाव्यक्ति जाणा । दोन्ही शून्य तो रघुनंदना । शून्यपणा येतसे ॥ ५८ ॥ जैसा आकाशीं कुंभ भरितां । अंतर्बाह्य पावे शून्यता । तैसा प्रपंचविहीन तत्वतां । पावे शून्यता जीवन्मुक्त ॥ ५९ ॥ प्रपंचे रावल्या शून्यतीं । मग सर्वत्र बाणे ब्रह्मता । अंतर्बाह्य पावे पूर्णता । प्रपंच सर्वथा ब्रह्मरूप ॥ ६६० ॥ जें जें भासे प्रपंचमान । तें तें अधि-

---

१ मन नसलेला. २ हें एका देशाचें नांव आहे. या देशांत गेलेला मनुष्य अपवित्र होतो असें शास्त्र आहे. ३ वरवर. ४ ब्रह्मच असून ब्रह्म होतो. ५ मुक्त असूनच मुक्त होतो. ६ गाईच्या पावलां एवढें.

ज्ञानत्वें पूर्ण चैतन्य । सर्वत्र न दिसे दुजेपण । आनंदघन सबाह्य ॥ ६१ ॥ अंतरीं ब्रह्मानंदें पूर्णता । बाह्यपदार्थे कोणही नाहीं रिता । ब्रह्मांडकोटि पावे ब्रह्मता । ब्रह्मचि तत्वतां सबाह्य पूर्ण ॥ ६२ ॥ नाहीं दुजें ब्रह्मेंविण । तेथें अगत्व उरलें नाहीं जाण । तया स्वस्वरूपाचि निर्माण । दुजेपण तेथें कैंचें ॥ ६३ ॥ तया अंतर्बाह्य काय बोलावें । जेथ दुसरें कांहींच न संभवे । हे गुरुखुण जाणावें स्वभावें । अनुभवें आपुलेनी ॥ ६४ ॥ शास्त्राचार्यउपदेशें । अनुभविलें ब्रह्मचि ऐसें । तेथ काय भासेल अनारिसें । गेलें पिसें दुजेपणाचें ॥ ६५ ॥ ह्मणोनि रितें न भासे तयासी । परिपूर्ण ब्रह्म आनंदराशी । उदकीं बुडालिया कुंभासी । जळ चौंपासीं अंतर्बाह्य ॥ ६६ ॥ घटाचें भान लोपलें । अंतर्बाह्य जळचि जालें । जळेंवांचूनि दुजें नाहीं निराळें । शब्दखोळें नयेचि ॥ ६७ ॥ जळीं परिपूर्ण घट असे । पदार्थांच हा दृष्टांत वसे । हा एकदेशी परी सर्वांशें । सर्वथा मानसें नेघावें ॥ ६८ ॥ पूर्णपण तें आपणासहित । परिपूर्ण ब्रह्म सदोदीत । नाहीं वेगळेपणें उरत । जळीं तळपत जळ जैसें ॥ ६९ ॥ आणीकही जीवन्मुक्ताचें । लक्षण सांगेन निर्वाणीचें । परिपूर्णपण वासनेचें । गेलें वेचें कल्पनेसहित ॥६७०॥

ईप्सितानीप्सिते न स्तो यस्यांतर्वस्तुदृष्टिषु । सुप्त इव यश्चरति स मुक्त इति कथ्यते ॥ २५ ॥

ज्याची बाह्यदृष्टि मोडोनी । अंतर्दृष्टि भरली कोंदोनी । तया ईप्सितें अनीप्सितें दोन्ही । जनीं वनीं उरणें नाहीं ॥७१॥ वस्तूहूनि दुजें असावें । तऱ्ही तेणें ईप्सितावें । वस्तूविण दुजें भासावें । तऱ्ही ईप्सितावें देहबुद्धी ॥ ७२ ॥ जो आत्मलाभापरतें । न मनी दुजया लाभातें । तैसेंचि दुःखबुद्धी दुजयातें । त्यजावें तेथें कैसें उरे ॥ ७३ ॥ जें निरतिशयसुखसंपन्न । जाला ह्मणौनि नाहीं आन । इतरां सुखांसि अतिशय संपूर्ण । नाहीं जया जाण रघुनाथा ॥ ७४ ॥ तया आत्मलाभसुखापुढें । दुःख कैंचें जेणें चरफडे । ब्रह्मसुखाबाहेरी न पडे । दुःख कोणीकडे जाणेल तो ॥७५॥ आत्मलाभापुढें लाभ नाहीं । ह्मणौनि तया ईप्सित उरेल कायी । निरंतर सुखीं निमग्न पाहीं । डंडळील कायी तेथूनि तो ॥ ७६ ॥ दुःखभोगें दुःख मानावें । तरीच देहबुद्धया न ईप्सावें । त्यजावया उपाय करावे । हेंही स्वभावें नाहीं तया ॥ ७७ ॥ यदर्थी तया किरीटीप्रति । गीतेसि बोलिला स्वयें श्रीपति । तेचि ऐकावी संमति । एकाग्र श्रोतीं मनोभावें ॥ ७८ ॥

संमतिश्लोक ॥ यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः । यस्मिँस्थितो न दुःखेन गुरुणापि विचाल्यते ॥

आत्मसुख पावल्यानंतर । आणीक लाभ न मनी त्याहूनि थोर । जे सुखीं राहिलया स्थिर । नेणे उत्तर दुःख जालें ॥ ७९ ॥ यालागीं सुखाहूनि थोर असावें । तरीच लाभत्व तेणें इच्छावें । दुःख अलाभत्वें त्यजावें । अनिष्ट स्वयें ह्मणोनियां ॥ ६८० ॥ ह्मणोनि ईप्सितानीप्सिता दोन्ही । गेलीं सुखस्वरूप वस्तु पावोनी । सुप्ताचेपरी अकरणीं । अनीहपणीं सर्वदा ॥ ८१ ॥ इच्छा अनिच्छा जेथें नाहीं । तेथें क्रिया उरेल कैंची कायी । अकर्त्ता सर्वदा विदेही । मुक्त पाहीं तो येकु ॥८२॥ आणीकही तयाचें लक्षण । आयिक रघुनाथा सांगेन । जेणें बुझसी संपूर्ण । जीवन्मुक्तपण तें कैसें ॥ ८३ ॥

निर्ग्रंथिः शांतसंदेहो जीवन्मुक्तः स्वभावतः । अनिर्वाणोपि निर्वाणश्चित्रदीप इव स्थितः ॥ १६ ॥

तरी तो स्वभावेंचि मुक्त जाण । तुटला चिदचिद्ग्रंथि संपूर्ण । तो मुक्त जाण ह्मणोन । येऱ्हवीं बंधन ग्रंथि असतां ॥८४॥ चिदचिद्ग्रंथि तो कैसा । तुज सांगों गा परेशा । तें चित्त देऊनि परियेसा । ग्रंथि कैसा जडाजडें ॥ ८५ ॥ तरी चितशब्दें ज्ञान अजड । अचित्‌शब्दें अप्रकाश जड । उभयतां ग्रंथि प्रचंड । पडे सदृढ रघुनाथा ॥ ८६ ॥ ग्रंथीची समूळ मांडणी । आयिकें गा कोदंडपाणी । हा ग्रंथि जाणतां निर्वाणीं । संसार स्वप्नीं भासेना ॥ ८७ ॥ तऱ्ही ब्रह्मस्थानीं महदाकाश । तेंचि बिंबलिया अभ्राकाश । अभ्र तें विद्या सावकाश । तेथें बिंबईश तो ईश्वरु ॥ ८८ ॥ देहस्थानीं घट येक असे । घटामाजी जें आकाश वसे । त्यतें कूटस्थ बोलिजे ऐसें । हे मांडणी विश्वेशें जाणावी ॥८९॥ घटामाजी असे जळ । जळस्थानीं बुद्धि निर्मळ । जळीं अभ्राकाश सकळ । बिंबे तत्काळ उपाधिवशें । ॥ ६९० ॥ बुद्धिजळीं जें ब्रह्मनभ बिंबलें । तेंचि जीवशब्दें चैतन्य बोलिलें । तें अजड चित् ज्ञानबळें । असे निराळें प्रकाशपणें ॥ ९१ ॥ बुद्धिजलस्थानीं अचित । तेथें प्रतिबिंबलें स्वयें चित । तें परस्पराध्यासें येकत्व । पावोनि निश्चित अहंसंगा ॥ ९२ ॥ देहाच्या संगें अहंस्थिति । हेचि विलासली चिद्चिद्ग्रंथि । प्रमाता ये बुद्धिवृत्तीं । सर्व ग्रंथीं हेंचि सिद्ध ॥ ९३ ॥ तिये बुद्धीतें मीचि ह्मणे । सर्वथा

१ 'लोटलें' असा पाठ. २ 'अंतरीं दृष्टि' असा पाठ. ३ 'निप्सितें' असा पाठ. ४ ज्यापेक्षां दुसरें उत्तम सुख नाहीं अशा सुखानें युक्त. ५ डळमळेल. ६ अर्जुनाला. ७ आशा आणि निराशा. ८ ब्रह्म हेंच आकाश. ९ बुद्धीच्या आच्छादनांत.

भिन्न ऐसें नेणे । मन बुद्धि तंव येकपणें । असती अभिन्न निरूपिलीं ॥ ९४ ॥ मनोबुद्धीचा व्यापार । मस्तकीं घेतसे विकार । सुखदुःखादिप्रकार । मानी साकार आपणिया ॥ ९५ ॥ मनाचें जडत्व आपणासी । आत्मप्रकाश आला मनासी । एवं ग्रंथि जडाजडासी । पडली अध्यासीं येरयेरां ॥ ९६ ॥ ऐसें जंववरी अभिन्न दिसे । कोटिकल्पवरी अभ्यास असे । तंववरी देहसंसृति न नासे । हें रघुवंशें जाणिजे ॥ ९७ ॥ बुद्धि आपणाहूनि भिन्न । ऐसें जेव्हां जाणे साक्षी होऊन । बुद्धीचा प्रकाशकु आपण । हेंचि ज्ञान सज्ञानत्वें ॥ ९८ ॥ येणें ज्ञानेंचि तत्काळ । चिदचिद्ग्रंथि तुटे सकळ । तेव्हांचि संसृतिशृंखळ । न लगतां वेळ तुटोनि जाये ॥९९॥ इये संसृतीचें कारण । हा चिदाचिद्ग्रंथी गा जाण । तो तुटला जयाचा पूर्ण । तोचि संपूर्ण जीवन्मुक्त ॥ ७०० ॥ जेव्हां सद्गुरूनें हृदयावेगळा केला अचित्ता जडा सकळा । तेव्हां साक्षी होऊनि निराळा । असे चित्कळा बोधरूपें ॥१॥ क्षणा कां संदेह उपजला । बुद्धयादिकांहूनि कैसा वेगळा । स्वप्रकाश ज्ञानकळा । साक्षी सकळां मी कैसा ॥२॥ अथवा सद्गुरुवचन प्रमाण । होय कीं नव्हे संदेह पूर्ण । उपजे तें ज्ञानचि अज्ञान । तम दारुण होऊनि ठाके ॥ ३ ॥ तैसा नव्हे तो रघुराया । गेला संशय समूळ माया । सकळ संदेह नाहींच तया । गेल्या लया असंभावना ॥ ४ ॥ यालागीं तो शांतसंदेह होये । तो स्वभावेंचि मुक्त आहे । बाह्य मानुषत्व दिसताहे । परी तो नव्हे देहवंतु ॥ ५ ॥ अनिर्वाण ऐसा दिसे । परी तो निर्वाण ब्रह्मचि असे । स्थिति जयाची न भ्रंशे । स्थिर असे चित्रदीप जैसा ॥ ६ ॥ चित्रीं दीप दीपपणें असे । परी तो निचेष्ट सर्वांशें । तैसा देहीं निरहंकार वसे । स्थिति विलासे अढळ पणें ॥ ७ ॥ निचेष्ट असावया कारण । तें रघुनाथा तुज सांगेन । स्वरूपस्थिति अढळपण । न भंगे जाण जेणेंकरीं ॥ ८ ॥

अहंकारमयीं त्यक्त्वा वासनां लीलयैव यः । तिष्ठति ध्येयसंत्यागी जीवन्मुक्तः स उच्यते ॥१७॥

अहंकारमयी जे वासना । ते लीलेकरूनि टाकिली जाणा । म्हणौनि ईहां[१] नुरेचि कर्त्तेपणा । अनीहपणें शोभतु ॥ ९ ॥ अगा अहंकारसंवलित । सर्व संकल्प असती उठत । अहंकारेंविण कदाचित । वासना ईषत नुठे कदा ॥ ७१० ॥ स्वरूपाश्रयें असे अज्ञान । अज्ञानें अहंदेह उठे जाण । तोही द्विविध अहंकार पूर्ण । विशेष सामान्य येणें रूपें ॥ ११ ॥ जें सामान्यत्वें सर्व देहीं । मी ऐसा अहंकार पाहीं । मग तोचि दृढावे विशेषेंही । सांगों तेही खूण तुज ॥१२॥ मी ब्राह्मण क्षत्रिय वैश्यादिक । तैसेंचि आश्रम सकळिक । येणें रूपें अहंकारु येक । बोलिजे सम्यक विषेश तो ॥ १३ ॥ हा सर्वत्र सर्व देहीं । अनुस्यूत सामान्यत्वें नाहीं । विशेषें ब्राह्मणाचां ठाईं । ब्रह्मत्वें पाहीं वर्त्तनु ॥ १४ ॥ क्षत्रियत्वें क्षत्रियासी । वैश्यत्वें वैश्यासी । शूद्रत्वें जाण शूद्रासी । पितापुत्रासि पितापुत्रत्वें ॥ १५ ॥ तैसेंचि आश्रमादिकांसी । विशेष अहंकारु परियेसीं । सामान्य तो सर्वांसी । अहंपणेंसि भासतु ॥ १६ ॥ तेथूनि मग संकल्प विकल्प । संकल्प तो जाण एवंरूप । अशोभन जें विषयस्वरूप । तेंचि शोभनरूप स्वयें करी ॥ १७ ॥ एवं शोभनाध्यास तो संकल्प । तेणें होआवा हा ऐसा आरोप । ते वासना जाण कामरूप । भवपादप[६] वाढे जया ॥ १८ ॥ ते अहंकाराच्या पोटीं । संस्काररूपें राहे शेवटीं । वासनेसारिखेंचि घेऊनि उठी । नेटीपाटीं आनकाळीं ॥ १९ ॥ दिवसा जे जे कामसंकल्प करी । तेचि राहाती अहंकाराभीतरी । तेचि देखे स्वप्नामाझारी । तेचि पुरी वासना जाण ॥ ७२० ॥ मग प्रबोधातिये वेळे । अहंकारु स्वयें प्रबळे । तेथें पुर्वकृतसंस्कारमेळें । वासनफळें उत्फुल्ल होती ॥ २१ ॥ यालागीं अहंकारसंवलित । वासनाजाळ प्रबळ होत । त्या अहंकारासमवेत । वासना त्यक्त जेणें केल्या ॥ २२ ॥ परी अपरोक्ष साक्षात्कारें । न लगती टाकणे बलात्कारें । ते लीलेचिकरूनि वासनाभ्रम विरे । केवळ उरे ज्ञेय जया ॥ २३ ॥ तें ज्ञेय आपण ध्याता । ध्यान जे वृत्ति तदाकारता । हे त्रिपुटी स्फुरे तत्वतां । ते संप्रज्ञातसमाधि ॥ २४ ॥ जेथें हेचि त्रिपुटी स्फुरे । ते सबीजसमाधि निर्धारें । सविकल्प संप्रज्ञात नामांतरें । नामें मनोहरें इयेसिचि ॥ २५ ॥ ध्याता ध्येय आणि ध्यान । नुरोनि ज्ञेय समसमान । आपणा आपण परिपूर्ण । निर्बीज जाण समाधि तो ॥ २६ ॥ अथवा ध्येयत्यागाचें लक्षण । तेंही हें एवंविध जाण । ध्येय तें अहंकारें ममकारें पर्ण । अखंड चिंतन तें चित्ती ॥ २७ ॥ देहविशिष्ट आत्मजाति वर्ण । ऐसें अहंकारें स्फुरण । ममकारें पुत्रवित्तादिभोगण । त्यांचें भरणपोषण योजणें जें ॥ २८ ॥ किंबहुना देहबुद्धयादिचिंतन । तें तें ध्येय गा संज्ञा जाण । तत्यागें त्याचें वर्त्तन । तोचि पूर्ण जीवन्मुक्त ॥२९॥

---

१ भ्रमामुळें. २ देह पुनःपुनः उत्पन्न होणें. ३ संसाराची बेडी. ४ इच्छा. ५ उत्तम पदार्थाची इच्छा. ६ संसाररूपी वृक्ष. ७ पूर्वी केलेल्या कर्माचा जोरदार परिणाम झाल्यामुळें. ८ 'देहविशिष्ट आपजातिवर्ण' असा पाठ.

सर्व संग बाधी ह्मणउनी । विक्षेपक त्यजी तयालागुनी । यालागीं निमग्न ब्रह्मपणीं । राहे कोंदोनि ब्रह्मानंदें ॥ ७३० ॥ ऐसा निर्बीजसमाधिस्थ । तोचि जाण जीवन्मुक्त । सर्वसंगविनिर्मुक्त । स्वरूपस्थ सर्वदा जो ॥ ३१ संगत्यागुही तुजप्रति । सांगों आयिक श्लोकसंमति । सादरें परिसें अयोध्यापती । अर्थप्राप्ति जेणें होये ॥ ३२ ॥ जन्हीं श्रवणीं नाहीं सादरता । तन्हीं तो जाणावा सबाह्य रिता । तो काये पावे श्रवणार्था । कुंभी तत्वतां लौकिकीं ॥ ३३ ॥ जया श्रवणीं असे सादरता । तोचि मननीं निजध्यास पुरता । ययाची सांगों व्यवस्था । रघुनाथा परियेसीं ॥ ३४ ॥

संमतिश्रुति ॥ षड्भिर्लिंगैः सर्वेषां वेदान्तवाक्यानामद्वैते ब्रह्मणि तात्पर्यावधारणं श्रवणम् ।

सर्वही वेदांतवाक्यें । तें परब्रह्मचि बोधिती आत्मैक्यें । तेंचि तात्पर्यवाक्य निकें । अवधारीं येकें मानसेंकैरीं ॥ ३५ ॥ जें जें बोले वेदशास्त्र वचन । त्याचें कोठें होतें अवसान । ययाचा तात्पर्यार्थ संपूर्ण । घेइजे तें ज्ञान श्रवण होये ॥ ३६ ॥ वेदवाक्याचा तात्पर्यार्थ । त्यामाजी रिघोनि घेइजे अर्थ । त्याचें अवसान पावे तो अर्थ इत्थंभूत । घेइजे निश्चित तें श्रवण ॥ ३७ ॥ अंतर्यामीं पाहिजे एकाग्रता । ते विचारीं जानकीकांता । हे नसोनि कीजे काळक्षेपता । पुण्यजनकता न घडे कांहीं ॥ ३८ ॥ आणि पूर्णश्रवणाचें श्रवण । त्यासिच पुण्यजनकता पूर्ण । श्रवणा न येतां श्रवणपण । पुण्यभाजन केवीं होये ॥ ३९ ॥ जरी सांग सिद्ध तयाचे याग । तरी तो पुण्यजनीं अभंग । त्यागुचि यागपणा आंग । न पवतां सांग पुण्यही कैंचें ॥ ७४० ॥ त्यालागीं श्रवणीं श्रवणपणें । सिद्धी जाय जरी तात्पर्यावधारणें । तरी सकळ सिद्धि आणि पुण्यें । तयाकारणें बोळंगती ॥ ४१ ॥ यालागीं श्रवणीं सादरता । अवश्य द्यावी गा रघुनाथा । श्रवणाची समूळ कथा । तुज सर्वथा सांगितली ॥ ४२ ॥ येणें श्रवणें सिद्धि होये । अन्यथा तो काळक्षेपु आहे । यालागीं सादर होयें । हें पुनःपुनः पाहें बोलिजेत ॥ ४३ ॥ ऐसी करूनियां एकाग्रता । श्लोकार्थ आइकें रघुनाथा । जीवन्मुक्त बाह्यार्था । त्यजी तत्वतां तें कैसें ॥ ४४ ॥

दूरे मुंचति बंधुमंघमिव यः संगाद्भुजंगादिवत् त्रासं यो विदधाति वेत्ति सदृशं रोगं च भोगं च यः ।
स्त्रैणेयस्तृणवद्घृणां प्रकुरुते मित्रेष्वमित्रेष्वपि स्वांतं यस्य समं समंगलमिहामुत्रापि मर्त्योऽश्नुते ॥ १८ ॥

तरी जो कीं सकळ बंधुमात्रसमस्त । सखे सहोदर मित्र गोत । व्याही जामातादि दूरस्थ । टाकी समस्त देहत्यागें ॥ ४५ ॥ जैसी निगडशृंखळा उपेक्षुनी । दुरी टाकिजे द्वेषेंकरुनी । तैसा सुहृद्वर्गीं स्नेहें तत्क्षणीं । टाकी भरंवसेनि वैराग्यबळें ॥ ४६ ॥ तैसाचि संगापासाव त्रास धरी । कोण्हाचाही संग न करी । संगें अनर्थ होती भारी । यास्तव न करी संग त्यांचा ॥ ४७ ॥ पुत्रवित्तादिगृहदारा । यांचा संग तंव नाहीं बरा । जैसें सर्पसंगें राहिजे विवरा । मृत्यु खरा न प्रार्थितां ॥ ४८ ॥ त्यांचेनि संगें अनिष्ट होये । त्याचें काय अपूर्व आहे । परी विजातीयाचेनि संगें पाहें । संसारभय कृपेस्तव ॥ ४९ ॥ भरतराजा महाराजचूडामणि । सकळ पृथ्वीचे भोग भोगुनी । मग संग दिधले उपेक्षुनी । ज्ञान साधूनि राहिला ॥ ७५० ॥ परम तपस्वी महामुनि । समाधिस्थ होता निरंजनीं । व्युत्थान होतां कोण्ही येक हरिणी । तिये वनीं प्राप्त जाली ॥ ५१ ॥ भरत स्नान करितां नदीभीतरीं । तंव सिंहें हाक दिली येकसरी । गर्भिणी हरिणी भयेंकरी । पळाली भारी प्राणलिप्सया ॥ ५२ ॥ नदी उडतां अतित्राणें । तंव गर्भपात जाला तत्क्षणें । तो नदीमाजी पडतां महंतें तेणें । देखिला नयनें दीनरूप ॥ ५३ ॥ तें अतिसकोमल सुंदर । त्यासि प्राणांतअवस्था देखे ऋषीश्वर । मग सकृप होऊनि सत्वर । काढी आतुर तें पाडस ॥ ५४ ॥ त्यासि कोण्ही नाहीं स्तनपानदेता । अनाथ प्राण त्यागील हे चिंता । ह्मणोनि संग्रह जाला करिता । वाढविता जाला कृपेकरुनी ॥ ५५ ॥ सेवटीं त्याचेनि संगेंकरुनी । स्वयें हरिण जाला तो मुनि । त्या भयास्तव संगालागुनी । टाकूनि दुसरे जन्मीं राहिला ॥ ५६ ॥ संगें सुखदुःख होय भारी । ह्मणोनि टाकी तें संसारीं । जडभरत ज्ञानियांमाझारी । सर्वांउपरी शोभतु ॥ ५७ ॥ येथें स्त्रीपुत्रादिकांचा संग । तो न बाधील गा कैसा सांग । येका येकी अंगें बाध अभंग । पावले अव्यंग कलंक कैसा ॥ ५८ ॥ हरिण पतंग आणि मीन । गज भ्रमर हे पांचही जण ते पांचा विषयीं पांचांसि जाण । क्षया संपूर्ण पावविलें ॥ ५९ ॥ श्रवणाचा विषय जाण । तेणें शब्दें मृत्यु पावला हरिण । पारधी नादें वेधून । धरी जाण हरिण पाशीं ॥ ७६० ॥ रूप तो नेत्रांचा विषयो

१ मनानें. २ या प्रकारचा. ३ वेळ घालविणें. ४ पुण्याला पात्र. ५ सार ध्यानांत ठेविल्यानें. ६ तुरुंगांतील बेडी. ७ पुत्र, द्रव्य, घर, स्त्री वगैरे. ८ जडभरत. ९ भयामुळें. १० प्राण वांचविण्याच्या इच्छेनें.

रघुपती । तेणें पतंग वेधे दीपें दीप्ती । तो मरण पावे सर्वार्थी । तैसीच गति भृंगाची ॥ ६१ ॥ रस-नेचा विषयो रसु जाण । तेणें रसें मीनासि मरण । त्वचेचा विषय स्पर्शन । कुंजरा मरण तेणेंचि होये ॥ ६२ ॥ घ्राणविषयो गंधु होये । गंधवेधें भृंगासि मृत्यु पाहें । ऐसा येकयेका विषयें नाशु आहे । संगें होताहे सर्वथा ॥ ६३ ॥ ऐसी येकैक संगें बंधप्राप्ति । आणि वाढों लागे दुःखसंतति । ते येकैक सांगों किती तुजप्रति । पुत्रवित्पत्ती ते आइक सांगों ॥ ६४ ॥ पुत्रदुःख आरंभापासुनी । तें येकैक ऐकें कोदंडपाणी । पुत्रसंगालागुनी । सतत अनुदिनीं दुःखकोटि ॥ ६५ ॥ पुत्र नसतां अति चरफडी । पठणादिकीं घाली उडी । पुत्रेंविण देहाची कोराडि । व्रततपकोडी पुत्रालागीं ॥ ६६ ॥ पुत्रेंविण धिक् जीवित । संसारचि शून्य मानित । तयालागीं देहादिधन वेचित । दुःख अपरिमित पुत्रार्जनीं ॥६७॥ पुत्र नसतां दुःखकोटि । अर्जनीं शरीरधना होये आटी । गर्भी राहिल्या करी कष्टी । सदा पोटीं जड-जाड्य ॥ ६८ ॥ स्त्रियेचेनि दुःख स्वयें दुखवे । ह्मणे पुत्र नसे हेंचि बरवें । होतां दुःखें न साहावे । दुःखें अभिभवे जन्मतां ॥ ६९ ॥ गर्भपात जाल्या अतिदुःख । जन्मतां व्यथेनि कैसें सुख । मातेचें अतिशय दुःख । होये आणीक तें परियेसीं ॥ ७७० ॥ पांचवे दिवशीं मृत्यु पावे । वांचलिया रोगें अभिभवे । पंगू वेडें बधिर जाल्या न पवे । सुख नव्हे पितरांसी ॥ ७१ ॥ अपवित्र प्रजा दुःखकोटि । मूर्ख दैन्य इत्यादि गोष्टी । अनपत्य जाल्या दुःख पोटीं । नाहीं भेटी सुखेंसी ॥ ७२ ॥ ज्ञाता जाला तरी दरिद्री होये । समर्थ जाल्या रोगु खाये । रोगें भोग भोगूं न लाहे । तेणें पाहें दुःख पितरां ॥७३॥ सर्वही गुणीं जाला संपन्न । तऱ्ही तो शीघ्रचि पावे मरण । पितरां दुःख अतिदारुण । सुख कोण अनुभवी ॥ ७४ ॥ ऐसें असतां नसतां आदिअंतीं । दुःखावांचूनि नाहीं प्राप्ति । तैसे स्त्री आदिसर्व-संपत्ति । द्रव्याची गति तैसीचि ॥ ७५ ॥ द्रव्य नसतां दुःखकोटि । अर्जनीं होय प्राणाची आटी । रक्षणीं आटाटी मोटी । व्ययकाळीं भेटि मरणेंसी ॥ ७६ ॥ अपहार दृश्य राज्यादिक । करितां अति-शय दुःख । अणुमात्रही नाहीं सुख । दुःखाहूनि दुःख उत्तरोत्तर ॥७७॥ ऐसिया पदार्थांची संगति । करितां त्रासु मानी मति । जैसा भुजंगदर्शनें त्रासु चित्तीं । तैसा न इच्छिती संगु त्यांचा ॥ ७८ ॥ व्याघ्रादिकादि भयंकर । जेणें होय मरणा निर्धार । त्यांचा त्रासु महाथोर । अतिशय नर मानी जैसा ॥ ७९ ॥ तैसा संगापासाव त्रास मानी । संग न करी पदार्थीं कोण्ही । असिलया संग प्रारब्धेंकरूनी । त्रासु मनीं सर्वदा वाहे ॥७८०॥ तैसेंचि स्रक्चंदनवनितादिकें । भोग आहेति जितके । प्राप्त जालिया न मनी निके । परी न तोखे रोगदृष्टी ॥ ८१ ॥ विषयभोगाकारणें । प्राप्त जाल्याही मनें । संतोषणें नाहीं तेणें । सर्वथा धरणें न बैसे ॥ ८२ ॥ प्राप्त जाल्याही विषयभोग । ते काकविष्टेसमान मानी चांग । मनें मानी जैसे रोग । अतिअभंग वैराग्यबळें ॥८३॥ तेथें प्रयत्नाची कें असे गोठी । भोगाकडे नेदी मिठी । आत्मलाभें नित्य संतुष्टि । आनंदकोटि ब्रह्मानंदें ॥ ८४ ॥ जो तृप्त असे अमृतपानें । तया कांजी कासया सेवणें । नित्य मिष्टान्न सेवी तेणें । तूस सेवनें घडेना कीं ॥ ८५ ॥ जो इंद्रपद देतां अव्हेरी । तो काय भिक्षा मागेल घरोघरीं । तैसा जो निमग्न परमानंदसागरीं । तो काय करी विषयोपभोग ॥ ८६ ॥ जो षण्मासांचा निराहारी । तो सर्वथा विषभक्षण न करी । तेणें षड्रसतृप्ति न स्वीकारी । अपूर्वपरी काय येथें ॥ ८७ ॥ तैसा मुमुक्षु साधनदशे । विषयभोग त्यजी मानसें । तेथें ज्ञानी न सेवी हें काय ऐसें । कोणा मिसें बोलावें पां ॥ ८८ ॥ हें काय अपूर्व येथ मानावें । तो स्त्रियादिभोग मनोभावें । न इच्छी हें काय प्रशंसावें । मानी स्वभावें शुभ्रकुष्ठ जैसा ॥ ८९ ॥ तैसाचि मित्रा अमित्रांसि सरिसा । सूर्य भलत्या सन्मुख जैसा । सर्व भूतीं सम सरिसा । गगन-वीरेशा जेवीं असे ॥ ७९० ॥ गाईची तृषा हरावी । व्याघ्रादि विषें होऊनि मारावीं । हे जैसी नाहीं ठेवाठेवी । सर्वां सम भावीं जळ जैसीं ॥ ९१ ॥ तैसाचि मित्रें अमित्रां कृपाळू । निष्ठुरत्वें पडों नेदी आडळू । चंद्र जैसा कां सुशीतळु । अतिनिर्मळु श्रोत्रियां चोरां ॥ ९२ ॥ त्याचें स्वतां जें अंतःकरण । तें तत्वज्ञानें जालें समान । तेणें आपण भिन्नाभिन्न । समसमान आत्मत्वें ॥ ९३ ॥ तया नाहीं आपपर । कैंचा बंधु शत्रु मित्र । समसमान सर्वत्र । सर्व पवित्र ब्रह्म जया ॥ ९४ ॥ ऐसें जयाचें दर्शन । सर्वत्र सम अंतःकरण । तो देहीं विदेहीं ब्रह्म पूर्ण । स्वानंदघन अनुभवी ॥ ९५ ॥ जें मंगळ होत्साता सम । चिद्धनैकरस परम । तें देहीं विदेहीं निरुपम । भोगी परम भोक्तृत्वेंविण ॥९६॥ सकळ मंगळांचें मंगळ ।

१ हत्तीला. २ अनेक दुखें. ३ 'पडणादिकीं' असा पाठ. ४ अनेक व्रतें आणि तपें. ५ मुलें नसलेला. ६ खर्च करतांना. ७ संतोषयुक्त. ८ कोंडा. ९ सहामहिन्यांचा. १० आश्चर्याची गोष्ट. ११ पांढरें कोड. १२ स्पर्श.

मंगळशब्दें सुखकल्लोळ । जेथूनि मंगळांचें प्राबल्य । तें अतिमंगळ परब्रह्म ॥९७॥ ऐसा सर्व संगत्याग करूनी । सर्वदा ब्रह्मानंदाचिये घणी । उपेक्षा न पडे काळीं कोणी । अतिनिर्वाणीं परमानंदें ॥ ९८ ॥ मृत्युशब्दें मरणधर्मक जें शरीर । हें जे पावले विवेकी नर । त्या मर्त्य शरीरेंचि महाथोर । सुखसंभार पावले ॥ ९९ ॥ अथवा देहाभिमानी जो जीव । तो ब्रह्मचि जाला स्वयमेव । ब्रह्मसुखाचा अनुभव । भोगी जीवभाव टाकुनी ॥ ८०० ॥ इहलोकीं आणि परलोकीं । परमानंदसुखें अतिसुखी । ऐसा तोचि बोलिजे सुखी । येर तो दुःखी संसारें ॥ १ ॥ इहलोकीं जीवन्मुक्त सुख । अनुभवित सर्वदा देख । इच्छेनें पावला जऱ्ही परलोक । तेथेंही देख परमानंदु ॥ २ ॥ कदाचित् जीवन्मुक्तासी । परलोकइच्छा मानसीं । हांसरलिया नेमेंसी । आन सुखासि असेना ॥ ३ ॥ यावत् इच्छा तों ते लोकीं असे । तेथेंही ब्रह्मसुखेंचि वसे । त्याचें ज्ञान कदापि न भ्रंशे । भोगांतीं कैसें आन होये ॥ ४ ॥ अथवा इहामुत्राचा अर्थ । देहाविदेह जाणे यथार्थ । विदेहपण काये कृतार्थ । देहीं अनर्थ काये होती ॥ ५ ॥ ह्मणोनि देहींविदेहीं पूर्ण । देशींविदेशीं नव्हे आन । काळींअकाळीं समसमान । चैतन्यघन चिद्रूप ॥ ६[1]॥ तया देशकाळवयावस्था । सर्व इत्यादि आत्मसत्ता[2] । नाहीं आपणाहूनि परता । नसे रिता कोणे भावें ॥ ७ ॥ आणीकही जीवन्मुक्ताचें लक्षण । रघुवर्या तुज सांगेन । ऐकें येकाग्र करूनियां मन समाधान जेणें होये ॥ ८ ॥

हृदयात्संपरित्यज्य सर्वं दृश्यं प्रशांतधीः । व्योमसौम्यतरोऽव्यग्रः स मुक्तः परमेश्वरः ॥ १९ ॥

आयिका रघुवंशदीपका । दशरथकुळटिळका । परापरव्यापका । प्रकाशका रघुवर्या ॥ ९ ॥ हृदयशब्दें जाण पां मन । त्या मनापासूनि टाकिजे दृश्यभान । दृश्य तें स्थूळसूक्ष्मात्मक जाण । तें सांगेन चिन्ह रघुवर्या ॥ ८१० ॥ सूक्ष्म तें अंतर्वासनासंपत्ति । मनबुद्ध्यादि जें जें जाणती । तें जाण सूक्ष्म दृश्य गा रघुपती । नाहीं व्युत्पत्ति यया बोला ॥ ११ ॥ याची येकि खूण सांगेन । तेणें बुझसी हें संपूर्ण । इंद्रियें जाणती तें स्थूळ दृश्य जाण । नव्हे आन सर्वथा ॥ १२ ॥ ब्रह्मावेगळें जें जें भासे । तें तें इंद्रियेंकरूनि प्रकाशे । सर्वांचें अंतर्बाह्य असे । तेणें प्रकाश दिसे इंद्रियां ॥ १३ ॥ कार्य कारणातें प्रकाशी । जड अजडातें काय विकाशी । ज्याचेनि प्रकाशें प्रकाश ज्यासी । तें तयासि जाणती काय ॥ १४ ॥ इंद्रिये तितुकीं बहिर्मुखें । तीं प्रपंचाचीं प्रकाशकें । तयांसि परब्रह्म ठाउकें । कोण्हे बेंपें[4] पडेल ॥ १५ ॥ तयालागीं मनाबुद्धीचें जाणणें । तें तें सूक्ष्म दृश्य मी ह्मणें । चक्षुरादिकीं प्रकाशणें । स्थूळ ह्मणणें तयासी ॥ १६ ॥ ऐसें जें स्थूळसूक्ष्मात्मक । तें मनापासूनि गेलें सकळिक । वस्तुता मनाचा ठाईंच भासे देख । मनोलयें निःशेष हारपे ॥ १७ ॥ हें मनोलयप्रकरणीं । मनचि कारण दृश्यदर्पणीं । ऐसें ठायीं ठेविलें[5] निर्वाणीं । तैसेंचि मनीं जाणावें गा ॥ १८ ॥ नाहीं दृश्य तितुकें मिथ्याभूत । तें मनोमयचि मना भासत । हें मानलें परी संशय येथ । सावचित्त परियेसीं ॥ १९ ॥ जऱ्ही मिथ्याचि प्रपंच समस्त । तऱ्ही सत्यासत्य त्यामाजी स्फुरत । घटादि सत्यत्वें मानित । रज्जुसर्प घेत असत्यत्वें ॥८२८॥ स्थूळदेह तैसें सत्य मानिति । सूक्ष्मजंतु क्षणिक ह्मणती । ऐसी सर्वत्र जनाची प्रतीति । कोणा अर्थी तें सांगिजे ॥ २१ ॥ असत्य तरी एकचि रूप असावा । सत्य जरी सत्यचि रूप भासावा । असत्या माजीही ह्मणावा । कोण ठेवा असत्यसत्या ॥ २२ ॥ तऱ्ही ऐकें याचें उत्तर । जें सांगिजैल मनोहर । जेणें संदेहसागराचा पार । अतिदुस्तर पाविजे ॥ २३ ॥ तऱ्ही पूर्वापूर्वसंस्कारें[6] । सत्यासत्य इयासि स्फुरे । येऱ्हवीं सत्यासत्य नव्हे खरें । तरी पूर्वाभ्यासपरें मनीं वसती ॥ २४ ॥ स्थूळ पडतां स्थूळाचि नाशे । परी लिंगशरीर तैसेंचि असे । लिंगदेहीं सूक्ष्मांशें । संस्कारवशें राहाती ॥ २५ ॥ संस्कारसहित लिंगशरीर । अज्ञानामाजी वसे सविस्तर । तेणें संस्कारेंचि समग्र । जन्मांतर थोर भासत ॥ २६ ॥ यालागीं जन्मसंस्कारें । दृढतर सत्यासत्य प्रपंच स्फुरे । तेंही आइका दृष्टांतद्वारें । कळे निर्धारें निश्चित ॥ २७ ॥ जागृतीचे सकळ संस्कार । ते स्वप्नीं प्रगटती सविस्तर । जें पावे जागृतीचें घर । तंव संसार जैसा तैसा ॥ २८ ॥ स्वप्नीं जग सत्यत्वें देखे । तथेंही रज्वादि रज्जुअहित्वें[7] पाहे निकें । परी सत्य भोगें अति हरिखे । जरी न देखे तरी विषादु ॥ २९ ॥ भयकंपादिकें दुःख पावे । रज्जुज्ञान जालिया हरिखावे । सत्यासत्यही स्वभावें । दोन्ही अनुभवें जाणतु ॥८३०॥ तेथेंही शास्त्रार्थ

---

१ झाल्यास. २ देश, काळ, वय वगैरे स्थिति. ३ आपल्याच सामर्थ्यानें. ४ रूपानें; येथें 'बेपें' असा पाठ आहे. ५ ठायीं ठेविलें = व्यवस्थेनें ठेवलेलें. ६ पूर्वीच अभ्यास घडला असल्यामुळें. ७ दोरीवर सर्पाचा भास.

येके। आग्निसाधन मानी निकें। त्यामाजी साधनें अनित्य येकें। एकानेकें मानितु ॥३१॥ ब्रह्मसाधनें साच मानी। बाधशास्त्र येके कानीं। जे तप्तशिळाआरोहणि[1]। व्यर्थ मानी तयातें ॥३२॥ ऐसे सत्यासत्यप्रकार। स्वप्नीं भासती सविस्तर। प्रबोधलिया दोन्ही असार। येकही निर्धार न राहे तेथें ॥ ३३ ॥ सत्य तेंही असत्यजाळ। असत्यही तद्रूप ठेलें। नाहीं सत्यासत्य संचळें। दोन्ही टवाळें[2] असतें होती ॥३४॥ तैसें स्वबोध पावे तंववरी। सत्यासत्य प्रपंचभरोवरी। ज्ञान जालिया सरोभरी। सरे वारी दोहींची॥३५॥ जगभानें स्वप्नस्थ होता। तंव सत्यासत्य मानी तत्वतां। स्वरूपबोधें दोन्ही मिथ्या। स्वयें सत्यता निजबोधें ॥ ३६ ॥ ययालागीं स्वात्मबोधेंकरुनी। दृश्य हारपलें हृदयापासुनी। प्रशांतबुद्धी ययालागुनी। दृश्यअभावनीं शुद्धत्वें ॥ ३७ ॥ निःशेष दृश्याभास जाये। ते शांतबुद्धी ह्मणिजेत आहे। ह्मणौनि ते सौम्यतर[3] पाहे। कूटस्थ होये गगन जैसें ॥ ३८ ॥ अतिशयें सौम्य तो सौम्यतर। प्रपंचोपशमें[4] जाला स्थिर। तोचि तो जाणावा अतिधीर। सर्वदा अव्यग्र ह्मणौनियां ॥ ३९ ॥ प्रपंचसंगें होयं व्यग्रता। जे कीं मनाचि प्रपंचोन्मुखता। तोचि प्रपंच मिथ्यत्वें बाणतां। चळु चित्ता कदा नव्हे ॥ ८४० ॥ स्वरूपाआड प्रपंच वसे। आणि तदाकार जेव्हां मन असे। तेचि व्यग्रता सावकाशें। दृश्य नाशे अव्यग्रपणें ॥४१॥ दृश्यकंचुक बाधलियावरी। स्वस्वरूपीं विश्रांति होये पुरी। तेचि अव्यग्रता सर्वोपरी। मुक्त तदनुसारी तोचि तो ॥ ४२ ॥ तोचि तो परम ईश्वर। तो नियंता परमेश्वर। बुद्ध्यादिनियंता निर्विकार। परापर परब्रह्म ॥ ४३ ॥ ऐसा जो जीवन्मुक्त ईश्वर। तो करू कां कर्मव्यवहार। अथवा राहो सर्वदा स्थिर। समाधिपार पावो सुखें ॥ ४४ ॥ तऱ्ही तो असंग उदास। नाहीं संग ना कर्मपाश। तेंचि निरूपण सावकाश। परियेसीं परेश रघुनाथा ॥ ४५ ॥

समाधिमथ कर्माणि मा करोतु करोतु वा। हृदयेनास्तसर्वाशो मुक्त एवोत्तमाशये ॥ २० ॥

ऐसा जो कीं जीवन्मुक्त। तो कर्मै करूनि समस्त। विधिनिषेध पाळित। अथवा गाळित दोहोंतेंही ॥ ४६ ॥ तो यज्ञादिकें कर्मै करू। अथवा सर्व कर्मै अव्हेरू। परी बाध न पवे अंतरू। बोधला थोरु ह्मणौनियां ॥ ४७ ॥ अथवा निरंतर असो समाधिस्थ। सविकल्प निर्विकल्प तटस्थ। अथवा असो उत्थितचित्त। कदाचित न करो कांहीं ॥ ४८ ॥ हृदयापासाव सर्वही आशा। ज्याच्या गेल्या गा वीरेशा। उत्तमांतःकरण तो परेशा। दृश्यलेश न स्पर्शे जो ॥ ४९ ॥ तोचि तो मुक्त आन नाहीं। तेथ संदेह धरिसी काई। तेंचि एकवारें ठेविलें ठायीं। दुसरी नाहीं मातु तेथें ॥ ८५० ॥ आतां बद्धमुक्ताचें मुख्य कारण। तेंही तुजप्रति सांगेन। जेणें तूं बुझसी संपूर्ण। थोर चिन्ह जीवन्मुक्ताचें ॥ ५१ ॥ हाचि जीवन्मुक्तिलक्षणाचा। उपसंहार बोलिजे साचा। हेंही लक्षणीं जीवन्मुक्ताचा। भीतरु साचा वोळखें गा ॥ ५२ ॥

अनात्मन्यात्मधीर्बंधस्तन्नाशो मोक्ष उच्यते। बंधमोक्षौ न विद्येते नित्यमुक्तस्य चात्मनः ॥ २१ ॥

तऱ्ही तेंचि आइकें रघुनाथा। चिन्हीं सांगों जीवन्मुक्ता। बद्धाचीही बद्धता। येक तत्वतां ऐसी असे ॥ ५३ ॥ अनात्मा जो अहंकार देहादि। तेथें ज्याची आत्मबुद्धी। पुत्रमित्रकलत्रावधि[5]। जाण सुबुद्धी आत्मा जया ॥ ५४ ॥ विचारितां तऱ्ही पुत्रादिक। तो आत्मा नव्हे कीं सकाळिक। ययाचा सांगेन तुज विवेक। तेंचि सम्यक परियेसीं ॥ ५५ ॥ पुत्रचि आत्मा ह्मणे ऐसें। तरी पुत्र मेलिया स्वयें असे। ऐसा अनुभव जाण मानसें। आत्मा कैसा विचारीं पां ॥ ५६ ॥ पुत्र आत्मा जऱ्ही होय। तऱ्ही तो नाशलिया आत्मा न राहे। पुत्रनाशें स्वनाश होताहे। अथवा पाहे विपरीत ॥५७॥ आत्मनस्तु कामाये(दं)सर्वंप्रियंभवति। ऐसें बोलेबृहदारण्यश्रुति[7]। पुत्रादि आत्मसुखाचिये प्राप्ती। ह्मणौनि पुत्रार्थी सर्वही जन ॥ ५८ ॥ पुत्राच्या प्रिया आत्मत्वें नाहीं। पुत्रचि आत्मत्वें प्रियत्वें पाहीं। पुत्रा लेवविले अळंकार सर्वही। सुख काई पुत्रासि होये॥ ५९ ॥ तेणें आपणचि संतोषिजे। अथवा पुत्रासि चुंबन दीजे। तेणेंकरूनि तो रडे निर्बुजे। तें सुख उपजे कवणासी ॥८६० ॥ यालागीं सर्वही आपणाचिकारणें। स्त्री पुत्रादिसाधनाउपकरणें। ह्मणौनि तयां आत्मा न ह्मणणें। अहंकार खुणे जाण तोचि॥६१॥ देह आणि अहंकार। हे तंव आपणा दृश्य गोचर। आपण साक्षी निर्विकार। ह्मणोनि अंतर सर्वांचा

---

१ तापलेल्या दगडावर चढणें. २ तुच्छ. ३ अतिसौम्य. ४ प्रपंच नाश पावल्यामुळें. ५ मनांतु. ६ पुत्र, मित्र, स्त्री वगैरे. ७ 'स्वतःच्या इच्छा पूर्ण करण्यासाठींच जगांतील सर्व पदार्थ प्रिय वाटतात', असें बृहदारण्य उपनिषदांत सांगितलें आहे.

॥ ६२ ॥ तया आपणानेणुनी । देहादिकांसि आत्मा मानी । तोचि बंध गा कोदंडपाणी । दृढपणीं दृढावला ॥ ६३ ॥ अगा संसारदुःखासि कारण । या बंधावांचूनि नाहीं आन । आणि बंध तो देहात्मबुद्धि जाण । निरयपतन हेंचि बोलिजे ॥ ६४ ॥ देहात्मबुद्धीवांचुनी । बंध नाहीं गा त्रिभुवनीं जन्ममरण जयाचेनी । अनुदिनीं होतसे ॥ ६५ ॥

संमतिवाक्य ॥ ॥ देहात्मबुद्धिजं पापं न तद्गोवधकोटिभिः ॥

इत्यादि वचनें बहुत असती । देहात्मबुद्धि घातक सर्वार्थीं । कोटि गोवध फल्गु होती । नाहीं समाप्ति कल्पांतींही ॥ ६६ ॥ आत्महत्ये समभार । येकत्र केलिया गोहत्येचे डोंगर । तरी ते देहात्मबुद्धि याहूनि थोर, । नये समभार तुलनेसी ॥ ६७ ॥ अगा बद्धतो इतुकाचि असे । देहीं आत्मबुद्धि कळासे । तेणें जन्मुमृत्यूचे वळसे । अति आवेशें फिरताती ॥ ६८ ॥ आणि मोक्षाचेंही लक्षण । तेंही इतुकेंचि असे जाण । जैसें देहीं बाणलें आत्मपण । अलोट पूर्ण लोटेना जें ॥६९॥ तैसेंचि आत्मयाचां ठाईं । आत्मबुद्धि दृढावे पाहीं । अज्ञानपण जैसें देहीं । अनपायी दृढ होत ॥ ८७० ॥ तैंचि आत्मयाचां ठायीं । आत्मबुद्धि बाणे जें अनपायी । तेचि मुक्ति गा जाण निश्चयीं । अवधि पाहीं मोक्षाचा ॥ ७१ ॥ ऐसी तृप्तिदीपाचे ठायीं सर्वांपरी । संमति ऐकें रावणारी । जेणें संदेहाची अवसरी । फिटोनि पुरी स्थिति बाणे ॥ ७२ ॥

संमतिश्लोक ॥ ॥ देहात्मज्ञानवज्ज्ञानं देहात्मज्ञानबाधकम् । आत्मन्येव भवेद्यस्य स नेच्छन्नपि मुच्यते ।

देहाचां ठाईं आत्मा ऐसें ज्ञान । तैसेंचि आत्मत्वीं अविच्छिन्न । देहात्मबुद्धीतें निरसून । उपजे ज्ञान अढळ जया ॥ ७३ ॥ तो जर्‍ही इच्छिना रघुनाथा । तर्‍ही तो मुक्तचि जाण सर्वथा । मुक्ति बैसे त्याच्या माथां । दवडितां नवजाये ॥ ७४ ॥ परबोधाची अवधि । हेचि जाण गा सद्बुद्धि । ययाहूनि न चढे सर्वादि । आत्मबुद्धि आत्मत्वीं ॥ ७५ ॥ इतुकेनि होतसे कृतकृत्यता । पुढें साधन नलगे तत्वतां । येथें संमति सांगेन आतां । अवधि तत्वतां बोधादिकांची ॥ ७६ ॥

संमतिश्लोक ॥ ब्रह्मलोकतृणीकारो वैराग्यस्यावधिर्मतः । देहात्मवत्परात्मत्वदार्ढ्ये बोधः समाप्यते ।
सुप्तिवद्विस्मृतिः सीमा भवेदुपरमस्य हि । दिशाऽनया विनिश्चेयं तारतम्यमवांतरम् ॥

इहलोकींचे भोग नावडती । स्वर्ग भोगही तुच्छ करिती । किंबहुना ब्रह्मलोकसंपत्ति । स्वयें मानिती तृणासमान ॥ ७७ ॥ ब्रह्मलोक मनोमानसें । तेथील भोगही तृणाऐसे । मानलें जया सर्वांशें । वैराग्य वसे यया नाम ॥ ७८ ॥ वैराग्याचा अवधि जाण । ब्रह्मलोक मानी तृणासमान । तेथें इतरा भोगांची गणना कोण । वैराग्य पूर्ण यया नाम ॥ ७९ ॥ आतां बोधाचा अवधि इतुका । तो जाण गा रघुकुळटिळका । तर्‍ही देहीं आत्मबुद्धि जैसी लेखा । तैसी लेखा आत्मपणीं ॥८८०॥ आत्मयाचे ठायीं आत्मपण । देहात्मबुद्धीऐसें जाण । बाणे तें बोधाचें अवसान । दृढतर पूर्ण रघुवीरा ॥ ८१ ॥ तैसीच उपरमाची सीमा । तेही ऐकें पुरुषोत्तमा । विश्वस्मृति जाय उपरमा । जैसी श्रीरामा सुषुप्ति होये ॥ ८२ ॥ प्रपंचाचें विस्मरण । सुषुप्तीसि निःशेष होये जाण । तैसें जालिया प्रपंचोपशमन । तो अवधि पूर्ण उपरमाचा ॥ ८३ ॥ याहूनि नाहीं अधिक कांहीं । हाचि ययाचा अवधि पाहीं । यालागीं जो ऐसा बोध कांहीं । मुक्ति पाहीं यया नाम ॥ ८४ ॥

संमतिश्लोक ॥ वैराग्यबोधोपरमाः सहायास्ते परस्परम् । प्रायेण सह वर्तंते वियुज्यंते क्वचित् क्वचित् ।
त्रयोऽप्यत्यंतपक्वाश्चेन्महतस्तपसः फलम् । दुरितेन क्वचित्किंचित्कदाचित्प्रतिबध्यते ।
तत्वबोधः प्रधानं स्यात्साक्षान्मोक्षप्रदत्वतः । बोधोपकारिणावेतौ वैराग्योपरमावुभौ ।
वैराग्योपरती पूर्णे बोधस्तु प्रतिबद्ध्यते । यस्य तस्य न मोक्षोऽस्ति पुण्यलोकस्तपोबलात् ।
पूर्णे बोधे तदन्यौ द्वौ प्रतिबद्धौ यदा तदा । मोक्षो विनिश्चितः किं तु दृष्टदुःखं न नश्यति ।

आणि वैराग्य बोध उपरम । हे परस्परें सखे परम । यांचें सख्य अति उत्तम । तिघे सम येकत्र वसती ॥ ८५ ॥ येक तेथें वैसती दोघे जण । परी न राहाती येकयेकाविण । यांचे उपजावयाचें कारण स्वरूपफळ पूर्ण सांगों तुज ॥ ८६ ॥ वैराग्यप्राप्तीचें कारण । मुख्य विषयीं दोषदृष्टि जाण । विषय तितुका विष दारुण । स्रक्चंदनवनितादिक ॥ ८७ ॥ ऐसी दोषदृष्टी जालियावरी । जिज्ञासा उपजे

---

१ नरकांत पडणें. २ तुच्छ. ३ पंचदशी नामक ग्रंथांतील तृप्तिदीप नांवाच्या प्रकरणांत. ४ जात नाहीं. ५ ब्रह्मलोकांतील सुखाचीं साधनें. ६ झोंप. ७ प्रपंच (संसार) नाहींसा भासणें. ८ माळा, चंदन, स्त्रिया वगैरे सुखोत्पादक पदार्थ.

मनाभीतरी । दोषदृष्टि दृढ जालियावरी । प्रीति विषयांतरीं उपजेना ॥ ८८ ॥ विषय टाकावे हें मनीं । निरंतर वर्त्ते ज्याचे अंतःकरणीं । तेचि जिज्ञासा कोदंडपाणी । स्वरूप निर्वाणीं वैराग्याचें हें ॥ ८९ ॥ ययाचें फळ तेंही आयिक । मागुतें विषयीं मन नव्हे रंक । न धरी भोगाची आळुक । नलगे भूक विषयांची ॥ ८९० ॥ मागुतें विषयीं प्रेम जालें । तऱ्ही वैराग्यफल नाहीं फळलें । पूर्ण वैराग्य नाहीं जडलें । जैसे वमिलें अन्न नापेक्षी ॥ ९१ ॥ आतां बोधोत्पत्तीचें कारण । श्रवण मनन निदिध्यासन । तेणेंचि उपजे ब्रह्मज्ञान । हेतु पूर्ण बोधाचा हा ॥ ९२ ॥ ब्रह्मप्रपंचामिश्रितपणें । जाहाला तेथ विवेक करणें । सत्य घेऊनि असत्य त्यजणें । स्वरूप जाणणें बोधाचें हें ॥ ९३ ॥ बोध जालियाचें फळ हेंचि जाण । नव्हे सत्यासत्यासि ग्रंथन । नव्हे मोह करी येकपण । हेंचि पूर्ण फळ बोधाचें ॥ ९४ ॥ यमनियमें उपरम उपजे । ह्मणौनि यमादिक हेतु जाणिजे । मनाचा निरोधु जो सहजें । स्वरूप जाणिजे उपरमाचें ॥९५॥ व्यवहाराचा क्षय होणें । हेंचि त्याचें फळ जाणणें । पुनरपि व्यवहारीं न प्रवर्त्तणें । जाण खूण उपरमाची हे ॥ ९६ ॥ एवं वैराग्य बोध उपरम । यांचे हेतु स्वरूपफळ परम । निरूपिले निरुपम । नसतेंही वर्म सांगों आतां ॥ ९७ ॥ प्रारब्धानुसार गा रघुपती । पूर्वसंस्काररूप हे उठती । या तिघांची येकत्र होये वसति । अथवा होती न्यून कोणी ॥ ९८ ॥ आतां येक असतां दोन्ही नसती । तऱ्ही तेणेंकरीं काय प्राप्ति । तेही निरूपिजेल व्यक्ति । सावध श्रीपती परियेसीं ॥ ९९ ॥ बोध तरी दृढतर आहे । वैराग्य उपरम जरी साह्य नव्हे । तरी मुक्ति ययासि सर्वथैव होये । मुक्तिसी पाहें कारण बोधु ॥ ९०० ॥ बोध येकु नसतां गा रघुपती । वैराग्य कां उपरम जागती । तऱ्ही उत्तमलोकांची होये प्राप्ति[१] परी नव्हे मुक्ति सर्वथैव ॥ १ ॥ ऐसेही गा योगेश्वर । पूर्वीं आतां आहेति थोरथोर । जनकासि वैराग्यविचार । दृढतर नव्हता जाण ॥ २ ॥ तऱ्ही वैराग्याचेंही लक्षण । तत्काल कीजे संन्यासग्रहण । संन्यास न घेतां मंदपण । आलें जाण विरक्तीसी ॥ ३ ॥ आणि वसिष्ठादिऋषीश्वर । करित ठेले[२] गृहकर्माचार । ज्ञानी तरी अतिशयथोर । परी वैराग्य सपुर तैसें नव्हे ॥ ४ ॥ सर्व विषयीं उदास असती । अतिशयें नाहीं विषयासक्ति । परी संग टाकणें हे मति । नुपजे चित्तीं मंदवैराग्यें ॥ ५ ॥ आणि तुळाधारप्रमुख[६] । ऐसे ज्ञानी आहेति अनेक । परी त्यांसि मंदवैराग्य देख । संन्यास सम्यक न घेतीचि ॥ ६ ॥ परी इतुकेनि न्यून काये जालें । प्रपंचसंगें काये बांधले । ते असंगी अकर्ते ज्ञानबळें । कोणा न मैळे चित्तवृत्ति त्यांची ॥ ७ ॥ ते देहीं असोनि विदेहवंत । संग असोनि संगरहित । बोधलेचि जीवन्मुक्त । जऱ्ही करीत राज्यादिकें ॥ ८ ॥ तैसाचि ज्ञानियांमाजी उत्तम । नारददेवऋषिसर्वोत्तम । परी अल्प होतां उपरम । करी कामकलहादिकां ॥ ९ ॥ परी उपरमाचेनि अल्पपणें । काय बोधासि आणिलें उणें । ब्रह्मरूपचि सर्व वर्त्तणें । पुरें उणें काय तेथें ॥ ९१० ॥ ब्रह्मरूप त्याचा व्यवहार । ब्रह्मरूप त्याचा राज्यभार । ब्रह्मरूप त्याचा कुळाचार । ब्रह्म चराचर सर्वही जया ॥ ११ ॥ एवं वस्तूवेगळें कांहीं । अणुमात्र दुजें नाहीं । तेथ बाधकता तया काई । सर्वत्र पाहीं ब्रह्म जया ॥ १२ ॥ भरतासि अतिवैराग्य होतें । तेणें सार्वभौम टाकिलें राज्यातें । परिपूर्ण बोधेंविण होत रितें । हरिणदेहातें पावला तो ॥ १३ ॥ यालागीं मुख्य मुक्तीप्रति कारण । येकु पूर्ण बोधुचि सर्वथा जाण । मुक्ति होये वैराग्यउपरमेंविण[१] ऐसें सामर्थ्य पूर्ण बोधाचें हे ॥ १४ ॥ बोध नसतां मुक्ति नव्हे । जऱ्ही वैराग्यउपरम आहे । यालागीं एकला बोधुचि होये । तऱ्ही सिद्धि जाये सर्वही ॥ १५ ॥ परी येक असतां दोन्ही असती । येकेंविण येक सर्वथा नसती । ऐसींच परस्परें यांची ख्याति । तिघे सांगाती सख्यत्वें ॥ १६ ॥ परी इतुकेंचि येथें असे । येकु दोघांचा मागु दिसे । परी निःशेष नसतां दुजें नसे । सख्य ऐसें त्रिवर्गांचें ॥ १७ ॥ जैसे सत्व रज तम त्रिगुण । प्राणिमात्रीं असती जाण । परी येकयेकाचें आधिक्य पूर्ण । दोन्ही न्यून परी असती ॥ १८ ॥ परी येकेंविण येकु नाहीं । हे व्याप्तिच तिहीं गुणाची पाहीं । तैसे बोधादिक तिघेही । सर्वथा नाहीं येकेंविण येकु ॥ १९ ॥ मूळीं दृढ वैराग्य नसतां । तरी बोध नुपजे गा सर्वथा । बोधेंविण उपरमता । कदाकल्पांता उपजेना ॥ ९२० ॥ ह्मणौनि ऐसी व्याप्ति असे । यालागीं बोध तेथ सर्वही वसे । हा निर्धार जाणिजे विश्वेशें । अनारिसें तेथ नाहीं ॥२१॥ प्रसंगेंकरूनि रघुनाथा । सांगितली बोधाची कथा । यालागीं देहादिबुद्धि सर्वथा । करी घाता सर्वांच्या ॥ २२ ॥ ह्मणौनि देहा

---

१ जाणण्याची इच्छा. २ प्रेम, आवड. ३ गुरफटागुरफट. ४ इंद्रलोक, ब्रह्मलोक वगैरे ठिकाणें. ५ घरांत राहून प्रपंचसंबंधीं कर्में करणें. ६ तुळाधार हें एका वाण्याचें नांव आहे. याची कथा भागवतांत सांगीतली आहे.

देहबुद्धि हेंचि बंधन । तियेचा नाशु तोचि मोक्ष जाण । तोचि ब्रह्मज्ञानावांचून । नव्हे क्षीण सर्वथा ॥ २३ ॥ ब्रह्मज्ञानासि उपाय कोटि । केलिया नव्हे ज्ञानेंसि भेटि । ते सद्गुरुदर्शनें उठाउठी । ज्ञानाचि भेटी येतसे ॥२४॥ ह्मणौनि सद्गुरुकृपावलेशें । देहबुद्धिबंधन निःशेष नाशे । तोचि मोक्ष हें विश्वासें । रघुवंशें जाणावें ॥ २५ ॥ नित्यमुक्त जो कीं परमात्मा । जीवन्मुक्ताचा महिमा । तयासि बंधमोक्षाची सीमा । नाहीं श्रीरामा विदित त्यासी ॥ २६ ॥ तो नेणे बंधमोक्षासी । बंधमोक्ष कैंचा तयासी । तो आत्माराम स्वरूपेंसी । क्रीडे निश्चयेंसि चिद्रूपीं ॥ २७ ॥ देहबुद्धीची वार्त्ता नेणे । तेथें देहबुद्धि गेली हें कोण ह्मणे । ते गेलिया मोक्ष ह्मणणें । यें दोन्ही वासनामुळें उपाधिगतें ॥ २८ ॥ तोचि तो जाण नित्य मुक्त । बंधमोक्षातें नाहीं जाणत । परमानंदें असे डुलत । मीपणाची मात टाकूनियां ॥ २९ ॥ अहो पूर्वोक्तलक्षणेंकरुनी । जीवन्मुक्त जाणिजे भरंवसेनी । उपसंहारु मुक्ताचे निरूपणीं । ये लक्षणीं जाणावा ॥१३०॥ मुख्य मुक्ताची सुखसंपन्नता । ते इतुकीचि गा श्रीरघुनाथा । तेंचि तें येका बोलें आतां । तुज तत्वतां सांगेन ॥ ३१ ॥

दृश्यं नास्तीति बोधेन मनसो दृश्यमार्जनम् । संपन्नं चेत्तदोत्पन्ना परा निर्वाणनिर्वृतिः ॥ २२ ॥

दृश्य वास्तव नाहीं या बोधेंकरून । मन होये तें दृश्यविहीन । बोधाचें मुख्य कारण । सद्गुरुचरण महावाक्य ॥ ३२ ॥ तें महावाक्य गुरुमुखेंकरुनी । पदार्थ बरवे शोधूनी । दोन्ही वाक्यार्थ बोधतां भरंवसेनी । बोध निर्वाणीं दृढतर होये ॥ ३३ ॥ ऐसा बरवा बोध जालिया । निःशेष दृश्य जातसे लया । मनाचां ठाईं आपसया । दृश्यमार्जन यया शब्दें नाम ॥ ३४ ॥ अन्यथा इतर बोध ह्मणती । तेणें नव्हे दृश्यसमाप्ति॰ ते तंव शब्दाचीच वदंती । दृश्यउन्नति जैसी तैसी ॥ ३५ ॥ असो ऐसे येणें बोधें सर्वदा । गेली जयाची दृश्यबाधा । मनसंपन्न आरूढबोधा । परमानंदा पावला तो ॥ ३६ ॥ तेव्हां परम सुखें जे निवृत्ति । जियेतें निर्वाण ऐसें बोलती । तेंचि तया होये प्राप्ति । मोक्षस्थिति अखंड ॥ ३७ ॥ निवृत्तिशब्दें निरतिशय सुख । जयासि अतिशयें नाहीं देख । परमकाष्ठा जें निर्वाणक । तेंचि सुख तयाचें ॥ ३८ ॥ निर्वाणनिवृत्तीआड । असे यया दृश्याचें कवाड । दृश्यमळें निरतिशय कोड । अति दुर्वाड रघुपुंगवा ॥ ३९ ॥ सर्वदा सुखचि प्राप्त असे । परी दृश्यसत्यत्वें नाहींसें दिसे । दृश्यसंवलित मंद भासे । निर्वाण असे दृश्यक्षयीं ॥ १४० ॥ सर्व सुखमात्र जें कीं रघुनाथा । तें तंव आत्मसुखचि गा तत्वतां । विषयभोगें सुखसंपन्नता । तेंचि तें तत्वतां जाणावें ॥ ४१ ॥ परी तें दृश्यविषयसंवलित । जालें ह्मणोनि सुख किंचित् । दृश्यनाशें अपरिमित । सुख उन्नत सुखकोटी ॥ ४२ ॥ जेथें दृश्य मात्र न स्फुरे । तेथें द्वैत तें सहजचि विरे । मग अद्वैतसुखचि स्फुरे । परमानंद धुरे तोचि जाण. ॥ ४३ ॥ ययातें परमानंद ह्मणिजे । ययावेगळें दुजें नेणिजे । तें सद्गुरुकृपा जाणिजे । येरीं नेणिजे अनुमानीं ॥ ४४ ॥ हेही निर्विकल्पसमाधि । असंप्रज्ञात निर्बीज अवधि । हेचि जाण पैं त्रिशुद्धी । नाहीं वृद्धि ययाहुनी ॥ ४५ ॥ सप्तमी भूमिका ह्मणिजे इयेसी । ज्ञानी अज्ञानी अनुभविती अहर्निशीं । निर्वाण ऐसें ह्मणिजे इयेसी । सर्वस्वेंसी जाण बापा ॥ ४६ ॥ हाचि मोक्ष हेचि स्थिति । हेचि बोलावी ब्रह्मप्राप्ति । हे जाणावी स्वरूपस्थिति । इतर गति न्यून जाण ॥ ४७ ॥ हेंचि समाधान चित्ताचें । हेंचि मुक्तलक्षण मुक्ताचें [९] जेथें नांवचि पुरे दृश्याचें । परमानंदाचें आरोगणें ॥ ४८ ॥ भोक्ता भोग्य भोग आपण । भोक्तृत्व नाहीं आपणेंविण । ऐसें अभिनव अवस्थान् । स्थानमान जेथ नाहीं ॥४९॥ जेथें सरे शब्दाची वारी । आनंदें आनंदाची भरोवरी । न देखे दुजें मनेंकरीं । आनंदभीतरी आनंदे ॥ १५० ॥ हे परा निवृत्ती जाण । जें कीं निरतिशय सुख निर्वाण । सच्चिदानंदैकघन । परम पावन पावना ॥ ५१ ॥ ऐसें केवळ परमानंदैकसुख । जेथें न स्फुरे द्वैतमात्र दुःख । दृश्यादृश्य सकळिक । नाहीं देख जिये ठाईं ॥ ५२ ॥ ऐसें सुखेंकरुनि देणें घेणें । सुखेंचि सुख मोचणें । हेचि मोक्षमुक्त ह्मणणें । नाहीं नेणणें दृश्य जेथें ॥ ५३ ॥ येचि देहीं याचि डोळां । भोगिजे गा सुखाचा सोहळा । तो दुरी नाहीं दिग्मंडळा । नाहीं पाताळाखालताही ॥ ५४ ॥

न मोक्षो नभसः पृष्ठे न पाताले न भूतले । सर्वाशासंक्षये चेतःक्षयो मोक्ष इतीष्यते ॥ २३ ॥

ऐसा मोक्ष गा रघुनंदना । नाहीं स्वर्गावरुता जाणा । आणि नाहीं पाताळभुवना । खालता ह्मणा नाहींच तो ॥५५॥ तो मोक्ष नाहीं गा भूतळीं । नाहीं लपविला ब्रह्मांडगोळीं । तो न भेटे जपतपधूम्रक-

---

१ 'घाय नेऊन' असा पाठ. २ शब्दानें सुचविलेला अर्थ. ३ वार्ता, गोष्ट. ४ तेथील. ५ दार. ६ दृश्य पदार्थांचें बनलेलें. ७ शेवटीं. अग्रभागीं. ८ 'इसी' असा पाठ. ९ 'पुरे' असा पाठ. १० भक्षण. ११ जप, तप किंवा धूम्रपानादिकांनीं,

लोळीं। पंचाग्निमेळीं न भेटेचि कीं ॥५६॥ त्रिभुवनीं न सांपडे पाहातां। अमित मौल्य देतां नये हाता। तोचि सद्गुरुचरण सेवितां। लाभे आइता स्वतःसिद्ध ॥५७॥ सद्गुरूचेनि वाक्यवचनें। सर्वाशांचा क्षय प्राप्त होणें। आशासंक्षयो मनें। अतिप्राणें पाविजे गा ॥५८॥ आशानाशें क्षयो जो चित्तासी। तोचि बंधविच्छेद परियेसीं। बळें निग्रह कीजे मनासी। नव्हे तो भूतांसि मोक्षहेतु ॥ ५९ ॥ वायुनिरोधें मन निरोधिती। लयलक्षीं लय पावविती। ते मूर्च्छा कां जैसी सुषुप्ति। नाहीं संपत्ति विवेकाची ॥६०॥ विवेकसंपत्तीकरूनि जें ज्ञान। महावाक्यें उठी जें संपूर्ण। तें जगज्जाळ आभास पूर्ण। मग सर्व निर्वाण-स्वरूप भासे ॥ ६१ ॥ दृश्यजात मिथ्या बाणलिया। मग कैंचें मन वासना यया। वासनाक्षयेंचि गा रघुराया। मनही विलया जातसे ॥ ६२ ॥ मन नाशावयाचें कारण। येक वासनीक्षयचि जाण। वायुधारणेनें मूर्च्छित पूर्ण। उठिल्या तरुण जैसें तैसें ॥ ६३ ॥ जंव मन निरोधिलें असे। तंव दृश्य-जात कहीं न भासे। परी तें निःशेष बाधलें नसे। लीन असे चित्तामाजी ॥ ६४ ॥ चित्त सावध जालियावरी। जैसी तैसी मायाविश्वलहरि। जैसीं दिवा बाळें करिती परी। निजोनि झडकरी उठती जैसीं ॥ ६५ ॥ दिवसाची रात्र जाली ह्मणती। ह्मणोनि नेत्र लावूनियां निजती। तेव्हां क्षणैक दृश्य जऱ्ही न देखती। तऱ्ही कोण स्थिति बाणली तयां ॥ ६६ ॥ इतुकेनि काय दृश्य बाधलें। कीं परमानंदसुख लाधलें। व्यर्थचि स्वसंकल्पें नेत्र झांकिले। सवेंचि उघडिले सूर्योदयत्वें ॥ ६७ ॥ तया अर्भकांचां खेळणीं। दिवस तैसीच होय रजनी। व्यर्थचि उठती निजोनी। काय निर्वाणीं फावलें तयां ॥ ६८ ॥ तैसें चिरकाल मननिग्रहण। केलिया काय प्राप्त जालें ज्ञान। आणि ज्ञानेंविण वासना दहन। केलियाही पूर्ण सर्वथा नव्हे ॥ ६९ ॥ सुषुप्तीसि मनोनिग्रह होये। वानला जालही लया जाये। इतुकेनि संसृति नाहीं पाहे। तरी निजावें काये अहोरात्र लोकीं ॥ ७० ॥ अहोरात्रीं जैसें कां निजणें। तैसें वायुरोधें चित्तनिग्रहणें। ह्मणोनि वासनाक्षय करावा ज्ञानें। तेणेंचि मनें क्षय पाविजे ॥७१॥ बाह्यदृष्टी हा जंव जंव पाहे। तंव तंव क्षीणुचि होत आहे। परी मोक्ष तो सर्वथा हाता नये। वेडा होऊनि राहे अतिदृढपणें ॥७२॥ मोक्षालागीं नानासाधनें। ज्ञातेनि सर्वथा न करणें। केलिया दुःखचि पावणें। अति शिणणें जन्मोजन्मीं ॥ ७३ ॥ याचा येकुचि उपावो असे। धरावे गुरूचे पाय अतिवि-श्वासें। तेणें मोक्ष स्वतःसिद्ध वसे। अतिप्रयासें कोण काज ॥ ७४ ॥ मुक्तता ते इतुकीच जाण। जैसें हातिचें भेटे रत्न। हातिच्यालागीं व्यर्थ प्रयत्न। नसतां क्षीण जो जो कीजे ॥ ७५ ॥ आणि मोक्षा चेंही मोक्षलक्षण। तेंही एवंविध जाण। जैसें देहाचां ठाईं आत्मपण। दृढतर पूर्ण होये जैसें ॥ ७६ ॥ तैसेंचि आत्मयाचा ठाईं। आत्मत्व बाणे जरी अनपायी। तरी मोक्ष आन नाहीं। न मैळे देहीं वर्त्ततां जाण ॥ ७७ ॥ आत्मत्वीं आत्मत्व दृढ बैसे। मग तेथील आनंदु कैसा असे। तो अनुभवी जाणती आपैसें। सुखवसें सुखरूप तें ॥ ७८ ॥ सहज आत्मसुख निरतिशय। तेथें नाहीं दुःखलेश आमय। अनुकूळ ना द्वेष्य द्वितीय। सांडूनि तृतीय अनुभवावें ॥ ७९ ॥ अनुकूळ तें विषयसुख। जें दुःस्वभावें अतिआलुक। जैसें मार्गीं जातां सुवर्णादिक। भेटल्या सुख जें कीं उपजे ॥ ८० ॥ तें सुख अतिनि-रूपम। नाहीं कोण्हेंसि उपम। तेंचि ब्रह्मसुख जाण परम। अतिसुगम सद्गुरुकृपा ॥ ८१ ॥ देहात्मज्ञान नाशतांचि क्षणीं। सुखचि न माय सुखपणीं। आत्मसुखासि हेचि व्यवधानी। जाण निर्वाणीं देह बुद्धि हे ॥ ८२ ॥ ते नाशे ते क्षणींच सुख असे। आणि तया बंध कांहीं नसे। सुखें सुखचि उल्हासे। मोक्ष वसे ऐसाचि जाण ॥ ८३ ॥ हा मोक्ष तरी देशांतरीं नाहीं। स्वर्गपाताळादि शोधितांही। तो तंव अनुभविजे येथेचि देहीं। सद्गुरुकृपा पाहीं जालिया ॥ ८४ ॥ देहात्मबुद्धीच्या संगती। सर्वत्र स्फुरे-दृश्यद्वैतसंपत्ति। द्वैतबुद्धीनें ब्रह्मसुखाची शांति। जाण रघुपती निर्धारें ॥ ८५ ॥ दृश्यनाशें ब्रह्मसुखचि असे। तेथ आत्मत्वीं बंध कोण्हा भासे। सर्वथा मग कांहींच नसे। स्वयें उल्हासे ब्रह्मपण ॥ ८६ ॥ तेंचि आयिकें त्रिदशाधिपती। निरूपण कीजेल श्लोकसंगती। तें परिसतांचि एकाग्रचित्तीं। स्वरूपस्थिति बाणे जेणें ॥ ८७ ॥

अनंते चित्सदानंदे निर्विकल्पैकरूपिणि। स्थिते द्वितीयस्याभावात्के बंधः कश्च मुच्यते ॥ २४ ॥

ब्रह्म जें अनंत चित्सदानंद। निर्विकल्पैकरूप अगाध। तेथें स्थिति बाणलिया निर्बंध। मग संग बद्ध कवणासी ॥ ८८ ॥ आतां एकैक पदाचें व्याख्यान। सांग तुजलागीं सांगेन। सद्गुरुचरणां

१ 'क्षयप्राय' असा पाठ. २ बंध तुटणें. ३ 'निरुधिलें' असा पाठ. ४ तव्हा, ५ रात्र. ६ 'कुरा ज्ञानें' असा पाठ. ७ 'मुक्तता' असा पाठ. ८ रोग, शारीरिक दुःखें. ९ त्रिदश = देव, त्यांचा मुख्य. १० बळकट. ११ स्पष्ट.

करूनि मनन। अर्थानुसंधान परियेसीं ॥ ८९ ॥ देशकाळवस्तुपरिच्छेदक। कैसें तुज सांगों सम्यक। ब्रह्म तें सदा अपरिच्छेदक। नित्य व्यापक परिपूर्ण ॥ ९० ॥ देशीं काळें वस्तुता। परिच्छेद नाहींच तत्वतां। हेचि काळत्रयीं अबाधता। नित्यनित्यता ब्रह्माची ॥ ९१ ॥ ग्राम अति थोर जऱ्ही जाला। परी अन्य देशीं नाहीं व्यापला। तो देशपरिच्छेदत्वें बोलिला। परिच्छिन्नत्व पावला अव्यापकपणें ॥ ९२ ॥ ऐसाचि अनेक दृष्टांतीं। देशपरिच्छेद जाणावा संतीं। जें एकदेशी असोनि देशांतीं। असे समैक्षति जयाची ॥ ९३ ॥ याचें नाम परिच्छेदन। अव्यापकासि घडे जाण। ब्रह्म तें व्यापक परिपूर्ण। अनुभव जाण सिद्धचि ॥ ९४ ॥ तैसेचि घटपटादिपदार्थ। असती काळपरिच्छेद पावत। काळांतरीं असती नाशत। ह्मणोनि पावत परिच्छेदन ॥ ९५ ॥ नश्वरपण काळपरिच्छेदता। हे तव आहे पृथ्व्यादिभूतां। हे तंव ब्रह्मीं नाहीं तत्वतां। असे नित्यता ह्मणोनियां ॥ ९६ ॥ जें कीं शुद्ध नित्य निरंतर। त्यासि नाहीं काळें व्यभिचार। सर्वही वस्तु नश्वर। नित्य निर्विकार परब्रह्म ॥ ९७ ॥ काळें व्यभिचार सर्वांसि होत। जागृतीमाजी स्वप्नसुषुप्ति नाशत। स्वप्नकाळीं दोन्ही नाहींत। दोन्ही भ्रंशत सुषुप्तीसी ॥ ९८ ॥ तैसेंचि जे जे अवस्थेचे पदार्थ। ते अवस्थांतरीं नाशु पावत सुषुप्तिकाळीं नाहींच होत। नाशिवंत सर्वही ॥ ९९ ॥ त्या तिहीं अवस्थांचेनि नाशें। नानापदार्थ भ्रंशती तैसे। आत्मा तो अखंड येकाचि असे। तो जाणतसे सर्वांशें ॥ १००० ॥ तिहीं अवस्थांचें ज्ञान। आणि जे जे अवस्थेचें जें जें भान। तें सर्व तया अनुसंधान। अविनाशी ह्मणोन एकपणा ॥ १ ॥ यालागीं तिन्ही अवस्था। जातां येतां आत्मचि तत्वतां। यासि नाहीं काळपरिच्छेदकता। नित्य आयता अविनाशपणें ॥ २ ॥ जैसें आकाश देशीं काळें अपरिच्छेद्य। परी वस्तूनें पावे परिच्छेद। वस्तु दुसरी तेणेंसि विरुद्ध। घटादि प्रसिद्ध असोचि कीं ॥ ३ ॥ पंचमहाभूतें पृथ्व्यादिकरूनी। वस्तु असती दुजेपणीं। तेणें आकाश परिच्छेदनीं। पावे निर्वाणीं परिच्छेद ॥ ४ ॥ तैसें परब्रह्म नव्हे जाण। यासि वस्तूपरिच्छेद न। ब्रह्मा वेगळें नश्वर परिच्छिन्न। दृश्य पूर्ण असत्यत्वें ॥ ५ ॥ तेणें परिच्छेद वस्तुसी। कैसा घडेल कोणे देशीं। यालागीं ब्रह्म अविनाशी। व्युत्पत्ति ऐसी अनंतपदें ॥ ६ ॥ ह्मणोनि देशकाळवस्तुविचारें। अपरिच्छेद्य अविनाश निर्धारें। अनंतपरिपूर्ण येणें प्रकारें। आणीक दुसरें चित्पद ॥ ७ ॥ चित्शब्दें ज्ञान स्वरूप। जें कीं स्वप्रकाश निष्कंप। जडाचें व्यावर्त्त अमूप। ज्ञानस्वरूप स्वप्रकाशें ॥ ८ ॥ सच्चिदानंदपदेंकरुनी। ब्रह्मस्वरूपचि बोलिजे निर्वाणीं। एक एक पद निर्वाणीं। चित्त देऊनि परिसिजे ॥ ९ ॥ सत्शब्दें सत्तारूप असे। तेथें असताची व्यावृत्ति केली असे। ब्रह्म सर्वदा संतचि दिसे। सत् ऐसें बोलिजे कीं ॥ १०१० ॥ आनंदशब्दें परमानंद। जो कीं स्वानुभवैकसुखस्वाद। येणेंचि दुःखाची व्यावृत्ति विशद। करूनि बोध केवळ जो ॥ ११ ॥ नाहो एकेंचि वस्तूचीं वाचकें। तीन पदें कोणे निमित्तिकें। तऱ्ही गुणगुणीभाव निके। वर्सती कौतुकें परब्रह्मीं ॥ १२ ॥ ब्रह्म नव्हे तें स्वयें गुणी बोलावें। त्याचे तेही गुण जाणावे। सच्चिदानंद स्वभावें। गुण हे गौरवें वस्तूचे कीं ॥ १३ ॥ तऱ्ही काये गुणगुणीभाव ऐसा। सांगिजेल एकाग्र परियसा। घट गुणी तेथें रूपादि ठसा। तोचि गुण ऐसा निर्णयो ॥ १४ ॥ अथवा नीलोत्पल स्वयें गुणी। नीलादिगुण वसती तये स्थानीं। ह्मणोनि नीळगुणें नीलोत्पल गुणी। येही लक्षणीं वर्त्ततसे ॥ १५ ॥ तेथें गुण वेगळे तयाहुनी। गुणी तो वेगळा असे निर्वाणीं। तयांसि परस्परें भेदुचि जनीं। प्रसिद्ध नयनीं देखिजेत ॥ १६ ॥ तैसें हें परब्रह्म सर्वथा नसे। तिन्ही पदीं ब्रह्मचि प्रकाशे। गुणगुणीभावभेदु नसे। तेंचि तें असे सर्वोत्कर्षें ॥ १७ ॥ जऱ्ही गुणगुणीभाव बोलिजे। तऱ्ही परस्परें त्यां भेदु नेणिजे। एकएका वेगळें किजे। तरी सिद्धि न पविजे ब्रह्मपणें ॥ १८ ॥ हे सर्वही मागें विवंचना। स्पष्ट केली असे सज्ञाना। तेचि एथें करितां निरूपणा। पुनरुक्तपणा येतसे ॥ १९ ॥ यालागीं सत्तादिक ते गुण। ब्रह्म तें गुणीं तद्विशिष्ट जाण। ऐसें तूं सर्वथा न ह्मण। अर्थ हा पूर्ण नेणोनियां ॥ १०२० ॥ याचा मुख्यार्थ ऐसाचि असे। ब्रह्म तें वाचक नव्हे सर्वांशें। हीं पदें जाणिजेत लक्ष्यांशें। तेंही सावकाशें परिसावें ॥ २१ ॥ चित्शब्दें स्वप्रकाश। ज्ञानरूप चित्तवृत्तीसि साभास। घट पट प्रकाशी सावकाश। तो वाच्यांश जाणावा ॥ २२ ॥ तें वाच्यांशत्व टाकुनी। स्वप्रकाशत्व घेइजे लक्षुनी। चित्तवृत्ति जे कीं ज्ञानपणीं। टाकिल्या निर्वाणीं स्वप्रकाश फावे ॥ २३ ॥ जैसें लौकिका आकाश।

---

१ अमर्याद. २ 'काळच्छेद ब्रह्मा पाठ. ३ 'वस्तुसि परि०' असा पाठ. ४ 'लक्ष्याचे ठिकाणीं प्रसक्त झालेला जो दोषादि अर्थ तो विशेषणादि सामर्थ्यानें त्यालक्ष्यीं लागू न होतां, त्याचा तेथून जो पृथग्भाव ती.'

सत्यशब्देंचि वाच्यांश । त्याचे टाकिल्या नामरूपांश । सत्ता सावकाश स्वयेंचि लाभे ॥ २४ ॥ तैसा चित्तवृत्तीनें विषयानंद । त्याचें भोगणें ज्ञातृत्व विशद । भोगिजे जो सुखाचा स्वाद । करूनि बाध वाचकांचा ॥ २५ ॥ विषयानंदाची सुखप्राप्ति ॥ विषयानंदत्वें जाली समाप्ति । परमानंदु येतसे व्यक्ती । सुखसंविक्ति परमानंदें ॥ २६ ॥ ऐसें पदत्रयाचे वाच्यांश । टाकूनियां सावकाश । फावे चित्सुखानंदें स्वप्रकाश । सद्रूपांश नित्यानंदु ॥ २७ ॥ जे कीं गुरुखुणेचे कुशल । तें पावती सच्चिदानंदकल्लोळ । दृश्यगार्त्री पदत्रयमेळ । वाच्यांशमळ टाकिलिया फावे ॥ २८ ॥ ऐसें अनंत चित्सदानंद । परब्रह्म जें कीं अगाध । जेथें सर्व कल्पनेचा बाध । तेंचि तें निर्विवाद नित्यानंदें ॥२९॥ कल्पनामात्रही लेश । जेथ विरतसे निःशेष । तेंचि तें परब्रह्म एकरस । नाहीं भास दुजेपणाचा ॥ १०३० ॥ ऐसा परमानंद जो एकसर । नाहीं दुसरियाचा आभासलेश । तेंचि सच्चिदानंदपदत्रयांश । सावकाश जडादिहीन ॥३१॥ असत्य जड दुःखादिक । व्यावर्तिलें पदत्रयें देख ॥ विश्व यावेगळें आणीक । नाहीं सम्यक् बोलावया ॥३२॥ जें जें बोलाल नयनीं देखाल । श्रवणीं जें कांहीं आइकाल । घ्राणें घ्राणाल त्वचेनें स्पर्शाल । रसने चाखाल जें जें कांहीं ॥ ३३ ॥ मनें जें जें कल्पाल । बुद्धीनें जें जें कांहीं बोधाल । सर्वेंद्रियें जें जें कांहीं आणाल । दृश्य सकळ जड तितुकें ॥ ३४ ॥ तेंही मिथ्याभूत दुःखरूप । स्थूळ सूक्ष्म विश्व अमूप । जें कीं श्रुतदृष्ट असद्रूप । जाण संकर चंचलत्वें ॥ ३५ ॥ तऱ्ही हें तंव कांहींच नाहीं । हें पदत्रय व्यावर्तिलें पाहीं । तऱ्ही उरे जें एकसर सर्वही । नाहीं कांहीं दुजें तेथें ॥ ३६ ॥ यालागीं परमानंदें एकरस । ह्मणोनि एकसर निर्विशेष । ऐसें ब्रह्म तें सावकाश । असमसहास परिपूर्ण तें ॥ ३७ ॥ दुसरियाचेनि अभावें । स्थिर जाला जो कीं अनुभवें । तें ब्रह्मानंदस्वरूपीं नैं संभवे । बद्ध स्वभावें आविद्यक ॥ ३८ ॥ तेथें बद्धता काय असे । कोण्हासि बद्धता बोलिजेत असे । बोधें बोधलिया मानसें । बंध नसे काळत्रयीं ॥ ३९ ॥ जेथ अविद्या उरली असावी । बंधमोक्षाची ठेवाठेवी । ते आत्मबोधें गेली आघवी । बद्ध उरवी कोणालागीं ॥ १०४० ॥ सद्गुरूचेनि कृपावलेशें । अविद्या गेली दाही दिशे । सर्वत्र ब्रह्मानंदेंचि उल्हासे । सामरस्य येकपणें ॥ ४१ ॥ दुजें असलिया येक बोलिजे । येकीं येक कार्य ह्मणिजे । सामरस्य कोणाचें कोणा कीजे । दुजें नेणिजे आपणेंविण ॥ ४२ ॥ एवंभूत जो कां आपण । तो सद्गुरुकृपा जाला निर्वासन । त्यासि बाधु तो कोणाचा कोण । मोक्षही जाण कैंचें काय ॥ ४३ ॥ तयासि मोक्ष ना बंधन । तो परिपूर्ण चैतन्यघन । येकायेक परम निर्वाण । आनंद पूर्ण पूर्णत्वें ॥ ४४ ॥ मन मनपणें चैतन्यघन । तयासि मग कैंचें मरण । मन नाशलिया ब्रह्म पूर्ण । मनें बंधन सर्वोपरी ॥ ४५ ॥

तस्मादुल्लासमात्रं तु मनसो बंधतां गतम् । मनः प्रशमने राम मोक्ष एवावशिष्यते ॥ २५ ॥

याकारणें गा श्रीरघुनाथा । मनोल्लास मात्रेंचि बद्धता । तें मन होतांचि प्रशमता । मोक्ष आइता स्वतःसिद्ध ॥ ४६ ॥ यालागीं मन ब्रह्मीं लीन कीजे । मन मनपणा येऊंचि नेदिजे । इतुकेनि मुक्तचि सहजें । येथें न धरी संशय कांहीं ॥ ४७ ॥ हें जीवन्मुक्ताचें लक्षण । लक्षणीं संपलें निरूपण । जीवन्मुक्तिप्रकरण । जालें संपूर्ण इतुकेनी ॥ ४८ ॥ प्रकरणाचेनि श्रवणें । बद्धही जीवन्मुक्त होणें । यालागीं श्रवण मनन मनें । सादर करणें अनुदिनीं ॥ ४९ ॥ निजानंदें रंगूनि साचा । अर्थ घेइजे यया प्रकरणाचा । इतुकेनि लाभ स्वात्मसुखाचा । होय सहज पूर्णत्वें ॥ १०५० ॥ ॥ ॥ ॥

## इति श्रीयोगवासिष्ठसारे श्रीवसिष्ठरामसंवादे जीवन्मुक्तिप्रकरणं नवमं संपूर्णम् ॥

॥ श्रीः ॥

## प्रकरण १० वें.

# निर्वाणप्रकरण.

श्रीगणेशायनमः ॥ जयजया जी श्रीनिजानंद । जयजय परमानंदैकअगाध । जयजय परब्रह्म विशुद्ध । अगाधबोध विशुद्धवर्या ॥ १ ॥ जयजय सच्चिदानंदैकघन । जयजय निरतिशयज्ञानसंपन्न । ज्ञाताज्ञेयज्ञानविहीन । परमपावनपावना ॥ २ ॥ जयजय परमानंदैकमूर्ती । जयजय अगाधज्ञानसंपत्ती । व्यक्ताव्यक्तरहितस्थिती । अगम्यश्रुति श्रीगुरुवर्या ॥ ३ ॥ जयजय जी त्रिगुणातीता । जयजय अज्ञानांधतमनिरस्ता । सर्वा वरिष्ठ विश्वभरिता । मना अचिंत्या श्रीगुरुवर्या ॥ ४ ॥ जयजय नित्य निर्मळ । अखिलजनानंदाखिलमंगळ । परमनिधानैक केवळ । नित्य निष्कळ श्रीगुरुवर्या ॥ ५ ॥ जयजय अचिंत्यानंतशक्ती । जयजय जी निखिलानंद चैतन्यमूर्ती । परापरसद्गती । चिच्छक्ती श्रीगुरुवर्या ॥ ६ ॥ जयजय पवित्रापवित्र । जयजय व्यापक निरंतर सर्वत्र। विश्वस्थितिलयादिसूत्र- । कर्त्ता विचित्र श्रीगुरुवर्या ॥ ७ ॥ जयजय त्रैलोक्यपावन । जयजय जडजीवउद्धरण । जनकृपादिकनिधान । सच्चिद्घन श्रीगुरुवर्या ॥ ८ ॥ जयजय अविद्यापाशनिकृंतन । सामदानउदारैकघन । सौंदर्यवरत्वें जनमोहन । मनमोहन श्रीगुरुवर्या ॥ ९ ॥ जयजय सद्गुरु परातीत । जयजय वाच्यवाचकभावें व्यतिरिक्त । सर्वसाक्षी चिद्रूपस्थित । सर्वातीत श्रीगुरुवर्या ॥ १० ॥ नमोस्तु भवभयविध्वंसन । नमोस्तु शरणशरण्य। नमोस्तु चिद्रसैकस्वादन । रसां रसन रसत्वें ॥ ११ ॥ नमोस्तु चित्कलाज्योती । नमोस्तु मूर्त्तामूर्त्तमूर्त्ती । नमोस्तु कलातीत चिदैकस्थिती । परेपरती वस्ती ज्याची ॥ १२ ॥ नमोस्तु चिदैकचिद्गगन । भवभयनिर्दलन । नमो आचार्या सिंहवदन । ब्रह्मसंपन्न ब्रह्मरूपा ॥ १३ ॥ ऐसें त्रयोदशश्लोकीं स्तवन। केलें सद्गुरुराया तुजलागून । स्तोत्रं बोलतांचि सुखसंपन्न । मन उन्मन पावतसे ॥ १४ ॥ तयाचि सुखें मंगलाचरण । तेणेंचि छंदें तुझें स्तवन । मग ध्यातसे तुझे चरण । सुखसंपन्न सुखरूपा ॥ १५ ॥ तुझें स्वरूप वर्णावया । येव्हडी स्फूर्ति कैंची श्रीगुरुराया । ह्मणोनि मौनाचि लागे तुझिया पायां । दृढ धरूनियां हृदयाकाशीं ॥ १६ ॥ जें जें वाचा बोलों जाये । तें तें स्वरूप तुझें नहोनि होये । तूंचि सर्वत्र येकचि आहे । दृष्टि काय देखेल माझी ॥ १७ ॥ जें जें ऐकें देखें बोलें । तें तें तुवां येकचि कोंदलें । इंद्रियें देती घेती तें सकळें । तूंचि निराळें सर्वत्र ॥ १८ ॥ तुजविण आणीक ठावो । पावता कां माझा मनोभावो । तूंचि माझा सर्व सद्भावो । देवाधिदेवो सद्गुरुराज तूं ॥ १९ ॥ तुजपरतें न फावे कांहीं । ह्मणोनि सर्व व्यापारीं तूंचि पाहीं । मज तों तुजविण दुजें नाहीं । तूंचि तें सर्वही येकपणें ॥ २० ॥ ऐसें विनवितांचि श्रीगुरुनाथु । हर्षें मस्तक असे डोलवितु । ह्मणे पुढारां वदें सिद्धग्रंथु । नको बहुत प्रार्थूं मज ॥२१॥ तुझ्या अतिकोमल वचनीं । मी हर्षनिर्भरु सर्वदा मनीं । तोचि प्रसाद तुजलागूनी । ग्रंथव्याख्यानीं प्रवर्त्ते आतां ॥ २२ ॥ हें आइकोनियां परमामृत । परमानंदें असे डुलत । येणें प्रसादेंचि सिद्ध ग्रंथ । जेणें संत निवतील ॥ २३ ॥ तया संतांसि नमन करून । आरंभीलें ग्रंथव्याख्यान । तें श्रोतां होऊनि सावधान । ग्रंथनिरूपण परिसावें ॥ २४ ॥ जीवन्मुक्तिप्रकरण संपलियावरी । पुढां निरूपणा कैंची उरी । ग्रंथसिद्धि जाली सर्वापरी । नाहीं पुढारी रचना तेथें ॥ २५ ॥ तऱ्ही यया प्रकरणाचें । कारण कोण उठावयाचें । जें जें उपयोगी ज्ञानाचे । आणि साधनाचे सिद्ध जालें ॥ २६ ॥ मुख्य जें कीं ज्ञान । तें मूळभूमिका वैराग्य जाण । तें सांगितलें वैराग्यप्रकरण । विषयीं वितृष्ण तेणें होये ॥ २७ ॥ देहादिप्रपंच यथार्थ भासतां । तंव वैराग्य नुपजे सर्वथा । ह्मणोनि जग मिथ्याभूत तत्वतां । प्रकरण गाथा निरूपिलीं ॥ २८ ॥ येणें दृढवैराग्यकरुनी । साधनें निरूपिलीं प्रयत्नीं । अंतरंगसाधन सर्वांहुनी । करितांक्षणीं तत्वप्राप्ति ॥ २९ ॥ ते वासनाक्षय मनोनाश । साधनद्वय हें

---

१ पवित्र करणाऱ्या वस्तूसही पवित्र करणारा. २ वेदांसही न समजलेल्या. ३ अज्ञानाचे पाश तोडून टाकणाऱ्या. ४ शरण आलेल्याचें रक्षण करणारा. ५ स्तुति. ६ 'आरंभील ग्रंथ व्याख्यान' असा पाठ. ७ गोष्ट. ८ ज्ञानादिकांचें.

सावकाश । करितांचि आत्मा परेश । स्वप्रकाश अपरोक्ष होये ॥ ३० ॥ हे सर्व श्रवणाची संपत्ति । यावरी मनन पाहिजे सर्वार्थी । ह्मणौनि आत्ममननप्रकरणोक्ति । जाणिलें श्रुतीचिया पंथा ॥ ३१ ॥ त्याउपरी निदिध्यासन । तें प्रकरणद्वयनिरूपण । येक बोलिजे शुद्धप्रकरण । आत्मार्चन दुसरें तें ॥ ३२ ॥ एवं निदिध्यासन जालियावरी । श्रीरघुराज आक्षेप करी । ह्मणे तो आत्मा किंलक्षण कैसेपरी । सांग झडकरी श्रीगुरुराया ॥ ३३ ॥ यावरी आत्मतत्वनिरूपण । करिता जाला वसिष्ठ आपण । तया नांव आत्मनिरूपण जाण । बोल प्रकरण यथातथ्य ॥ ३४ ॥ हे सर्व साधनसंपत्ति जालिया । जीवन्मुक्तता बाणे आपसया । ते लक्षणें सांगितलीं रघुराया । नाहीं उपाया बुद्धि येथें ॥ ३५ ॥ तेणें श्रीरघुराज सुखसंपन्न । परमानंदें डुल्ले उलथोन । ब्रह्मानंदें त्रिभुवन । भरे कोंदोन सर्वत्र ॥ ३६ ॥ इतुकेनि जाली कृतकृत्यता । निरूपणाची राहिली कथा । पुढें प्रकरण उपजतां । प्रकार सर्वथा असेचिना ॥३७॥ आयिकतां जीवन्मुक्तलक्षण । स्वयें जीवन्मुक्त जाला आपण । श्रीरघुनाथ सुखसंपन्न । समाधान पावले ॥ ३८ ॥ या सुखाची सुखगोष्टि । सांगतां भासे सकळ सृष्टि । ब्रह्मानंदाची ये पुष्टि देहादिव्यष्टि नुरे जेथें ॥ ३९ ॥ ऐसें रघुनाथाचेनि जालेपणें । वसिष्ठासि आनंद सहस्रगुणें । जाला तो न जाणिजे मनें । आपला आपण भोगितु असे ॥ ४० ॥ एवं दोघे परमानंदें जाले तृप्त । तेणें ब्रह्मांड आनंदरूप होत । तेणें निरूपणाची हे मात । राहिली तटस्थ परमानंदें ॥ ४१ ॥ तथापि उठावया हें प्रकरण । सांगेन थोर कारण । तें आयिकतां येकाग्रमन । सुखसंपन्न होइजे ॥ ४२ ॥ श्रीरघुनाथ पावले समाधान । तेथें पुढारें संपलें निरूपण । परी श्रीराम आक्षेप पूर्ण । घेऊनि प्रश्न करिता जाला ॥ ४३ ॥ ह्मणे विनंती ऐकिजे सद्गुरुराया । मी आनंदरूपचि जालों स्वामिया । स्वयेंचि सुखरूपें असोनियां । जन हा वायां नेणु कां जाला ॥४४॥ परी सद्गुरुकृपेवांचून । सर्वथा प्राप्त नव्हे ब्रह्मज्ञान । आत्मा स्वप्रकाश चैतन्यघन । परी सद्गुरुविण प्राप्त नव्हे ॥ ४५ ॥ आपुलेचि कंठींचा मणि । जैसा भ्रमें जाय विसरोनी । मग हिंडे जनीं वनीं । प्राप्तीलागूनि तयाचिये ॥ ४६ ॥ तथापि तो अप्राप्य तयासि । भ्रमें हिंडे दाही दिशीं । मग आप्त भेटलिया मणीसी । प्रत्यक्ष तयासि दाखवी ॥ ४७ ॥ तैसाचि स्वयें आपणासि विसरोनी । नेणपणें जाय भुलोनी । मग व्याकुळ हिंडे देवालागुनी । तीर्थी वनीं गिरिकपाटीं ॥ ४८ ॥ देवालागीं हिंडे दिशा दाही । तंव देव न भेटे तया कांहीं । जळपाषाणादि आलिंगी बांहीं[4] । आणि देव देहीं तो न देखे ॥४९॥ जेणें देखे नानास्थानें । तया देवासि स्वयें नेणें । हाले चाले बोले जेणें । तया नेणे स्वयें देवा ॥ ५० ॥ देवो आणि देवीभावो । तया सर्व प्रकाशिता जो देवो । तया अज्ञानें नेणें पाहा हो । जंव सद्गुरुरायो भेटला नाहीं ॥ ५१ ॥ येक सद्गुरु भेटलियासाठीं । अपरोक्ष आत्मनेंसि होये भेटी । अज्ञान पळे उठाउठी । स्वानंदपुष्टि स्वयें पावे ॥ ५२ ॥ तें सर्वही तुझे कृपादृष्टी । मज अपरोक्ष स्वरूपीं भेटि । न देखें मायादिविश्वसृष्टि । ब्रह्मांडकोटि न भासती ॥ ५३ ॥ अवघा स्वानंदचि हेलावतु । कांहीं न दिसे दुसरा पदार्थु । जैसा महाप्रळयीं जळसंकेतु । भरोनि राहातु सर्वत्र ॥ ५४ ॥ ऐसी स्थिति बाणली सद्गुरुराया । तऱ्ही एक पुसणें असे स्वामिया । हे सर्वदा सर्व स्थिति बाणावया । कठीण उपायांमाजी मन ॥ ५५ ॥ मनोनाशें वासनाक्षयेंकरुनी । स्वरूपास्थिति पावावी क्लेशेंकरुनी । तो मनोनिग्रहो भरंवसेनी । दुर्लभ जनीं असे स्वामी ॥५६॥ ऐसेंचि बोलिलेंही असे । मनोनिग्रह कठीण दिसे । तेचि संमति सावकाशें । स्मृति ऐसें बोलत ॥५७॥

संमतिस्मृति ॥ ॥ चंचलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवद्दृढम् । तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम् ॥

या मनाचा स्वभाव ऐसाचि असे । चपळत्वें सर्वदा वसे । तो स्वभावो ययाचा कैसा नासे । तरी हें कैसें सांगा स्वामी ॥ ५८ ॥ मनोनिग्रहकरणें यांचिसाठीं । होतसे जन्ममरणान्त आटी । वासना हे अतिशय लाठी । स्वरूपीं भेटी अतिदुर्लभ ॥ ५९ ॥ आणि ते निर्विकल्पसमाधीचें । साधन हें मानलें साचें । परी तियेविण जीवन्मुक्तीचें । न्यून त्याचें काये होये ॥ ६० ज्ञानमात्र जालियासाठीं । अपरोक्ष ब्रह्मेंसि होये भेटि । अज्ञान जाय बारा वाटीं । संसारकपाटिं लागतसे ॥ ६१ ॥ तेथ येव्हडी आटी करुनी । कां पां भरावें योगसाधनीं । स्वरूपस्थ राहावें ज्ञानेंकरुनी । जनीं वनीं स्वप्नजागरीं ॥ ६२ ॥ चालतां बोलतां वर्ततां । स्वरूपानुभवें सर्वथा । मन वासना न कोंडितां । सांगें उपायार्थी सोपानांहीं ॥६३॥ तंव वसिष्ठ ह्मणती गा श्रीरघुपती । धन्य धन्य तुह्मी भारती । अपूर्व केली

---

१ दोन प्रकरणांतील वर्णन. २ हा माझा देह, हा दुसऱ्याचा देह, असा प्रत्येक देहाविषयीं निराळेपणा. ३ नेणता, अज्ञान. ४ हातांनीं. ५ भेट झाल्यानंतर. ६ वासनांच्या नाशानें मनाचा नाश करून. ७ गीता, भारत.

गा प्रश्नोक्ति । सुखसंपत्ति तेणें लाभे ॥ ६४ ॥ तऱ्ही आयिक आतां सांगेन । जेणें सहजस्थिति पावसी निर्वाण । नलगे प्राणायामादि आसन । ना मननिरोधन वासनाक्षय ॥ ६५ ॥ वासनाक्षय मनोनाश । ज्ञानपूर्वक केलिया सावकाश । तेणें निर्विकल्पदशा तयास । जीवन्मुक्तास होतसे ॥ ६६ ॥ ज्ञानेंविण मनवासनेच्या क्षय करणें । तेणें होये प्रपंच उपसंहरणें । प्रपंचलय तो समाधि बोलणें । नये खुणे अनुभव्यांचिये ॥ ६७ ॥ मनोलय प्रपंचोपशमन । केलिया न निरोधे अज्ञान । तें अज्ञान असतां आत्मदर्शन । घडे जाण अपरोक्ष ॥ ६८ ॥ ब्रह्मसाक्षात्कारावांचून । सर्वथा न चुके संसरण । तेथें मनोनाश केलिया कार्य कोण । प्रपंचभान काय करी ॥ ६९ ॥ बहुरूपी मनाचा लय करी । वासना अभावें प्रपंच संहारी । ताटस्थ्यें राहे चिरकाळवरी । परी त्यागासि अंतरीं धरू नेणें ॥ ७० ॥ तेचि समाधीचेनि उत्थानें । उचित दे राया ऐसें ह्मणे । तरी अज्ञान काय निरसलें तेणें । कीं उठे धरणें संसाराचें ॥ ७१ ॥ यालागीं मनोवासनाक्षयेंकरुनी । अज्ञान निरसे भवसेनी । सुषुप्तीसि लयो प्रतिदिनीं । होतां भवश्रेणि न चुकती ॥ ७२ ॥ सुषुप्तिमूर्छनाप्रलयीं । मनोलय होये जागृतिसमयीं । तेथें विश्व ना भासे कांहीं । तरी संसृति कायि निमाली ॥ ७३ ॥ कीं सज्ञान निःशेष काय निमालें । कीं आत्मसुख प्राप्त जालें । यालागीं ज्ञानेंविण क्लेश केले । ते वायां गेले सर्वही ॥ ७४ ॥ मुख्य अज्ञानाचें नाशक । येक आत्मज्ञानचि सम्यक् । वांचूनि साधनें सकळीक । निरर्थक ज्ञानविषईं ॥ ७५ ॥ ययालागीं ज्ञानमात्रेंचिकरुनी । अज्ञान निरसे भवसेनी । कार्य प्रपंचसहित कोदंडपाणी । जाय तत्क्षणीं नाशोनि ॥ ७६ ॥ सविलास अविद्या नाशली । तेथें समूळीं संसृति निमाली । ब्रह्मानंदें नित्य नवी दिवाळी । असती नव्हाळी तया सुखाची ॥ ७७ ॥ इतर्कोंचि मुमुक्षें करावें । येक ज्ञानमात्रचि साधावें । ज्ञानहीअन्य साधनीं न संभवे । येक परिसावें महावाक्य ॥ ७८ ॥ सद्गुरुमुखापासुनी । महावाक्य आयिकावें श्रवणीं । तयाचें मनन करितांचि क्षणीं । पूर्णपणीं स्वयें शोभे ॥ ७९ ॥ महावाक्यश्रवणकाळीं । अज्ञानाची होय होळी । अज्ञानकार्यही तयेवेळीं । होय समूळीं भस्मीभूत ॥ ८० ॥ अज्ञान सविलास जात खेवो । आत्मा स्वप्रकाशे स्वयें देवो । तो जाणतांचि नाशे भवभेवो । मग होय रावो मोक्षश्रियेचा ॥ ८१ ॥ ऐसें अनंता बोलती श्रुति । आत्मज्ञानेंचि मोक्षप्राप्ति । नलगे उपायांची संपत्ति । आयिकें संमति सांगेन ॥ ८२ ॥

संमतिश्रुति ॥ तमेव विदित्वातिमृत्युमेति नान्यः पंथा विद्यतेऽयनाय ।

तेंचि जें आत्मस्वरूप । स्वप्रकाशें प्रकाशदीप । अचळ निष्कळ निष्कंप । सच्चिद्रूप सत्तामात्र ॥ ८३ ॥ हेंचि येक जाणितिलियासाठीं । परममोक्षेंसि भेटी । अतिमृत्यु ह्मणिजे जगजेठी । मोक्ष ऐसी गोष्टि बोलिजे ॥ ८४ ॥ मृत्यु तो अतिक्रमूनि असे । ह्मणोनि अतिमृत्यु बोलिजेतसे । मृत्युव्याजें जन्मही नसे । दोन्ही नाशें मोक्षस्थान ॥ ८५ ॥ नाहो मुळीं मृत्यु बोलिला असतां । नसता जन्म तेथें कां आदितां । तऱ्ही मृत्यु हें उपलक्षण सर्वथा । जन्मप्रसंगता आला असे ॥८६॥ काकेभ्यो दधि रक्ष्यताम् हें वचन । बोलतां याचा ऐसा अर्थ जाण । दधि रक्षावें काकापासून । तरी काय लक्षण इतुकेंचि ॥ ८७ ॥ काकापासूनि दधि रक्षावें । तरी मार्जारादिकरूनि खावुवावें । यालागीं उपलक्षण जाणावें । भक्षूं नेदावें उपघातकां ॥ ८८ ॥ ऐसा वाक्याचा अर्थु असे । उपलक्षणें जाणिजेतसे । मृत्यु तेथ जन्मही भासे । दोन्ही नसे तें मोक्षस्थान ॥ ८९ ॥ जन्ममरण दोन्ही नाहीं । तें आत्मस्वरूप मोक्ष पाहीं । तो तो पावे होवोनि विदेही । आत्मा जिहीं जाणितला ॥९०॥ अन्य मार्ग नाहीं जाणावयासी । ऐसें श्रुति स्वयें उपदेशी । येकें ज्ञानमात्रेंचि मोक्षासी । होय प्राप्तीसि कारण ॥ ९१ ॥ तैशाचि आणिकाही श्रुति । ज्ञानमात्रेंचि बोलती मुक्ति । नलगे अन्य साधनसंपत्ति । तेही श्रोतीं परिसावें ९२

संमतिश्रुति ॥ ब्रह्मविदाप्नोति परम् ।

ह्मणोनि ब्रह्मज्ञानेंकरून । ब्रह्मवेत्ता पावे ब्रह्म पूर्ण । नलगे तेथें इतर साधन । क्लेश जाण व्यर्थचि ॥९३॥ ऐशा किती बोलों श्रुति । ज्ञानमात्रेंचि ब्रह्मप्राप्ति । ब्रह्मविद्ब्रह्मैवभवति । स्वयं श्रुति ऐसें बोले ॥ ९४ ॥ तेथ येक ऐसें ह्मणतातीं । ज्ञानधारा करावी सर्वार्थीं । ज्ञान जालिया ज्ञानसंपत्ति । जाणावयाप्रति करणें लागे ॥ ९५ ॥ ते ज्ञानधारा करावया । निरंतर करावें मनोजया । तऱ्ही हेंही नलगे गा रघुराया । ज्ञानचि आत्मया अपरोक्ष करी ॥ ९६ ॥ अहो व्रतबंधेंकरून । विधीनें जो जाला ब्राह्मण ।

---

१ जन्म आणि मृत्यू यांचें फेरे. २ उदासीन. ३ 'धरूनियां' असा पाठ. ४ नवेपण. ५ संसाराची भीति. ६ एक मुख्य वस्तु सांगीतली असतां तिच्या सारख्याच दुसऱ्यावस्तूंचेंही ग्रहणकरणें ( पुढील ८७ ओवी पहा. ) ८ मुंजीमुळें.

नलगे मी ब्राह्मण अनुसंधान । अहोरात्र जाण घोकणें लागे ॥९७॥ त्यासि व्रतबंध जालियाचि सांठीं । पडे ब्राह्मणत्वाची वज्रमिठी । कैळासे ब्राह्मणाची गांठी । टाकितां संकटीं टाकवेना कीं॥९८॥ ऐसा आत्मा जाणता खेवो । स्वयेंचि वरी त्या ब्रह्मभावो । ज्ञानधारा न करितां स्वभावो । नव्हे भावो अनारिसा ॥ ९९ ॥ तमेवंविदित्वा या 'एव'कारें । सर्वही दूषिलीं साधनांतरें । ज्ञानधारा हेंहीं साधन खरें । सर्व प्रकारें दूषिलें असे ॥ १०० ॥ असंभावना विपरीत भावना । यया निःशेष जालिया लीना । तो अपरोक्ष साक्षात्कार जाणा । ज्ञानाभिधाना तेंचि रूप ॥ १ ॥ इतुकेंचि अतिचोखट कीजे । असंभावनारहित ज्ञान साधिजे । तेणेंचि आत्मा अपरोक्ष कीजे । भ्रम निवर्तिजे तेचि क्षणीं ॥ २ ॥ रज्जूतें जाणत खेवों । जाला भुजंगाचा अभावो । मग सर्पत्व जातांचि सर्प वावो । नुपजे नवलावो अपरोक्षाचा ॥ ३ ॥ सर्पैसहित रज्जूचें अज्ञान । रज्जूविषयीं जालें जेव्हां क्षीण । तेथें मागुतें नव्हे सर्पज्ञान । रज्ज्वानुसंधान न करितांही ॥ ४ ॥ असंदिग्ध जालें रज्जूचें ज्ञान । मग कां करावें तिचेंचे अनुसंधान । भयकंपादिक भस्म पूर्ण । समाधान पावला जो ॥ ५ ॥ तैसेंचि अपरोक्ष जालिया ब्रह्मज्ञान । निःशेष निरसलें अज्ञान । मग सत्यत्वें नेघे विश्वस्वप्न । जागृति पूर्ण जालिया ॥ ६ ॥ शुद्ध जालिया जागृति । त्यासि कां होईल प्रतीति । स्वप्नीं पाठी लागला हस्ती । भयें पळती कोण्ही तेथें ॥ ७ ॥ अथवा स्वप्नींचिया भाजे । जागृतीसि कोण्ही भुंजे । स्वप्नीं राया रंकपण साजे । कीं परिव्राजें अंत्यजपण ॥ ८ ॥ ऐसी संमति श्रीभागवतीं । बोलिला असे तो विश्वमूर्ती । तेही एकाग्र परिसावी श्रोतीं । भाव चित्तीं धरूनियां ९

संमतिश्लोक ॥ तं स प्रपंचमधिरूढसमाधियोगः स्वाप्नं पुनर्न भजते प्रतिबुद्धवस्तुः ॥

ह्मणोनि सकृत् जाणावयासाठीं । मागुता न लगे संसारापाठी । अज्ञान गेलें उठाउठी । कैंची भेटि नेणतयाची ॥ ११० ॥ यालागीं गा श्रीरघुनाथा । ज्ञानधारा नलगे सर्वथा । आत्मा जाणोनि राहें ताता । सांडीं कथा साधनाची ॥११॥ तरी नानासाधनांविरहित । मन वासनालय न करित । आत्मा कैसा जाणिजेत । तेही निश्चित सांगों आतां ॥ १२॥ ते जीवन्मुक्ताची स्थिति । सर्वदा तेचि स्थितीनें वर्त्तती । मग चालवितां राज्यसंपत्ति । संसृति न पावती ते ॥ १३ ॥ सर्वदा ताटस्थ्येंचि पाहिजे बैसलें । तऱ्ही जनकें राज्य कां पां केलें । व्यासादिक काय ताटस्थ्यें राहिले । गार्हस्थ्य केलें वसिष्ठादिकीं ॥ १४ ॥ वाणिज्य करी तुळाधारु । कर्कटी करी मनुष्याहारु । भागवत सांगे श्रीशुकेंद्रु । कर्मांतरु श्रीदत्तसांगे ॥ १५ ॥ ऐसे ज्ञानिये सांगों किती । नारदासि कळीवरी अतिप्रीति । सनकादिक ते सर्वत्र हिंडती । तैसीचि गति जायंताची ॥ १६ ॥ ऐसे सहज स्थितीनें योगेश्वर । येक चालविती सर्वही व्यवहार । परी ते अकर्त्ते निर्विकार । परावर स्वयें जाले ॥ १७ ॥ येक ज्ञानमात्रेंचिकरून । आत्मस्वरूप अपरोक्ष जाणून । स्वयेंचि जाले ब्रह्म निर्वाण । बाधक कोण व्यवहारतां ॥ १८ ॥ त्यांचा बाह्यदृष्टी व्यवहार दिसे । परी तें अकर्त्तेपणेंचि ब्रह्म असे । तयां नेणोनियां लोक पिसे । वर्त्तती ऐसे त्यांतें ह्मणती ॥ १९ ॥ ययालागीं गा विश्वमूर्त्ती । सांगेन तेचि सहजस्थिति । ते आयिक पां येकाग्र चित्तीं । सुखसंपत्ति जेणें लाभे ॥ १२० ॥ आधीं सांगों स्वरूप कैसें । व्यवहारही जाणिजेत असे । मग ते स्थितिही अनायासें । बाणे ऐसें सांगेन ॥ २१ ॥ मनादिकांचा लयो न करितां । इंद्रियें कांहीं न कोंडितां । प्राप्त होय निर्विकल्पता । त्या उपायींर्थी सांगेन ॥ २२ ॥ नाहो इंद्रियप्राणादिनेमेंकरुनी । बैसावें मन निग्रहुनी । वासनेचा नाशु करुनी । समाधानीं राहावें ॥ २३ ॥ वासनाक्षय मनोनाश । योगाभ्यासें जालिया निःशेष । तेंचि निर्विकल्पता सावकाश । समाधि इयेस बोलताती ॥ २४ ॥ आणि तुह्मी बोलतां अनारिसें । जें इत्यादिकां न करितां प्रयासें । निर्विकल्पता होतसे अनायासें । हा संदेह मानसें मानिजेत ॥ २५ ॥ तऱ्हीं आयिक याचें उत्तर । सांगिजेल अतिसुंदर । प्रयासेंविण मनोमार । समाधि स्थिर निर्विकल्प ॥ २६ ॥ अगा संकल्प ह्मणिजे याचें नाम । वस्तूवेगळा जो दृश्यभ्रम । तो यथार्थ मानूनि परम । करी सम्भ्रम हेयोपादान ॥ २७ ॥ असत्य तें सत्य मानुनी । आणि भोग्यत्वें तया देखोनी । ग्राह्यग्राहकता कल्पुनी । कल्पी मनीं ग्राह्यबुद्धि ॥ २८ ॥ याचें नाम विकल्प ह्मणिजे । इतुकेनि संसृति पाविजे । हे जेथें संकल्प नेणिजे । तेचि जाणिजे निर्विकल्पता ॥ २९ ॥ असताचि प्रपंच बाधला । नामरूपत्यागें सत्य मानला । निर्विशेषें ब्रह्मचि जाला । संकल्प तयाला कासयाचा ॥ १३० ॥ आपणावांचूनि दुसरें जनीं । देखे तरी संकल्प करी मनीं । सर्वथा नेणे तो

---

१ घट्ट बसते. २ तं एव (त्यालाच) विदित्वा = जाणून. ३ तत्काळ ४ त्रिवेळा. ५ संन्याशाला. ६ गृहस्थाचा धर्म. ही राक्षसी असून मनुष्यें भक्षण करीत असे. ही कथा मोठ्या योगवासिष्ठांत आहे.

ब्रह्मावांचुनी । जागृतिस्वप्नसुषुप्तीसी ॥ ३१ ॥ देहादिप्रपंचप्रतिभास । जयालागीं सावकाश । तया ब्रह्मावेगळा कोण्ही लेश । नाहीं अंश उरला असे ॥ ३२ ॥

संमतिश्लोक ॥ सर्वं ब्रह्ममयं यस्य न तस्य पृथगस्ति वै ॥ एकांतसेवनं व्यर्थं व्यर्थं मौनादिसाधनम् ॥

प्रतीति काय रूप ऐसें । दृश्य सत्यपणें कदा न भासे । दृष्टी तरी साचा ऐसें दिसे । जैसें कां भासे मृगजळ ॥३३॥ प्रातीतिक विश्वप्रतीति । जालियाही सर्व ब्रह्मसंवित्ति । तेथें संकल्प कासयाचे उठती । तेचि स्थिति निर्विकल्पा ॥ ३४ ॥ ब्रह्मरूप जाला भूगोल । ब्रह्मरूप जाला कुलाचल । ब्रह्मरूप सर्वही नागकुळ । देव सकळ ब्रह्मरूप ॥ ३५ ॥ शुद्धाशुद्ध तें ब्रह्मरूपचि भासे । बरें वाईट तितुकें ब्रह्मरूपचि असे । किंबहुना घटपटादि वसे । तें स्वयंभ दिसे परब्रह्म ॥३६॥ ब्रह्मावेगळें अणुमात्रही । न भासे विश्वीं आणि देहीं । देहेचि देहपणें तेथें नाहीं । न देखे कांहीं ब्रह्मेंविण ॥ ३७ ॥ तेथें कल्पिता आणि कल्पना । केलियाही न भासे सज्ञाना । जेथ उरी नाहीं दुजेपणा । तेथ कल्पना कासयाची ॥ ३८ ॥ यालागीं न करितां अष्टांगयोग । मनोनाश न करितां सांग । वासनाक्षय नलगे अभंग । नलगे व्यंग अन्य साधन ॥ ३९ ॥ उघडांचि डोळां सैरसमाधि । उठतां बैसतां व्यापारसंधी । जागृतीच्या आदिमधीं । असे समाधि निर्विकल्प ॥ १४० ॥ क्षण एक देहावरी एतु । तरी देहसंबंधी सुखदुःख जाणतु । तेही आत्मरूपेंचि देखतु । परिपूर्णस्थितु तोचि पूर्ण ॥ ४१ ॥ हें पंचमी भूमिकेमाझारी । चतुर्थी सुखदुःख-लहरी । तेंही क्षणा येकाभीतरी । सर्वेचि पुरी बाणे दशा ॥ ४२ ॥ तरी क्षण एक सविकल्प । होईल जाणा समाधिसुख । तेंही तया नव्हे बाधक । बोधला सम्यक् ह्मणोनियां ॥४३॥ अगा ज्ञाता आत्मतत्व जाणे । तया नाहीं संसृति पावणें । ब्रह्मानंदुचि सर्वदा भोगणें । जरी करणें न कोंडिता ॥ ४४ ॥ अथवा सविकल्पही असता । काय संसृति वाजे तयाचे माथां । तो सविकल्पें निर्विकल्पते वर्तत्चा । स्थिति सर्वथा भंगेना कीं ॥४५ ॥ त्यासि इंद्रियें नेमितां । गुणअवगुण नव्हे सर्वथा । तोचि ब्रह्मसुखीं पहुडतां । कोण व्यथा तया बाधी ॥ ४६ ॥ पूर्ण जाणिलें आत्मतत्व जेणें । तया नलगे इंद्रियें कोंडणें । मनबुद्ध्यादिकें नियमणें । क्षय करणें वासनेचा ॥४७॥ तो इंद्रियसमाधानें असे । अथवा व्यवहारदशे वसे । परी तया भ्रांतीचा अतिशयो नसे । स्वरूपीं विशेषें नासोनि गेला ॥४८॥ तया समाधि दोनीच असती । विश्रांतीचें स्थान वसती । एक निर्विकल्प दुजी ह्मणती । सविकल्पस्थिति अखंड ॥ ४९ ॥ तयावेगळें तिसरें ठाई । योगिया सर्वथा राहाणें नाहीं । तरी दोहींचें स्वरूप सांगों कांहीं । त्यांत एक पाहीं सांगितली ॥ १५० ॥ निर्विकल्पसमाधीची खूण । तुज सांगितली गा संपूर्ण । सविकल्प ते इतु-कीचि जाण । द्रष्टा दृश्य दर्शन जेथें स्फुरे ॥ ५१ ॥ जेथें ज्ञेय ज्ञान आणि ज्ञाता । जेथें त्रिपुटी स्फुरे गा रघुनाथा । तियेतें बोलिजे सविकल्पता । समाधि तत्वतां जाण तूं ॥ ५२ ॥ स्वरूपस्थिति तरी आहे । परी त्रिपुटी जेथें स्फुरताहे । तेचि ते सविकल्पसमाधि पाहें । निर्धारु होय योगियासी ॥५३॥ हेचि त्रिपुटी जेथें न स्फुरे । तेचि निर्विकल्प जाण निर्धारें । यया दोहींवेगळें तिसरें । नाहीं खरें योगियासी ॥ ५४ ॥ तो इंद्रियें नेमूनि बैसला । अथवा न नेमी कोणा इंद्रियाला । परी परब्रह्मीं ब्रह्म-रूप संचला । नव्हे वेगळा प्रपंचरूप ॥ ५५ ॥ दधि मंथूनि काढलें लोणी । तें ताकीं घालितां न मिळे मिळणी । तैसा जो कां निघाला प्रपंचाहुनी । तो नये मागुतेनि वर्त्तत्तां तेथें ॥ ५६ ॥ इक्षुदंडाची कीजे शर्करा । ते ते गाळितां नानाप्रकारा । तऱ्ही तो ऊंस नव्हे कोण्हीही द्वारा । शर्करा ते शर्करा न ढळेचि ॥ ५७ ॥ तैसें सद्गुरुप्रसादेंकरून । देहादिप्रपंचविहीन । स्वयें ब्रह्म जाला जो आपण । तो न पवे देहपणें वर्त्ततांही ॥ ५८ ॥ दुग्ध मथितां घृत होये । मागुतें तें दुग्धीं घालितां दुग्ध नोहे । तैसा ज्ञानी तो अज्ञानी हें । कोणे उपायीं घडेना कीं ॥५९॥ तैसा ज्ञानी प्रपंचीं वर्त्तत्ता । परी प्रपंच नव्हे सर्वथा । नातरी समाधिस्थ बैसतां । नाहीं तत्वतां विशेष कांहीं ॥ १६० ॥ रत्नपेटिये नाना वेष्टणें बांधलें । तरी तें रत्नपणाहूनि अधिक जालें । किंवा धुळींत पडल्या मुकलें । नाहीं हारविलें रत्नपण ॥ ६१ ॥ तैसा निर्विकल्पें काय होय ज्ञानी । किंवा सविकल्पें होईल अज्ञानी । हे दोन्ही समाधि नव्हे लाभ-हानी । सर्वत्र निर्वाणि ब्रह्मचि तो ॥ ६२ ॥ यालागीं समाहित करणें केलीं । तरी विशेषता नाहीं आली । असमाहितें स्थिति बुडाली । हे तंव बोली न घडे कदा ॥ ६३ ॥ यदर्थीं श्रीकृष्णभगवंतु । उद्धवाप्रति बोले सिद्धांतु । संमति श्रीभागवतोक्तु । दत्तचित्त परिसिजे ॥ ६४ ॥

१ स्वच्छंद ( पूर्ण ) अशी समाधि. २ झोंप लागण्यापूर्वी क्षणमात्र, आणि झोंपेंतून उठल्यानंतर देहादिकांचें स्मरण होण्यापूर्वी क्षणभर. ३ ताक्यांत ठेवणें. ४ 'अति सो' असा पाठ. ५ रत्नें ठेवलेल्या पेटीस. ६ चित्त दिलेला.

संमतिश्लोक ॥ समाहितैः कः करणैर्गुणात्मभिर्गुणो भवेन्मत्सुविविक्त धाम्नः ।
विक्षिप्यमाणैरुत किं नु दूषणं घनैरुपेतैर्विगतै रवेः किम् ॥

श्रीकृष्ण ह्मणती उद्धवासी । अपरोक्ष जाणे जो मज स्वरूपासी । नाहीं असंभावनामळ जयासी । तया पुरुषासि कोण बंध ॥६५॥ त्रिगुणात्मकें जें इंद्रियें । ते त्रिगुणावृत्ति एकप्रकाचिये । तें समाहित कोण कोणा आहे । ब्रह्माहूनि काय अधिक होईल ॥६६॥ तो पावला असे गा निर्वाण । स्वयेंचि परब्रह्म आपण । तो इंद्रियां नेमिल्या होईल कोण । ब्रह्माहूनि थोर दुसरा ॥६७॥ कीं मुक्तीसिही मुक्ति होये । किंवा तयासी आन कांहीं फळ होय पाहे । किंवा तो स्वर्गादिकासि जाये । फळरूप आहे सर्वांसि तोचि ॥ ६८ ॥ करणें समाहितें असतां । त्रिगुणावृत्त्यांहीं विचरतां । कोण हानि तयाचे माथां । अनात्मा मागुता होईल काय॥६९॥किंवा तो ब्रह्म अब्रह्म होये । कीं जालें जें ज्ञान मागुतें जाये । कीं संसृतिस्वप्नीं बुडोनि राहे । काय होताहे अपकार त्यासी ॥१७०॥ जागृत काय स्वप्न देखे । कीं अमृतचि परी मारकें । कीं अग्नि जळे स्वज्वाळकें । नीरें नीर कें बुडोनि जाये ॥७१॥ अथवा वारियाच्या लहरी । वायुचि उडोनि जाय जरी । विखचि विखकंदु चुरमुरी । कीं मरण भारी मरणातें ॥ ७२ ॥ अथवा सूर्यैचि सूर्य भक्षिजे । सूर्यें सूर्य आच्छादिजे । चंद्रें चंद्रकळा ग्रासिजे । तैसें जाणिजे नवल हें ॥ ७३ ॥ तैसें सर्व ब्रह्म जयासि प्रतीति । तयासि इंद्रियनेम कोणाप्रति । तऱ्ही सत्वरजतमोगुणवृत्ति । उठिल्या स्थिति काय भंगे ॥ ७४ ॥ सत्वरजतमोगुणाच्या वृत्ति । क्षण येक चित्तातें आवरिती । परी खेवाचि स्फुरे ब्रह्मस्फूर्ति । लया जाती सकळीक ॥ ७५ ॥ पहिलेचि आहाचवाहाचे उठलिया । त्याही बाधित जालिया गा रघुराया । सर्वेचि ब्रह्मस्फूर्त्ति जालिया । जातील लया सर्वही ॥७६॥ ऐसेंच बृहदारण्यश्रुति सुरेश्वराचार्य व्याख्यानिती । न मोडे आत्मविदाची स्थिति । त्रिगुणवृत्ति उठिल्या जरी ॥ ७७ ॥

संमतिवार्त्तिक ॥ रागादिदर्शनं यच्च ज्ञानिनोऽपि हि चोद्यते । बाधितस्यैव तत्सूते सदप्युक्तं न दूषणम् ॥

कामक्रोधलोभादि पाहीं । दिसे ज्ञानियाचे ठायीं । परी ब्रह्मस्फूर्तीनें बाधित सर्वही । न बाधिती कांहीं तयासी ॥ ७८ ॥ यालागीं इंद्रियेंही न कोंडितां । स्थिति न्यून नव्हे गा सर्वथा । ग्रहणीं व्यापिल्याही सविता । काय न्यूनता पावेल ॥ ७९ ॥ काय सूर्यपण त्याचें गेलें । कीं खद्योतपण आंगासि आलें । कीं स्वप्रकाशपणें हारपलें । काय जालें न्यून त्याचें ॥ १८० ॥ तया मेघाचिया दाटी । प्रतिबंध जाला जनाचिये दृष्टी । परी सूर्य तो प्रकाशक सकल सृष्टी । नाहीं भेटि अंधकारेंसी ॥ ८१ ॥ तया अभ्राचाही प्रकाशिता । स्वप्रकाशिता होय तो सविता । प्रकाश आच्छादीना सर्वथा । समूळ हे कथा असंबद्ध ॥ ८२ ॥ नाना तिमिरअस्तु जालियावरी । प्रकाश पावे तो तमारि । अभ्र गेलिया लाभ काय करी । सांग निर्धारीं विचारोनियां ॥ ८३ ॥ अभ्रेंचि येती आणि जाती । परी तो तैसाचि तेजोमूर्ति । न टाकी आपुली प्रकाशगति । प्रकाशोनि वर्त्तती याचेनि सर्व ॥ ८४ ॥ अभ्र आलें गेलें असतां । परी दोहींचा साक्षी तो सविता । तैसा गुणवृत्त्यादि आत्मवेत्ता । न भुले सर्वथा साक्षित्वें ॥ ८५ ॥ तो स्वप्रकाशेंकरुनी । गुणदोष न पवे भरंवसेनी । जडा अप्रकाशा वृत्तींकरुनी । नियमनीं इंद्रियांच्या ॥ ८६ ॥ ऐसें स्वप्रकाशेंचि श्रेष्ठें । सूर्यासि जेथें नाहीं लिंपणें । तेथें सूर्यप्रकाशी कोणहे । इंद्रियवृत्तीनें आवरिती ॥ ८७ ॥ तेथें सूर्यादितेजमंतें । तेणें प्रकाशती स्वप्रकाशें जेथें । त्या कोण प्रकाशी आत्मयातें । आवरणातें कोण करी ॥ ८८ ॥ यदर्थीं स्वयें बोलतसे श्रुति । अग्निसूर्यादि जेथें न भासती । तेथ इतरांची कोण गति । सर्व प्रकाशती त्याचेंनी ॥ ८९ ॥

संमतिश्रुति ॥ न तत्र सूर्यो भाति न चंद्रतारकं नेमा विद्युतो भांति कुतोयमग्निः ।
तमेव भांतमनुभाति सर्वं तस्य भासा सर्वमिदं विभाति ॥

अहो जेथें चंद्रसूर्य न भासती । तारागणें विद्युल्लताचि संपत्ती । तेथें अग्नीची किती दीप्ति । जे प्रकाशती आत्मयातें ॥ १९० ॥ यालागीं सूर्यचंद्रादिकांसी । येकु आत्मा स्वयें प्रकाशी । तो भासतांचि प्रकाशु सर्वांसी । जग हें व्यक्तीसि येतसे ॥ ९१ ॥ नेत्रादिकें प्रकाशकें होती । परी अंधारीं काय वस्तु देखती । तें सूर्यप्रकाशेंचि प्रकाशती । अकिंचित्करगति सूर्याविण यांची ॥ ९२ ॥ सूर्यकांतु प्रकाशकु होये । दर्पणीं रूप दिसताहे । परी सूर्यप्रकाशेंचि पाहे । येऱ्हवीं काय प्रकाशती ॥९३॥

---

१ सत्व, रज व तम यांच्या पुनः पुनः उत्पत्तीनें. २ संसाररूपी स्वप्नांत. ३ उगीचच्या उगीच. ४ अर्थ स्पष्ट करून सांगतात. ५ काजव्याचें रूप. ६ सूर्य. ७ सूर्य वगैरे तेजस्वी पदार्थ. ८ यांस सूर्याशिवाय कांहीं करतां येत नाहीं.

सोमकांत द्रवता होये । परी ते हातवटी चंद्रींच आहे । तैसें प्रकाशमंतासि प्रकाशितुचि जाये । आत्मा पाहे स्वप्रकाशें ॥ ९४ ॥ त्याचा प्रकाश कोण्ही न अभिभवी । ना प्रगट करी उचलूनि दावी । प्रकाशें नाहीं हे ठेवाठेवी । अज्ञानगोवी सर्वस्वाची ॥ ९५ ॥ हें रविचंद्रदृष्टांतें सांगितलें । आतां असंगपणेंही तो न मैळे । हें आकाशदृष्टांतेंकरूनि बोले । ब्रह्म सांवळें उद्धवाप्रति ॥ ९६ ॥

संमतिश्लोक ॥ यथा नभो वाय्वनलांबुभूगुणैर्गतागतैर्वर्तुगुणैर्न सज्जते । तथाक्षरं सत्वरजस्तमोमलैरहंमतेः संसृतिहेतुभिः परम् ॥

तैसें हें कीं गगन । अग्नीनें न जाय जळोन ॥ वारेनें न शोषे जाण । उदकें बुडोन न जाय कदा ॥ ९७ ॥ तैसेंचि रजें धूसरादिकीं । न मैळे तें काळीं तिहीं कीं । अथवा षड्तु वर्षादिकीं । गुणविशेषीं तैसें नव्हे ॥ ९८ ॥ शीतें कांकडोनि गेलें गगन । अथवा उष्णें नाहीं गेलें करपोन । पर्जन्यबोलें निथळोन । नाहीं बुडोनि गेलें उदकीं ॥ ९९ ॥ साही ऋतु येती आणि जाती । गगन जैसें तैसें आत्मस्थिती । न बुडे न जळे मैळगती । धूसर नव्हती कदाकाळीं ॥ २०० ॥ कोण्हे ही संगातें नपवे । कोण्हाचेनिही न अभिभवे । त्याच्याचि ठाईं सर्व संभवे । मागुतें मांवळे त्याचा ठाईं ॥ १ ॥ आगमापायी षड्तुगण । तेणेंसि संग न पवे गगन । असंगपणें आपणा आपण । शुद्ध संपूर्ण जैसें तैसें ॥ २ ॥ तैसा जो अहंकाराहूनि पर । आत्मा शुद्धबुद्ध निर्विकार । त्यासि सत्वरजतमादिविकार । न करिती विचित्र आपणाऐसें ॥ ३ ॥ यास्तव रजतमाच्या वृत्ति । अतिमळिण संसृति देती । तरी आत्मयातें न बाधिती । जऱ्ही उठती स्वकार्यरूपें ॥ ४ ॥ अगा सर्वही अहंकारें बाधता । संसृति अहंकाराचे माथां । तोही विपरीत जाला तत्वतां । तेथ कैची कथा जन्ममरणाची ॥ ५ ॥ जो देहाकारें परिणमतु । मी देह ऐसा अध्यासभूतु । तोचि 'ब्रह्मोह-मस्मि' ऐसा बठतु । उठतांचि भस्मांतु अज्ञानासी ॥ ६ ॥ देहाहंकारें सत्वरजतमोवृत्ति । त्या निश्चयें संसृतीतें देती । तोचि 'ब्रह्माहमस्मि' होतां क्षणांतीं । भस्म होती जन्ममरणें ॥ ७ ॥ देहसंग न लगे जयासी । तेथें देह कोण अर्थ बाधील त्यासी । तो असंग सर्वांसी । उदासपणें ॥ ८ ॥ आत्मा सर्वदा असंग असे । ऐसें श्रुतिही बोलतसे । 'असंगोह्ययंपुरुष' ऐसें । बोलत सर्वांशें आत्मयासी ॥ ९ ॥ ह्मणोनि तो सविकल्पनिर्विकल्पें । असतां न लिंपे पुण्यपापें । असंगपणें विषयीं न तापे । असे अमूपें ब्रह्मानुभवें ॥२१०॥ ह्मणोनि देहाहंकारें जें करिजे । तेणें कर्त्तेपणा लिंपिजे । अहंकारेंविण जें जें करिजे । ब्रह्मचि सहजें तें तें कर्म ॥ ११ ॥ देहाहंकारें तो ब्रह्ममूर्त्ति । कर्माकर्म तया ब्रह्मस्थिति । ते विश्वाचा जरी संहार करिती । तऱ्ही नपवती बाधु काई ॥ १२ ॥ यदर्थीं श्रुतींचीं वचनें । स्वयें बोलिलीं श्रीना-रायणें । मुखीं घातलीं अतिप्रीतीनें । जनार्दनें अर्जुनाच्या ॥ १३ ॥

संमतिश्लोक ॥ यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते । हत्वापि स इमाँल्लोकान्न हंति न निबध्यते ॥

जयासि अहंभाव नाहीं । मी देहीं ब्राह्मण क्षत्रीय वैश्य पाहीं । तैसें आश्रमाभिमानही । न जागे देहीं जयाचा ॥ १४ ॥ अगा अभिमान तो द्विविध जाण । येकु विशेष येकु सामान्य । याचेंही सांगों लक्षण । सावधान परिस पां ॥ १५ ॥ अहं प्रत्यय सर्व देहीं । मी ऐसा अहंकारु पाहीं । हा सामान्य वर्त्ते सर्वांही । विशेष तो येहीं लक्षणीं जाणा ॥ १६ ॥ मी शूद्र वैश्य अथवा ब्राह्मण । गृहस्थ वनस्थ यति जाण । भिक्षुक उद्यमी धनी गोमाँन् । हा विशेष अभिमान जाण ऐसा ॥ १७ ॥ या दोन्ही अभिमानेंकरुनी । विश्व हें बांधलें कळासोनी । त्यासि स्वानुभवें देई टाकुनी । तरी अकर्त्ता जनीं तोचि एकु ॥ १८ ॥ हा द्विविध अहंकार जयाचा गेला । त्याची बुद्धि न लिंपे कर्त्तेपणाला । तेणें जगत्रयाचा संहारु केला । तऱ्ही पापाला न लिंपे हो ॥ १९ ॥ जरी तो कर्मांचा कर्त्ता होईल । तरी तो पापपुण्यासि लिंपिजेल । त्याची बुद्धि कर्त्तेपणा उठेल । अहंकारु असेल देहपणें ॥ २२० ॥ ह्मणोनि अहंकार सांडुनियां कर्मे । केलीं तेंचि परब्रह्मं । तेंही संस्कारें करी परी नाहीं देहधर्मे । हेंचि वर्म अक-र्त्तेपणाचीं ॥ २१ ॥ यालागीं सर्व कर्मे केलिया । परी न पवे उणियापुरियां । अथवा निर्विकल्पें राहि-लिया । परिपूर्ण तया न्यून पूर्ण काय ॥२२॥ यदर्थीं ऐसेंचि बोले श्रुति । ब्रह्मनिष्ठा कर्माकर्मे न बाधिती । केलिया कर्मे न मोडे स्थिति । न केल्या गति न्यून काये ॥ २३ ॥

संमतिश्रुति ॥ एष नित्यो महिमा ब्राह्मणस्य न कर्मणा वर्धते नो कनीयान् ॥

हा नित्य अविशिष्ट ब्राह्मणाचा । ज्ञानमहिमा जाण साचा । कर्मे करितां समंध वाढीचा । नव्हे

---

१ योग्यता. २ 'नाहीं आहे' असा पाठ. ३ धुळ वगैरे पदार्थांनीं. ४ 'माळवे' असा पाठ. ५ मी ब्रह्म आहें. ६ हा पुरुष ( आत्मा ) संगरहित आहे. ७ गाई ज्याच्याजवळ आहेत तो. ८ कमजास्तीपणाला.

त्याचा कर्म करितां ॥ २४ ॥ कर्मे करितां काय अधिक होईल । किंवा न करितां तुटी येईल । तो जैसा तैसाचि केवळ । नाहीं तळमळ अहंभावाची ॥ २५ ॥ नाहीं ब्राह्मण शब्द साधारण । सकल बोलिजती ब्राह्मण । तो कर्म करितां पावे महिमान । न करितां हीन सर्वथा ॥२६॥ एक सामान्य ब्राह्मण असती। ते सर्व कर्मही आचरती । परी ते साधारण बोलिजती । केवळ जातीकरूनियां ॥ २७ ॥ परी ते वेषें करूनियां ब्राह्मण । ब्राह्मणाचें सांगेल लक्षण । वार्तिक बोले सुरेश्वर आपण । तेंचि चिन्ह परियेसा २८

संमतिवार्तिक ॥ यस्त्वक्षरपरिज्ञानान्मर्त्योमृत्युं प्रमीयते ॥ स एव ब्राह्मणो नान्यो जगत्यध्यवसीयताम् ॥

जें कीं शाश्वत नित्य अक्षर । परब्रह्म जें निर्विकार । त्याच्या परिज्ञानेंकरूनि संसार । भस्मसार जेणें केला ॥२९॥ मृत्यूउपरी मृत्युहारि । होती ज्या संसाराभीतरी । गेलिया कोटि कल्पांच्या भरोवरी। परी नसे ज्या वारी संसाराची ॥२३०॥ ऐसिया संसाराचें धरणें । उठलें ब्रह्माचे अपरोक्ष ज्ञानें । तया तेंचि ब्राह्मण ऐसें म्हणणें । येरु तो जाणणें वेषधारी ॥३१॥ दुसरें ऐसें व्याख्यान । वस्तूचें जें अपरोक्ष ज्ञान । तेणें मृत्यूचा मृत्यु जें चैतन्य होय तो ब्राह्मण निश्चयेंसी ॥ ३२ ॥ अगा त्रैलोक्यामाझारी । बरवा निश्चयो सर्वांभीतरी । जो ब्रह्म जाणे स्वज्ञानेंकरीं । ब्राह्मणत्व वरी तयातेंचि ॥ ३३ ॥ इतर तेही ब्राह्मण होती । परी मुख्य ब्राह्मण ते नव्हती । ते सत्कर्मी आचारवंत असती । परी मुख्य म्हणिजेती पूर्वोक्त ॥ ३४ ॥ यालागीं तोचि तो ब्राह्मण । कर्माधीन कदा नव्हे जयाचें महिमान । महिमान म्हणिजे स्वरूपज्ञान । नव्हे क्षीण कर्मे करितां ॥ ३५ ॥ यालागीं तो सर्वही कर्मे करू । अथवा तो कांहींच न करू । समाधिस्थ राहो अथवा राज्य करू । कां व्यवहारू गृहस्थाश्रमीं ॥ ३६ ॥ यालागीं कर्मे करितां कां न करितां । तोचि ब्रह्मरूप तत्वतां । अगा अल्पही मन ब्रह्मीं लावितां । कर्मे करितां न लिंपे तो ॥३७॥ तो परमानंदुचि पावेल । परी न देखे तो दुःख कल्लोळ । करितां व्यवहार सकळ । अतिनिर्मळ असंगत्वें ॥ ३८ ॥

संमतिश्लोक ॥ योगरतो वा भोगरतो वा संगरतो वा संगविहीनः । किंचिद्ब्रह्मणि योजितचित्तं नंदति नंदति नंदति यत् ।

जेणें किंचित् कदाचित् चित्त । ब्रह्मीं ठेविलें गा सुनिश्चित । तो परमानंदु पावे अद्भुत । हेलावतब्रह्मगोळ ॥३९॥तो परमानंदुचि श्रीरघुनाथा । पावे निश्चयें जाण सर्वथा । नको आणूं तूं भ्रांति चित्ता। दिव्य सर्वथा देईन मी ॥२४०॥ परी तो असो भलत्यापरी । योग साधूनि राहो अंतरीं । अथवा भोग भोगो नानापरी । किंवा संगु करो स्त्रीपुत्रांचा ॥ ४१ ॥ अथवा निःसंग होऊनि वनीं बैसो । कां स्त्रीपुत्रसंगें घरीं वसो । कां यागादिकर्मे करूनि असो । अथवा नसो गृहाश्रमी ॥ ४२ ॥ परी तो संगें असंगें न जळे । भोगीं अभोगीं वर्त्ततां न पोळे । पुत्रादिसंगेंकरूनि न मैळे । जरी खेळु खेळे नानापरी ॥४३॥ यालागीं कर्मी अकर्मी वर्त्ततां । परी तो न पवे अधिक न्यूनता । तो ब्रह्मरूप तत्वतां । नेणे कथा जीवत्वाची ॥ ४४ ॥ म्हणोनि कर्माचरणें वर्त्ततां । परी तो बाधु न पवे ना रघुनाथा । अथवा समाधिस्थ राहाता । अधिकता काय पावे ॥ ४५ ॥ आतां बहु बोलोनि काय करावें । ब्रह्मनिष्ठासि सर्वत्र निष्ठा होये । तो स्वयेंचि ब्रह्मरूप आहे । न्यून काय होईल त्यासी ॥ ४६ ॥ तो देहीं असोनि देहातीतु । स्वात्मबोधेंचि जो वर्त्ततु । यदर्थीं भागवतीं श्रीभगवंतु । बोले मातु श्रीउद्धवासी ॥ ४७ ॥

संमतिश्लोक । देहस्थोऽपि न देहस्थो विद्वान्स्वप्नाद्यथोत्थितः । अदेहस्थोऽपि देहस्थः कुमतिः स्वप्नदृग्यथा ।

अगा देहीं असोनि तो नव्हे देही । जो सर्व साक्षित्वें वर्त्ते पाहीं । नेणे आपणाव्यतिरिक्त कांहीं । कर्म आपणासि भिन्न न देखे ॥ ४८ ॥ आपुलें स्वरूप न देखे भिन्न । ब्रह्मीं ब्रह्मरूप चैतन्यघन । पूर्वी जो देखतसे विश्वस्वप्न । तें आपणा नेणोनि भ्रांतीस्तव ॥ ४९ ॥ तो स्वा[illegible]धें जाला जागृत । देहोस्मिस्वप्न गेलें निभ्रांत । जैसा जागा पुरुष स्वप्नस्थ । देखे समस्त स्वप्न [illegible] ॥२५०॥ तैसा जागिजलियां काय स्वप्नपंचा होये । तैसा ब्रह्मावबोधें संसारी नोहे । येणें[illegible]तें तूं पाहें । सर्वथा नोहे मोह कांहीं ॥ ५१ ॥ तैसा अज्ञानी जाण विपरीत । तो देहस्थ नहोनि[illegible] देहस्थ । बुद्धि तयाची कुत्सित । आत्मतत्व नेणोनियां ॥५२॥ जैसा स्वयें ब्राह्मण असता । तो [illegible] चांडाळत्व होय धरिता तो नव्हे परी अंत्यजता । स्वयें मानिता होय आपणासी ॥ ५३ ॥ मग [illegible] देहाचेनि सुखदुःखेंकरीं । तद्रूपचि होय सर्वांतरीं । तैसाचि ज्ञानी गा रावणारी । नहोनि मारी [illegible]स्वरूप होये ॥ ५४ ॥ यालागीं

१ स्वतः ज्ञानयुक्त झालेल असल्यामुळें. २ यज्ञ याग वगैरे ब्राह्मणानें [illegible]दयाचीं कर्मे. ३ मी देह आहे असा जो भ्रम, तें स्वप्न. ४ जागा असता रास. ५ ब्रह्मज्ञान झाल्यामुळें.

वास्तव तो देही नव्हे । तेथ देहींचें कर्म बाधील काये । ऐसें उद्धवाप्रति यदुरायें। बोधिलें पाहे स्वरूपज्ञान ॥ ५५ ॥ यालागीं असतां सहजस्थिति । संगासंग बाधूं न शकती । मनादिनिरोध करणें न लगती। सहजस्थिति सहजपणें ॥ ५६ ॥ तरी ते सहजस्थिति कैसी असे मनादिनिरोध न करितां अनायासें ब्रह्मरूप असिजेत असे । तेंही कैसें सांगेन ॥ ५७ ॥ ऐसें बोलतां श्रीवसिष्ठमुनि । रघुनाथ हर्ष न माय गगनीं । तेंचि पुसावया प्रवर्त्तला प्रश्नीं । प्रत्युत्तरं मुनि देता जाला ॥ ५८ ॥ तेंचि निरूपण करावया लागून । प्रवर्त्तलें दशमप्रकरण । येथें नवांही प्रकरणांचें निरूपण । आहे पूर्ण ब्रह्मानंदु ॥५९॥ ययास्तवें हें निर्वाणप्रकरण । गोडपणें पावलें अभिधान । तेंचि कीजैल निरूपण । सावधान परियेसा ॥ २६० ॥ त्यामाजीं कितीयेका श्लोकांकरून । प्रथम कीजैल स्वरूपज्ञान । वर्त्ततांही व्यवहारें करून । होय भान ब्रह्मचि तया ॥६१॥ ब्रह्म तें सद्रूप चिद्रूप आनंदरूप । त्रिप्रकारें येक ब्रह्मस्वरूप । तें तिहीं प्रकारें वोळखें अनुरूप। सांगिजे स्वरूप तिहीं श्लोकीं॥६२॥ त्यावरी पांच श्लोकेंकरून। याचें कीजैल दृढीकरण । आणि ते वस्तूचि पाहतां खूण । सांगिजैल पूर्ण बोधें तैसें ॥ ६३ ॥ त्यांमाजीं प्रथम श्लोकीं आनंदांशें । ब्रह्म बोधिजैल वोळखीमिषें । द्वितीय श्लोकीं चित्प्रकाशें । आणि सत्तांशें तृतीय श्लोकीं ॥ ६४ ॥ तेंचि आठा श्लोकीं जाणिजे । सर्वत्र ब्रह्मदर्शन कीजे । तयावरी श्लोकद्वयें वाखाणिजे । स्थिति सहजें ते सहजस्थिति ॥६५॥ यावरी स्थिती तेचि दृढीकरण । यावत्समाप्ति हें प्रकरण । मध्यें इतर भंगीं[1] निरूपण । कीजैल ज्ञान श्रोते हो ॥ ६६ ॥ परस्परें प्रकरणांची संगति । निरूपिली श्रीरामाची प्रश्नोक्ति । आतां निरूपण श्रीवसिष्ठ जें करिती । तें सावधान श्रोतीं परिसावें ॥ ६७ ॥

दृश्यदर्शनसंबंधादुद्भवेत्परमं सुखम् । तदैकांतिकसंवित्त्या मनोनाशः परं पदम् ॥ १ ॥

श्रीरामा तुझेनि प्रश्नेंकरुनी । सुखनिर्भर जालें अंतःकरणीं । तऱ्ही आयिक सांगों विस्तारुनी । जेंवरी धणी पावे मन ॥ ६८ ॥ तऱ्ही सहजस्थितीनें असतां । आत्मानुभवें चालतां बोलतां । तेचि आइकें श्रीरघुनाथा । अपूर्वता इये स्थितीची ॥ ६९ ॥ तरी आत्मयाचें जाणणें । तें अतिसुलभ गा इये खुणे । सोपें आणि सुख पावणें। विटिजेना मनें अनुभवितां ॥ २७० ॥ मनासि तरी अनुभव नाहीं । परी वृत्तिरूप ज्ञानास्तव पाहीं । बोली बोललों तो दोष कांहीं । न मनीं देहीं रघुवर्या ॥ ७१ ॥ केवळ शुद्धबुद्धीची जे वृत्ति । ते चैतन्याकारें होतां रघुपती । तेणें आत्मविषयिक अज्ञाननिवृत्ति। होये क्षणाप्रति राघवा ॥ ७२ ॥ अगा तया अज्ञानाचा नाश । होतांचि आत्मस्वरूपप्रकाश । तो स्वयें अनुभव आपणास । सावकाश होतसे ॥ ७३ ॥ यालागीं बुद्धिग्राह्य ह्मणती । हेंचि खूण बोलावया रघुपती । येचिविषई द्वारकापति[3] । पार्थाप्रति बोले गीता ॥ ७४ ॥

संमतिश्लोक ॥ सुखमात्यंतिकं यत्तत् बुद्धिग्राह्यमतींद्रियम् ॥

संमतिश्रुति ॥ दृश्यते त्वग्र्यया बुद्ध्या सूक्ष्मया सूक्ष्मदर्शिभिः ।

यन्मनसैवानुद्रष्टव्यम् । हृदा मनीषा मनसाभिकॢप्तो य एनं विदुरमृतास्ते भवंति ॥

यालागीं गा त्रैलोक्यपती । बुद्धिग्राह्य ऐसें ह्मणती । एऱ्हवीं अनुभविजे स्वयें प्रतीती । परी इंद्रियवृत्ति न पावे ॥ ७५ ॥ तरी प्रिय दृश्याचि भेटी । जें कीं दर्शनें स्वयेंचि उठी । दृश्यदर्शनाच्या संघटीं[4] । सुखकोटि उद्भवे जें ॥ ७६ ॥ दृश्य देखिली प्रिय वनिता । तियेसि दर्शनाचा संबंधु होतां । सुख जें होय गा विबुद्धनाथा । आयिकें तत्वतां वर्म सांगों ॥ ७७ ॥ चैतन्य सर्वत्र एकचि असे । तें दृश्यीं स्वतः सिद्धचि वसे । चिद्वृत्ति तें दर्शन ऐसें । ति येमाजी भासे चैतन्य ॥ ७८ ॥ होतां दृश्य दर्शनाची भेटि । दोन्ही चैतन्येंसि पडे मिठि । तेथ अज्ञान पळे उठाउठी । सुखकोटि चैतन्यरूपा ॥ ७९ ॥ तें सुख न माये गगनीं । स्वयेंही भरे कोंदुनी । तेव्हां मनवासना जाती विरोनी । दक्ष[5] दोनि परमानंदा ॥ २८० ॥ हा भलतयासि अनुभव असे । तो एकांत सेवित्याचा[6] होतसे । एकांतसंवित्ती ह्मणिजे ऐसें । तें सांगों विन्यासें परिस पां ॥ ८१ ॥ घटपटादि जेणें जाणणें । जें स्थूळवृत्तीकरूनि पाहाणें । तें लौकिकज्ञान मी ह्मणें । वृत्तिरूप जाणें एकांतरू ॥ ८२ ॥ वृत्तिरूपचि घटज्ञान असे । परी तत्क्षणींच तें नासे । त्यातें लौकिक ह्मणिजेत असे । स्थिर वसे तें एकांतज्ञान ॥ ८३ ॥ अनेकाकारा जे वृत्तिसंवित्ति । ते लौकिक ऐसें बोलती । एक ब्रह्माकार जे चरमांतःकरणवृत्ति[7] । एकांतसंवित्ति ते ह्मणिजे ॥ ८४ ॥ दृश्यदर्शनसंबंधेंकरूनि ज्ञान । जें कीं उद्भवे सुख घन । तेंचि निर्वाहक केलिया पूर्ण ।

---

१ प्रकरण संपेपर्यंत. २ विषयासंबंधानें आलेल्या इतर अंगासंबंधानेंही. ३ कृष्ण, गीतेंत. ४ एकत्र होण्यानें. ५ स्त्री. ६ एकांतीं झालेलें ज्ञान. 'एकांत सेविती' असा येथें पाठ आहे. ७ अंतःकरणाची शेवटची स्थिति.

होय खूण एकांताची ॥ ८५ ॥ विषयनाशेंकरूनि नाशलें । ह्मणोनि तें लौकिकज्ञान जालें । विषयउपाधीनें युक्त भलें । ह्मणोनि आलें लौकिकपणा ॥ ८६ ॥ तेंचि उपाधीच्या त्यागेंकरूनी । निर्वाहातें कीजे संपूर्ण जनीं । तरी तेंचि ज्ञान एकांतपणीं । सुख निर्वाणीं होय जेथें ॥ ८७ ॥ तें दृश्यदर्शनयोगेंकरून । तेणें एकांतज्ञानें संपूर्ण । परम सुख उद्भवे जाण । मनोनाशन जेणें होये ॥ ८८ ॥ जेथ मनाचा नाश होये । तेंचि तें परमानंदसुख पाहें । तेंचि आत्मस्वरूप निश्चयें । जें सुख होताहे दृश्यभेटी ॥ ८९ ॥ तरी दृश्य आणि दर्शनव्यक्ति । सांडूनि घेइजे सुखसंपत्ति । केवळ आत्मसुख तें गा सुमती । जाण निश्चिति आन नाहीं ॥ २९० ॥ अगा अखंडज्ञानेंकरून । जऱ्ही जालें मनोनाशन । तऱ्ही तेंचि परमपद निर्वाण । ब्रह्म पूर्ण तेंचि रामा ॥ ९१ ॥ ऐसेंचि सर्वत्र गा जगजेठी । सकळ दृश्यदर्शनाचिये भेटी । तेंचि पाहातां स्थिरावलेनि दृष्टी । होये भेटी स्वरूपेंसी ॥ ९२ ॥ जें विषयदर्शनें सुख उपजे । तेंचि विषयत्यागें जरी निर्वाह कीजे । तरी तेंचि आत्मसुख जाणिजे । नाहीं दुजें तयाविण ॥९३॥ सर्वत्रसुखनामें जें जें बोलती । तें तें आत्मसुख जाण विश्वमूर्ती । परी तें अल्प जालें विषयसंगती । विषयिक ह्मणती आत्मसुख तें ॥९४॥ जैसें एकचि महदाकाश । सर्व जगा देतसे अवकाश । तेणें व्यवहार करिती सावकाश । सुखसंतोष पावती ॥९५॥ तेंचि आकाश संबंधेंकरून । घटाकाश मठाकाश भिन्नभिन्न । जालिया तेंचि परिच्छिन्न । सुख संपूर्ण जना नेदी ॥९६॥ घटाकाशीं काय व्यवहार होईल । किंवा तयामाजी लोक [illegible]तील । तेथें कोण सुख पावतील । आहरणजळावांचूनियां[1] ॥९७॥ घटीं जलादिकांचें आहरण । मठीं गृहकर्मादिवर्त्तन[2] । तेथें तितुकेंचि सुख प्राप्त जाण । नाहीं संपूर्ण पूर्णऐसें ॥ ९८ ॥ ऐसेंचि आत्मसुखही येक । तें विषयसंगें जालें अनेक । त्या विषयांसारिखें होय सुख । परी असंख्य संपूर्ण नव्हे ॥९९॥ तरी तें आत्मसुख सर्वत्र जाण । तेंचि विषयसुख ह्मणती नेणोन । ज्ञानी तो तद्रूपें राहोन । सुखसंपन्न सुखत्वें ॥ ३०० ॥ यालागीं हेंचि सुख सर्वत्र पाहीं । दृश्यदर्शनें जें अनपायी[3] । तेंचि अनुभवीं अनुस्यूत[4] देहीं । तेणें पाहीं आत्मसुख ॥ १ ॥ आणीकही आत्मसुखाची खूण । सांगेन विश्वंभरा तुजलागून । ते आइकें येकाग्र करूनि मन । जेणें ब्रह्मज्ञान प्राप्त होये ॥ २ ॥

दृश्यदर्शनसंबंधे सुखसंविदनुत्तमा ॥ दृश्यसंवलितो बंधस्तन्मुक्त्या मुक्तिरुच्यते ॥ २ ॥

अगा दृश्यासि दर्शन संलग्न[5] । होतांचि सुखस्वरूपज्ञान । उद्भवे अतिगहन जाण । थोर जयाहून आन नाहीं ॥ ३ ॥ तेंचि तें सुखस्वरूपज्ञान । तेंचि तें परब्रह्म पूर्ण । दृश्य वेगळें निवडून । स्थिरावोनि घेइजे सुख ॥ ४ ॥ अहो दृश्याचें जें जाणणें । तें होय दर्शनसंबंधेंचि येणें । तेंचि स्थिरावलेनि अंतःकरणें । नाशीं नेदिजे घेइजे ऐसें ॥ ५ ॥ तेंचि जें दृश्याचें ज्ञान । जालें जेव्हां दृश्याविहीन । त्यासि जालिया स्थिरपण । ब्रह्म परिपूर्ण तेंचि तें कीं ॥ ६ ॥ तेंचि दृश्येंसि जालिया संवलित । तरी तोचि संसार बंध निश्चित । दृश्य दृश्यत्वें सत्य जरी जाणत । तरी तोचि भ्रांत बंधरूपें ॥ ७ ॥ अगा सर्वत्रही ब्रह्मचि असे । ब्रह्मावेगळें अणुमात्रही नसे । परी मध्यें दृश्यत्वें जें भासे । तें मिथ्या ऐसें जाण तूं ॥ ८ ॥ जितुकेंही ज्ञानमात्र जाण । तितुकेंही पूर्ण चैतन्य । दृश्य प्रातिभासिक[6] अध्यस्त हीन । भ्रमेंचि आन स्वप्न जैसें ॥९॥ तया दृश्यासि युक्त जालें जाण । ह्मणोनि तेंही पावलें दृश्यपण । त्याचेनि क्षणिकत्वें क्षणिकपण । पावलें जाण उपाधीयोगें ॥३१०॥ तेंचि दृश्यावेगळें करितां ज्ञान । जऱ्ही निर्वाहातें कीजे स्थिरावाने । तऱ्ही तेंचि ज्ञान चैतन्यघन । ब्रह्म परिपूर्ण पूर्णत्वें ॥११॥ तेथें आणीकही येक अनर्थ । जेव्हां तेंचि ज्ञान होये दृश्यसंवलित । तेव्हां तोचि बंध गा सुनिश्चित । दुःख देत संसारिक ॥ १२ ॥ तोचि दृश्याचा योग वेगळा होतां । तोचि शुद्ध गा रघुनाथा । तोचि तो जाण तत्वतां । परम पुरुषार्थी पावला ॥ १३ ॥ आणीकही तुज सांगेन खूण । जेणें पाविजे ब्रह्म पूर्ण । पावतांचि सुखसमाधान । सच्चिद्घन स्वयें प्राप्त ॥ १४ ॥

शुद्धं सदसतोर्मध्ये पदं लब्ध्वा चलं च तत् । सबाह्याभ्यंतरं विश्वं मा गृहाण विमुंच मा ॥ ३ ॥

दृश्यामाजी जे जे वस्तु संत । घटपटादि जे कीं पदार्थ । ते असंत ह्मणतांचि [illegible] । तेंचि निश्चित ब्रह्मज्ञान ॥ १५ ॥ यालागीं संत वस्तूचा पोटीं । [illegible] ब्रह्मचि उठी । याची विचारमात्रेंचि होय भेटि । पडे गांठि येकत्वें ॥१६॥ घटापटाची आहेपणें जे सत्ता । तेंचि ब्रह्म गा रमाकांता । घटपटत्व त्यजूनि केवळ सत्ता । घेइजे तत्वतां निरंतर ॥ १७ ॥ तैसे असंत जे कीं पदार्थ । ते खपुष्प

---

१ आणलेल्या पाण्याशिवाय. २ घरांतील अनेक प्रकारचीं कर्मे करणें. ३ अविनाशी. ४ सर्वत्र भरलेलें. ५ दृश्य (पहाण्याचा) पदार्थ व दर्शन (पहाणें) यांची गांठ पडल्याबरोबर. ६ स्वप्नांतील पदार्थांप्रमाणें भ्रमरूप. ७ आहे.

आणि वंध्यासुत । त्यांचेनि नाहींपणेंचि ब्रह्मसंत । प्राप्त सुनिश्चित निरंशत्वें ॥ १८ ॥ जें पदार्थजाताचें नाहींपण । तेंचि जाण निखिल चैतन्य । विश्वाच्या अभावें आनंदघन । ब्रह्म परिपूर्ण पूर्णत्वें ॥ १९ ॥ आणि नाहींपण जेथ स्फुरत । जेणें नाहींपण जाणिजेत । तेंचि ब्रह्म सदोदीत । जाण निश्चित आनंदरूपा ॥ ३२० ॥ आणि सताअसतांमाझारी । शुद्ध ज्ञान जें कीं रावणारी । अचळ अढळ सर्वांपरी । सबाह्य अंतरीं तेंचि येक ॥ २१ ॥ संत असंत ऐसें जाणिजे । असंत संत जेथें भासिजे । तेंचि तें ब्रह्म जाण सहजें । श्रीरघुराजें जाणावें पैं ॥ २२ ॥ अथवा सत्‌शब्दें द्रष्टा जाणिजे । असंत तें तंव दृश्य सहजें । या दोहींमाजी असोनि प्रकाशिजे । तेचि निर्व्याजें अचळ वस्तु ॥ २३ ॥ ब्रह्मावेगळें अचळ नाहीं । तेंचि तें सर्वत्र येक पाहीं । विचारें पाहातां लाभे सर्वत्रही । पद अनपायी तेंचि तें कीं ॥२४॥ दृश्य तें दृश्यत्वें सरे । दृश्याभावें द्रष्टाही वोसरे । मध्यें अचळपण जें वावरे । जाण निर्धारें तेंचि ब्रह्म ॥ २५ ॥ ऐसें स्वस्वरूप सभरोंभरी । पावल्या बाह्याभ्यंतरीं । विश्व हें मध्येंचि भासे लहरि । नको रावणारी घेवों त्यातें ॥ २६ ॥ अथवा भासे तें विश्व सांडावें । इयेही पडों नको हांवे । सांडीमांडी सोडोनि राहावें । स्वयें अनुभवावें स्वस्वरूपा ॥२७॥ यया विश्वाचें सांडणें मांडणें । सांडोनियां निवांत राहाणें । जें कीं सदसतामाजी पाहाणें । पद लाधणें तेंचि स्थिती ॥ २८ ॥ आणीकही येक खूण । सांगेन तुज अतिनिर्वाण । तेचि जाणोनि राहें लीन । समसमान पूर्णत्वें ॥ २९ ॥

जडाजडदृशोर्मध्ये यत्तत्वं पारमार्थिकम् । अनंताकाशहृदयं तत्समाश्रय सर्वदा ॥ ४ ॥

घटपटाचें जें वृत्तिज्ञान । जें जाणिजे घटपटादिभान । विश्वभास भासे आपण । तें ज्ञान जाण जडरूप ॥ ३३० ॥ ज्ञान तऱ्ही सर्वत्र येकचि असे । परी जड जालें दृश्यजडांशें । ह्मणोनि जड बोलिजेतसे । अजड तें ऐसें स्वरूपभूत ॥ ३१ ॥ येक इंद्रियांच्या वृत्ती । तें जड जाणा रघुपती । येक साक्षित्वें साक्षस्फूर्ति । इंद्रियवृत्ति नसोनियां ॥ ३२ ॥ इंद्रिय आणि इंद्रियवृत्ति । येही पदार्थ जें प्रकाशिजेती । यातें जाणिजे संवित्ति । तें जाण रघुपती अजडज्ञान ॥ ३३ ॥ जडज्ञान तें विषयस्फूर्ति । अजडज्ञान तें द्रष्टा सर्वार्थीं । द्रष्टादृश्यातें प्रकाशी जे संवित्ति । तें जाण रघुपती परमतत्व ॥ ३४ ॥ तेंचि कैसें पुससी रघुनाथा । तरी तें अनंत अपरिमित सर्वथा । नाहीं त्रिविध परिच्छेद ताता । तेंचि तत्वता अनंतवाच्य ॥ ३५ ॥ या दोहीं ज्ञानांचें लक्षण । सांगितलें तुज संपूर्ण । यांमाजी जें पारमार्थिक ज्ञान । तेंचि जाण परमतत्व ॥ ३६ ॥ ऐसें परिपूर्ण बाह्याभ्यंतरीं । परिच्छेद न पवे कोण्हेपरी । अवकाशालागूनि न उरे उरी । अतिनिर्धारीं निघोटरूपें ॥ ३७ ॥ जयामाजी दुर्ज्ञेय न शिरे । येकत्वें गणनेसि न पुरे । ऐसें सुखरूप जें उरे । जाण निर्धारें परब्रह्म तें ॥३८॥ तेंचि आश्रयूनि राहें सर्वदा । तद्रूप भोगीं परमानंदा । जाणूनियां सुखस्वादा । नाहीं मर्यादा जयासी ॥३९॥ तेथें नेणणें ना जाणणें । नाहीं भोगणें ना पाहाणें । नाहीं तेथें घेणें देणें । अनुभवणें परमानंदु ॥ ३४० ॥

द्रष्टृर्दृश्यस्य संबंधो बंध इत्याभिधीयते । द्रष्टा दृश्यबलाद्बद्धो दृश्याभावे विमुच्यते ॥ ५ ॥

हें नेणोनियां रघुपती । द्रष्टा दृश्यचि साच देखती । तोचि बंध जाण सर्वार्थी । विश्व देखती साचारपणें जे ॥ ४१ ॥ दृढ जालिया विश्वभावना । तोचि संसारबंध गा रघुनंदना । द्रष्टा जालिया दृश्य आधीना । पावे बंधना सांसारिका ॥ ४२ ॥ हे देहादिदृश्य सत्यत्वें स्फुरतां । द्रष्टेपण आपणा मानितां । तोचि भव तेचि बंधता । संसार पुरता आंगीं वाजे ॥ ४३ ॥ जंव जंव दृश्य हें साच स्फुरे । तंव तंव पडे संसारगुंफिरें । मग तें आकल्पांत न सरे । तेथेंचि मरे उपजे पुढती ॥ ४४ ॥ कोशकाराचियेपरी । सत्यत्वें तंतूचें घर करी । शेखीं गुंफे तेणेंचिकरीं । मरणावारी तेथेंचि पावे ॥ ४५ ॥ नातरी ऊर्णनाभिका जैसा । ऊर्णा वमूनि करी फांसा । तेणेंचि गुंफे स्वयें सरसा । मरणवळसां पडतसे ॥ ४६ ॥ तैसे देहादिदृश्यमनोविलास । मनकल्पीत हे सकळांश । ते यथार्थ कल्पितां पडे पाश । पावे सावकाश बंधनातें ॥ ४७ ॥ आपणाचि कल्पूनि दृश्य जाणा । तेणेंचि बंधन पावे जैसी ऊर्णा । तिये ऊर्णेचेपरी पावे बंधना । आपण आपणा बांधोनि घे ॥ ४८ ॥ तेंचि दृश्यमात्र न स्फुरतां । स्वयें खरी आपुली मुक्तता । तोचि मुक्त जाण गा रघुनाथा । दृश्य तत्वतां न स्फुरे जया ॥ ४९ ॥ वास्तव वस्तूचेनि ज्ञानें । प्रपंचु न देखिजे मनें । तरी तेचि स्वरूपस्थिति जाणणें । नाहीं करणें आन कांहीं ॥३५०॥

१ निष्कपटपणें, सरळपणें. २ इकडे तिकडे. ३ टाकणें आणि घेणें. ४ काल, देश आणि वस्तु असे तीन प्रकारचे. ५ आश्रय करून. ६ संसारांत गुरफटणें. ७ सुरवंट किंवा घुल्याप्रमाणें. ८ ज्याच्या पोटांतून सूत येतें तो, कोळी.

आणीकही ब्रह्माचें लक्षण । सहजस्थिति जे कीं परिपूर्ण । वोळखोनि बाणे जाण । तेंचि अनुसंधान परियेसीं ॥ ५१ ॥

द्वयोर्मध्यगतं नित्यमस्ति नास्तीति पक्षयोः । प्रकाशकं प्रकाश्यानामात्मानं शुद्धमाश्रय ॥ ६ ॥

जो जो दृश्यपदार्थ देखिजे । श्रवणीं जो जो आइकिजे । तेथें तेथें अस्तित्व साच घेइजे । वस्तु जाणिजे आहेपणें ॥ ५२ ॥ जे जे सत्तारूपें वस्तु पाहे । तेथें अस्तित्वें ब्रह्मचि आहे [१] जेथें ना ह्मणों जाये । तेथेंचि आहे सर्व भावें ॥ ५३ ॥ सर्वांचें जें अभावरूप । सर्व निरासें उरे निष्कंप ।[२] तेंचि तें ब्रह्मरूप । अतिअमूप उदारपणें ॥ ५४ ॥ अस्तिनास्तीति या पक्षद्वयीं । मध्य भासे जें अक्षयी ।[३] सत्य व्यापक जें सर्वही । जाण अनपायी तेंचि ब्रह्म ॥ ५५ ॥ जे जे प्रकाशमंत पदार्थ । अग्नि चंद्र आणि भास्वंत । विद्युल्लता मनादिसमस्त । यांतें प्रकाशित स्वप्रकाश जें ॥ ५६ ॥ सर्वां प्रकाशांचें प्रकाशन । तोचि आत्मा व्यापक परिपूर्ण । शुद्ध निर्मळ निरंजन । चैतन्यघन पूर्णानंद ॥ ५७ ॥ तेंचि आश्रयावें गा रघुपती । निरंतर राहावें तेचि स्थिती । सांडूनियां दृश्यप्रतीति । अधिष्ठानीं मति स्थिर करीं ॥ ५८ ॥ आणीकही लक्षण गा विश्वमूर्ती । सांगेन तुज त्रिदशाधिपती । तेणें होय ब्रह्मप्राप्ति । सहजस्थिति पावसील ॥ ५९ ॥

द्रष्टृदर्शनदृश्यानि त्यक्त्वा वासनया सह । दर्शनं प्रथमाभासमात्मानं केवलं भज ॥ ७ ।

हें द्रष्टा दृश्य आणि दर्शन । आणि दृश्याचिया वासना जाण । टाकूनि एकसमयापैं । पहाती खूण ते आइका ॥ ३६० ॥ दर्शन अहंकारु मनासंवलित । जो कां आपुला अहंकारु निश्चित । तोचि द्रष्टा जाण इत्थंभूत । चैतन्यमिश्रित जाण कां जें ॥ ६१ ॥ तेणें प्रकाशिली मनोवृत्ति । घेऊनि चक्षुरिंद्रियाची वृत्ति । जे असे दृश्य प्रकाशिती । दर्शन ह्मणती जयातें ॥ ६२ ॥ जेणें दर्शनें जें प्रकाशिजे । तयातें दृश्य ऐसें ह्मणिजे । या त्रयातें निःशेष विसरिजे । आणि टाकिजे वासनेतें ॥ ६३ ॥ सर्व वासनांसहित जाण । टाकिजे द्रष्टा दृश्य दर्शन । दर्शनापूर्वी जें भासन । तेंचि ज्ञान ब्रह्मरूप ॥ ६४ ॥ द्रष्टा दृश्याकार जंव नव्हे । दर्शन दृश्यातें जंव न पवे । तंव स्वप्रकाशें जें जें संभवे । तेंचि जाणावें परब्रह्म ॥ ६५ ॥ दृश्यद्रष्टादर्शनातें । ये त्रिपुटीपूर्वी प्रकाशी यांतें । प्रकाशमंत स्वतःसिद्धातें । जाण निरुतें परब्रह्म ॥ ६६ ॥ अगा द्रष्टादृश्यदर्शनादि । प्रकाशमंत स्वयें अनादि । तेंचि परब्रह्म जाण सुबुद्धी । जो कां निरवधि परमानंद ॥ ६७ ॥ दर्शना होय दृश्याची भेटि । तंव पहिलेंचि जें प्रकाश प्रगटी । तेंचि ब्रह्म गा नेटीपाटीं । जाण जगजेठी रमाकांता ॥ ६८ ॥ अगा याचि इंद्रियांच्या वृत्ति । दृश्यातें जंव झोंबती । तयापूर्वी जे प्रकाशस्थिति । जाण सुमती तेंचि चैतन्य ॥ ६९ ॥ हा नेत्र जंव रूपातें प्रकाशी । तंव आधींच जें रूप प्रकाशी तयाशी । प्रकाशमंत अनिर्देशी[४] । तें ब्रह्म ऐसी जाण खूण ॥ ३७० ॥ दर्शनें जों दृश्यासि झोंबे । तों त्रिपुटीपूर्वीच जें उभें । स्वप्रकाशें स्वयें शोभे । दृश्यप्रभे न मिळे जें कां ॥ ७१ ॥ द्रष्टा दृश्य आणि दर्शन । हें वासनासहित टाकून । ययापूर्वी जें कां भासन । तेचि चैतन्य जाणावें पां ॥ ७२ ॥ तोचि आत्मा व्यापक परिपूर्ण । द्वैतादिकभावविहीन[५] । केवळ नित्य निरंजन । आनंदघन उपासिजे ॥ ७३ ॥ तयाचें भजन तें ऐसें । आपणेंविण दुजें न भासे । तयाविण अणुमात्रही नसे । स्वयें समरस कर्पूराग्नि जैसा ॥ ७४ ॥ अग्निकर्पूराच्या मिळणीं । एकत्वें नुरतीच गा दोन्ही । ना न येतीच एकपणीं । लेशा निर्वाणीं नुरोनियां ॥ ७५ ॥ जैसा अवकाश अवकाशीं समरसे । तेथें नुरती नामरूपाचे ठसे । कां वीचि[६] जळीं उल्हासे । होय समरसें जळचि एक ॥ ७६ ॥ नातरी गंध आणि परिमळ । कीं प्रकाश आणि उजाळ । सुवर्ण कांतीसि होय मेळ । नुरे अढळ द्वैतांचें तेथें ॥ ७७ ॥ कां माणीक आणि कीळ । रत्न आणि झळाळ । तें येकत्वें नव्हती वेगळ । तैसें निर्मळ भजन जाण ॥ ७८ ॥ नातरी वाचा आणि अर्थ । अर्थत्वें वाचाचि येकत्व । कां वर्ण आणि गीत । स्वयें येकार्थ येक जैसें ॥ ७९ ॥ कां सोनें आणि कांकण । तें सोनपणाचें अभिन्न[७] । तैसें ब्रह्म नेणें आपणाविण । जाण भजन हेंचि मुख्य ॥ ३८० ॥ मुळीं भजन जें ऐसे । तयाचा अर्थ ऐसा असे । सूर्यासि सूर्य प्रकाशी जैसें । भजिजे तैसें तयापरी ॥ ८१ ॥ कां चांदणें भजे चंद्रासी । कां प्रकाशु भजे दीपासी । नातरी शर्करा गोडियेसी । अनन्य ऐसी भजनदशा ॥ ८२ ॥ तयापरी आत्मभजन । श्रीरघुनाथा जाण अभिन्न । उपचारें जें बोल

---

१ आहे आणि नाहीं या दोन वादांत २ सूर्य; तेजस्वी पदार्थ. ३ एकाच वेळीं सर्व बाजूंनीं. ४ दाखवितां येत नाहीं असा. ५ दुजेपणा वगैरे कल्पना जेथ नाहींत असा. ६ लाटा. ७ वेगळी नसणारी.

जे बोलिजे भजन । परी अनन्य पण येकत्वाचें ॥ ८३ ॥ सर्वदा जे कीं ब्रह्माकारता । प्रपंचु सत्य न भासे दृष्टी पाहातां । तेंचि भजन गा रघुनाथा । जाण तत्त्वतां सामरस्याचें ॥ ८४ ॥ सर्वदा ब्रह्मपणेंचि असणें । देहबुद्धीसि कदा न स्पर्शणें । तयातेंचि मी भजन ह्मणें । येर तें करणें साधनाभ्यास ॥ ८५ ॥ विषय स्यावयाची वासना । आणि टाकूनि द्रष्टा दृश्य दर्शना । एतत्पूर्वी ययाच्या भाना । घेंई चैतन्या शोधूनियां ॥ ८६ ॥ मग तया चैतन्याच्याच ठायीं । आपणासि अभेदें राहीं । तेंचि भजन सर्वदा पाहीं । जाण अनपायी ब्रम्हस्थिति हे ॥ ८७ ॥ आणीकही आइक आनंदमूर्त्ती । आत्मबोळखी सांगों गा तुजप्रति । जियेची असे सकळां अनुभूति । परी ते नेणती भ्रांतिभ्रमें ॥ ८८ ॥ सकळांसि तरी अनुभव असे । परी नेणती अज्ञानवशें । आणि उघडे तरी स्वप्रकाशें । तैसें न भासे नानासाधनीं ॥ ८९ ॥ ऐसें सुगम आणि सोपारें । पाविजे गुरुमुखें भक्तीचेनि द्वारें । कांहींच न लगती साधनांतरें । तें स्वयेंचि अवतरे आपणामाजी ॥ ३९० ॥ ऐसी येकी खूण जगन्नाथा । तुजलागीं सांगेन अपूर्वता । ते खूण जाणतांचि आत्मता । बाणे तत्वतां ब्रम्हानंदु ॥ ९१ ॥ तेचि आइकतां येकाग्र । मन हें करूनियां अव्यग्र । ऐकतांचि ब्रम्ह समग्र । पाविजे अपार सच्चिदानंदु ॥ ९२ ॥ तंव श्रीराम ह्मणती गुरुमूर्त्ती । येव्हडी ब्रम्हखुणेची स्थिति । यियेच्या श्रवणें पावलों विश्रांति । सुखसंपत्ति परमानंदु ॥ ९३ ॥ मा ते खूण प्रत्यक्ष पावलिया । कोण सुख श्रीरघुराया । हे तंव न कळे जी स्वामिया । तरी सांग तया उपायासी ॥ ९४ ॥ तंव वसिष्ठ ह्मणती गा जानकीपती । तया सांगेन आत्मखुणेची मति । तेचि जाणतां ब्रह्मस्थिति । होय त्रिजगतीं ब्रह्मरूप ॥ ९५ ॥ ते स्थिति पावतांचि क्षणीं । जे उघड ब्रह्मसुखाची खाणि । ते आतां येकाग्र आकर्णीं । समाधानीं आरूढ जेणें ॥ ९६ ॥

निद्रादौ जागरस्यांते यो भाव उपजायते । तं भावं भावयन्साक्षादक्षयानंदमश्नुते ॥ ८ ॥

तरी जागृतिअवस्थेचां अंतीं । जेव्हां प्रवेश करितसे सुषुप्ति । तेव्हां होय जे सुखप्राप्ति । ब्रह्ममूर्त्ती तेंचि ब्रह्म ॥ ९७ ॥ अहो जागृति जातां जातां । स्वयें सुषुप्ति प्रवेशूं लागतां । या दोहींचां संधीं निर्विकारता । तेंचि तत्वतां ब्रह्म जाण ॥ ९८ ॥ सर्व देहादिइंद्रियप्रपंचाच्या । लोपें संहारु जेथें सर्व वृत्तींचा । तोचि उठावो गा समाधीचा । निर्विकल्पाचा जाण तूं ॥ ९९ ॥ सर्व प्रपंचाच्या उपरमें । लय विक्षेप जेथें शमे । तेथ उरिजे केवळ ब्रह्म । साधन निमे जिये ठाईं ॥ ४०० ॥ ऐसें केवळ आनंदरूप । तेंचि परमात्मस्वरूप । सुखें सुख कोंदे अमूप । तेंचि स्वरूप परब्रह्म ॥ १ ॥ ऐसी हे वेदांतग्रंथींची उक्ति । अनुभवी ते अनुभवें जाणती । तैसीच जाण हे स्थिति । भिन्न गति असेचिना ॥ २ ॥ जरी जागृतीचां अंतीं । आदिप्रवेशु जो सुषुप्ती । तेव्हां इंद्रियवृत्ति उपरमती । इंद्रियें लय पावती बुद्धींद्रियवर्गें ॥ ३ ॥ पूर्ण लय तरी नाहीं जाला । तरी वृत्ती विषयव्यापार टाकिला । हेयउपादानाचा मेळा सर्वही गेला वृत्तीपासाव ॥ ४ ॥ जया इंद्रियाच्या ज्या वृत्ति । त्या इंद्रियांमाजी प्रवेशती । इंद्रियें मनामाजी लय पावती । संकल्पवृत्ति मन सांडी ॥ ५ ॥ जैसें अंशुमाळीच्या अस्तमानीं । किरणें प्रवेशती मंडळस्थानीं । मंडळ सामावलें तरणीं । उरे निर्वाणीं सविता येकु ॥ ६ ॥ कां पांगुळ स्वार नेटका । तो जाल्या अश्वारूढ जाळा निका । तेव्हां त्रिभुवन हिंडतां तया देखा । नाहीं लेखा गमनाचा ॥ ७ ॥ नातरी करचरणविहीन । सूर्यरथीं बैसतां अरुण । त्या क्षणीं हिंडतां त्रिभुवन । नाहीं लेखा गमनागमनाचा ॥ ८ ॥ नातरी पवन जालिया साह्यभूत । अग्नि करी त्रैलोक्य भस्मांत । तोचि वायु नसतां सामर्थ्यहत । भस्मीभूत स्वयेंचि होये ॥ ९ ॥ तैसें इंद्रिय सारथि मनासी । तेंचि अश्वरथस्थानीं तयासी । मन पंगु अंगिकारितां त्यासीं । त्रैलोक्यासि न पुरे मग ॥ ४१० ॥ तेंचि इंद्रिय साह्य नसतां । मनाची सहज होय स्थिरता । सांडी संकल्पाचिया लेता । बुद्धिरूपता पावलिया ॥ ११ ॥ साह्य असतां पंगूची थोरी । साह्य नसतां अकर्त्ता भिकारी । तैसें मग पंगु इंद्रिय साह्यकारी । अति व्यापारीं दक्ष होय ॥ १२ ॥ इंद्रियांविण होय निचेष्टित । सांडी व्यापारु विकल्प संकल्पान्त । ह्मणोनि इंद्रियें नेमावीं हें मत । बोले अच्युत अर्जुनेंसी ॥ १३ ॥

संमतिश्लोक ॥ तस्मात्त्वमिंद्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ । तस्मायस्य महाबाहो निगृहीतानि सर्वशः ।
इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता । यदा संहरते चायं कूर्मोऽगानीव सर्वशः ॥

ऐशा इत्यादि संमति त्या येथें स्याह्याव्या किती । इंद्रियनिरोधें कुंठित गाते । होय सर्वार्थी

---

१ एकादा पदार्थ दुसऱ्या पदार्थांत निमाला असतां तद्रूपता पावल्यामुळें जो नाहींसेपणा होतो तो. २ एकाद्या पदार्थाचें वास्तविक रूप मनांत न स्मरतां अवास्तविक रूपानें तो पदार्थ मनामध्यें भासूं लागणें तो.

मनाची पैं ॥ १४ ॥ येथें कोणी ऐसें करी भावन । श्रीरामावतार वर्त्ततां आण । कृष्ण पूर्वींही नसतां कोण । संमतिप्रमाण पूर्वांसि हें ॥ १५ ॥ रघुनाथाउपरि कृष्णावतार । याचें बोलणें भविष्योत्तर । तें येथ कैसें संमत्यंतर । हा न घडे विचार सर्वार्थी ॥ १६ ॥ तरी ययाचा विचारु ऐसा असे । पूर्वापर येथें कांहीं नसे । अवतार येकामागें येक होतसे । खंडणा न वसे कोण्हे काळीं ॥ १७ ॥ श्रीरामाचें जालें अवतरण । तत्पूर्वीं होय श्रीकृष्ण । जैसे वारामागें वार संपूर्ण । न कळे खूण आद्यंताची ॥ १८ ॥ शनिवाराउपरि रविवार वसे । तंव मागेंही येक गेलाचि असे । यालागीं गेले अनादि ऐसे² अवतार तैसे सर्वोत्तमाचे ॥ १९ ॥ धर्मसंस्थापनाकारणें । आदिपुरुषें अवतार धरणें । अवतारें विश्वाचें पाळणें । यालागीं न ह्मणें ऐसें कांहीं ॥ २० ॥ आणीकही येक विचार । सकळांहूनि वेद अनादितर । तोही भविष्य बोले संमत्यंतर । कथा सार जनकादिकांची ॥ २१ ॥ वरुणहरिश्चंद्रादिकसमस्त । भविष्यचरित्रें बोले वेद महंत । ह्मणोनि दूषण नाहीं किंचित् । भविष्यार्थ असे ऐसा ॥ २२ ॥ यालागीं इंद्रियनियमनें मनोव्यापार । राहिल्या उरे निर्विकार । हें सर्वही सिद्धांतांचें सार । नाहीं विचार आन कांहीं ॥ २३ ॥ ह्मणोनि सर्वेंद्रियांच्या वृत्ति । विषयव्यापार सर्व टाकिती । सर्वही मनाच्या ठाईं वस्ती पावती । स्थिरावती हृदयाकाशीं ॥ २४ ॥ इंद्रियांचे स्थिरावलेपणें । मनें सर्व व्यापार टाकणें । सुषुप्ति नसतां अनुभवणें । सुख भोगणें तुर्य जें कीं ॥ २५ ॥ निद्रेमाजी तरी सुख असे । परी तें नेणिजे अज्ञानांशें । दोहींच्या संधीं सावकाशें । सुख उल्हासे परमानंदु ॥ २६ ॥ तें तरी आत्मसुख निरवडी । परी गुरुमुखेंविण नेणती बापुडीं । तन्हीं तेचि अनुभवोनि गोडी । राहे परवडी स्थिरावली ॥ २७ ॥ निर्विकल्पदशेचें लक्षण । तें तुज सांगितलें गा संपूर्ण । आणि ये दशेचें फावे जरी चिन्ह । तरी सांग न्यून काय येथें ॥ २८ ॥ येथें सुखाची सुखसंपत्ति । सुखभरें कांहींच नेणती । येकें उठविल्या भोजनाप्रति । परी तुटती सुखभरें ॥ २९ ॥ तया सुखासि विक्षेप होतां । विक्षेपकर्त्याच्या करूं धांवे घाता । येव्हडी सुखाची सुखरूपता । तें सांग तत्वतां कोण सुख ॥ ४३० ॥ मैथुनादिविषयसुख । तें नावडे तयासि देख । तेथ इतर भोग अनेक । तेही सकळीक काय इच्छी ॥ ३१ ॥ तेथें लय ह्मणावा तरी नाहीं सुषुप्ति । विक्षेप तरी न भासे विश्वस्थिति । मी येक द्रष्टा भोक्ता हे प्रतीति । न स्फुरती त्या सुखाविण ॥ ३२ ॥ आपणेंसि सुखरूप जाला । तेणें भोक्ताभोग्यभोगाला । विश्वस्वप्न निःशेष मावळला । नेणे मेळा इंद्रियांचा ॥ ३३ ॥ सर्वा वृत्तींच्या उपसंहारें । केवळ निरुपाधिक जें सुख उरे । तेंचि आत्मसुख जाण निर्धारें । जेथें तुरे अवस्थात्रय³ ॥ ३४ ॥ तैसें जागृतीचेनि उपरमें । सर्व विक्षेप मात्र विरमे । निद्रा होतां लयही शमे । मध्यें निःसीम उरे तें ब्रह्म ॥ ३५ ॥ लय विक्षेप निःशेष नाहीं । सुखानुभव तो जागता पाहीं । तोही ब्रह्मस्थिति अनपायी । हें अनुभवें ठाईं⁴ ठेविलें असे ॥ ३६ ॥ ह्मणोनि जागृतीच्या अंतीं । आरंभु होतांचि सुषुप्ती । जो भाव उपजे गा रघुपती । तेचि स्थिति परमानंदु ॥ ३७ ॥ तो लय विक्षेपाचेनि अभावें । सहजचि ब्रह्मस्थिति स्वयें पावे । तो सुखभाव तेंचि वस्तु जाणावें । तेथें नेणवे दुजें कांहीं ॥ ३८ ॥ तो भाव भावितांचि साक्षात । तोचि अनुभवितां सदोदीत । अक्षयानंद अपरिमित । भोगी संतत ब्रह्मानंदु ॥ ३९ ॥ जया सुखासि कालत्रयीं । अणुमात्र सर्वथा नाश नाहीं । तोचि तो अक्षयानंद पाहीं । भोगीं अनपायी श्रीवल्लभा⁵ ॥ ४४० ॥ अथवा सुषुप्तीच्या अंतीं । जेव्हां आवर्त्ततां कां जागृति । तेव्हां होतसे सुखप्राप्ति । जाण रघुपती तेंचि चैतन्य ॥ ४१ ॥ सुषुप्तीसि लय पूर्ण असे । नेणोनि परी सुखानुभव वसे । तोचि सुषुप्ति सरतां मध्यदशे । जागृति नसे पूर्ण जेथें ॥ ४२ ॥ लयापासूनि जरी उठिला । विक्षेपावरी तरी नाहीं आला । मध्येंचि स्थितीनें राहिला । तोचि भला परमानंदु ॥ ४३ ॥ तेथूनचि माघारेंही नवजावें⁶ । सुषुप्ति वरँपडें न व्हावें । पुढें जागृतीवरी न यावें । विक्षेप पावे जेणेंकरुनी ॥ ४४ ॥ यालागीं मध्यस्थितीच्या पोटीं । देऊनि धैर्येंसि मिठी । तेथें राहावें गा नेटिपाटीं । सुखकोटि सुखानुभवें ॥ ४५ ॥ जागृति सुषुप्तीचां संधीं । जें सुख उपजे गा निरवाधि । तेंचि साक्षात् केलिया सुबुद्धी । आनंदाब्धि प्राप्त स्वयें ॥ ४६ ॥ साक्षात् ह्मणिजे तें ऐसें । हें सुख सर्वांसि तन्हीं होतसे । परी नेणती अज्ञानवशें । परोक्ष ऐसें जालें तयां ॥ ४७ ॥ प्रत्यक्ष असोनि हें नेणिजे । तेंचि परोक्ष ऐसें जाणिजे । ह्मणोनि परोक्ष सर्वांसि सहजें । जाण निव्याजें तेचि खूण ॥ ४८ ॥ जैसा कंठींचा मणि । न जाणे ना देखे नयनीं । तेंचि परोक्ष ज्ञाण कोदंडपाणी । सर्व जनीं

पुढें होणारें पूर्वी सांगितलेलें. २ अतिशय अनादि (आदि नाहींसें). ३ जागृति, स्वप्न व सुषुप्ति या तीन अवस्था. ४ ठाईं ठेविणें = आणणें. ५ हे लक्ष्मीकांता रामा! ६ जाऊं नये. ७ गुंतलेला. ८ धैर्यानें निश्चय करून.

अनुभविजे ॥ ४९ ॥ आपण आपणा जवळि असतां । नवांचि गणना स्वयें कारितां । दहावा न गणी स्वयें असतां । तेंचि परोक्षता जाण विष्णो ॥ ४५० ॥ तैसाचि आत्मा सर्वांसि प्रत्यक्ष असे । अणुमात्रही व्यवधान नसे । तो आपणचि असोनि नेणती पिसे । परोक्ष ऐसें याचें नाम ॥ ५१ ॥ तैसेंचि जागृतीच्या अंतीं । आणि सुषुप्तीच्या आदि जे सुखप्राप्ति । ते साक्षात असोनि अपरोक्षगति नेणोनि करिती जगभ्रम ॥ ५२ ॥ तेंचि सुख आत्मत्वें जाणुनी । तैसेंचि राहिजे वोळखोनी । ते सुखरूपींचि राहिजे बुडोनी । साक्षात् जनीं त्यातें ह्मणिजे ॥ ५३ ॥ याचें साक्षात् करणें । अथवा ऐसें व्याख्यान जाणणें । सुषुप्तिजागराचा संधी पावणें । तो भाव करणें अनुभवारूढ ॥५४॥ 'तं भावं भावयन्' ऐसें । मूळीं ग्रंथार्थीं बोलिलें असे । तया सुखाकार होणें सर्वांशें । साक्षात् ऐसें तया नांव ॥ ५५ ॥ जो आपुलाचि स्वरूपानंदु । पावला होता परोक्षवादु । तोचि तदाकारें अक्षयानंदु । स्वतःसिद्ध साक्षात् तो ॥ ५६ ॥ तो भाव भावितांचि क्षणीं । साक्षात् अक्षयानंदाची धणी । भोगी भोक्तेपणेंविण निर्वाणी । जनीं वनीं तद्रूपेंचि ॥ ५७ ॥ ऐसें स्वस्वरूपचि जाणणें । सांगितले प्रकारें येणें । तद्रूपें राहातां जे स्थिति बाणे । तेही लक्षणें सांगों आतां ॥ ५८ ॥ आठे श्लोकीं स्वरूपवोळखी । सांगितली तुजप्रति निकी । तद्रूपें राहाणें स्थिति ऐकी । सांगों अलौकिकी जे दुर्लभा ॥ ५९ ॥ तेही श्लोकद्वयेंकरूनि आतां । स्थिति सांगों गा रघुनाथा । श्रवणमात्रेंचि स्थिरता चित्ता । वरी तत्वतां अनायासें ॥ ४६० ॥

प्रशांतसर्वसंकल्पा या शिलावदवस्थितिः । जाग्रन्निद्राविनिर्मुक्ता सा स्वरूपस्थितिः परा ॥ ९ ॥
जडतां वर्जयित्वैकां शिलाया हृदयं हि तत् । अमनस्कं महाबाहो मन्मयो भव सर्वदा ॥ १० ॥

सर्व संकल्पांची जे शांति । देहादिइंद्रियें आणि मति । अहंकारमुख्यअंतरगति । ते न भासती जिये ठाईं ॥ ६१ ॥ आणि बाह्यही नानापदार्थ । घटपटादिकरूनि समस्त । विश्वपरंपरा स्वर्ग मृत्य । आणि समस्त व्यक्तिमात्र ॥ ६२ ॥ इत्यादि न स्फुरे मनासी । तेचि संकल्पशांति अतिशयेंसी । निघोट अछिद्र शिळा जैसी[१] । चेष्टा तैसी गेली त्याची ॥ ६३ ॥ निचेष्ट अनीह जयापरी । पर्वत राहे जैसा अंतरीं । संकल्पशून्यता शिळेचियेपरी । बाह्याभ्यंतरीं अतिशुद्ध ॥ ६४ ॥ एक घेणें एक न घेणें । अथवा पदार्थाकारत्वें स्फुरणें । हें निःशेष नाहीं तें जाणणें । निर्विकल्प ह्मणणें या नांव ॥ ६५ ॥ पदार्थ यथार्थपणें स्फुरे । तेथेंचि सांडी मांडी उरे । तोचि संकल्प जाण निर्धारें । इत्यादिक न स्फुरे तोचि निर्विकल्प ॥ ६६ ॥ ऐसिया संकल्पच्या लहरी । माळवती अनेका हारी । मागुतां नुपजती क्षणांतरीं । जाण सर्वांपरी निर्विकल्प ॥ ६७ ॥ ऐशी संकल्पाची प्रशांति । राहे शिळेचियापरी अवस्थिती । एकें ब्रह्मेंविण नाहीं स्फूर्ति । जेथ लय पावती जागरनिद्रा ॥ ६८ ॥ सर्वही इंद्रियांच्या वृत्ति । स्थूळ पदार्थ बाह्य घेती । ययाचें नाम जाण जागृति । विक्षेप ह्मणती ययातेंचि ॥६९॥ हा विक्षेप जेथ निःशेष सरे । आणि लय सुषुप्ति जेथ नुरे । कषायदोष[३] नव्हती निर्धारें । तेंचि स्थान खरें ब्रह्मस्थितीचें ॥ ४७० ॥ इंद्रियांच्या वृत्ती करून । न करिजे स्थूळसूक्ष्मपदार्थग्रहण । सर्वांचा लय होय संपूर्ण । सुषुप्ति जाण तिये नांव ॥ ७१ ॥ इंद्रियांचा लयही असतां । केवळ मनासिच पदार्थाकरितां । वासनारूपें भासे यथार्थता । तें स्वप्न रघुनाथा याचें नाम ॥ ७२ ॥ तरी निद्रा ना स्वप्न जागृति । सर्व संकल्पाची होय शांति । तेचि ते शिळेचियेपरी अवस्थिति । तेचि स्वरूपस्थिति पराकाष्ठा ॥ ७३ ॥ सर्वांही स्थितीहूनि श्रेष्ठ । ते हे स्वरूपस्थिति वरिष्ठ । इये स्थितीहूनि नाहीं विशिष्ट । हेंचि स्पष्ट श्रेष्ठपणें ॥ ७४ ॥ तरी ब्रह्म हें एवंभूत असे । तें मागां निरूपिलें सावकाशें । तथापी संमतिविशेषें । जाण सर्वांशें सांगेन ॥ ७५ ॥

संमतिश्लोक ॥ सर्वसंकल्पसंशांतं प्रशांतघनवासनम् । न किंचिद्भावनाकारं तद्ब्रह्म परमं विदुः ॥

संशांत ह्मणिजे निःशेष जाण । सर्व संकल्पांचें भस्म पूर्ण । निबिड वासनेचें संहरण । नव्हे भावन विपरीताचें ॥ ७६ ॥ विषयपदार्थांचें होय उपादान । करणें तोचि संकल्प जाण । संस्कारें होय पदार्थस्फुरण । वासना पूर्ण तिये नाम ॥ ७७ ॥ एक वेळे स्वयें घट देखिला । तो मागुता घटाकार स्फुरला । वासना ह्मणिजे ययाला । याचा मेळा तें घनपण ॥ ७८ ॥ दिवाव्यापारें निद्रा करी । सुषुप्ति तेथें उठे तदाकारीं । पूर्वदिवशींचें स्फुरे अंतरीं । व्यवहार व्यवहारीं तैसा भासे ॥ ७९ ॥ जैसें पूर्व-

१ निद्रेंतून जागें होतांना मध्येंच निद्राही नव्हे, आणि धड जागेपणाही नव्हे, त्या दोहोंहून वेगळी अशी जी स्थिति तीं. २ 'तीं स्थिति जाणली असतां.' ३ लय, विक्षेप, कषाय आणि रसास्वाद अशीं निर्विकल्प समाधीचीं चार प्रकारचीं विघ्नें.

दिवशीं देखिले । तें ज्ञान सुषुप्तीं निमालें । परी संस्कारें मनीं राहिलें. । तेंचि उद्भवलें अपरदिवशीं ॥ ४८० ॥ तैसें ज्ञान क्षणिक । पदार्थ स्फुरती क्षण एक । तें ज्ञान नाशोनि आणीक । पदार्थ अनेक स्फुरताती ॥ ८१ ॥ तऱ्ही तें ज्ञान नाशलें असतां । तद्रूपेंचि पदार्थ स्फुरे मागुता । तयाचा संस्कार मनीं होता । ह्मणोनि तत्वतां स्फुरे तैसाचि ॥ ८२ ॥ ययाचें नाम जाण वासना । यासि मर्यादा नाहीं रघुनंदना । ह्मणोनियां घनपणाचि अभिधाना । आलें जाणा निबिडपणें ॥ ८३ ॥ ह्मणोनि निबिड यया वासना । निःशेष जेथें जालिया लीना । आणि सर्व संकल्पविहीन रघुनंदना । क्षीणपणा प्रवर्ती जेथें ॥ ८४ ॥ मागुती संस्कारें करुनी । विपरीतभावना नुपजे जे क्षणीं । तेंचि परब्रह्म जाण निर्वाणीं । खूण मनीं दृढ धरीं ॥८५ ॥ येथें राहाणें जें ये वृत्ती । तेचि दृढ जाण ब्रह्मस्थिति । ते शिळेपरी निघोटगति । अचळस्थिति अंतर्बाह्य ॥ ८६ ॥ अथवा दुसरें ऐसें व्याख्यान । संकल्प तो एवंविध जाण । स्वस्वरूपापासाव प्रथम स्फुरण । अहंपणें पूर्ण ऐसा जो उठी ॥ ८७ ॥ अहं जीव देही ब्राह्मण । गृहस्थ वानप्रस्थ संन्यासी जाण । अहं काणा बधिर मुकेपण । पंगवादि पूर्ण जेथें भासे ॥ ८८ ॥ हे ऐसे जे संकल्प उठती । ते शांत जिये ठाईं राहाती । आणि विश्वभावनेची न स्फुरे स्फूर्ति । तेचि स्थिति निर्वाण पैं ॥ ८९ ॥ भावनेचें रूप तें ऐसें । शुद्ध ब्रह्माचा ठाईं विश्व भासे । तेंचि यथार्थ मानी ऐसें । भावना सर्वांशें हेचि जाण ॥४९०॥ शुद्ध एकचि ब्रह्म असतां । विश्वाकारें भावी तेचि तत्वतां । ते भावना उपजों नेदीं चित्ता । तेचि तत्वतां ब्रह्मस्थिति ॥ ९१ ॥ शुद्धस्वरूपापासुनि । संकल्प उठती जीवोहं ह्मणोनि । तेथें ते विपरीतभावना तत्क्षणीं । घटपटपणीं उठताती ॥ ९२ ॥ येकाचि ब्रह्माचां ठाईं । हे स्त्री हा पुरुष पाहीं । अश्व गज रथ महिषी सर्वेही । व्यक्तिमात्र ही ते भावी ॥९३॥ हे विपरीतभावना जालियावरी । ते उपादेयपणें ग्राह्यबुद्धि करी । त्याचि वासना सहस्रांतरीं । ब्रह्मांडभरी उठताती ॥ ९४ ॥ त्या एकएकाच्याकारणें । परंपरांसि होय उठणें । संकल्प होताती विश्वपणें । स्वयें उठणें भावनेतें ॥ ९५ ॥ ते भावना दृढतर जालिया । उठती वासनेच्या चळिया । तेणेंचि प्रपंचु रघुराया । जाणा यालागीं सर्वत्र ॥ ९६ ॥ संकल्प भावना वासना । जेथें निःशेष होती लीना । तेंचि ब्रह्म जाण रघुनंदना । आन विचारणा येथें नाहीं ॥ ९७ ॥ ऐसिया ब्रह्माचा ठाईं । तद्रूपेंचि राहाणे अनपायी । तरीच ब्रह्मस्थिति बाणे सर्वही । निघोट पाहीं शिळा जैसी ॥ ९८ ॥ ह्मणोनि ब्रह्मस्थिति । ऐसी । सर्व संकल्प जाती क्षयासी । जागृति निद्रा स्वप्नेंसीं । निश्चयेंसि मावळे जेथें ॥९९॥ इयेचें नाम निर्विकल्पसमाधि । स्थितीमाजी स्थिति निरवधि । हे साधितां विघ्न तिये संधी । अति बाधी साधकासी ॥५००॥ ते चतुर्विधविघ्नप्रकार । वेदांतीं बोलिले सविस्तर । सांगेन ऐसें सादर । दोष हे थोर कळावयां ॥१॥ जयासि दोष कळेना जो मोठा । तऱ्ही तो न वचे दोषाचिया वाटा । यालागीं सांगणें लागे सुरश्रेष्ठा । ऐक उत्कटा दोषाची ॥२॥ जयासि मार्ग अमार्ग ऐसें सुझे । उत्तम मध्यम ऐसें बुझे । तो अमार्गीं न प्रवर्ते सहजें । अधिष्ठी निर्व्याजें सुमार्गाचि ॥ ३ ॥ अन्न विष येकत्र केलिया । नेणता तो सेवी न कळोनियां । कळे तो पात्रावरूनियां । उठोनियां पळेचि कीं ॥ ४ ॥ सर्प आणि हार दोन्ही । नेणता सर्पाचि घे नेणोनी । जाणता अनर्थीं न प्रवर्ते कोण्ही । न देखिजे नयनीं सर्वत्र ॥ ५ ॥ ह्मणोनि दोष अदोष कळावया । हें सांगणें घडे गा श्रीरघुराया । अदोष ते व्यतिरिक्त यया । जाणलिया कळतील ॥ ६ ॥ तेंचि वेदांत वाक्य आतां । तुज सांगेन गा जानकीकांता । जें ऐकें येकाग्र करूनियां चित्ता । निर्विकल्पता पावसी जेणें ॥ ७ ॥

संमतिवेदान्तसार ॥ अस्य निर्विकल्पस्य लयविक्षेपकषायरसस्वादलक्षणाश्चत्वारो विघ्नाः संभवंति ॥

इये निर्विकल्पसमाधीसी । येथ चारि विघ्नें परियेसीं । लय विक्षेप कषाय रसस्वादनेंसीं । लक्षणें यांसि बोलिजती ॥ ८ ॥ त्यांमाजी प्रथम लयाचें लक्षण । लय ह्मणिजे सुषुप्ति जाण । तें सांगेन तुजलागून । सावधान परियेसीं ॥ ९ ॥

संमतिवेदान्तसार ॥ तत्र लयस्तावदखंडवस्त्वनवलंबनेन चित्तवृत्तेर्निद्रा ॥

आतां निद्रा ऐसी जाण रघुपती । पूर्ण ब्रह्मीं लावितां चित्तवृत्ती । धारणेनें विकल्प टाकविती । मग विश्वस्थिति न स्फुरे ॥ ५१० ॥ बाह्य प्रपंचानुसंधान गेलें । वस्तूचें अवलंबन तुटलें । मग चित्तवृत्तीसि उबडलें । लीन जालें अज्ञानीं ॥ ११ ॥ अज्ञानीं बुडाल्या चित्तवृत्ति । तेचि जाण गा मूढ

१ दुसऱ्या दिवशीं. २ पांगळेपणा वगैरे. ३ मी जीव असें ह्मणून. ४ परस्परांस. ५ चारप्रकारचीं विघ्नें. ६ भयंकरपणा. ७ 'जाणावा खावया' असा निरर्थक पाठ. ८ प्रपंचाकडील लक्ष.

सुषुप्ति । हे समाधीच्या विघ्नांप्रती । मूळ हें सुमती महाथोर ॥ १२ ॥ येणेंचि विघ्नें किती नाडले। ध्यानमिषें सुषुप्ति पावले । तेहीं लौकिकदंभ संपादिले । नाहीं झेपावलें परमतत्व ॥ १३ ॥ स्वस्थ बैसतांचि ते क्षणीं । निद्रा बांधी तयांलागुनी । ते बुडोनि जाती अज्ञानीं । सुख स्वप्नीं न देखती ॥ १४ ॥ धावतां आत्मस्थितीचा गावो । टाकिला दुर्धर मार्ग विपरीत भावो । निद्रा घाला घाली पाहा हो । आन ठावो जोडोनि दिधला ॥ १५ ॥ शमदमादिमार्ग क्रमूनि आला । क्रोधादिव्याघ्रसंग चुकविला । आखरीं निद्राभैंदा सांपडला । घाला घातला महामारकु ॥ १६ ॥ प्रवेशतां ब्रह्मराज्य सिंहासनीं । प्रवेश करितां समाधिद्वारस्थानीं । निद्राभैंदें गांठिये धरुनी । बोलों नेदूनि आकळिला ॥१७॥ येऊनि अज्ञानअरण्यांतु । वस्त्वनवलंबन मूळ वनहेतु । मोहफांसा गळा घालितु । निःशेष मारितु स्मृति घेउनी ॥ १८ ॥ हें ना तें ऐसें यया केलें । स्वग्राम ना पर ऐसें जालें । सिद्ध विषयसुखही नेलें । नेण आलें सकलार्थीं ॥ १९ ॥ असो हें किती बोलावें । स्वसुख ना विषयसुख तयां न पवे । दोन्ही नेणोनियां राहावें । तयातें जाणावें लय ऐसें ॥ ५२० ॥ अगा अल्पाभ्यासेंकरून । आणि तमोगुणाचें निबिडपण । तेणेंचि लय होय संपूर्ण । जाण खूण रघुपुंगवा ॥ २१ ॥ आतां विक्षेप तोही सांगेन । तो आइकें येकाग्र करूनियां मन । विक्षेप तो महा दारुण घातक पूर्ण स्वरूपच्युती ॥ २२ ॥

संमति वेदान्तसार ॥ अखंडवस्त्वनवलंबनेन चित्तवृत्तेरन्यावलंबनं विक्षेपः ॥

बैसतां अखंडैकब्रह्माकारें । चित्ताचें वृत्तिरूपज्ञान अवतरे । तें वस्तु सांडोनि धांवे बाहिरें । प्रपंचाकारें जें वर्त्ततां ॥ २३ ॥ सांडोनि आत्मामृतसुखाची गोडी । चित्तवृत्ति धांवे बाहिर सवडी । खेटीं विषयसुखाचिया बरडी । पाडी दरडी धारणेच्या ॥ २४ ॥ वांताशीच करी चर्वण । जैसें निसुगं पडकलें श्वान । दुःख पावे जऱ्ही ताडण । तऱ्ही उपशमन नव्हेचि तया ॥२५॥ विषय ते दुःखरूपीच असती । अनुभव बाणे जऱ्ही चित्तीं । तऱ्ही तो न सांडी सीतापती । श्वानस्थिति आपुली ॥ २६ ॥ असो याचें नाम विक्षेप बोलिजे । ब्रह्मसुखत्यागें प्रपंचु अवलंबिजे । हा महाथोर दोष जाणिजे । संसारबीज हेंचि जाण ॥२७॥ अवैराग्यें करून । विक्षेप होय महादारुण । वैराग्य असतां नव्हे जाण । हेंचि खूण येथिंची पैं ॥ २८ ॥ आतां कषाय तो जाण ऐसा । भ्रमें लोक ह्मणती समाधि जैसा । समाधीच्या साम्या पडत ठसा । साधक पिसा गर्वें होये ॥ २९ ॥ त्या कषायासिच समाधि ह्मणती । ऐसे साधक ठकले नेणो किती । सांगों तयाची स्थिति । परिसें भूपती ब्रह्मांडाचिया ॥५३०॥

संमति वेदान्तसार ॥ लयविक्षेपाभावेऽपि चित्तवृत्ते रागादि वासनया स्तब्धीभावादखंडवस्त्वनवलंबनं कषायः ॥

स्वस्वरूपाकार करितां चित्तवृत्ति । साधक साधनपणें राहाती । परी विषयांचे ठायीं अतिप्रीति । राहे चित्तवृत्ति संस्काररूपें ॥ ३१ ॥ त्या विषयरागेंकरून । चित्तवृत्ति राहे स्तब्धोन । लयविक्षेप ना स्वरूपावस्थान । मध्येंचि जाण तटस्थता ॥ ३२ ॥ स्वरूपसुख ना विक्षेप करी । ना निद्राही नये तेव्हां पुरी । हें त्रयही सांडूनि राहे अंतरीं । स्मृति ते पुरी बुडाली ॥ ३३ ॥ वैराग्यबळें विक्षेप गेला । अभ्यासबळें लयही बुडाला । परी सूक्ष्म विषयराग मनीं स्थिरावला । तेणें तुटला आत्मानुभव ॥ ३४ ॥ ऐसे मध्येंचि जें ताटस्थ्य । निचेष्टपणें कांहीं नेणत । सूक्ष्मपणें विषयराग वर्त्तत । जाण निश्चित कषाय हा ॥ ३५ ॥ हें प्रज्ञामांद्यंकरून । स्वस्वरूप न प्रकाशे जाण । अंतरीं विषयासक्ती दारुण । कषाय पूर्ण महाथोर ॥ ३६ ॥ आतां रसस्वाद किलक्षण । तेंही सांगों तुजलागून । हाही दोष महादारुण । निर्विकल्प पूर्ण हों नेदी ॥ ३७ ॥

संमति वेदान्तसार ॥ अखंडवस्त्वनवलंबनेन चित्तवृत्तेः सविकल्पकानंदास्वादो रसस्वादः ॥

स्वस्वरूपाकार करितां चित्तवृत्ति । अखंड वस्तूचें अवलंबन करिती । सेविलया आनंदातें भोगिती । तयातें ह्मणती रसस्वादन ॥ ३८ ॥ आतां अखंड वस्तु तें कैसें । आणि सखंड तें कैसें असे । सविकल्प कोणासि ह्मणतसे । तेंही सावकाशें सांगेन ॥ ३९ ॥ तरी येथ ज्ञेय ज्ञान आणि ज्ञाता । हे त्रिपुटी जेथ न स्मरे गा रमाकांता । आपणासहित येकात्मता । भेदु तत्वतां न स्फुरे जेथें ॥ ५४० ॥ आनंदाचेंचि घेणें देणें । आनंद आनंदेंचि भोगणें । भोक्ता भोग्य नुरे भोगणेंपणें । तें वस्तु जाणणें अखंडत्व ॥ ४१ ॥ एवं अखंड वस्तूचे ठाईं । चित्तवृत्तीसि अवलंबन नाहीं । स्फुरे ज्ञेयत्वें ब्रह्म पाहीं । सखंड येहीं लक्षणीं होये ॥ ४२ ॥ सर्वत्र एक ब्रह्मावांचुनी । दुजें अणुमात्र नसतां जनीं वनीं । तेथ

---

१ मिळालें. २ 'बाधित' असा पाठ. ३ शमदम वगैरेंचें साधन हा मार्ग. ४ षड्रिपु हे व्याघ्रादिक. ५ निद्रारूपी लुटारूनें. ६ वस्तु न सांपडणें. ७ ओकलेल्या अन्नाचें. ८ आळशी. ९ संबकलेलें.

ज्ञाता ज्ञेय ज्ञान तिन्ही । विभागूनि देखतसे ॥४३॥ एकेचि अखंड वस्तूसी । त्रिखंड केलें गा परियेसीं । आपण ज्ञाता तें ज्ञेय ऐसी । प्रतीति मानसीं वर्त्ते जे कीं ॥ ४४ ॥ ह्मणोनि अखंडासिच सखंड केलें । अखंडाचें अनुसंधान तुटलें । ज्ञातेपणें सुख अनुभविलें । जाण संचलें रसस्वादन ॥ ४५ ॥ आणि अखंड वस्तूचा ठाईं । संकल्पमात्राचा उद्भव नाहीं । ह्मणोनि ते दशा निर्विकल्प पाहीं । येर ते तेही सविकल्प ॥ ४६ ॥ जेथें ज्ञाता ज्ञेय ज्ञान स्फुरे । तो सूक्ष्म संकल्प जाण निर्धारें । हे त्रिपुटी जेथ निःशेष विरे । निर्विकल्प धुरे तोचि जाण ॥४७॥ ध्येयाचेनि अभिव्यक्तपणें । ध्यात्यासि हर्षनिर्भर होणें । तोचि रसस्वाद मी ह्मणें । जाण ये खुणे विबुद्धपती ॥ ४८ ॥ अथवा समाधीचिये प्रारंभीं । चित्तवृत्ति सुखातें अवलंबी । तेंचि सुखस्वानंदचित्तनभीं । तें पद्मनाभी रसस्वादन ॥ ४९ ॥ हा निर्विकल्पासि दोष थोर । परी दोषत्रयापेसा नव्हे अनर्थाकार । हा आत्मसुखासि नव्हे व्यभिचार । कोमळप्रकार ह्मणोनि न्यून ॥ ५५० ॥ इतरा ज्या तिन्ही स्थिति । त्या अनर्थाकार फल्गुप्राय[१] असती । त्या निरर्थक जाण सर्वार्थीं । फळप्राप्ति कांहींच नाहीं ॥ ५१ ॥ यालागीं दोषचतुष्टयाविरहित । जे निर्विकल्पसमाधि निश्चित । तेचि आत्मस्थिति गा निभ्रांत । यथातथ्य जाण हरी ॥५२॥ बाहुल्य नेणूनि इये स्थितीसी । दोषचतुष्टयांत विश्रांतीसी । पावती परी भवमोचनासी । न ये कार्यासि रघुराया ॥ ५३ ॥ रसस्वादन येकेपरी । हा साधनरूप गा अवधारीं । येणेंचि निर्विकल्पदशा पुरी । काळेंवरी होतसे ॥५४॥ अखंड ब्रह्मात्मैक्यज्ञानेंविण । सर्वथा अज्ञान न तुटे जाण । अज्ञान असतां नानासाधन । अप्रमाण केलें तऱ्ही ॥ ५५ ॥ ह्मणौनि दोषचतुष्टय सांडोनी । निर्विकल्प दशा आश्रयोनी । राहें रघुनाथा तूं निर्वाणीं । मग जनीं वनीं तूंचि तूं पैं ॥ ५६ ॥ अहो दोषचतुष्टयाविरहित । राहे जे स्थिति निश्चित । तेचि ब्रह्मस्थिति गा निभ्रांत । अतिउन्नत ब्रह्मानंदु ॥५७॥ तेचि पराकाष्ठा गा मंगळमूर्ती । इयेहूनि न चढे ब्रह्मस्थिति । शिळेचेपरी अनन्यगति । परी अजड सर्वार्थीं स्वप्रकाशें ॥ ५८ ॥ तरी आतां ऐक गा रघुनाथा । सांडावी शिळेची काठिण्यता । कठीण तें जड अप्रकाशतां तत्वतां । त्यजोनि स्थिरता तैसी घेईं ॥ ५९ ॥ ते जडता टाकूनि शिळेची । तियेची हृदयस्थिति स्थिरतेची । निघोटपणें स्थिति वस्तूची । सर्वा स्थितीची जननीचि हे ॥५६०॥ इयेचेंचि नाम अमनस्क बोलिजे । इयेतेंचि उन्मनि ह्मणिजे । सुलीनता ते हेचि जाणिजे । सर्वांउपरि जे वरिष्ठपणें ॥६१॥ तन्मय होईं महाबाहो । हाचि सर्व साध्यचा रावो । स्थितींमाजी स्थिति निर्वाहो । स्थितीचा उपावो मुगुटमणी ॥ ६२ ॥ आजानूपर्यंत बाहुप्रमाण । यासि महाबाहु ह्मणिजे जाण । तरी रघुनाथा चक्रवर्तिया भूषण । होय निधान राजचिन्हांचें ॥ ६३ ॥ अभयवरदहस्त दोन्ही । विराजतांचि परामुक्तिदानीं । क्रोधादिअसुर निदाळुनी । अकर्त्तेपणीं शोभतांती ॥ ६४ ॥ नाना निर्वाणस्थितीलागून । रघुनाथापासींच प्रातिकारण । द्यावया करा करपण । यालागीं ह्मणोन महाबाहो ॥ ६५ ॥ श्रीगुरूनें सांगितली ब्रह्मस्थिति । ते जयाचिये न चढे हातीं । ते क्षुल्लकहस्त ह्मणिजेती । स्थूळ सर्वार्थीं अप्राप्तपणें ॥ ६६ ॥ तैसा तो नव्हे रघुरावो । तोचि स्वयें ब्रह्मविद्येचा ठावो । सांगतांचि जाला ब्रह्मभावो महाबाहो । यालागीं ह्मणे ॥६७॥ तुवां तन्मयचि असावें । अनर्थ दोष तयांवरी न यावें । संकल्पवासनाभावें । न लागावें रघुराया ॥ ६८ ॥ इये स्थितीनें सर्वदा असतां । तरी तूंचि ब्रह्म गा श्रीरघुनाथा । विराली प्रपंचकथा । येकु तत्वतां अगीं तूंचि ॥ ६९ ॥

सत्यानंदचिदाकाशस्वरूपः परमेश्वरः । मृद्भाजनेषु मृदिवत्सर्वत्रास्त्यपृथक् स्थितिः ॥ ११ ॥

आतां षट्श्लोकेंकरून । सांगिजे आत्मा किंलक्षण । तोचि तूं परिपूर्ण जाण । आनंदघन परिपूर्ण ब्रह्म ॥ ५७० ॥ सत्ता आनंद आणि ज्ञान । तदैक्य तूं चिद्गगन । सर्वांचा नियंता जाण । परिपूर्ण पूर्णानंदु ॥ ७१ ॥ तोचि तूं जाण श्रीरघुपती । तोचि तूं विश्व विश्वमूर्त्ति । तुजवांचूनियां त्रिजगतीं । तुजी स्थिति असेचिना ॥ ७२ ॥ हे सर्वही विश्वपरंपरा । ब्रह्मरूपचि जाण रघुवीरा । जैसें घटशरावादिभांडपसारा । सर्वत्र सैरा मृत्तिकाचि जैसी ॥ ७३ ॥ अगा या मृद्भाजनांचा ठाईं मृत्तिकेवांचूनि दुजें नाहीं । नामरूप तें मिथ्या पाहीं । शब्देंविण कांहीं वस्तु नसे ॥ ७४ ॥ नानाघटशरावादिरांजण । नाहीं वास्तव मृत्तिकेवांचून । ऐसेंचि स्वयें श्रुति बोल ती आपण । वाचारंभणंनामविकार ॥ ७५ ॥

संमतिश्रुती ॥ वाचारंभणविकारोनामधेयं मृत्तिकेत्येव सत्यम् ॥

यालागीं नाम आणि विकार । हा वाचेचानि विस्तार । मृत्तिकेवांचूनि वस्त्वंतर । नाहीं साचार

---

१ स्पष्टपणामुळें. २ तुच्छवत्. ३ पुष्कळ वेळ पर्यंत. ४ गुडघ्यापर्यंत. ५ गडकीं, परळ वगैरे अनेक प्रकारचीं मडीं. ६ मातीच्या भांड्यांत. ७ नामादि विकार हे वाचिक आहे.

रघुपुंगवा ॥ ७६ ॥ तैसा तोचि सर्वांपरी । नाहीं पृथक् सबाह्यांतरीं । येक येकुलता चराचरीं । नाहीं दुसरी मातु येथें ॥ ७७ ॥ तैसें जग हें नामरूपात्मक असे । नामरूप तें मिथ्या भासे । तें वाचारंभणमात्रचि असे । ब्रह्म सर्वांशीं सर्वत्र जें ॥ ७८ ॥

संमतिश्लोक ॥ अस्ति भाति प्रियं रूपं नाम चेत्यंशपंचकम् । आद्यत्रयं ब्रह्मरूपं जगद्रूपं ततो द्वयम् ॥
निस्तत्वे नामरूपे द्वे जन्मनाशयुते च ते । बुद्ध्या ब्रह्मणि वीक्षस्व समुद्रे बुद्बुदादिवत् ॥

सत्ता ज्ञान आणि सुख । हें अंशत्रय ब्रह्मचि येक । विश्व हें नामरूपात्मक । श्रुति सम्यक् सर्वत्र बोले ॥ ७९ ॥ यालागीं नामरूपात्मक मिथ्या असे । ब्रह्म तें सत्तासुखप्रकाश दिसे । ब्रह्मेंविण दुजें कांहींच नसे । सर्वत्र वसे परिपूर्णत्वें ॥ ५८० ॥

अपारावारविस्तारसंवित्सलिलवल्गनैः । चिदेकार्णव एकोऽयं स्वयमात्मा विजृंभते ॥ १२ ॥

पारावार नाहीं जयासी । ऐसा ज्ञानसमुद्र चिदैकरासि । विश्ववीचि शोभती जयासी । असे सर्वांसि पूर्णत्वें ॥ ८१ ॥ विश्वलहरिवीचिकरून । येकु चिदाब्धि उल्हासे जाण । नाहीं दुजें तयावांचून । अणुपरिमाणआदिकरुनी ॥ ८२ ॥

भरितशेषदिक्कुजमनंताकाशनिर्भरम् । एवं वस्तु जगत्सर्वं चिन्मात्रं वारि चांबुधेः ॥ १३ ॥

जैसें आकाश हें सार्वपरी । विस्तारलें त्रैलोक्यबाह्याभ्यंतरीं । तें रितें नाहीं तिळभरी । सर्व विस्तारी सर्वपणें ॥ ८३ ॥ आकाशीं भरिल्या दिशा विदिशा । स्वर्गमृत्युपाताळसरिसा । गिरीगव्हरकुंजअशेषा । दाहाही दिशा परिपूर्ण ॥ ८४ ॥ तैसें देशकाळवस्तुपरिच्छेद । नाहीं कालत्रयीं जया बाध । तेंचि तें अनंतपद निर्बाध । जाण शुद्ध नभजैसें ॥ ८५ ॥ ऐसें सर्वही विश्वामात्र । तें सकळही जाण चिन्मात्र । वस्तूविण नाहीं स्वतंत्र । नसे सर्वत्र जगनामें ॥ ८६ ॥ जैशा समुद्राचिया लहरि । तो समुद्रचि जैसा रावणारी । नाहीं येथ भेदपरी । सभराभरी तोचि तो पैं ॥ ८७ ॥ आकाशदृष्टांतेंकरून । ब्रह्म ते निःसंग तैसें जाण । ब्रह्म सर्व उपमाविहीन । लौकिकें पूर्ण साम्य घडे ॥ ८८ ॥

निरंशत्वाद्विभुत्वाच तयाऽनश्वरभावतः । ब्रह्मव्योम्नोर्न भेदोऽस्ति चैतन्यं ब्रह्मणोऽधिकम् ॥ १४ ॥

जो जो अंशमंत पदार्थ । तो परिणामी होय संतत । जैसें अंशत्वें दुग्ध परिणामत । तें दधि होत जयापरी ॥ ८९ ॥ पृथ्व्यादिकें अंशमंतें । तितुकेंही परिणाम पावतें । तैसें आकाश नव्हे सर्वार्थें । ह्मणौनि तयातें निरंश ह्मणती ॥ ५९० ॥ ऐसें परिपूर्ण सर्वांपरी । कोंदलेंसे बाह्याभ्यंतरीं । परिच्छिन्न नव्हे कोणेपरी । असे उजरी विभुत्वाची ॥ ९१ ॥ आकाशेंविण रिता ठावो । कोण्ही नाहीं महाबाहो । ह्मणोनि व्यापकत्वें निर्वाहो । आन भावो येथें नाहीं ॥ ९२ ॥ तैसें अनश्वरता तयासी । नाशु नपवे कोण्हे अंसीं । स्थिर सूक्ष्म असंगवेशीं । जाण सर्वांशीं नांदत ॥ ९३ ॥ ऐसें ब्रह्म अपरिणामी निरंश । व्यापक अपरिच्छिन्न उदास । नित्य अनश्वर सावकाश । जैसें आकाश तैसें जाण ॥ ९४ ॥ दोहींची समानता । नाहीं कोण्ही अंशीं न्यूनता । परी येक चैतन्यचि रघुनाथा । अधिक तत्वतां ब्रह्मासि पैं ॥ ९५ ॥ गगनाचा ठाईं जडपण । आणि असे प्रकाशविहीन । आत्मा स्वयंज्योति प्रकाशमान । चिद्गगन चिदानंदु ॥ ९६ ॥ चैतन्यगुणें श्रीरघुनाथा । ब्रह्माचे ठाईं हे अधिकता । अप्रकाश जाणोनि तत्वता । स्वयंब्रह्मता साधीं आपुली ॥ ९७ ॥ आणीकही आत्मयाचें वोळखण । तें ही सांगों येक चिन्ह । तूं होईं तेंचि जाणोन । खूणसंपन्न तेणें होसी ॥ ९८ ॥

निस्तरंगोऽतिगंभीरः सांद्रानंदसुधार्णवः । माधुर्यैकरसाधार एक एवास्ति सर्वतः ॥ १५ ॥

हे विश्वतरंगरहित । ब्रह्माब्धि जाण सांद्रानंदभरित । अतिगंभीर सदोदीत उचंबळत ब्रह्मानंदें ॥ ९९ ॥ अतिनिबिडपणें निघोट । सर्व आनंदाहूनि श्रेष्ठ । तो सांद्रानंद अतिउद्भट । सर्वत्र प्रगट सर्वपणें ॥ ६०० ॥ षड्रसांतें तिरस्कारून । सर्व रसांचें जें रसपण । तेंचि तें येकरस पूर्ण । नाहीं भान नानाव्यक्ती ॥ १ ॥ विषयरस ते नानाकार । ब्रह्म तें येकरस निर्विकार । सर्वां गोडियांचे गोड गव्हर । अतिमधुर माधुर्याचें ॥ २ ॥ शर्करेची माधुर्यता । वाचा बोबडी पडे बोलतां । वेगळी न निवडे सर्वथा । जाण तत्वतां माधुर्य ऐसें ॥ ३ ॥ सर्वत्र सदा सर्वपणें । असे सर्वां सर्व येकपणें । जें जें बोलिजे तें तेथें उणें । पूर्ण पूर्णपणें पूर्णचि वर्ते ॥ ४ ॥ मुका भक्षी जैसी शर्करा । सांगतां न प्रवर्ते जैसी गिरा । परी तो

१ अनेक जगें यास्त लाटा. २ स्वर्ग, मृत्यु आणि पाताळ या तीन्ही लोकांत. ३ पृथ्वी वगैरे ज्यांचे भाग पडतात असे पदार्थ. ४ उत्कर्ष. ५ कधींही नाश न पावणारें.

गोडीच जाणे भीतरा । नये बाहिरा बोलवरी ॥ ५ ॥ ब्रह्मरसगोडियेसि उपमा । तेथ कोण रस पावेल सीमा । तैसी माधुर्यता निःसीमा । मेघश्यामा ऐसें जाण ॥६॥ स्त्रीसंभोगरतीच्या अंतीं । जे कीं होय सुखाची प्राप्ति । तें कोटिसुखें वळी दीजेती । तैसी स्थिति आनंदाची ॥७॥ ब्रह्मपदसुखाचिया गोडी । कीजेती त्या ब्रह्मांडाची कुरवंडी । तैसी जाण आनंदपरवडी । पडे वेगडी बोलतां वाचे ॥८॥ हें काय बोलों रमाकांता । ब्रह्मानंद चहूं वाचां नये बोलतां । हा अनुभव ब्रह्मवेत्ता । जाणे तत्वतां ज्याचा तोची ॥ ९ ॥ अगा जें जें विश्वाकार भासे । तेंचि ब्रह्मचि एक उल्हासे । ब्रह्मावेगळें अणुमात्रही नसे । सर्वत्र असे तेंचि तें एक ॥ ६१० ॥ ब्रह्म तें जाण एवंभूत । आणीकही सांगों अद्भुत । तें आइक येकाग्रचित्त । स्वयें निश्चित होइजे तेंचि ॥ ११ ॥

समस्तं खल्विदं ब्रह्म सर्व मात्मेदमाततम् । अहमन्य इदं चान्यदित्यखंडं न खंडय ॥ १६ ॥

समस्त जितुकें विश्वजात । तितकेंही एक ब्रह्म स्फुरत । ब्रह्मेंविण अणुमात्रही किंचित । नाहीं निश्चित जाण हरी ॥ १२ ॥ हें अहंकारमात्र जें समस्त । आत्मा येकुचि जाण संतत । सर्वत्र येकला येकुचि व्याप्त । सर्वां सर्वगत अनन्यपणें ॥ १३ ॥ ऐसें जें अखंडदंडायमान । पूर्णानंदैकपूर्णघन । तयातें खंडिती अज्ञानपण । आपणा अन्य मानूनियां ॥ १४ ॥ मी आन तो मजहूनि अन्य । दोहीं तेणेंसी असे भिन्न । ऐसें अज्ञानी करिती खंडण । अहं अन्य ह्मणोनियां ॥ १५ ॥ जग हें मजहूनीयां वेगळें । मी तो जगाहूनियां निराळें । ऐसें अखंडासि अज्ञानबळें । खंडिती सगळें एक वस्तु ॥ १६ ॥ ऐसें षट्श्लोकीं करून । सांगितलें आत्मयाचें लक्षण । एवं जाणोनि आत्मा पूर्ण । तद्रूपें जाण राहिजेसु ॥ १७ ॥

यदेव ब्रह्मणो रूपं ततं बुद्धमखंडितम् । तदा विस्तीर्णसंसारः परमेश्वरतां गतः ॥ १७ ॥

जें कीं एवंरूप परब्रह्म । सर्वत्र व्यापक परिपूर्ण सम । अखंड सुखरूप निःसीम । परापरम जाणसी तेव्हां ॥ १८ ॥ ऐसें जाणतलियासाठीं । तरी तूंचि ब्रह्म गा जगजेठी । परमेश्वर तो तेचि भेटी । पडे तुटी संसाराची ॥ १९ ॥ जेव्हांचि पावसी गा ब्रह्मता । तेव्हांचि संसाराची भस्मता । निःशेष होय गा विबुद्धनाथा । नव्हे मागुता कल्पांतींही ॥६२०॥ स्वस्वरूपब्रह्मच्या ठाईं । अज्ञान तेथ निःशेष नाहीं । तत्कार्य संसार तो कैंचा कायी । मग दुजें नाहीं आपणाविण ॥ २१ ॥

समस्तमेव ब्रह्मेति भाविते ब्रह्म वै पुमान् । पीतेऽमृतेऽमृतमयः को नाम न भवेदिति ॥ १८ ॥

आणि समस्त हें जगज्जाळ । तें देखेचि जो ब्रह्म केवळ । तो स्वयेंचि ब्रह्म हे काय नवल । नित्य निष्कळ तोचि ब्रह्म ॥ २२ ॥

संमतिश्लोक ॥ अनुभूतेरभावेऽपि ब्रह्मास्मीत्येव चिंत्यताम् । अप्यसत्प्राप्यते ध्यानान्नित्याप्तं ब्रह्म किं पुनः ॥

नाहीं नसता देह भावितां । पुरुष देहरूपचि होय तत्वतां । जड कीटकी जडातेंचि ध्यातां । भृंगी तत्वतां स्वयें होये ॥ २३ ॥ मा हा तरी अनुभव प्रत्यक्षभूत । आणि स्वयें देह भावितां देहचि होत । तैसें स्वतःसिद्धचि ब्रह्म निश्चित । विचार येथ काइसा पां ॥ २४ ॥ आपण स्वतः ब्रह्मचि असे । आणि सर्वत्र ब्रह्म देखे सर्वांशें । तो ब्रह्म नोहे येथें अनारिसें । कैसें मानसें मानावें पां ॥ २५ ॥ आणि सर्वत्र ब्रह्म देखतां रघुपती । तोचि पुरुष स्वयेंचि असे ब्रह्ममूर्त्ति । येथें नाहीं विप्रतिपत्ति । जाण निश्चिति त्रिवाचा हें ॥ २६ ॥ अगा अमृता प्राशन जो करी । अमृतरूप नव्हेल कोणेपरी । ऐसें कोठें त्रैलोक्या माझारी । अमृत मारी कवणातें ॥ २७॥ जेणें जैसी स्वतु सेविजे । तेणें तत्काळ तद्रूपचि होइजे । विषें विष होऊनि मरिजे । अमृतें सहजें अमृतरूप ॥ २८ ॥ यालागीं देहोहं ऐसी भावना जो करी । तो देहरूपेंचि देहधारी । आणि ब्रह्म भावी तो ब्रह्मरूप हरी । जाण निर्धारीं विवेकचंद्रा ॥ २९ ॥ यालागीं जो ब्रह्मचि देखे समस्त । तो स्वयें ब्रह्मचि गा निश्चित । ब्रह्म ह्मणोनि ब्रह्माकार चित्त । करी संतत श्रीरामराया ॥ ६३० ॥

भव्योसि चेत्तदा तस्मात्सर्वमाप्स्यसि निश्चयात् । नोचेद्बह्वपि संप्रोक्तं यथा भस्मनि हूयते ॥ १९ ॥

यालागीं सर्व ब्रह्म या अनुभवें । रघुपती सर्वदा तुवां राहावें । राहतां परमानंदुचि फावे । नाहीं स्वभावें दुजें तेथें ॥ ३१ ॥ जरी तूं भव्य आहेसि गा रघुनाथा । ह्मणजे साधनचतुष्टयीं पुरता । तरी सर्व ब्रह्म देखतां । सीताकांता सर्व पावसी ॥३२॥ सर्वशब्दें ब्रह्मचि जाण । तेंचि तूं गा होसि निर्वाण । ब्रह्म स्वतःसिद्धचि आहेसी पूर्ण । उपचारें जाण ह्मणणें ऐसें ॥ ३३ ॥ साधनचतुष्टयाचें लक्षण ।

---

१ परा, पश्यंती, मध्यमा आणि वैखरी या चार वाचांनीं. २ न मोडलेल्या काळिमेप्रमाणें एक सारखें. ३ शंका, संशय.
४ कल्याणरूप.

तें सांग पूर्वींच केलें निरूपण । तें पुनरुक्त बोलोन कार्य कोण । तं तंव संपन्न साधनातेंही ॥ ३४ ॥ साधनचतुष्टयेंकरून । योग्य जाला आहेसि पूर्ण । तरी सर्व ब्रह्म हे स्थिति संपूर्ण । निश्चयें जाण पावसी ॥ ३५ ॥ पूर्ण ब्रह्मस्थिति बाणावया । हा साधनक्रमुचि रघुवर्या । चित्तशुद्धि सावधानेंकरूनियां होतसे यया त्रैलोक्यपती ॥ ३६ ॥ इतुकेंचि वर्म नसिजे जरी । तरी जे उपाय करूं सहस्रवरी । जैसा रक्षेमार्जा क्षेम करी । व्यर्थ रावणारी सर्वस्वें ॥ ३७ ॥ यया साधनचतुष्टयाविरहित । शुद्ध नसतां जयाचें चित्त । तेथें इतर जे सहस्रांत । अति व्यर्थ निर्फळत्वें ॥ ३७ ॥ स्वयें दर्पण जन्ही शुद्ध असे । तन्हीच तेथें मुख प्रकाशे । तेंचि पारुषें आतां काय रूप दिसे । किंवा भासे रविचंद्र तेथें ॥ ३९ ॥ ह्मणोनि ब्रह्मबोधासि मुख्य कारण । येकि चित्तशुद्धिचि पैं जाण । चित्तशुद्धि तेथें निश्चयें जाण । ब्रह्म पूर्ण प्राप्त स्वयें ॥ ६४० ॥ हें मा गां तुज निरूपिलें सकळ । श्लोकें 'शिष्यप्रज्ञैवकेवला' । यालागीं चित्त जालिया निर्मळ । लाभे प्रांजळ स्वात्मसुख ॥४१॥ नसतां अंतःकरणशुद्धि । नसतां साधनचतुष्टयाची समृद्धि । तेथ प्रयोजितां नानाबुद्धि । वेदांतासिद्धी व्यर्थ होय ॥ ४२ ॥ गुरूसि होय अगुरुत्व । महावाक्यासि ये अवाक्यत्व । साधन तेव्हडें व्यर्थ जात । भस्मीभूत तैसें होये ॥ ४३ ॥ आतां व्यर्थ क्लेशासि दृष्टांत । सांगेन तुज अपरिमित । वाळु घाणा गाळिजेत । क्लेश प्राप्त जयापरी ॥ ४४ ॥ गगनाच्या नाकीं वेसणी । कीं नरशृंगा कीजे चित्रावणी । कां वांझवृक्षासि घालिजे पाणी । सौभाग्यमिरवणी कांतहीने ॥ ४५ ॥ मृगांभासि पेहे दीजे । खपुष्पें वंध्यापुत्र शृंगारिजे । शशविषाणाचें औषध कीजे । रोग सहजें नाशती तेणें ॥ ४६ ॥ जन्ही नामासाधनें केलीं । तन्ही तें कोण्या उपयोगा मेलीं । कूर्मा [illegible]मशुद्धि जाली । काय फळली ब्रह्मविद्या ॥ ४७ ॥ सर्वांगीं नेत्र जाले मयूरासी । परी दोनि दृखत नसलिया त्यासी । कोण उपयोग कोण्या कार्यासि । आनंदरासी सांग पा ॥ ४८ ॥ गगनासि करितां पायरिया । कोण्ही येक प्रारंभी स्वर्गीं जावया । तरी यागु करितां रघुराया । दीक्षिता ये या स्वर्गावरी ॥ ४९ ॥ दाणे नसतां भांडेंचि घुसळी । बीज नसतां कृषि वाहिली । तैसीं महावाक्यें जीं बोधिलीं । तीं व्यर्थ गेलीं चित्तशुद्धीविण ॥ ६५० ॥ कापुराची भिंसि करूनियां । धांव घेतसे मेघ मावया । गगनारविंद तोडावया । नानाउपाय कीजे जैसे ॥ ५१ ॥ ययालागीं गा मंगलमूर्ती । तुज जालीसे साधनसंपत्ति । शुद्ध जालिया चित्तवृत्ति । तरी रमापती फावलें तुज ॥ ५२ ॥ जरी तूं पावलासी जाण । यया बोला नाहीं आन । आनंदमूर्ती तुह्मीच गा आण । करीं साधन ब्रह्माभ्यासु ॥५३॥

अपि विज्ञाततत्वेन त्वयाभ्यस्यमिदं सदा । न नाममात्रात्कतकफलमंबुप्रसादनम् ॥ २० ॥

जरी असंदिग्ध जालें तुज ज्ञान । निश्चयें जाणितलें ब्रह्म पूर्ण । तरी ब्रह्माभ्यासुचि किजे जाण । प्रपंचानुसंधान टाकूनियां ॥ ५४ ॥ अखंड निर्विकल्पसाधनीं । ब्रह्मानुभवें राहीं समाधानीं । तच्चिंतनीं तत्कथनीं । राहें प्रबोधनीं परस्परें ॥ ५५ ॥

संमतिश्लोक ॥ तच्चिंतनं तत्कथनमन्योन्यं तत्प्रबोधनम् । एतदेकपरत्वं च ब्रह्माभ्यासं विदुर्बुधाः ॥

तोचि ब्रह्माभ्यासु कैसा असे । तोही सांगों तुज विन्यासें । तें चित्त देऊनी विश्वेशें । सावकाशें परिसावें ॥ ५६ ॥ तरी एकाकी असतां रघुपती । ब्रह्मस्थितीनें राहावें येकांतीं । तेंचि शिष्य आलियां आपणाप्रति । किजे सुगती ब्रह्मकथन ॥५७॥ समान भेटालिया प्रबोधन । परस्परें करावें ब्रह्मनिरूपण । सर्वांही पदार्थत्रयांची पूर्ण । येकत्वें खूण जाणावी ॥ ५८ ॥ जैसी शब्दमात्राची प्रवृति । येक परब्रह्मीं पावे विश्रांति । तैसीच सर्व पदार्थजाति । येक ब्रह्माप्रति येकपरत्व ॥ ५९ ॥ हेंचि विचारातें अवस्थान । करूनि साधावें ब्रह्मसमाधान । अथवा वासनाशमन । करावें जाण अभ्यासें नाना ॥ ६६० ॥ हेंचि दृढ ब्रह्मभ्यसन । षड्गुणैश्वर्यभगवान । श्यामसुंदर कमळनयन । स्वयें श्रीकृष्ण बोलिले ॥ ६१ ॥ अर्जुनाप्रति भगवद्गीता । सांगता जाला जगत्पिता । तेंचि आइकें श्रीरघुनाथा । अभ्यास पुरता परब्रह्माचा ॥ ६२ ॥

संमतिश्लोक ॥ मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयंतः परस्परम् । कथयंतश्च मां नित्यं तुष्यंति च रमंति च ॥

स्वयें येकला असतां गा महामती । माझ्या स्वरूपीं घालीं चित्तवृत्ति । ते बाहिर नये विषयाप्रति । तैसी स्थिति साधावी ॥ ६३ ॥ प्राणाचेनि परिस्पंदें करून । जन्ही न राहेल स्थिर मन ।

---

१ पुनः बोललेलें. २ हजारों. ३ 'शिष्यप्रज्ञैव' या श्लोकानें. ४ नकशी काढणें. ५ विधवेला. ६ सशाच्या शिंगावें. ७ शाई. ८ आकाशाचें फूल. ९ प्रपंचाकडचें लक्ष्य.

तऱ्ही तयेंचि करा प्राणसमर्पण । मद्गतप्राण करूनियां राहे ॥ ६४ ॥ अथवा प्राणशब्दें इंद्रियें जाण । माझ्या स्वरूपीं घालीं नियमून । समस्त करणें आणि मन । मद्रूपीं समर्पण करीं त्यांचें ॥ ६५ ॥ अर्जुना मन आणि हे प्राण । माझ्या स्वरूपीं केलिया समर्पण । तरी तो तद्रूपचि जाला जाण । ब्रह्म परिपूर्ण पूर्णत्वें ॥ ३६ ॥ मग तया परमानंदाचिया गोडी । किजे विषयसुखाचिया कुरवंडी। तेचि ते अनुभविजे फुडी । विश्वपरवडी न स्फुरे जेथें ॥ ६७ ॥ येकांत नसतां गा महामति । आणि समान भेटे जरी भाग्योन्नती । तरी बोलती मत्स्वरूपस्थिति । परस्परें डुलती ब्रह्मानंदें ॥ ६८ ॥ परस्परें मत्स्वरूप बोधितां । आनंदु न समाये दोहींचे चित्ता । तेणेंचि पावे सुलीनता । देहादिवार्ता विसरोनियां ॥ ६९ ॥ परस्परें बोलतां दोघांजना । आनंद न समाय ब्रह्मांडभुवना । ते मद्रूप होती कुरुनंदना । काय वर्णना करूं त्यांची ॥ ६७० ॥ ते देहभावातें विसरले । परस्परें बोलतेंही राहिले । मग ब्रह्मानंदीं बुडाले । नेणती वर्त्तलें बाह्य कांहीं ॥ ७१ ॥ समान भेटतां महामती । शिष्य आला जरी शुद्धमती । तरी मत्स्वरूपकथन तयाप्रति । अतिप्रीती करावें ॥ ७२ ॥ तेणें उभयतां समाधान । मीच प्रगटे पूर्णानंदघन । माझें स्वरूप बोलतांचि पूर्ण । प्रगटे जाण पूर्णानंदु ॥ ७३ ॥ ऐसें चतुःप्रकारें ब्रह्माभ्यास । हाचि निरंतर करितां जाण । परमानंदें डुलती पूर्ण । नेणती आपण मजवांचूनियां ॥७४॥ तेणें परमानंदें डुलती । माझ्या स्वरूपींच रमती। बाह्य दृश्यावरी कांहींच न येती । वर्त्तलें नेणती देहीं कांहीं ॥ ७५ ॥ ऐसें निरंतर करिती । निरंतरशब्दाची ऐसी व्युत्पत्ति । अंतर नाहीं जयाप्रति । निरंतरस्थिति या नांव ॥ ७६ ॥ करितां ऐसा ब्रह्माभ्यासु । मध्यें असों नेदिजे अवकाशु । अन्य व्यापारीं येकही लेशु । मनीं विषयांशु लागों नेदीं ॥ ७७ ॥ ऐसें निरंतर जाण । करितां ब्रह्माभ्यासु पूर्ण । असंभावनादिदोष दारुण । नाशोनि ज्ञान शुद्ध मी देतों ॥ ७८ ॥ जया ज्ञानातें पावोन । आनंदामाजी होइजे निमग्न । मग नुरे दोघां दोनी पण । परिपूर्ण मज येकत्वें ॥ ७९ ॥ ऐसें स्वमुखें श्रीपति । बोलता जाला अर्जुनाप्रति । तोही श्लोक गीतासंगति । आइक सुमती एकाग्र ॥ ६८० ॥

संमतिश्लोक ॥ तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् ॥ ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयांति ते ॥

ऐसें प्रीतिपूर्वक निरंतर । मातें भजती जे महाधीर । ते मातेंचि पावती साचार । नाहीं विचार आन येथें ॥ ८१ ॥ ययालागीं श्रीरघुपती । तत्व जाणितलें जरी विश्वमूर्ती । तरी अभ्यासु करीं या रिती । सर्वदा चित्तीं हेंचि धरीं ॥८२॥ यया अभ्यासें विण उपाय कोटि । करितां होसी गा हिंपुटी । उदकीं न घालितां कतकपिठी । नव्हे भेटि शुद्ध जळेंसी ॥ ८३ ॥ रजें डहुळलें उदक । त्यामाजी घालिजे जऱ्ही फळ कतक । तऱ्हीच शुद्ध जळ प्राप्त सम्यक् । येऱ्हवीं देख जैसें तैसें ॥८४॥ कतकाविरहित गा रघुवर्या । किजे जरी नानाउपाया । तरी न पविजे शुद्ध जळा तया । जाण राया त्रैलोक्याच्या ॥ ८५ ॥ तैसें ब्रह्माभ्यासावांचून । नाहीं ब्रह्मप्राप्तीसि कारण । त्यालागीं नित्य कीजे अभ्यासन । ब्रह्म पूर्ण जेणें प्राप्त ॥ ८६ ॥ तेणें अभ्यासेंकरून मीच ब्रह्म ऐसें बाणे पूर्ण । राहे ब्रह्मत्वें अनुसंधान । नित्य निमग्न परमानंदीं ॥ ८७ ॥

अहमेव परं ब्रह्म वासुदेवाख्यमव्ययम् । इति स्यान्निश्चयो मुक्तो बंध एवान्यथा भवेत् ॥ २१ ॥

आतां पूर्णबोध तो जाण कैसा । तोही परिसें गा वीरविलासा । तरी मीच परब्रह्म ऐसा । बाणे ठसा अवस्थात्रयीं ॥ ८८ ॥ जें कोठूनि व्यावर्त्तलें नाहीं अनुगत । ऐसें परिपूर्ण व्यापक अखंडित । आकाशादिभूतांचें अद्भूत । तेंचि संतत परब्रह्म मी ॥ ८९ ॥ जया वासुदेवनाम बोलती । सर्व भूतें जेणें आभासती । जेथूनि भूतव्यक्ति उदयातें पावती । आणि निमग्न होती जिये ठांई ॥ ६९० ॥ जें सर्व चराचरांचें जन्मस्थान । तेथ विश्व ऐसें होय कल्पित भान । तेंचि वासुदेवनामें परिपूर्ण । नित्य निर्गुण चिन्मय ॥ ९१ ॥ आणि चराचरविश्वाच्या लयीं । जें कीं अविनाश असे कालत्रयीं । व्यापकपणें नव्हे क्षयी । अनपायी सर्वदा जें ॥ ९२ ॥ ऐसेंचि सर्वदा बोले श्रुति । जे चराचरांची माझे ठायीं उत्पत्ति । स्थिति आणि मत्स्थांनीं होय समाप्ति । अद्वय चिन्मूर्त्ति अखंड मी ॥६९३ ॥

संमतिश्रुति ॥ मय्येव सकलं जातं मयि सर्वं प्रतिष्ठितम् । मयि सर्वं लयं याति तद्ब्रह्माद्वयमस्म्यहम् ॥

ऐसा निश्चय होतांचि क्षणीं । तेचि मुक्ति वरी तयालागुनी । स्वयें ब्रह्म बाणतां स्वसुखधनी ।

---

१ इंद्रियें. २ शब्दाचा अर्थ. ३ निवळीच्या फळाची वी. ही उगाळून किंवा पूड करून गढूळ पाण्यांत टाकून पाणी स्थिर ठेवलें म्हणजे कांहीं वेळानें पाण्यांतला गाळ खालीं बसतो.

मुक्त त्रिभुवनीं तोचि येकु ॥ ९४॥ ऐसा बोधु जयासि नाहीं । तरी तयासि तोचि बंध पाहीं । मी इंद्रियसमुदाय देही । जीवत्व तेंही बोधु तया ॥ ९५ ॥ अगा ब्रह्मभाव नसतां पोटीं । देहपणें तया संकल्प उठी । मी जीव ऐसें गा जगजेठी । भावना खोटी जऱ्ही वाढे ॥ ९६ ॥ तरी तेंचि जाण गा बंधन । अतिदृढ कळासे देहत्व जाण । मग करितां नानासाधन । नव्हे मोचन सद्गुरुवांचोनियां ॥ ९७ ॥ आतां तेंचि परब्रह्म कैसें । तें कोणे उपायें जाणिजेत असे । आणि प्रत्यक्ष देहादि भासे । तें कैसें निरसे प्राप्ति कैसी ॥ ९८ ॥ विश्व भासतां प्रत्यक्ष दृष्टी । आणि सांपडला दिसे देहसंपुटीं । ऐसें असोनि ब्रह्मेंसि भेटि । कोणे गोष्टी होतसे ॥ ९९ ॥ तऱ्ही तेंही सांगों रघुनाथा । तें आइकें येकाग्र करूनियां चित्ता । जेणें आत्मानुभव पुरता । बाणे तत्वता श्रीरामा ॥ ७०० ॥

नेति नेतीति नेतीति शेषितं यत्परं पदम् । निराकर्तुमशक्यत्वात्तदस्मीति सुखी भव ॥ २२ ॥

'नेति नेति' ह्मणोनि श्रुति । दृश्यमात्राचा निषेध करिती । श्रुतदृष्ट विश्व जें रघुपती । तें तें व्यक्ति ब्रह्म नव्हे ॥ १ ॥ जें जें जितुकें आकारा आलें । तें तें उत्पत्तिविनाशा पावलें । तें तितुकेंही नश्वर भलें । असे संचलें कल्पित ॥ २ ॥ दृश्य तें ब्रह्म नव्हे ऐसें । श्रुति स्वयें बोलत असे । स्थूळलिंगदेह तैसे नश्वर असे जाण रामा ॥ ३ ॥ षोडश कळा लिंगदेहीं । एक सतरा कळा ह्मणती पाहीं । तो तंव आत्मा नव्हे पाहीं । देह क्षरी परिणामवंतु ॥ ४ ॥ सोळा कळा लिंगदेहीं भेद । तेही तुज सांगों गा विशद । तरी इंद्रियें जाण दशविध । ऐकें भेद तयांचेही ॥ ५ ॥ चक्षु श्रोत्र आणि [illegible] । चौथी रसना पांचवें घ्राण । हें ज्ञानेंद्रियपंचक जाण । ऐक सांगेन कर्मपंचक ॥ ६ ॥ तरी कर चरण वाचा गुदोपस्थ । हें कर्मेंद्रिय पंचक निश्चित । ऐसीं दशेंद्रियें इत्थंभूत । प्राणवृत्त तें आइक ॥ ७ ॥ प्राणापानव्यानोदानसमान । आणि सोळावें तें मन जान । ऐसें षोडश कळांचें हें पूर्ण । लिंगदेह खूण रघुपुंगवा ॥ ८ ॥ सत्रावी बुद्धि ही गणितां । तरी सतरा कळा होती गा जानकीकांता । हे येकेक कळा निरक्षितां । विस्तारु ग्रंथा होतसे ॥ ९ ॥ म्हणौनि एकाचि दृष्टांतेंकरुनी । स्थूळलिंगदेह निरसुनी । तें परिस मन येकाग्र करुनी । सुरशिरोमणी अयोध्यापती ॥ ७१० ॥ पंचमहाभूतांचा समूहो । त्याचें नाम बोलिजे स्थूळदेहो । तैसेंचि नश्वर जाण निःसंदेहो । ब्रह्म स्वयमेव देह नव्हे ॥ ११ ॥ एवं स्थूळ लिंग दोन्ही शरीर । तें नश्वर दृश्यपणें निर्धारें । हें ब्रह्म नव्हे साचोकारें । तें जाण खरें साक्षिभूत ॥ १२ ॥ जो जयाचा होय द्रष्टा । तो तें दृश्य केवीं होय सुभटा । ह्मणोनि एक न करीं दृश्य द्रष्टा । भिन्न दृष्टा द्रष्टेपणें ॥ १३ ॥ एस नेतिमुखें दृश्यजात । निरसिजेती दृश्य पदार्थ । जें जें उत्पत्ति क्षय असे पावत । तें जाण निश्चित मिथ्या मात्र ॥ १४ ॥ या स्थूळसूक्ष्माचा साक्षिभूत । सर्व निषेधें उर्वरित । स्वप्रकाशें जें प्रकाशत । तेंचि निश्चित परमपद ॥ १५ ॥

संमतिश्रुति ॥ अस्थूलमनणुमन्हस्वमदीर्घमचक्षुरश्रोत्रमपाणिपादमिति ॥

जें सर्वांचेंही अधिष्ठान । जेथ स्वकार्य भासे अज्ञान । जेथ भासे विश्वस्वप्न । होय लीन मागुतें जेथ ॥१६॥ अहो ज्याचे अज्ञानें विश्व भासे । आणि ज्याचे ज्ञानमात्रें सर्वही नासे । तया अविनाशातें जाण ऐसें । जें न नासे निषेधितांही ॥ १७ ॥ संकल्पाचि निराकरणें । उरे जें सर्वांचें साक्षीपणें । जयासि निराकरण करवेना श्रुतींनें । नेणती कवणें तेंचि ब्रह्म ॥ १८ ॥ नेतिनेति ऐसें ह्मणती श्रुति । जेथें मौन धरूनियां राहाती । तेंचि ब्रह्म गा ब्रह्ममूर्त्ती । न भासे व्यक्ति जिये ठायीं ॥ १९ ॥ सर्वा दृश्यांचे निरासपणें । जेथ विचाराचें पुरेपण । मन वृत्तिबळाचें मावळणें । तेंचि जाणणें परब्रह्माचें ॥७२०॥ देहादिकारांचा निरास करून । अवशेषित जें प्रकाशमान । तेंचि परब्रम्ह ऐसें जाण । नाहीं आन रमाकांता ॥ २१ ॥ यदर्थीं भगवान सुरेश्वर । बृहदारण्यश्रुतीसि थोर । विस्तार केला आत्मविचार । तोचि येकाग्र परिकेसीं ॥ २२ ॥

संमतिवार्तिक ॥ अध्यात्मादिपदार्थेभ्यो विविक्तं स्वात्मनि स्थितम् । तन्न पश्यन्त्यहो कष्टं दौर्भाग्यं दुष्टचेतसाम् ॥

अध्यात्म अधिभूत अधिदैवत । देहादिप्रपंच समस्त । तैसेचि अंतरींचेही पदार्थ । जाण निश्चित अध्यात्मादिक ॥ २३ ॥ यया समस्तांहूनि वेगळें । दृश्यमात्राहूनि निराळें । तेंचि आत्मस्वरूप सकळें । वर्त्ते सोज्वळें स्वप्रकाशें ॥ २४ ॥ तया नाहीं व्यवधान । नाहीं आपणाहूनि भिन्न । अपरोक्ष

१ ठसतें; बाणतें. २ ऐकिलेलें आणि पाहिलेलें. ३ देवाच्या मुकुटावरील रत्न. ४ गति, मजल. ५ बाकी उरलेलें. ६ याच अर्थानें. ७ निराळेपणा आडकाठी.

आपुलें स्वरूप जाण । प्रकाशमान स्वप्रकाशें ॥ २५ ॥ जयाचिया भेटीलागीं । नलगे पडणें पडणीं मार्गीं । नलगे जाणें साधनमार्गीं । अंतरंगीं स्वयेंचि पाहावें ॥ २६ ॥ आपणा देहीं आपणा आंत । आत्मस्वरूप पाहावें निश्चित । पाहातां क्षणीं स्वयेंचि भेटत । परी तें असत स्वतःसिद्ध स्वयें ॥२७॥ यालागीं कासया साधनें । अपरोक्ष वस्तूसि पाहिजे देखणें । हेंचि अंतर आणि स्वतःसिद्धपणें । कांहीं पुसणें लागेचिना ॥ २८ ॥ पाहातां न पाहातां स्वयेंचि असे । तया साधनांचे कां करी वळसे । तें साधनही जयाचेनि प्रकाशे । तें साधनीं कैसें आतुडेल ॥ २९ ॥ डोळा पदार्थातें प्रकाशी । डोळिया दावी ते कोण वस्तु ऐसी । यालागीं आत्मप्रभा आत्मयासी । स्वयें प्रकाशी स्वसंवेद्यत्वें[१] ॥ ७३० ॥ ऐसें प्रगट आणि प्रकाशमंत । स्वयें स्वतःसिद्ध प्रत्यक्षभूत । तयासि न देखती भाग्यहत । दुःख अद्भुत महाथोर ॥ ३१ ॥ अहा कटा हें अतिवोखटें । हें दुष्ट भाग्य या जनांचें उफराटें । स्वतःसिद्ध नेणोनि कल्पिती मोठे । विषय गोमटे मानिताती ॥ ३२ ॥ कामक्रोधलोभविकीकरून । दुष्ट नष्ट जयांचें मन । तयांचें दुर्भाग्य वाखाणी कोण । अतिदीन अभाग्य जे ॥ ३३ ॥ या दुष्ट भाग्याहूनि थोर । आणीक दुःख नाहीं गा साचार । आत्मस्वरूप प्रत्यक्ष निर्विकार । अभाग्य नर न देखताती ॥ ३४ ॥ ऐसेंचि स्वयें श्रुति बोलती । खेदेंकरूनि कपाळ पिटिती । तेंही सुरेश्वराचार्य बोलती । ते आयिक संमति रघुपुंगवा ॥ ३५ ॥

संमतिवार्तिक ॥ प्रत्यक्षगोचरं देवं लोकं चातिप्रमादिनम् । दृष्ट्वा श्रुतिः शिरस्ताडन्ननुक्रोशति दुःखिता ॥

प्रत्यक्ष गोचर असतां देवो । हा प्रमादी कैसा पाहाहो । सर्वां प्रकाशी तोचि बोलिजे देवो स्वतः सिद्ध देवो हो स्वयेंचि असे ॥ ३६ ॥ जन्हीं हा लोक न पाहूं बैसे । जन्ही पाहातां न पाहातां स्वयेंचि प्रकाशे । जनांच्या नेणत्यातेंही प्रकाशित असे । तो पाहातां कैसे न देखती ॥ ३७ ॥ मी आपणा नेणें ह्मणातां । त्या नेणण्यातें जो प्रकाशिता । तोचि स्वयें स्वतःसिद्ध असतां । सर्वां प्रकाशिता तो नेणती ॥ ३८ ॥ जरी नेणपणाचि स्वरूप याचें । तरी नेणपणेंचि वसणें शिळेचें । असावें हृदय याचें । नेणपणाचें अज्ञान नसावें ॥ ३९ ॥ शुद्ध नेणपण असे सुषुप्तीसी । ते प्रकाशी काय नेणण्यासी । कीं नेणणें याचें ज्ञान वृक्षासी । ते मूढ वृत्तीसी अतिमूढ ॥ ७४० ॥ तैसें हें नव्हे गा जाण । तेथें नेणणें याचेंही होतसे भान । भान करी तोचि पूर्ण । चिदानंदघन परब्रह्म ॥ ४१ ॥ ऐसें प्रत्यक्षमंत प्रकाशगोचर । त्यातें प्रमादी लोक नेणती पामर । तें देखोनि फोडिती शिर । श्रुतिसंभार कळवळोनी ॥४२॥ अति अक्रोशें कपाळ पिटिती । आपण प्रवर्त्तलों लोकसंस्थिती । लोकां होईल विषयासक्ति । आपणा नेणती ह्मणोनियां ॥४३ ॥ म्हणौनि प्रवर्त्तलों यथा भंगी । नेणों लोक वेधले विषयसंगीं । नेणती आत्मसुख अंतरंगीं । दुःखभागी म्हणती या ॥ ४४ ॥ आम्हीं अतिदुःखिता श्रुति होऊन । आक्रोश करितों पुनःपुनः जाण । मग विचारिती आपणा स्थान । कोणा शरण जाऊं म्हणती ॥ ४५ ॥

संमतिवार्तिक ॥ प्रत्यक्षतममप्येनं विततं च स्वयं स्थितम् । अहो कष्टन्न पश्यंति कं याम शरणं वयम् ॥

घटपट प्रत्यक्षामध्यें प्रत्यक्षभूत । देहादिक जे समीप पदार्थ । तेही दृश्यत्वें असती स्फुरत त्याहूनि समीपस्थ ते प्रत्यक्षतम[४] ॥४६॥ यथाच्या तीन कोटि असती । येक ते प्रत्यक्ष पदार्थ दिसती । येक ते प्रत्यक्षतर म्हणती । तिसरी याची गति प्रत्यक्षतम ॥ ४७ ॥ तरी प्रत्यक्ष घटपट देहादिक । प्रत्यक्षतर मन बुद्धि सम्यक् । आणि बुद्धीने साक्षी जें प्रकाशक । जाण निष्टंक प्रत्यक्षतम तें ॥४८॥ ऐसें प्रत्यक्षामाजी प्रत्यक्षतम । तेंच तें जाण शुद्ध ब्रह्म । येणें हें प्रत्यक्षाचें परम । व्याख्यान उत्तम शब्दाचें या ॥४९॥ प्रत्यक्ष घटपटदेहादि असे । परी देह अज्ञानें व्यापिलें दिसे । चक्षुरादि प्रमाणेंचि प्रकाशे । स्वयें तरी असे अप्रकाश जड ॥ ७५० ॥ दुसरेनि प्रकाशिलया प्रकाशे । येऱ्हवीं अप्रकाश पणेंचि असे । दुसरियासि प्रकाशीना स्वयंप्रकाशें । तेंचि जड ऐसें सर्वार्थीं ॥ ५१ ॥ तैसें नव्हे तें आत्मस्वरूप । तें तंव स्वप्रकाशें प्रकाशदीप । जें ज्ञानाचें उद्दीप[६] । तमाचा लेप जेथें नाहीं ॥५२॥ ऐसियासि नाहीं व्यवधान । स्वस्वरूपीं जयाचें अवस्थान । ऐसियातें जे न देखती अंधजन । दुःख दारुण अत्याश्चर्य ॥ ५३ ॥ तरी आतां आह्मीं कोण्हासि जावें शरण । आमचें पारपत्य करील कोण । यालागीं श्रुति भाकिती अति दैन्य । देखोनि मूर्खपण लोकांचें ॥ ५४ ॥ हातींचें कंकण न देखती । देखावया दर्प-

१ स्वतःच्या जाणतेपणामुळें. २ बेसावध रहाणारा. ३ दुःखांचा उपभोग घेणारा. ४ अतिशय प्रत्यक्ष ५ संशय टाकून देऊन. ६ उजेड पाडणारें. ७ आज्ञेप्रमाणें वर्तन.

ध्यातें इच्छिती । दर्पणसाधनेंविण नाहीं प्राप्ति । ऐसें जल्पती चतुर ॥५५॥ आपणासि जिव्हा आहे कीं नाहीं ऐसें । इये जिव्हेनें गा जगातें पुसे । स्वयें आत्मा नेणोनि तैसे । जाणोनि पिसे भिरवितातीं॥५६॥ इतुकियाचा ऐसा मथितार्थ । सर्व दृश्यांचे निरासें उर्वरित । तेंचि जाण पां इत्थंभूत । व्यापक नित्य आत्मस्वरूप ॥ ५७ ॥ जयासि निरसितांही कहीं । सर्वदा असत्यपणें निरासु नाहीं । तेंचि तूं ब्रह्मस्वरूप पाहीं । तेंचि तूंही प्रत्यक्ष नित्यानंद ॥ ५८ ॥ ऐसिये स्थितीनें रघुनाथा । तूं सुखी होसी सर्वथा । सांडूनि नको अन्यथा । वर्त्ततां वरपडा अनर्था होसी ॥ ५० ॥ येथें ध्याता ध्येयध्यान सांडूनी । येकत्वें राहे निर्वाणीं । त्रिपुटी कल्पूं नको खंडणीं । कोदंडपाणी ब्रह्मासि करूं ॥ ७६० ॥

अहं ध्याता परं ध्येयमखंडं खंडसे कथम् । आत्मानं सततं ब्रह्म विद्धि चैकं निरंतरम् ॥ २३ ॥

येका अखंड ब्रह्मासी । खंडपण तें पाप परियेसी । त्रिपुटी कल्पितां येकासी । मा अनेकांसि अनेक पाप ॥ ६१ ॥ येकाचि ब्रह्मासि गा जगजेठी । भाविता ध्याताध्येयध्यानत्रिपुटी । होती दोषांच्या गा कोटि । तेथें कल्पितां सृष्टि अनेक पापें ॥ ६२ ॥ यालागीं स्वयें आत्माचि ब्रह्म । येक व्यापक निरंतर सम । नाहीं व्यवधान निबिडपरम । अखंड निःसीम परिपूर्णत्वें ॥ ६३ ॥ अखंड निरंतर जे वस्तु । तेथें दुजेपणाची कैं मातु । ऐसिया ब्रह्मातें ध्येय ह्मणतु । आपणा मानितु ध्याता ह्मणौनी । ॥ ६४ ॥ आपणा जीवत्वें ध्याता ह्मणे । ईश्वरत्वें ब्रह्मासि ध्येयत्वें जाणे । हेंचि अखंडासि खंडणें । नको मनें कल्पूं ऐसें ॥ ६५ ॥ अगा जीवात्मा जो कां आपण । तोचि त्वंपद शोधितां ब्रह्म पूर्ण । नाहीं परस्पर दोघे भिन्न । येक चिद्घन निरंतर ॥ ६६ ॥ जीवाचे परिच्छिन्नत्वें किंचिज्ज्ञत्व । ऐसें कर्तृत्व आणि भोक्तृत्व । सांडूनि निवडा शुद्धत्व । आणि अज्ञानत्व देहाध्यासु ॥६७॥ ईश्वराचें परोक्षत्व ऐश्वर्यगुण । सांडूनि शुद्ध घइजे निवडून । तरी दोहींसि अकृत्रिमजाण । नाहीं भिन्नपण स्वानुभवें ॥ ६८ ॥ दोहींचे सोडितां विशिष्ट गुण । हरपोनि जाये दोहींचें दोन्हीपण । येक आपणाचि ब्रह्मपूर्ण । उरे निर्वाण दुजेनविण ॥ ६९ ॥ ऐसें आपणाचि येक ब्रह्म जाण । निरंतर सर्वात्मक परिपूर्ण । हेंचि जाणोनि राहें निर्वाण । चिदानंदघन आपणचि ॥ ७७० ॥ यालागीं ध्येय ध्यान सोडुनी । स्वयें ध्यानपण विसरोनी । राहें येक निर्वाणीं । नको शिरणी ध्यानयोगाची ॥ ७१ ॥ जरी करूं ह्मणसी ध्यातेयोग । तरी तुज सांगेन सांग । करूनि क्लेश अव्यंग । सांगों योग परियेसीं ॥७२ ॥

सोऽहं चिन्मात्रमेवेति चिंतनं ध्यानमुच्यते । ध्यानस्य विस्मृतिः सम्यक् समाधिरभिधीयते ॥ २४ ॥

अगा समाधि आणि ध्यान । सांगों यांचेंही लक्षण । तोचि योग करितां संपूर्ण । समाधान जेणें पावसी तूं ॥७३॥ तरी 'तत् त्वंपद' शोधिलिया जाण । उरे जें चिद्रूप निरंजन । शुद्ध स्वप्रकाश उपाधिहीन । नित्य पूर्ण पूर्णानंदु ॥ ७४ ॥ चिद्रूप चिन्मात्र आनंदघन । तेंचि मी ऐसें चिंतन । त्या चेंचि नाम बोलिजे ध्यान । परिशीलन स्वस्वरूपाचें ॥ ७५ ॥ तया ध्यानाचें लक्षण ऐसें । चित्त स्वरूपाकार करितसे । तें तेथूनि उठे प्रपंचाध्यासें । मागुतें तैसें तदाकार कीजे ॥ ७६ ॥ ययाचें नाम तिये ध्यान बोलिजे । यया ध्यानातें सम्यक् विसरिजे । स्वस्वरूपीं स्थिर राहिजे । समाधि बोलिजे नाम ॥ ७७ ॥ तेंचि समाधीचें लक्षण । आयिकें रघुनाथा संपूर्ण । करूनियां एकाग्रमन । सावधान परियेसी ॥ ७८ ॥

ब्रह्माकारमनोवृत्तिप्रवाहोऽहंकृतिं विना । संप्रज्ञातसमाधिः स्यात् ध्यानाभ्यासप्रकाशतः ॥ २५ ॥

ब्रह्माकारमनोवृत्ति । तिचा प्रवाह कीजे प्रत्यगावृत्ति । तेही सांडूनियां अहंकृति । जीवत्वभ्रांति, जे बोलिजे ॥७९॥ गळिया निःशेष अहंकारणीं । मी जीव ऐसें अनुसंधान । तत्त्यागेंचि ब्रह्मरूपस्फुरण होय पूर्ण अखंड जें कां ॥ ८० ॥ तैलधाराचियापरी । अखंड चित्तवृत्ति ब्रह्माकार करीं । आणि तेथेंचि स्थिरावे रावणारी । समाधि पुरी संप्रज्ञात ॥ ८१ ॥ हे ध्यानाच्या अभ्यासास्तव । समाधि प्रकाशे स्वयमेव । समाधिसंपत्ती चित्तस्वभाव । राहाती सर्व ब्रह्माकार ॥८२॥ तेव्हां ब्रह्मरूपेंचि राहे मन । निःशेष न करी प्रपंचभान । तेचि अमनस्कसमाधि जाण । चित्तें चित्तपण हरविलें ॥ ८३ ॥ संकल्पविकल्पाची फरारी । तेचि जाणें या मनाची थोरी । तेंचि राहातां ब्रह्माकारीं । तुरेचि उरी चित्तपणा ॥ ८४ ॥ जेव्हां चित्ताचें अचित्त जालें । तेव्हांचि संसारादि भय गेलें । दृश्याचें दृश्यपण

१ दुःखयुक्त. २ 'तत्त्वमसि' या महावाक्यांतील 'त्वं' या पदाचा विचार केला असतां. ३ रिघणें प्रवेश क ४ विस्फुर केल्यास. ५ तेलाच्या धारेप्रमाणे. ६ मनरहित समाधि.

उबडलें । तेथें कें भालें भय कोणा ॥ ८५ ॥ जेव्हां चित्त असे चित्तपणें । त्याचेंचि नाम दृश्य स्फुरणें । तेव्हांचि शोकमोहादि दारुणें । होती मनेंकरूनियां ॥ ८६ ॥

संमतिश्रुति ॥ कामः संकल्पो विचिकित्सा श्रद्धाऽश्रद्धा धृतिरधृतिर्ह्रीर्धीर्भीरित्येतत्सर्वं मन एवेति ॥

कामसंकल्पादि हें मन सर्व । ऐसें श्रुति बोले मनाचें गौरव । मनेंकरूनि सर्व भयादिभाव । होय अभाव मनेंविण सर्वां ॥ ८७ ॥ तेंचि एकें श्लोकसंगती । वासिष्ठ जे रघुनाथा निरूपिती । तेंचि आतां परिसावें श्रोतीं । जेणें विश्रांति पावेल ॥ ८८ ॥

कल्पांत वायवो वांतु यांतु चैकत्वमर्णवाः । तपंतु द्वादशादित्या नास्ति निर्मनसः क्षतिः ॥ २६ ।

कल्पांतींचा सर्वेच वारा । येकत्र मिळोनि सुरश्रेष्ठवरा । वाजो जऱ्ही सैरावैरा । तऱ्ही दरारा नाहीं त्यासी ॥ ८९ ॥ त्रैलोक्याचा करूनि गोळा । हा वायो ने कां अंतराळा । परी अमनस्का भयादि मेळा । नाहीं कळवळा क्षितीचा ॥७९०॥ अथवा सप्तोदधि येकत्र होती । त्रैलोक्यातें बुडवूं पाहाती । तऱ्ही ज्ञाननिष्ठा नाहीं क्षिती । बाह्य नेणती ह्मणोनियां ॥ ९१ ॥ द्वादशादित्य एकवट होतां । ते द्वादशकळीं खरतर तपती । ब्रह्मांडाची रक्षा करिती । परी नेणे सुमती अमनस्क ॥ ९२ ॥ मन स्वरूपीं ब्रह्माकार । तें नेणे हा अंतर्बाह्य विचार । ह्मणोनि न कळे विचार । तेथें विकार काय उपजे ॥ ९३ ॥ मनेंचिकरूनि दृश्यप्रतीति । मनें चराचरें सत्यत्वें भासती । मनें युक्तायुक्त स्फुरती । मनें होती लज्जादिक ॥ ९४ ॥ आधीं मनें प्रपंच कल्पिला । त्यामाजी उत्तम मध्यम भाग केला । तेथेंही वधादिक मेळा । वोहवला निश्चयात्मक ॥९५॥ त्यामाजी येकाची लज्जा धरी । येकाचे भयें कांपे थरारी । येक उपजवी एक मारी । संकल्पामाझारी करी जैसें ॥ ९६ ॥ तेंचि मन ब्रह्माकार जालिया । स्वयें मनपण मुकलिया । नेणे वर्तणुक मोकळया । अथवा प्रळयामाजी पडलें ॥ ९७ ॥ प्रळई जालिया महामारी । कोणे जाणावी हे प्रळयाची परी । मन बुडालें ब्रह्मानंदसागरीं । याचीच अवसरी नाहींपणा ॥ ९८ ॥ तेथें कल्पितें कल्प्य कल्पना । मावळोनि गेलीं गा रघुनंदना । हे सर्व मनाची विभागलक्षणा । मनक्षयीं भावना सर्वही बुडे ॥ ९९ ॥ तेथें उत्पत्ति प्रलय कोणासी । होती भासती कोणासी । यालागीं जालियाही प्रळयासी । अमनस्कासि क्षिती कैंची ॥८००॥ ब्रम्हज्ञानेंकरूनियां मन । भयाचें विरोनि जालिया अमन । तोचि तो पूर्णानंदघन । नित्य निर्गुण चित्स्वरूप ॥ १ ॥ तंव श्रीराम म्हणती श्रीगुरुमूर्ती । अपूर्व निरूपिली हे ब्रम्हस्थिति । ज्ञानेंकरूनियां इयेची निष्पत्ति । तरी ते ज्ञानव्यक्ति कैसी असे ॥ २ ॥ ज्ञान ऐसें म्हणिजे कोणासी । प्रगट कीं गुप्त असे या जनांसी । तें सांगितलें सांग मजपासीं । खूण ऐसी अति सोपी ॥ ३ ॥ तंव वसिष्ठ म्हणती गा रघुकुळज्योती । बरें पुसिलें तुवां विश्वमूर्ती । तरी करीन ज्ञानाची व्यक्ति । प्रगट जनांप्रति अप्रगट जाण ॥ ४ ॥ सर्वांही प्रत्यक्ष अनुभूत असे । परी ते नेणती अज्ञानवशें । आणि तें विचारितां तरी स्वयेंचि वसे । सांगेन ऐसें आयिका ५

या चितिः सर्वभूतानामुदयव्ययसाक्षिणी । तां चितिं पश्यतावस्थां पूर्णानंदघनामृताम् ॥ २७ ॥

सर्व भूतांचा उत्पत्तिनाश । साक्षित्वें देखे जो सावकाश । तेंचि ज्ञान पां उदास । अनुभूत सर्वांसु स्वतःसिद्ध ॥ ६ ॥ तेंचि स्थितीकरूनि ज्ञान । पाहिजे जरी अविच्छिन्न । तरी तेंचि पूर्णानंदघन । ब्रम्ह पूर्ण परमामृत ॥ ७ ॥ हें तरी ज्ञान सर्वांसिही असे । परी आपुलें आपण नेणती ऐसें । तेंचि विचारितां सावकाशें । वस्तुचि असे चिदानंदघन ॥८॥ या जगाचें होणें आणि जाणें । उत्पत्ति क्षये इत्यादि घर्त्तणें । तें सर्व जाणें जेणें ज्ञानें । जाण खुणे चिद्रूप तेंचि ॥ ९ ॥ आणि आपुलेंही क्रियाजात । देखणें परिसणें घेत देत । यया व्यापारातें जें जाणत । ज्ञान निश्चित सर्वात्मकतें ॥ ८१० ॥ ऐसें सर्वांही व्यापारांतरीं । मन बुद्धि प्रकाशे अंतरीं । साक्षित्वें साक्षिभूत सर्वांपरी । वसे निर्धारीं तेंचि ब्रम्ह ॥ ११ ॥ यालागीं सर्वही ज्ञानरूप असे । विश्वाभास तो मिथ्या भासे । जगद्रूपें मनचि उल्हासे । मनोंविण नसे विश्वाभासु ॥ १२ ॥

मनोदृश्यमिदं सर्वं यत्किंचित्सचराचरम् । मनसो ह्युन्मनाभावात् द्वैतं नैवोपलभ्यते ॥ २८ ॥

जें दृश्य चराचर विश्वजाळ । यत्किंचित् श्रुत दृष्ट सकळ । तितुकें मनोमय केवळ । स्वयें निर्मळ मृगांभ जैसें ॥ १३ ॥ रविरश्मीं मृगजळ भासे । तें सम्यक् निरीक्षणेंचि नासे । तया मूळ का

---

१ वाहूं दे. २ सात समुद्र. ३ बारा सूर्य. ४ मन नाहींसें झालें त्यास. ५ हे रघुकुल दीपका रामचंद्रा. ६ सर्व कर्मे. ७ मृगजळ. ८ नीटपणें पाहिलें असतां.

यसें । जाण सर्वांसें विवर्त्त सर्व ॥ १४ ॥ तैसें जाण हें जगडवाळ । असत्यपणेंचि हें निर्मूळ । ब्रह्मींचा विवर्त्तचि केवळ । नाहीं मूळ सत्यपणाचें ॥ १५ ॥ मननिमित्त विवर्त्त स्फुरे । मन विराल्या स्वयेंचि विरे । ब्रह्माचेनि सत्यत्वें संस्फुरे । येन्हवीं लेकुरें वांझ जैसीं ॥ १६ ॥ स्वप्नींचिया लेकुरासी । कवण माय बाप तयासी । हें उठोनि पाहे जागृतीसी । तंव सिद्ध यासि ठाव नाहीं ॥ १७ ॥ तैसें या जगाचें आहेपण । तें तंव सर्वही मनाचें मनपण । तेंचि मन जालिया उन्मन । विश्वभान नाहींच होये ॥ १८ ॥ देहादिअंतर जें द्वैतजात । हेंही सत्वत्वें न स्फुरे जेथ । मग विश्व भासेल काय तेथ । सर्वही अनित्य होऊनि जाये ॥१९॥ यालागीं विश्वाचा उदय रघुपती । होय मनाचिपासाव निश्चिती । तेंचि उन्मन जालिया शांति । जगप्रतीति कैंची तेथें ॥ ८२० ॥ यालागीं जग तें सर्व मिथ्याभूत । आहे तें ज्ञानमात्रचि समस्त । तेंचि परब्रह्म जाण निश्चित । सर्वगत सर्वही जें ॥ २१ ॥ तेंचि आयिकें श्लोकेंकरून । जेणें बुझसी सर्व ब्रह्म पूर्ण । तेचि सांगों निजरूपण । होय समाधान समाधि ॥ २२ ॥

यदस्पंदं शिवं शांतं यस्यांतर्जगतः स्थितिः । स्पंदास्पंदविलासात्मा स एकोऽत्र चिदाकृतिः ॥ २९ ॥

तरी तें ऐसें देखिजे यया दृष्टी । तेंचि शिवरूप गा इये सृष्टी । न स्फुरे जेथ विश्वव्यष्टि । शांत जगजेठी या नाम ॥ २३ ॥ निःशेष उपाधीचा उपरम । तेंचि बोलिजे शांत परम । जयामाजी जग हें विषम । येकत्वसम ब्रम्हरूप ॥ २४ ॥ ऐसें शांत शिवरूप कल्याण । पूर्णानंदैकब्रम्ह परिपूर्ण । माजी विश्वस्थिति वर्त्ते जाण । उत्पत्ति मरण त्यामाजी दिसे ॥ २५ ॥ जगाची उत्पत्ति आणि मरण । दोहींचें जें अद्वैत अभान । तद्विनाशात्मक ब्रम्ह जाण येक चिद्धन चिदाकृति ॥२६॥ तया ज्ञानस्वरूपाचि ठाईं । विश्वोत्पत्तिस्थितिविनाश भासती पाहीं । तरी तदात्मकचि जाण सर्वही । जगनाम नाहीं दुजें तेथें ॥२७॥ सकल ज्ञानमात्रचि असे । ज्ञानाचाचि ठाईं सर्वही भासे । तद्व्यतिरिक्त कांहींच नसे । हें पूर्ण मानसें जाणावें ॥ २८ ॥ ऐसें तें आत्मस्वरूप जाणोनी । राहाताती योगिये निर्वाणीं । तैसेंचि तुम्हींही राजचूडामणी । ब्रह्मपणीं राहावें गा ॥ २९ ॥ मग देह असो अथवा जावो । परी त्या देहांतीं नाहीं संदेहो । स्वस्थितीनें नाठवे देहभावो । तो बोधाचा रावो बोधस्वरूप ॥ ८३० ॥ ज्ञानदिनमणि पावतां । तेथ देहात्मबुद्धितम नाशे तत्वतां । आत्मभाव तो पावे सोज्वळता । स्वयें स्वरूपता स्वरूपदृष्टी ॥ ३१ ॥ जैसें कां रंक पावे राज्यातें । तत्काल हारवी त्या रंकपणातें । कीटकी पावे जैसी भृंगत्वातें । स्वदेहातें विसरे जैसी ॥ ३२ ॥ तैसा असतांही देहसंग कोडें । परी तो न पाहे तया देहाकडे । स्वस्वरूपचि वाडेंकोडें । भोगी निवाडें द्वैतजोविण ॥ ३३ ॥ तेंचि वर्म तूं आइकें आतां । सांगेन तुज अवनिपाळनाथा । तेंचि येकाग्र करूनियां चित्ता । देह नेणता कैसा असे ॥ ३४ ॥

अहिर्निर्वलनीमहिरात्मया । जगृहे परिमोक्षणतस्तु पुरा ॥
परिमुच्यति तामुरगः स्वबिले । न निरीक्षत चात्मतया तु पुनः ॥ ३० ॥

तरी महासर्प अद्भुत । पूर्वी कांत आत्मत्वें घेता होत । मीच ह्मणोनि देखत पाळित । सुखदुःख पावत तत्संगेंकरूनी ॥ ३५ ॥ मग तेचि मुळींहूनिया सुटली । भुजंगें अनात्मपणें तत्काळ त्यजिली । तेव्हांचि मी पणाची अहंता गेली । उपेजिली परकीयत्वें ॥ ३६ ॥ जन्ही वारूळाचे द्वारीं । पडली असे तदाकारीं । परी घेतां जातां येरझारी । न स्वीकारी मी ह्मणोनी ॥ ३७ ॥ तैसेंचि अज्ञानदशेचा ठाईं । आत्मत्वें देह घेत होता पाहीं । तेथील ऊर्मि ज्या कीं साही । घेतु डोई आपुलिया ॥ ३८ ॥ त्या साहाही ऊर्मि कोण कोण । ऐसें पुरुषोत्तमा सांगेन । तरी क्षुधा पिपासा जन्म । मरण शोक मोह जाण साही ऊर्मि ॥ ३९ ॥ कोण निष्ठा ऊर्मि त्या कोणी । त्याही सांगतों कार्मुकपाणी । तरी क्षुधा पिपासा वर्त्तता प्राणीं । धर्म अनुदिनीं ययाचे हे ॥ ८४ ॥ उर्मी दोन्ही क्षुधा आणि तृषा । हे प्राणाचे धर्म गा सर्वेशा । वेहीं जरा मृत्यूचा वळसा । धर्म ऐसा स्थूळ देहाचा ॥ ४१ ॥ शोक मोह हे मनाचे धर्म । मानसीं वर्त्तती हे अधम । हें जाण षडूर्मींचें वर्म । याहूनि परब्रम्ह व्यतिरिक्त ॥ ४२ ॥ यया षडूर्मिवंत हें शरीर । तें हें आत्मत्वें नेघे धीर । आत्मप्रतीति देखे दृश्यतर । स्वयें निर्विकार साक्षी असे ॥ ४३ ॥ जालिया स्वरूपप्राप्ति । तोचि आत्मदेह आत्मत्वें न मानितो । बाह्य दिसतीही तत्संगतीं ।

१ भ्रम. २ कल्याणकारक. ३ अनेक विश्वांचा निराळेपणा. ४ विस्मरण. ५ विश्व उत्पन्न होणें, चालत असणें आणि नाश होणें. ६ तहान. ७ सहा विकारींनीं युक्त असलेलें.

परी नाहीं भ्रांतिही देहपणाची ॥ ४४ ॥ जैसा जागृतीचा ठाईं । देह आत्मत्वें घेतु पाहीं । सुषुप्तीसि अनुसंधान तेंही । न धरी कांहीं देहपणें ॥ ४५ ॥ देहाचेंचि नेणे अनुसंधान । तेथें कैंचा ह्मणों येईल क्षत्रिय वैश्य ब्राह्मण । ना गृहस्थ वनी[1] यति आपण । नेणे जाण रघुवर्या ॥ ४६ ॥ अज्ञानासि देहधारी ऐसा दिसे । परी तो देही नेणे ऐसें । ज्ञानी जाण तो तैसा असे । देह सर्वांशें नेणतु ॥ ४७ ॥ पुरुषपणें पुरुषछाया । सर्व असतांही विबुद्धराया । परी अनुसंधान नाहीं तया । तैसा ज्ञानिया[2] वर्त्ततु ॥४८॥ अगा देहादिकाचां ठाईं । तुटतां आत्मबुद्धि कांहीं । तो देही असलिया पाहीं । बाधील कायि आत्मविदा ॥ ४९ ॥ ययालागीं देह असतां कां नसतां । सर्वथा न लिंपे तो आत्मवेत्ता । देहत्वेंचि अनुसंधान तत्त्वतां । नाहीं सर्वथा तयासी ॥ ८५० ॥ तो देही असोनि देहातीत । देहसाक्षित्वें असे वर्त्तत । तेणें केलियांही जगाचा घात । स्वयें अलिप्त अकर्त्तेपणें ॥ ५१ ॥ तूं जरी ऐसें ह्मणसी पीता कांता । तरी तो होय कर्माचा अकर्त्ता । तरी तो हिंसाकर्म करितां । कैसा अकर्त्ता तो दिसे ॥ ५२ ॥ बुद्धिपूर्वक केलियावांचून । कर्म सांग न निपजे जाण । निषेध गाळूनि विधीचें पाळण । कर्त्ता कोण कर्मादिकांचा ॥ ५३ ॥ बरवें वाईट ऐसें सुजे । विधिनिषेध ऐसें बुझे । तरीच तदनुसार कर्म निपजे । कर्त्तेन कीजे विध्यनुसार ॥ ५४ ॥ निषेध करितां पापदर्शन । विधि आचरतां अतिपुण्य । पापपुण्य सुखदुःखभान । तरीच जाण वर्त्ते तैसा ॥ ५५ ॥ पापास भेऊनियां निषेध गाळी । पुण्याश्रयें विधीतें पाळी । तरी देहानुसंधानिची काजळी । त्याचे कपाळीं कैसी नाहीं ॥ ५६ ॥ आणि बुद्धीवांचूनि कर्माचरण । कैसें घडेल त्यालागून । निषेधादि येकु विधिपालन । करी वर्त्तन कैसें जाण ॥ ५७ ॥ तरी याइकें सांगों गा रघुपती । येकाग्र होऊनियां चित्तीं । परिसतांचि पावसी विश्रांति । विश्वमूर्त्ती विश्वंभरा ॥५८॥

दोषबुद्ध्यो भयातांतो निषेधान्न निवर्त्तते । गुणबुद्ध्या च विहितं न करोति यथाऽर्भकः ॥ ३१ ॥

स्वस्वरूप जया अवस्थान । तोचि तो स्वयें ब्रम्ह पूर्ण । देह तयाचें नव्हे जाण । अनुसंधान तैसें नाहीं ॥ ५९ लोकदृष्टी जरी देह दिसे । तरी तो देहाचेनि संगें नसे । तो अकर्त्ता अभोक्ता सर्वांशें । प्रारब्धशेषें देह चळे ॥ ८६० ॥ अज्ञानविक्षेपात्मकेंकरून । प्रारब्ध राहिलें[3] असे जाण । तेणेंचि होय देहद्वयभान । कर्माचरण तच्छेषेंचि ॥ ६१ ॥ परी दोष होईल म्हणोनी । कर्मीं दोषदृष्टी करुनी । न निवर्त्ते निषेधापासुनी । कर्त्तेपणें उदास तो ॥ ६२ ॥ आधीं निषेधातें देखेल । निषेधवर्त्तनीं पाप होईल । इतुकें बुद्धीनें नेणोनि केवळ । टाकी सकळ निषेधजात ॥ ६३ ॥ तेणें नानाजन्मजन्मांतरीं । साधन करितां सहस्रवरी । निषेध गाळूनि विधिचि करी । निष्ठा अंतरीं धरूनियां ॥ ६४ ॥ तेणें सत्कर्माचें अनुष्ठान । निषेधाचें परिवर्जन । करितां सहस्र जन्म जाण । संस्कार पूर्ण तोचि बैसला ॥ ६५ ॥ अगा व्रतबंध केलियावरी । संध्येविण न जेवी ब्रम्हचारी । तो पूर्वींच निषेधकरीं । व्रतबंधावरी सर्व टाकी ॥ ६६ ॥ गायत्रीमंत्राचे उपदेशें । तो विपरीत होऊनि बैसे । मर तों राहे त्रेणेंचि अध्यासें । न नासे संस्कार त्याचा ॥ ६७ ॥ मा जन्मजन्मांतरीं केलें । तें केवीं राहेल उगलें । कुमारीचें जेव्हां लग्न जालें । तेव्हा लग्न जालें । तेव्हांचि बाणलें अहेवपण[4] ॥ ६८ ॥ यालागीं संस्कारेंचिकरून । प्रवाहेंचि निषेध गाळी जाण । तैसेंचि करी विहिताचरण । गुणागुण नेणोनियां ॥ ६९ ॥ स्नानसंध्यादेवतार्चन । यज्ञदानादिनानासाधन । सांग करी सत्कर्मानुष्ठान । नें धरूनि मनीं गुण त्यांचा ॥ ८७० ॥ हें केलिया दोष जाईल । अकरणीं प्रत्यवाय[5] उपजेल । केलिया अभीष्ट फळ होईल । इत्यादि केवळ नाहीं तया ॥ ७१ ॥ पूर्वप्रवाहेंकरून । उगेंचि करी विहिताचरण । तैसेंचि निषेधाचें परिवर्जन[6] । स्वभावें जाण करित असे ॥ ७२ ॥ तो तरी स्वयें उभयातीतु । नेणे पुण्यपापाची मातु । विधिनिषेध दोन्ही नेणतु । स्वभावें आचरतु सर्वदा ॥ ७३ ॥ सत्कर्म स्वयें आचरावें । असत्कर्म सर्वस्वें गाळावें । ऐसा सर्वथा नव्हे इयें हावे । सहज स्वभावें आचरतु सर्वदा ॥ ७४ ॥ परी वर्त्ततां न वर्त्ततां दोष नाहीं । केल्याचें फळ तेंचि पाहीं । देही असोनि तो विदेही । नाहीं कांहीं दोषादोष ॥ ७५ ॥ जैसा बाळक हा जयापरी । गुणदोषातें नेणे अंतरीं । परी संस्कारें बाह्यचेष्टा करी । शुभाशुभपरी नेणोनियां ॥ ७६ ॥ संकल्पविकल्पाविरहित । चेष्टा करी स्वभावपतित । त्या माजी येक अशुभ हीत । स्वयें नेणत जयापरी ॥ ७७ ॥ देव पूजिल्या हीत होईल । तोचि टाकिल्या दोष जडेल । हें दोहींच कांहीं नेणें बाळ । करी खेळ संस्कारवरी ॥ ७८ ॥ इंद्रियांच्या ज्या ज्या राहाटी । ज्ञानी नेणवां आत्मदृष्टी । इयापरी

---

१ वानप्रस्थाश्रमांत राहाणारा. २ आत्मज्ञान झालेल्या पुरुषास. ३ ते शिल्लक राहिल्यामुळें. ४ सौभाग्य. ५ केलें नाहीं तर दोष लागेल. ६ त्याग.

तो जगजेठी । करी राहाटी कर्माची हे ॥ ७९ ॥ तया अकर्म आणि कर्म । दोन्ही जालीं परब्रह्म । जम तें ब्रम्हत्वें निःसीम । नाहीं विषम अणुमात्र जया ॥ ८८० ॥ ब्रम्ह नेणोनियां पाहिजे । तरीच ब्रम्ह देखिजे । येऱ्हवीं सर्व ब्रम्ह सहजें । नाहीं दुजें वस्तुविण ॥ ८१ ॥

अनुत्कीर्णे यथा स्तंभे संस्थिता शालभंजिका । तथा विश्वं स्थितं तत्र तेन शून्यं न तत्पदम् ॥ ३२ ॥

अगा या ब्रम्हाचां पोटीं । विश्व संचलें असे जगजेठी[१] ब्रम्हेंविण विश्वाची गोठी । खोटी भिन्न म्हणतां ॥ ८२ ॥ जैसा न कोरितां दारुस्तंभ । पुतळिया असती स्तंभ । कोरिलिया पुतळियांचे गलंभ । दिसे भांब नानाकारें ॥ ८३ ॥ स्तंभ न कोरितां सुतारें । तो स्वयंभचि असे पुतळ्याकारें । कोरितां पुतळियांच्या संभारें । उठी निर्धारें स्तंभचि जैसा ॥ ८४ ॥ इतुकियाचा सिद्धांत ऐसा । स्तंभेंविण नाहीं पुतळियांचा ठसा । तैसें जगचि हें ब्रम्ह परेशा । नाहीं दशा दुजेपणाची ॥ ८५ ॥ नातरी गगनाचा ठाईं । मारुतें सर्वत्र असे पाहीं । भासविल्या भेटे देहीं । येऱ्हवीं नाहीं ऐसाचि गमे ॥ ८६ ॥ ऐसें सकळ विश्व ब्रम्हचि असे । निराळें पाहिलें तरीच दिसे । येऱ्हवीं ब्रम्हपणेंचि वसे । भिन्न नसे आन कांहीं ॥ ८७ ॥ परी तें विश्वावांचून । ब्रह्म तें सर्वथा नसे जाण । सकळ विश्वाचें अधिष्ठान । असे ह्मणोन विश्व तेथें ॥ ८८ ॥ जैसें पृथ्वियेच्या पोटीं । घटशरावादिभांडीं गोमटीं । असती जाण पां जगजेठी । केलीं तरी भेटी होतसे ॥ ८९ ॥ नातरी कापुसामाजी कापड । कापुसरूपें आहे उघड । केल्यानिमित्त भासे उघड । दिसे गिव्हाड कापडपणें ॥ ८९० ॥ नातरी सुवर्णी अळंकार । कटककुंडलादिप्रकार । कां सुषुप्तीमाजी जागर । असे निरंतर अधिष्ठानत्वें ॥ ९१ ॥ जें जयाचें अधिष्ठान । ते वस्तु तद्रूपचि जाण । नव्हती परस्परें दोन्ही भिन्न । तया येकपण तें अखंड ॥ ९२ ॥ उंसामाजी जैसी शर्करा । कां गुळीं गोडी जैसी रघुवीरा । कां परिमळु जैसा कापुरा । शब्द अंबरामाजी[३] जैसा ॥ ९३ ॥ कां शुक्तिकेचां ठाईं रजत । तैसें ब्रह्मीं विश्वजात । अज्ञानें भिन्नसें भासत । येऱ्हवीं सदोदीत परब्रह्म ॥ ९४ ॥ प्रथम सर्वनिरासें करून । साधिजे स्वस्वरूप निर्वाण । मग सर्वत्र सर्व ब्रह्म पूर्ण । नाहीं अपूर्ण पूर्णत्वें ॥ ९५ ॥ सर्वही हें जग ब्रह्म पूर्ण । ब्रह्मेंविण दुजें न देखे आन । हे रघुनाथा सेवटील खूण । जाणिजे पूर्ण ब्रह्म येक ॥ ९६ ॥

यथा न पुत्रिका शून्यः स्तंभोऽनुत्कीर्णपुत्रिकः । तथा भातं जगद्ब्रह्म तेन शून्यं न तत्पदम् ॥ ३३ ॥

जैसा कां स्तंभु न कोरितां । पुत्रिकाशून्य[४] नव्हे तत्वतां । तैसें जग वेगळें न भासतां । तदंतगर्ता असोचि कां ॥ ९७ ॥ जग भासतां न भासतां । ब्रह्मीं ब्रह्मरूपचि तत्वतां । नाहीं येथें आन कथा । ब्रह्म सर्वथा ब्रह्मचि येक ॥ ९८ ॥

सौम्यांभसि यथा वीचिर्न चास्ति न च नास्ति च । तथा जगद्ब्रह्मणीदं शून्याशून्यपदं गतम् ॥ ३४ ॥

जैसें महाऱ्हदाचां ठाईं । जळगंभीर निमग्न पाहीं । जेथें लहरी पण भासे अनेकही । परी निवाड दोहीं न होये ॥ ९९ ॥ सपाटलेपणें उदकचि दिसे । तेथें वीचि बुद्बुद कांहीं न भासे । तेंचि पाहातां वायुवशें । दिसती सर्वांशें वीचि सर्व ॥ ९०० ॥ तथापि वीचि भासतां न भासतां । सर्वही जळाचि तत्वतां । लहरि असे जळात्मता । भासु अन्यथा तो भ्रमु ॥ १ ॥ परी वीचि आणि बुद्बुदाकारें । येक जळचि नाहीं दुसरें । तैसें ब्रह्मचि विश्वाकारें । भासे साचारें नानाकृति ॥ २ ॥ विश्वाचें आहेनाहींपण । हें कांहीं न बोलें ब्रह्मीं जाण यालागीं जग ब्रह्मासि भिन्नपण । नाहींच प्रमाण सर्वथा ॥ ३ ॥ भेददृष्टी तरी विश्व भासे । ज्ञानदृष्टी ब्रह्मच असे । ज्ञानाज्ञानभेदें दोन्ही ठसे । येऱ्हवीं असे ब्रह्मचि येक ॥ ४ ॥ दर्पणामाजी मुख पाहिजे । तरी तेथें दुजें देखिजे । येऱ्हवीं मुखचि मुख तें सहजें । नाहीं दुजें देखतांही ॥ ५ ॥ दर्पणीं काय नेवें मुख आलें । कीं दर्पणामाजी होतें ठेविलें । कीं दर्पण न घेतां हारपलें । किंवा लपालें कोणाआड ॥ ६ ॥ यालागीं दर्पणाचिया उपाधी । येकी झाली द्वैतबुद्धि । उपाधित्यागें निरवधि । ब्रह्म निरुपाधि येकयेकलें ॥ ७ ॥ जैसें सुषुप्तीचेनि संगें । स्वप्नीं भासती देहें अनेगें । सेखीं एकचि उरे निद्रात्यागें । स्वयें निजांगें स्वयंभचि ॥ ८ ॥ तैसें अज्ञानउपाधीनें जग भासे । तेंचि उपाधिनाशें ब्रह्मचि । असे येकचि भासती अनंत ठसे । परी ते एकचि ऐसें जाण तूं ॥ ९ ॥ ह्मणोनि जे हे विश्वपरंपरा । ते सर्वही ब्रह्मचि गा रघुवीरा । तरुवर पावला विस्तारा । तऱ्ही बीजांकुरा भिन्न कांहीं ॥ ९१० ॥ नातरी अवयव जरी अनेक । नानाआकार नानावेष । नामेंचि दिसती

---

१ लांकडाचा खांब. २ वायु. ३ आकाशांत; शब्द हा आकाशाचा गुण आहे ह्मणून. ४ ज्यामध्यें पुतळी नाहीं असा. ५ मोठ्या डोहांत. ६ लाटा. ७ बुडबुडे.

असंख्य । परी देह येक न चुकेचि ॥ ११ ॥ नानाकारें भिन्नभिन्नीं । भेदुनि द्वढावला इये जनीं । तो अधिष्ठानज्ञानेंवांचुनी । न जाय प्रयत्नीं कोटिसंख्या ॥ १२ ॥ तेंचि अधिष्ठानज्ञान होतां । भेदु नाशूनि जाय तत्वतां । उरे अधिष्ठान येकात्मता नाहीं । वार्त्ता दुजयाची ॥ १३ ॥ ऐसेंमि वस्तुविचारें । सांडूनि सर्व भेदांतरें । राहीं येकात्म निर्धारें । नेणोंचि दुसरें कल्पित जें पैं ॥ १४ ॥ ब्रह्मचि मन बुद्धि आणि प्राण । इंद्रियें सर्व ब्रह्मचि पूर्ण । ब्रह्म देह विदेह जाण । सर्व कल्पन परब्रह्म ॥ १५ ॥ देह देहत्वें ब्रह्म जाण । इंद्रियव्यापार कर्त्ता करण । कर्तृत्वादिही निर्माण । ब्रह्मचि पूर्ण पूर्णत्वें ॥ १६ ॥ सर्वही जितुका जगदाभास । जाण तें तेंचि ब्रह्म उदास । पाताळ मृत्युलोक स्वर्गास । नित्य निवास सर्वपणें ॥ १७ ॥ दिशा अदिशा अंतराळ । उत्तरदक्षिणादिदिशामेळ । कुळाचळादिनभमंडळ । श्रुतिअदिशा ऐसेंचि बोले ॥ १८ ॥

संमतिश्रुति ॥ स एवाधस्तात्स उपरिष्टात्स पश्चात्स पुरस्तात्स दक्षिणतः स उत्तरतः स एवेदं सर्वम् ॥ पुरुष एवेदं सर्वं यद्भूतं यच्च भव्यम् ॥

पुत्रदारादि सुहृदपणें । ब्रह्मचि स्फुरे रूपपणें । तें देणें घेणें चालणें बोलणें । निद्रा जेवणें तद्रूप ॥ १९ ॥ श्रवण श्रवणीय श्रोता । वचन वक्तव्य वक्ता । भोगणे भोग्य भोक्ता । ब्रह्म तत्वतां परिपूर्ण येक ॥ १२० ॥ दृश्य द्रष्टा आणि दर्शन । कर्त्ता क्रियादिकारण । ज्ञाता ज्ञेय आणि ज्ञानें । त्रिपुटी पूर्ण ब्रह्म येक ॥ २१ ॥ जें जें मी पाहों जाय दृष्टीं । तें तें सर्वही ब्रह्मरूपेंचि उठी । श्रवणें शब्दार्थ जो घोटी तो ब्रह्मपुष्टि ब्रह्मत्वें ॥ २२ ॥ स्पर्शीं जातां स्पर्शन । तो ब्रह्मरूपचि जाण । घ्राणें करितां अवघ्राण । समसमान परब्रह्म ॥ २३ ॥ जे जे रसना घे रसगोडी । ते गोडीसहित ब्रह्म निरवडी । वाचा वाचिक वडी । ब्रह्मगोडी ब्रह्मत्वें ॥ २४ ॥ हातहाताचें घेणें देणें । चरणचरणाची गति चालणें । शिश्नशिश्नें रतिसुख भोगणें । ब्रह्मपणें ब्रह्म सर्व ॥ २५ ॥ गुदगुदाचा व्यापारु । व्यापारीं व्यापार निर्विकारु । एवं सकळही येकाकारु । निराकारु पूर्णानंदु ॥ २६ ॥ मनाचें मनपण संकल्पन । तें तें जाण ब्रह्म पूर्ण । बुद्धिबुद्धीचें बोद्धव्यपण । चिदानंदघन सदोदीत ॥ २७ ॥ एवं ब्रम्हावेगळें कांहीं बोलिजे ऐसें दुजें नाहीं । येणें ज्ञानें ज्ञान सर्वही । कुंठित पाहीं कोंदलेपणें ॥ २८ ॥ पाणी कोंदलें पाणियें । तें परिपूर्ण आहे तयापरी ॥२९॥ आकाश कोंदलें आकाशीं । येणें जाणें न घडे तयासी । घेणें देणें तेंचि तेणेंसी । नाहीं दुजयासि परिश्रमु तेथें ॥ १३० ॥ दृष्टि कोंदली बुबुळीं । बुबुळ बुबुळा खेवे वळी । कापुर गुंतला परिमळीं । कल्लोळ कल्लोळीं कोंदे जैसा ॥ ३१ क्षीराब्धि उचंबळे क्षीरें । तथें येणें जाणें सहजचि मुरे । यालागीं ब्रह्मींच ब्रह्म वावरे । नाहीं दुसरें बोलावया ॥ ३२ ॥ जैसें कल्पांतींचें उदक । सभराभरित आयितें येक । तें कोंदे न घटे निष्टंक । तंव तें नेटकं निघोटपणें ॥ ३३ ॥

संमतिश्लोक ॥ किं करोमि क्व गच्छामि किं गृण्हामि त्यजामि किम् । आत्मना पूरितं सर्वं महाकल्पांबुना यथा ॥

यालागीं जेणें जाणें करणें । जें कीजे तें ब्रह्म होणें । होणें न होणें जेणें भासणें । तें कोंदलें तेणें परब्रह्म ॥ ३४ ॥ यालागीं जैसा आहे तैसिया रिती । सुखचर्यारार्हे सहजस्थिती । ह्मणोनि प्रेमें आळंगिती । येरयेरां स्थिति बाणली पूर्ण ॥ ३५ ॥ देह जाला रोमांचित । प्रेमें कंठ सद्गद दाटत । नयनीं अश्रु लोटले भरित । जैसें गलित कर्दळीपुट ॥ ३६ ॥ आनंद न माय हृदयांबरीं । तो बाहा फांकला इंद्रियद्वारीं । स्वेदकण दाटले शरीरीं । सुखैकथरारी देहकंप ॥ ३७ ॥ शुद्धसत्वाचें उत्थान । आनंदें येत स्फुंदन । असकें कोंदलें संपूर्ण । देह मीपणे विरसला ॥ ३८ ॥ आनंदु न माये सृष्टीं । नृत्यानंदु विराला पोटीं । मग सच्चिदानंदु तटतटीं । सर्व दाटी कोंदलेपणें ॥ ३९ ॥ अष्टही भाव सात्विकगुणी । सत्व मीनले उपशमनीं । उपशमले सत्वगुणीं कोंदे निर्वाणीं ब्रह्मसुख ॥ १४० ॥ ब्रह्मसुखीं न कळे दिवाराती । ना न दिसे दृश्याची व्यक्ति । स्वप्रकाश स्वयंज्योति । नित्यानंदुतृप्ति नित्यानंदें ॥ ४१ ॥ हें देखोनियां वसिष्ठऋषि । आनंद पूर्ण न माय मानसीं । शिष्याचेनि पूर्णत्वें सद्गुरूसी । आनंदु आकाशीं न माये ॥४२॥ मग प्रबोधोनि रघुनाथासी । व्युत्थान करी समाधीसी । आळंगी सप्रेमेंसी । ह्मणे ये स्थितीसि कुरवंडी करूं ॥ ४३ ॥ मग ह्मणे धन्य धन्य हे स्थिति । धन्य धन्य बा तुझी मति । धन्य धन्य तुझी देहाकृति । ब्रह्मस्थिति बाणली तुज ॥ ४४ ॥ तुझ्या भाग्याच्या गणनेसी । तुलना नाहीं ये महीसी । काय वाणूं ये ब्रम्हस्थितीसी । म्हणोनि पोटेंसि मागुता धरी ॥ ४५ ॥

---

१ रहाण्याचें स्थान समजणें. २ नाहींसें होऊन. ३ दक्षिण उत्तर वगैरे सर्व दिशा. ४ हुंगणें. ५ खरोखर. ६ जिकडे तिकडे भरलेलें. ७ सुखानें आचरण करून. ८ घामाचे थेंब. ९ सर्व.

अहो पुत्राचेनि आलेपणें । पितयासि ते आलेपण बाणे । परी तें न्यून सहस्रगुणें । असे उणें शिष्याहुनी ॥ ४६ ॥ शिष्यपणाचेनि आलेपणासाठीं । गुरुशिष्या आनंदी होय भेटी । ना चले ययाहूनि कोटी । आनंदा पुष्टि स्वानंदें ॥ ४७ ॥ तया दोघांसि सुखकोटी । परमानंदें पडली मिठी । जिरालों येरयेरां पोटीं । द्वैतसृष्टि मावळली ॥ ४८ ॥ ऐसे राहिले मुहूर्त दोन्ही । क्षेममिसें श्रीरामवदनीं । बोधामृतावि रिचउनी । एकपणें शोभताली ॥ ४९ ॥ मग अतिप्रयासें करूनियां । क्षेम सुटलें दोघां तया । तरी ऐक्य दोघांचिया आंतुलिया । निबिड होवोनियां राहिलें ॥ १५० ॥ मग ह्मणे जी सद्गुरुनाथा । परमानंदीं बुडालों आतां । नेणिजे दृश्यस्फूर्ति तत्वतां । देहाचा माथांचिरा पडिला ॥ ५१ ॥ आतां वस्तूवांचूनि दुसरें । अणुमात्र न दिसे साचोकारें । सर्वही आत्मानंदभरें । वेगळें नुरे आपुणेंविण ॥ ५२ ॥ देहादिसकळप्रपंचजात । हा दृश्यत्वें भिन्न देखत । तो सर्वही जालें ब्रह्मभूत । दुजें तेथें न स्फुरे कांहीं ॥ ५३ ॥ स्वामी तुमचेनि प्रसादेंकरूनी । मीचि येकु जालों त्रिभुवनीं । दुजें न दिसे मजवांचुनी । जनीं वनीं मीचि येकु ॥ ५४ ॥ गुरुशिष्यादिद्वैतगोष्टी । मावळोनि जाली ब्रह्मपुष्टि । तुम्हांसि तूपणें न देखें दृष्टीं । कोंदे सृष्टि ब्रह्मानंदें ॥५५॥ न देखें क्रिया कर्म करण । न देखें मजसहित मीपण । देहादिइंद्रियें प्राण । समसमान चैतन्य देखें ॥ ५६ ॥ माझें ज्ञान आणि अज्ञान । उभयतां उभय चिद्गगन । क्रिया कर्तृत्व गमनागमन । चैतन्यघन चिद्रूपें ॥ ५७ ॥ आतां मज नाहीं कर्तव्यता । कर्तव्य करणेंचि तत्वतां । मजवेगळें सर्व पहातां । नाहीं रिता ठाव कोण्ही ॥ ५८ ॥ मी व्यापक चिद्रूप अनंत । करणिक्रियादिव्यवहार समस्त । मजवेगळा मज नाहीं भासत । त्रिविध अंत नाहीं जया ॥ ५९ ॥ ऐसें बोलतां तया विशद । तंव वाचा जाली सद्गद । उठला बोध तुटला बाध । निर्विवादें होऊनि ठेला ॥ १६० ॥ वसिष्ठ वोवाळी जीवींच्या जीवें । चिद्रत्नांचे वोवाळून दिवे । ह्मणे चिरंजीवी तूं माझेनि जीवभावें । काय करावें तुजलागीं ॥ ६१ ॥ तूं आनंदाचें पडप । तूं आनंदाचें मूळरोप । तूं चित्प्रकाशाचे चैतन्यदीप । उदंड अमूप परिपूर्णत्वें ॥ ६२ ॥ तूं आनंदादिनियंता सर्वेश्वरु । तूं ब्रह्मविद्येचा पूर्ण सागरु । तूं अकर्त्ता अभोक्ता निर्विकारु । सदाचारु जनप्रवृत्ती ॥ ६३ ॥ तूं अनादिपणाचेंही मूळ । तूं सर्वातीत सर्व सकळ । तूं अकळ अचळ अढळ । नित्य निर्मळ स्वयंज्योति ॥ ६४ ॥ तूं सच्चिदानंदैकघन । तूं व्याप्यव्यापक विहीन । नित्य निर्गुण निरंजन । ब्रह्म परिपूर्ण अनादिरूप ॥ ६५ ॥ तूं कर्त्ताकर्मक्रियाविहीन तूं अनादीचें मूळस्थान । तूं नित्य निराकार निर्गुण । परम पावन पावना ॥ ६६ ॥ तूं सगुणनिर्गुणाची आदि । तूं या आकाराची अवधि । तूं बुद्धीची बोधक बुद्धि । तूं सर्वसिद्धि साधका ॥ ६७ ॥ तुझें स्वरूप तुज कळलें । अपरोक्षानुभवें स्वयेंचि बाणलें । तुझें सुख तुजाचि फावलें । अज्ञान गेलें तुझें तुझेनी ॥ ६८ ॥ स्वयें आपण स्वतःसिद्ध असतां । तें अज्ञान प्रतिबंधी सर्वथा । तें सद्गुरुप्रसादें विचारूं जातां । मागुही पुरता न लभेचि ॥६९॥ तेव्हां स्वतःसिद्ध आपला आपण । परिपूर्ण पूर्णानंदघन । तें तूं राहिलासि जाणोन । जगीं धन्य तूंचि एक ॥ १७० ॥ तुझी स्थिति वर्णूं जातां । तेथें वाचा कुंठित गा समस्ता । तुवां जगा उपकार केला आतां । उद्धरणार्थ त्रैलोक्यासी ॥ ७१ ॥ तुझी माझी हे गुह्य गोष्टी । ते समूळ फावली प्रसंगें सृष्टी । भाग्याचा जो धरूनि पोटीं । ब्रह्मीं भेटि श्रवणमात्रें ॥ ७२ ॥ मज पाहातां तुझें अवतरण । मनीं धरूनि हेंचि कारण । जें करावें जगदुद्धरण । हेंचि आचरण दाविसी ॥ ७३ ॥ अज्ञानाची घेऊनि बुंथी । हेंचि कारण । जें करावें जगदुद्धरण । हेंचि आचरण दाविसी ॥ ७३ ॥ अज्ञानाची घेऊनि बुंथी । अंगिकारु करिसी स्वशक्ती । तेव्हां जनांसि मनुष्यप्रतीति । श्यामलाकृती दाविसी तूं ॥ ७४ ॥ गुरुशिष्याची मिरवणी । करूनि जगा ब्रह्मसुखाचा धनी । दिधली तुवां कार्मुकपाणी । जगदुद्धरणीं समर्थ ॥ ७५ ॥ जे अज्ञानार्थासि पावती । ते ज्ञानार्थचि स्वयें होती । परमानंदें डुल्लती । न समाती ब्रह्मांडीं ॥ ७६ ॥ आणि जे ज्ञानार्थासि न पवती । ते संवादु तरी आइकती । इतुकेनिच तयां ब्रह्मप्राप्ति । ग्रंथाची शक्ती ऐसी असे ॥ ७७ ॥ संप्रदाय या ग्रंथाचा । एकांतसंवादु आमुचा । श्रवणमात्रेंचि स्वसुखाचा । पावे साचा नित्यानंदु ॥ ७८ ॥ जो जया ठायांसिही न पवे । तो श्रवणसुखेंचि सुखावे । मूर्खासही प्रेम दु... । सर्वीं पावे ब्रह्मसुख ॥ ७९ ॥ ययाहूनि जो मंद । तया तुझें नाम तें विशद । ...लों तो स्वाध ब्रह्मानंदु ॥ १८० ॥ तुझिया नामाचें जें संबोधनें । तन्मिषें नामें सगुणनिर्गुण । बोलि... उच्चारितां परमप... । संसारदैन्य निर्दळती ॥ ८१ ॥ तीं भक्ती अथवा अभक्ती । प्रीतीं

१ आलिंगन. २ देण्याच्या निमित्तानें. ३ ...स्वरूपानें. ३ प्रतिष्ठा. ४ प्रत्यक्ष अनुभव आल्यामळें. ५ अंगाचा काळा रंग. ६ हाय ... मारण्यासाठीं घेतलेलें नांव. ७ ... निमित्तानें देखाल.

अथवा अप्रीती । सावध अथवा व्यग्रमती । उच्चारितां प्राप्ती ब्रह्मसुखाची ॥ ८२ ॥ जऱ्ही नेणोनियां गंगाजल । सेविलियाही निर्दळी कलिमल । कां नेणोनि स्पर्शिलया अनल । पोळी तत्काल स्वतेजें ॥ ८३ ॥ नेणोनि शर्करा घातली तोंडीं । तऱ्ही आपणापेसीच दे गोडी । सेवितांचि अमृत पाडी । करी फुडी अमरत्वें ॥ ८४ ॥ तैसें तुझेनि नामोच्चारणें उठे । संसाराचें धरणें । तोषे वैकुंठींचेनि राज्यपणें । सुखें भोगणें नित्यानंदु ॥ ८५ ॥ ऐसे मुक्त मुमुक्षु विषयीजन । सुखी होती श्रवणेंकरून । हा उपकार तुवां रघुनंदन । अवतरोन केला जनां ॥ ८६ ॥ ते तुझे गुण गणनेसी । बोलतां सांकडें जेथें श्रुतीसी । तेथें पाड काइसा इतरांसी । धन्य कुसी मातेची ॥ ८७ ॥ माझें गुरुत्व सकळां वरिष्ठ । ह्मणोनि नाम पावलों वसिष्ठ । तुझेनि जालों अतिश्रेष्ठ । भाग्य उत्कट गुरुत्व माझें ॥ ८८ ॥ आणि धन्य तयाची मातापिता । हा माझा तुझा संवाद गा रघुनाथा । जे स्वयें बैसोनि आणिती चित्ता । ते पावती तत्वतां ब्रह्मानंदु ॥ ८९ ॥ अगा यया ग्रंथाचेनि श्रवणें । जाणते नेणते यांनीं जाणणें । ब्रह्मसुखचि त्यां पावणें । जऱ्ही भोगणें संसारसुखा ॥९९० ॥ जंववरी हा ग्रंथु श्रवण करिती । तंववरी येक सुख पावती । तेणें ब्रह्मानंदें येक निर्वाहती । येक उठती व्यासंगें ॥ ९१ ॥ परी क्षणभरि जरी ब्रह्मानुसंधान । तें करी संसारअटवीचें दहन । ऐसें ब्रह्मसुखाचें सामर्थ्य पूर्ण । जाण हे खूण रघुपुंगवा ॥ ९२ ॥ जऱ्ही अग्नीचा विस्फुलिंग साना । तऱ्ही तृणराशि करी भस्मी पूर्णा । कां तात्काळ जाळितसे तृणा । पेटला वनामाजी जैसा ॥ ९३ ॥ नातरी अमृताची येक कणिका । सेविल्या अमर करी देवां । कां सदनीं जऱ्ही दीपकाळिका प्रकाशसुखा मेळवीचि ॥ ९४ ॥

कुलं पवित्रं जननी कृतार्था वसुंधरा पुण्यवती च तेन
अपारसंवित्सुखसागरेऽस्मिन् लीनं परब्रह्मणि यस्य चेतः ॥
स्नातं तेन समस्ततीर्थसलिलैर्दत्ता च सर्वावनिर्यज्ञानां च कृतं सहस्रमखिलादेवाश्च संपूजिताः ।
संसाराच्च समुद्धृतास्वपितरस्त्रैलोक्यपूज्योऽप्यसौ यस्य ब्रह्मविचारणे क्षणमपिस्थैर्यं मनः प्राप्नुयात् ॥

ययालागीं तयाचें कुळ पवित्र । जननी तयाची कृतकृत्य । चरण ठेवी पृथ्वीआंत । तीर्थवंत ते होय ॥ ९५ ॥ त्याचे चरणरज जेथें पडती । त्याचा स्पर्श तीर्थें वांच्छिती । जेथें वसे ते पवित्र क्षिती । ब्रह्मसंवित्ति जो लाभे ॥ ९६ ॥ क्षणभरही जयाचें चित्त । ब्रह्मविचारीं राहे सुनिश्चित । तोचि गा नर कृतकृत्यार्थ । नाहीं अनर्थ करणीयत्वें ॥ ९७ ॥ सर्वां सत्कर्मांचें फळ । यज्ञयागादिजपतपसकळ । तीर्थव्रतशमदमादिकल्लोळ । या सर्वांचें फळ ब्रह्मसुख ॥ ९८ ॥ तया ब्रह्मविचाराचा ठांई । क्षण येक चित्त स्थिर पाही । तरी दानव्रतादिकें सर्वही । केलीं पाहीं तेणें पुरुषें ॥ ९९ ॥ जो व्यवहार करूनि आणीक । ब्रह्मविचार करी क्षण येक । तरी तोचि पवित्रांहूनि पवित्र देख । निष्कलंक ब्रह्मस्वरूप ॥ १००० ॥ सर्वां तीर्थीं तोचि न्हाला । पृथ्वीदान दिल्हें ब्राह्मणांला । नानापरीचा यज्ञादि मेळा । तेणेंचि केला अश्वमेधादि ॥ १ ॥ सकळ देव तेणें पूजिले । भवापासाव पितर मुक्त जाले । तेणें त्रैलोक्य आर्चिलें । आनंदविलें सर्वांभूतां ॥ २ ॥ येव्हडिया फळाचा भोक्ता । तोचि स्वयें होय गा रघुनाथा । धन्य धन्य होय त्याची मातापिता । ब्रह्मवेत्ता जो होय ॥ ३ ॥ क्षणभरि चित्त ब्रह्मविचारीं । घालितां त्याची येव्हडी थोरी । मा ब्रह्म जाणे जो साक्षात्कारीं । त्याची थोरी काय बोलों ॥ ४ ॥ तो तंव ब्रह्मरूपचि तत्वतां । तेथें काय करिजे इतर कथा । तो सकळांचा प्रकाशु नियंता । जगा चाळिता ब्रह्मरूपें ॥ ५ ॥ यालागीं ग्रंथाचेनि श्रवणें । उठे संसाराचें धरणें । स्वयें ब्रह्मसुख अनुभवणें । होय पारणें ब्रह्मानंदाचें ॥ ६ ॥ तंव राम ह्मणे जी श्रीगुरुराया । हें मी लाधलों प्रसादें तुझिया । बुडतां भवार्णवामाजी यया । तारिलों स्वामींया कृपा करोनी ॥ ७ ॥ या संसारसागरामाझारी । गिळिलों होतों क्रोधादिजळचरीं । तुवां सोडविलें काढूनि बाहेरी । ब्रह्मानंदपुरीं निमग्न केलें ॥ ८ ॥ तरी तुझिया उपकारा उत्तीर्ण । नव्हिजे केल्या देहादिअर्पण । ते नश्वर सर्व पदार्थ जाण । तनु मन धन अर्पीं जऱ्ही ॥ ९ ॥ तुवां दिधलें वस्तु शाश्वत । अचळ पूर्णानंदभरित । त्यासि शिष्य उत्तीर्ण होइजेत । हा व्यवहार व्यर्थ करणें वाचा ॥ १०१० ॥ जें जें गुरुसि कीजे समर्पण । देह पुत्रादिसंपत्ति जाण । तें तें मिथ्या नश्वरहीन । नव्हे समान परब्रह्मेंसीं ॥ ११ ॥ जन्ममरणांचि [illegible] कोडी । असती संसाराची बांदवडी । ऐशा ययाच्या उतरंडी । करी तडाकोडी गुरु[illegible] जैसें रंकासि

---

१ कलियुग संबंधी पाप. २ अग्नि. ३ संसाररूपी अरण्याचें. ४ [illegible]ठणगी. ५ ज्याला [illegible]नीं. [illegible] दुसरें कांहीं करावयाचें राहिलें नाहीं असा. ६ कामक्रोध इत्यादि भवसमुद्रांतील क्रूर

अमरत्व देणें । कीं भणंगासि क्षीराब्धि समर्पणें । मृतासि जैसें अमर करणें । इत्यादि जाणे यथाहुनी ॥ १३ ॥ ऐसिये पदवीचा दाता । तयासि नश्वरें कीजे उत्तीर्णता । हें लज्जित होय बोलतां । काय आतां निवेदूं ॥ १४ ॥ ययालागीं सद्गुरूसि नमन । सद्भावेंचि करावें जाण । आणि मौनेंचि करावें स्तवन । तेंचि भजन सर्वस्वेंसी ॥ १५ ॥ ऐसें बोलोनिया रघुपति । श्रीगुरुचरणांवरी लोळती । येरें उचलूनि आलिंगिलें प्रीती । धन्य त्रिजगतीं ह्मणे आपणां ॥ १६ ॥ श्रीरघुनाथ ब्रह्ममूर्ती । ज्ञानाची देवता अधिष्ठात्री । तोही माझा शिष्य ह्मणतां । धन्य त्रिजगतीं मीचि येकु ॥ १७ ॥ परब्रह्म आणि मी बोधकर्त्ता । कोण हे गुरुत्वाची गुरुता । ऐसें स्मरस्मरोनि विस्मयता । करूनि सुलीनता पावला ॥ १८ ॥ दोघां नाठवे दोनीपण । ब्रह्मसुखें ब्रह्म परिपूर्ण । नाठवे देहादिप्रपंचभान । आपणा आपण कोंदले ॥ १९ ॥ जया सुखाची सांगतां गोठी । बोलतां बोली हे गिरा तुटी । असो ब्रह्मरूपचि जाली सृष्टि । सर्वत्र पुष्टि ब्रह्मानंदें ॥ १०२० ॥ तंव विश्वामित्र ह्मणे धन्य । यथा दोघांचें गुरुशिष्यपण । मानिलें परस्परें आपणा आपण । दोघां दोनीपण उरेचिना ॥ २१ ॥ शिष्यत्वें रघुनाथ जाला वरिष्ठ । गुरुत्वें श्रीवसिष्ठ श्रेष्ठ । दोघां जालें ऐक्य उत्कट । ब्रह्म स्पष्ट पूर्णानंदु ॥ २२ ॥ दोघांचें जाऊनि दोनीपण । ब्रह्मरूप जाले परिपूर्ण । धन्य माझें आगमन । फळला यज्ञ ब्रह्मफळेंसी ॥ २३ ॥ चित्तशुद्धी लागीं यज्ञादिसाधन । साधक करिती सांग जाण । मग चित्तशुद्धीनें ब्रह्मज्ञान । जें ब्रह्म निर्गुण निर्विकारु ॥ २४ ॥ तो यज्ञ आरंभितांचि क्षणीं । सगुणब्रह्म देखिलें नयनीं । आतां याचीच करितां काहाणी । जाली धनी ब्रह्मानंदयांची ॥ २५ ॥ बाप भाग्य माझें थोर । यज्ञमिसें पावलों निर्विकार । कोण पूर्वसामग्रीचा संभार । सुखसागर प्राप्त मज ॥ २६ ॥ यज्ञादिकर्में चित्तशुद्धीद्वारा । ब्रह्मज्ञान पावे परंपरा । तेंचि यज्ञारंभीं येकसरा । ज्ञानसागरामाजी निमग्न ॥ २७ ॥ कोण्ही भोजनसामग्रीलागून । याचना करी मनीं धरून । तो जाय येकाचें घर लक्षून । तों अपूर्वपण तेथें देखे ॥ २८ ॥ वोगरिलीं ताटें आयितीं । सिद्ध असती उभय पंक्तीं । तेथें आदरें बैसऊनि जेवविती । अतिप्रीती परमानंदें ॥ २९ ॥ तैसेंचि जालें मजलागून । यागसाधना श्रीरामयाचन । करितां फावलें सगुणनिर्गुण । ब्रह्म परिपूर्ण चिद्रूप जें कीं ॥ १०३० ॥ मुष्टिधान्यालागीं मार्गीं जातां । तंव तेथें निधि भेटे अवचितां । तेवीं मज ब्रह्मप्राप्ती तत्वतां । साधन न करितां अलभ्य लाभु ॥ ३१ ॥ तृषाहरणार्थ कांजीप्राशन । करितां फावलें अमृतपान । तैसें जालें मजलागून । ब्रह्म परिपूर्ण लाधलें ॥ ३२ ॥ ह्मणोनि हर्षत माय गगनीं । रघुनाथा आळंगी धांवोनी । प्रेम न समावे तिघांलागुनी । जाले निर्वाणीं ब्रह्मपणीं ॥ ३३ ॥ न कळोनि तऱ्ही राजा दशरथ । संवादसुखें सुखोन्नत । आनंद पोटीं न समात । क्षेम देत रघुनाथा ॥ ३४ ॥ वसिष्ठविश्वामित्रासि नमून । राजा जाला सुखसंपन्न । सुरवर पन्नग परिवारजन । आनंदें परिपूर्ण डुल्लती ॥ ३५ ॥ सकळां जाला आनंदीआनंदु । रघुनाथ चित्तीं परमानंदु । अवघा कोंदला ब्रह्मानंदु । सुखस्वादु सर्व सभेसी ॥ ३६ ॥ सभासि पिटिली येक टाळी । जयजयकारु कीजे सकळीं । उत्साह न समाये नभमंडळीं । भूमंडळीं परमानंदु ॥ ३७ ॥ मग आनंदें बैसोनि सभेसी । श्रीरामाचें लक्ष सर्वां जनांसी । पुष्पवर्षाव करिती स्वर्गवासी । सुख विबुधांसी कोंदतसे ॥ ३८ ॥ स्वर्गीं नाचती नृत्यांगना । गंधर्व करिती गायना । आनंदु होतसे त्रिभुवना । सर्वां जनां महोत्साव ॥ ३९ ॥ तंव विश्वामित्र ह्मणे रायासी । मी यज्ञफळ पावलों अनायासीं । सगुणब्रह्म देखिलें श्रीरामासी । नाहीं सुखासि मर्यादा ॥ १०४० ॥ तंव प्रसंगें वसिष्ठाचें दर्शन । रघुनाथसंवादें सुखसंपन्न । ब्रह्मानंदें वोसंडलों जाण । ब्रह्म निर्गुण असोनि जालें ॥ ४१ ॥ 'ब्रह्मैव सन् ब्रह्माप्येति'। ऐसें स्वयें बोले श्रुति । ह्मणोनि ब्रह्म असोनि ब्रह्मप्राप्ति । जाली गति ऐसी माझी ॥ ४२ ॥ आतां काशिया यज्ञादिसाधनें । राहिलीं सत्कर्मादिक्रियादानें । जपतपव्रतादितीर्थाटनें । ज्याकारणें तें प्राप्त जालें ॥ ४३ ॥ तुझेनि दर्शनें कृतकृत्यता । भेटि जाली श्रीरघुनाथा । जाली जन्माची साफल्यता । कांहीं कर्त्तव्यता नाहीं मज ॥ ४४ ॥ राया तुझें भाग्य थोर । पोटा आला सर्वेश्वर । जयातें पाहाती योगेश्वर । ध्यानीं निरंतर लक्षिती जे ॥ ४५ ॥ नानासाधनीं करून । सर्वत्यागें संन्यास घेऊन । प्रत्यग्व्यांकरितां ? मत । निरंतर ध्यान करिती ज्याचें ॥ ४६ ॥ अंतरीं पाहातांही न सांपडे । नानासाधनीं ... पोटा आला वाडेंकोडें । भाग्य गाढें दशरथा तुझें ॥ ४७ ॥ तुझिया

---

वं ... भिका ... मूठभर दा ... जन्मार्जित कर्माचा. ५ वाढिलीं. ६ श्रीरामचंद्राला मागून घेणें.

भाग्याचें गणन । करूं न शके चतुरानन । तेथें एक मुखें मी ब्राह्मण । भाग्यपरिमाणें केवीं करीं ॥४८॥ यांहीवरी वसिष्ठापेसा गुरु । स्वयें ज्ञानाचा सागरु । उपदेशी ब्रह्मानंदाचा पूरु ।,अतिथोरु पूर्ण केला ॥ ४९ ॥ यया सुखाहूनियां कोड । नाहीं कोण्ही सुख अतिगोड । सरलें साधनांचें कोड । जाला निबिड ब्रह्मानंदु ॥ १०५० ॥ तथापि कार्यांतर मनीं धरून । करणें असे राक्षसदहन । पुढें जानकीचें परिणयन । होईल लग्नसमारंभें ॥ ५१ ॥ यया कार्यांतरीं घालूनि दृष्टि । मग करी रायासि गोष्टी । ह्मणे माझें कार्य धरूनि पोटीं । राम जगजेठी देईं मज ॥ ५२ ॥ माझा यज्ञ सिद्धी पाववीं । मनींचे मनोरथ पुरवीं । रामलक्ष्मण देईं मनोभावीं । नको गोंवी करूं या यज्ञा ॥ ५३ ॥ तंव राजा ह्मणे विश्वामित्रासी । तुह्मीं अतिथोर केलें आह्मासि । उत्तीर्ण नव्होचि उपकारासी । ह्मणोनि चरणासि लागला ॥ ५४ ॥ श्रीरामलक्ष्मण दोघेजण । वसिष्ठ करी विश्वामित्रा अर्पण । रायासि ह्मणे नको निवारण । करूनि जाण राहाऊं रामा ॥ ५५ ॥ श्रीराम परब्रह्म निर्गुण । तो रामरूपें जाला सगुण । करावया दैत्यनिर्दळण । स्वयें आपण प्रगटला ॥ ५६ ॥ ऐसें बोलोनियां रायासी । रामलक्ष्मण दिधले विश्वामित्रापासीं । श्रीरामें कार्य सिद्धि केली यज्ञासी । स्वयंवरासि[१] गेले सर्व ॥ ५७ ॥ तेणें आनंदु जाला सर्वां जनांसी । रामराज्य जालें पृथ्विवेसी । सुखसोहळा त्रैलोक्यासी । विपश्चितांसि[२] ब्रह्मानंदु ॥ ५८ ॥ येथें समाप्ति जाली ग्रंथासी । व्याख्यान जालें ब्रह्मानंदासी । निजानंदें रंगोनि मानसीं । विनवी श्रोतयां स्वात्मसुखें ॥ ५९ ॥ सद्गुरूचा अंकिला । कीं सद्गुरूचाचि असे केला । निजानंदें जो रंगला । पूर्णपणें सहजाचि ॥ १०६० ॥ येथें संपलें निर्वाण प्रकरण । याचें केलें यथामती निरूपण । केवळ भावार्थदीपन । प्रकाशमान परमार्थ ॥ ६१ ॥ भावार्थटीका हे संपूर्ण । मूळ ग्रंथाचें यथामती व्याख्यान । करूनि केलें समर्पण । सद्गुरुचरण स्मरोनियां ॥ ६२ ॥ श्रीकृष्णा तटसन्निध । भामे निर्गुणग्राम अगाध । तेथें ग्रंथसमाप्तिबोध । जाला सहज पूर्णत्वें ॥ ६३ ॥ शके पंधराशेंचौऱ्यांसी । शुभ-[३]

---

१ विवाह; स्वयंवर. २ विद्वानास. ३ यानंतर मोगरेकर रंगनाथाच्या नांवानें प्रसिद्ध असणाऱ्या प्रतींत कांहीं ओव्या वेगळ्या आहेत. त्या येणेंप्रमाणें:—

गोदावरीच्या दक्षिण तिरीं । तत्क्षेत्र प्रतिष्ठूनि श्री नरहरि । दर्शनमात्रें जगासि तारी । कृपाळु भारी कृपाळुत्वें ॥ १६ ॥ तेथें प्रसिद्ध गा कपिलगोत्रोत्पन्न । श्री नरसिंहाकिंत अनंत गुण । कुळस्वामी जयासी सिंहासनी । करी रक्षण परंपरेसी ॥ १७ ॥ श्रीमदनंत नामें करून अवतरला श्री नारायण । करी जनांचें कलिमलदहन । करी तारण नाममात्रें ॥ १८ ॥ त्रिविध अंत नाहीं जयासी । देशकालादि प्रमाणांसी ह्मणोन अनंत नामें प्रसिद्ध ऐसीं । तारी जयासी स्वप्रकाशें ॥ १९ ॥ तत्पुत्र स्वयें जाण आपण । सर्वत्र ब्रह्मात्मक खूण । ह्मणोनि करितां नामस्मरण । पिता जाण नामठेवी ॥२०॥ ब्रह्म अपरोक्ष जाण आपणासी । ह्मणोनि आपेराज संज्ञा त्यासी । पिता नामसंज्ञा ऐसीं । अनामासी नामसंकेत ॥ २१ ॥ तयाचा पुत्र तत्कळावंत । रंगनाथ नामें असे विख्यात । तो ग्रंथार्थी प्रकटीं यथार्थ । वेंचोनि चित्त सद्गुरुचरणीं ॥ २२ ॥ तें करावयाचें कारण । तेंही निमित्त आतां सांगेन । करून तत्पदाचें व्याख्यान । निरूपण करीन आतां ॥ २३ ॥ गो शब्दें इंद्रियगण । तयातें प्रकाशी गोविंद पूर्ण । नियंता प्रवर्तक होय आपण । तेंचि अभिधान गोविंद ऐसें ॥ २४ ॥ तयाचा पुत्र विठ्ठल मूर्ति । तो स्वयें प्रकाशाची ज्योति । ऐका नामाची उत्पत्ति । एकाग्र चित्तीं परिसावी ॥२५॥ विठ्ठल नाम या तिनी अक्षरांची विपत्ति । ते कीजेल एकएकाक्षराप्रति । तें सूक्ष्मदृष्टीं नाणावें संतीं । प्रबुद्ध जाणती स्वज्ञानें ॥ २६ ॥ संमति । विशेषेण ठसितं भासमानं जगत् लसितं प्रकाशतं यस्मिन् स विठ्ठलः ॥ एवं व्याख्यानाची वित्पत्ति । किती लिहावी इये ग्रंथीं । बहुधा प्रकारीं व्याकरण स्थिति । कीजेल वित्पत्ती व्याकरणबळें ॥ २७ ॥ जें स्वस्वरूपाचेनि विस्मरणें । स्थूल सूक्ष्म भासे दृश्यपणें । तें लया पावे स्वप्रकाशें जेणें । तेंचि जाणणें विठ्ठल नाम ॥२८॥ अथवा जयाची स्वप्रकाशमूर्ति । प्रकाशें वर्ततां स्वयंस्थिति । विश्वाभास पावे समाप्ति । न भासे व्यक्ति दुजयाची ॥ २९ ॥ अथवा ज्या अधिष्ठानाचे ठायीं । विस्तृत जें जग प्रकाशे पाहीं । तेंचि तें अधिष्ठानत्वें सर्वही । शोभे कांहीं विठ्ठलनाम ॥ ३० ॥ तेंचि विठ्ठल नाम बोलिजे । विठ्ठल ऐसें त्यासचि ह्मणिजे । त्या प्रीतीस्तव वरिजे । ग्रंथ [illegible] ॥ ३१ ॥ ते श्रीमद्विठ्ठलाचिया प्रीति । ग्रंथ पावला हा समाप्ति । करावया [illegible] मूर्ति [illegible] राय ॥ ३२ ॥ तत्स्नेहसहित ग्रंथ व्याप्ति । प्रीति [illegible] प्रीति [illegible]

क्षवनामसंवत्सरासी । उदगयन माघ शुक्लदशमीसी । ग्रंथ केला समाप्त ॥ ६४ ॥ आनंदसंप्रदायवंशोद्भव । माध्यंदिनीशाखे अभिनव । वासिष्ठसारग्रंथानुभव । हृदयीं स्वयमेव प्रगटला ॥ ६५ ॥ सर्व शास्त्रांचे मथितार्थ । सर्व वेदांतसंमत । वासिष्ठसार हा ग्रंथ । यथामती वाखाणिला ॥ ६६ ॥ हे

समाप्ती-जिल्हित्वें ॥ ३३ ॥ आतां न बोलतां श्रीगुरु परंपरा । तरी व्यर्थचि श्रम पावेल गिरा । ह्मणून बोललों येक दोन अक्षरां । प्रसाद पुरा लाभे जेणें ॥ ३४ ॥ ईश्वरापासोनियां ज्ञान । तें शिष्यपरंपरेनें आलें पूर्ण । तितकें न बोलविती सद्गुरुजाण । परी येक दोन तीन वर्णवेकीं ॥ ३५ ॥ तरी तोचि करणें आह्मां । कांहीं वर्णू सद्गुरु महिमा । वर्णितां वाचेचि गरिमा । जाय उपरमा अवाच्यपणें ॥ ३६ ॥ नानादुर्बळ जरी भक्त असती । भावें समर्पितां गंगावती । तरी तोषे विश्वमूर्ति । समानगति दुर्वारत्न ॥ ३७ ॥ कां त्रैलोक्य प्रगटी जो स्वप्रकाशतेजें । तया सूर्यातें दीपें वोवाळिजे । तेथें भक्तांवांचूनि प्रकाश नेणिजे । परी अभीष्ट दीजे संतोषूनि भक्तां ॥ ३८ ॥ तैवें भक्तिभावें गुरुपरंपरेसी । वर्णनी अल्प चित्सुखासी । तोचि ज्ञानदावाग्नि अविद्येसी । जाळून ब्रह्मानंदासी वाढवी ॥ ३९ ॥ तरी आधीं वासुदेवानंद सरस्वती । ते साक्षात सगुणत्वें ब्रह्ममूर्ति । न वर्णवे तयाची कीर्ति । अगुण अमूर्ति परमानंदत्वें ॥ ४० ॥ कोणी सिद्धानंद ऐसें ह्मणती । किती वर्षें करूं क्षेत्रीं वस्ती । करूनि देह ठेविला श्रीभागीरथी । सागराप्रती गंगासंगमीं ॥ ४१ ॥ ब्रह्मग्राम उत्तरतीरीं । तेथें परमानंदादिकां प्रबोधकरी । देह ठेउनी गंगातीरीं । ब्रह्मत्ववरी स्वयें आपण ॥ ४२ ॥ तयाचा शिष्य वैकुंठानंद । तो साक्षात आनंदकंद । ब्रह्मपरिपूर्ण पूर्णानंद । ब्रह्मस्वानंद स्वादितां ॥ ४३ ॥ तयाची कीर्ति बोलिजेल । तरी वाचा पवाडु न पाविजेल । तो सर्व प्रकाशक पूर्ण कमळ । नित्य निर्मळ ब्रह्ममूर्ति ॥ ४४ ॥ कितीयेक काळ गमन । करूनि आनंद वनीं निवासन । पश्चात् बदरिकाश्रमीं निवास पूर्ण । जनतारण करावया ॥ ४५ ॥ अनेक शिष्य बोलिले । ब्रह्मानंदसुखें निवाले । ते बोलों किती जाति बोलिले । असो ते नमिले मनें करोनी ॥ ४६ ॥ मगदेहविसर्जन केदारीं । केलें अलकनंदातीरीं । स्वयें ब्रह्मत्व असोनि ब्रह्मत्वावरी । लीलें करी जनसंग्रह ॥ ४७ ॥ तयाचें शिष्यत्व अंगिकारूनी । स्वयें प्रगटला शारंगपाणी । श्रीकृष्णानंद नामें मिरवणी । जनीं वनीं प्रकाशक ॥ ४८ ॥ श्रीकृष्णानंदनामें येणें । तेणें त्रैलोक्यासि उद्धरणें । नामरूपातीत पणें । ब्रह्मनिर्गुण ब्रह्ममूर्ति ॥ ४९ ॥ नामनिर्दोष तें परब्रह्म । सर्वदा सर्वगत सर्वसम । करूनि नामव्याख्यान उत्तम । पावनापावन परब्रह्म ॥ ५० ॥ श्रीकृष्णनामें ब्रह्ममूर्ति । ज्ञातया नामोच्चारें होय प्रतीति । पावोनि पावनीं विश्रांति । स्वानंदचित्तीं भोगिती ते ॥ ५१ ॥ तयावरी आनंद पद येणें । ब्रह्मत्वासि आणिलें उणें । ऐका ब्रह्माभिधान येणें । निराकरणें जडदुःखादि ॥ ५२ ॥ आणि समस्तांहूनियां बृहत । आकाशाहून थोर विस्तृत । तयातेंचि ब्रह्म ऐसें ह्मणिजेत । साक्षेपत ब्रह्म ह्मणवुनी ॥ ५३ ॥ जड विश्वापेक्षा तें चैतन्य । दुःखापेक्षा तें आनंदघन । कल्पितापेक्षा तें अधिष्ठान । सत्ता पूर्ण पूर्णत्वें ॥ ५४ ॥ स्थूळ सूक्ष्मापेक्षा तें बृहत । इत्यादि अपेक्षा ब्रह्म ह्मणिजेत । सर्व व्यावृत्ति त्याज्य निश्चित । इत्थंभूत तेंचि ब्रह्म ॥ ५५ ॥ हें सर्व नसतां कल्पित पणें । इत्यादि नामें कासया ठेवणें । ब्रह्मत्वहि हरवी सच्चिदानंदपणें । आनंदपणें परिपूर्ण ॥ ५६ ॥ शेवटींच्या आनंदें करूनी । सर्वही परमानंदचि वाखाणी । परमानंदावांचूनि जनीं । नाहीं कोणी दुजेपणें ॥ ५७ ॥ ज्या ज्या अपेक्षा नाम बोलिजे । तंव त्या जडादिकांसि अभाव सहजें । यालागीं तें न वाखाणिजे । सर्व जाणिजे परमानंद ॥ ५८ ॥ हेंचि जाणावयालागून । आनंदपद मिरवी आपण । ह्मणोनि कृष्णानंद नामें पूर्ण । ब्रह्म निर्गुण अनिर्देश्य ॥ ५९ ॥ नेणोनियां दुजाची मात । येकला येक आनंद भरित । तोचि कृष्णानंद नामें संकेत । जाण हेत ब्रह्माख्यतें ॥ ६० ॥ तेंचि कृष्णनामाचें व्याख्यान । यथाभिषणा करीन पूर्ण । न भंगोनियां व्याकरण । शुद्धनिरूपण सांप्रदायें ॥ ६१ ॥ तेंचि संमति श्लोकें करूनी । प्रगट कीजे आर्षवाणी । परिसावें श्रोते जनीं । आनंदघणी पावावया ॥ ६२ ॥ संमतिश्लोक ॥ कृषिर्भूवाचकः शब्दो णश्च निवृतिवाचकः । तयोरैक्यं परंब्रह्म कृष्ण इत्यभिधीयते ॥ टीका ॥ तरी कृषि या वर्णद्वयें करून । भूवाचक शब्द होतसे जाण । भूसत्ता या धातूचें व्याख्यान । प्रसिद्धपूर्ण व्याकरणशुद्ध ॥ ६३ ॥ एवं आद्यवर्णद्वय सत्ताघन । करी कल्पिताचें व्यावर्तन । णकार जो कीं तृतीयवर्ण । वाचक पूर्ण [illegible] ॥ ६४ ॥ निवृत्ति परमसुख ऐसें । सर्व शास्त्रीं बोलिलें असे । [illegible] परमशब्दें [illegible] । ज्याहूनि नसे सुख थोर ॥ ६५ ॥ निरतिशय सुख तें ब्रह्म जाण । [illegible] तेसी पावतां ऐक्यपण । ब्रह्म परिपूर्ण पूर्णत्वें ॥ ६६ ॥

वासिष्ठसारटीका । न म्हणावी जी पुण्यश्लोका । पदपदार्थ पाहातां निका । हर्षे साधका दिसेना ॥६७॥ सहज पूर्ण निजानंदें । रंगला तो साधुवृंदें । श्रवण करावा स्वच्छंदें । ग्रंथ निर्द्वंद्व वासिष्ठ ॥१०६८॥

---

सत्तासुखाचे अंतरीं । ज्ञान नांदे परव्यापरी । येके वीण येक क्षणभरी । भिन्न परस्परीं नविना ॥ ६७ ॥ हें स्वगत भेद निरसन मिसें । कां श्रीरामपद व्याख्यानांशें । पूर्वी सांग निरोपिलें असे । जाणिजे ऐसें सज्ञानीं ॥ ६८ ॥ सत्ता तेंचि जाणावें ज्ञान । ज्ञान तोचि आनंद पूर्ण । तिहीं पदीं एक ब्रह्म निर्गुण । नव्हे न्यून एकत्वें । येथें नाहीं गुणागुण विभाग । तिहीं पदीं एक ब्रह्मचि सांग । म्हणोनि भिन्न नलगे पदांग । एक अव्यंग परब्रह्म ॥ ७० ॥ ते कृष्णानंद नामें मिरवणी । हाचि मंत्र परम गुह्य स्थानीं । हें महावाक्य कोडिसवाणी । करी निर्वाणी साक्षात्कार ॥ ७१ ॥ म्हणून श्रीकृष्ण नामें यण । परब्रह्मचि सर्वदा बोलणें । वरी आनंद शब्द पुरवणें । आनंद येणें सर्वत्र पैं ॥७२॥ तें श्रीकृष्णानंद नाम उच्चारणें । बळिजे स्वरूप साक्षात्कारपणें । ज्ञाते सुखपावती तेणे । नाहीं दैन्य परमानंद पणें ॥ ७३ ॥ 'शब्दादेव अपरोक्षसिद्धि' ऐसें । सिद्धांत शास्त्रीं बोलिलें असें । तेंचि अनुभवाहि येतसे । शब्दें प्रकाशे वाच्य वस्तु ॥ ७४ ॥ लौकिकही शब्दें करून । वाच्यार्थासी तद्रूपपण । करितसे स्वयें जाण । न करितां प्रयत्न शक्ति ऐसी ॥ ७५ ॥ गो मनुष्य घट पट हस्ती । जे जे नामशब्दें भारती । तदाकार होय चित्तवृत्ति । संत बोलती साक्षात्कार तो ॥७६॥ यालागीं श्रीकृष्णानंद नारायणें । स्वरूप साक्षात्काराचि बोलणें । म्हणोनि हेंचि उच्चारणें । ब्रह्मसुख जेणें पाविजेत ॥ ७७ ॥ म्हणोनि सर्वदा हेंचि मी करीं । बुडे श्रीकृष्णानंद सागरीं । नेणें तत्सुखेंवीण दुसरी । मात पुरी सर्वदा ॥ ७८ ॥ असो त्याची कीर्ति वाखाणणें । तरी ग्रंथरूपें केलें बोलणें । संत निवती तत् श्रवणें । अनुदिनीं परमानंद ॥ ७९ ॥ यालागीं सर्वदा सर्व पणीं । ग्रंथरूपनामें तया वाखाणीं । तेव्हांचि विचरे सर्वत्र सर्व पण । पूर्णपणीं पूर्णत्वें ॥८०॥ एवं आदिमध्य अवसानीं । गाइला श्रीकृष्ण मंगळचरणीं । ऐसीच उक्ती शिष्टाचरणीं । ग्रंथ परिपूर्णपणीं सिद्ध येणें ॥८१॥ संमति ॥ ग्रंथादौ ग्रंथमध्ये ग्रंथांते मगलमाचरणीयमिति शिष्टाचारः । नमस्कारात्मकं आशीर्वादात्मकं वस्तुनिर्देशादिकं चेत्यादि ॥ ययांत नमस्कारात्मक । मंगळाचरण केलें देख । जयशब्दें आशीर्वादात्मक । केलें सम्यक मंगलाचरण ॥८२॥ आणि वस्तुनिर्देशात्मक । ते सद्गुरुरूपवर्णन देख । नामरूपावरी निष्टंक । केलें एक मंगल ऐसें ॥ ८३ ॥ एवं आदिमध्यें अवसानीं । नमन आशीर्वाद रूप वर्णनीं । केलें परमप्रेमेंकरोनी । काया वाचा मनीं करोनियां ॥ ८४ ॥ ते प्रीति पावो सद्गुरु रावो । येणें बोधेंचि फळो माझा भावो । आतां क्षमा करो हा सखा सद्गुरुरावो । नित्य मद्भाव नित्यत्वें ॥८५॥ धारा नाम महानगरी । गोदावरीच्या दक्षिणतीरीं । षोडषक्रोशा भीतरी । वर्त्ते पुरी अतिविशाळ ॥ ८६ ॥ तद्देश दुर्ग पश्चिम तीरीं । महाविशाळ गुह्यगिरी । तेथें अति कृपाकटाक्ष करी । प्रकाशक शिरीं ठेविला ॥८७॥ त्या हस्तस्पर्शाचेनि योगें । समाधीच स्वयें पायां लागे । प्रपंच विसरे स्वयें स्वांगें । ब्रह्मचि अंगें होऊन ठेले ॥ ८८ ॥ नेणे दिशा विदिशा अंतराळ । नेणे स्वर्ग मृत्यु पाताळ । नेणे गिरिदरी ब्रह्मांड गोळ । झालों सकळ ब्रह्मचि मीं ॥ ८९ ॥ आत्मस्वरूपावांचूनि कांहीं । दुजेपणाची मात नाहीं । तुरीय देह विदेह पाहीं । ब्रह्मसुख दोहीं सुखरूप ॥९०॥ तेंचि निर्विकल्प सुख जोडी । ग्रंथमिसें म्यां केली उघडी । आतां कासया कीजे शब्दप्रौढी । व्यर्थ वोढी पुनरुक्तीची ॥ ९१ ॥ जें किर ठेविलें होतें सर्वा चोरूनी । तेंचि माझ्या स्वामींनीं मजलागुनी । अतिरहस्य हृदयींचें काढोनी । मद्वदनीं रिचविलें जें । तेंचि म्यां ग्रंथामिसें करून । प्रगट केलें जनालागून । सुख पूर्णोद्धारें ग्रंथ संपूर्ण । कवित्वगुण येथें नाहीं ॥ ९२ ॥ येथें नेणोनि अक्षरादि वर्णभेद । अक्षरसाम्य ह्रस्वदीर्घ विशद । काव्यमुद्रा वचनावबोध । नेणोनि बाध परबंधाचा ॥ ९३ ॥ ऐसाही रचिला ग्रंथसागर । पूर्णानंद स्वादाचा पूर्णोद्धार । येथें कवित्व न करोनि विचार । बोधसमुद्र आश्रय हा ९४ येथें बोधसमुद्रींच घालोनि दृष्टि । ग्रंथान्वयें पदार्थ पुष्टी । पावोनि मोक्षश्रियेच्या पाठीं । बैसिजे सृष्टीं आनंदाच्या ॥ ९५ ॥ आतां हेचि असे माझी विनंती । नमन करून पुढतपुढती । न्यून पाविजे पूर्णार्थी । ग्रंथसमाप्ति अत्यादरें ॥ ९६ ॥ ॐ तत्सत् ब्रह्मार्पण । करूनि ग्रंथ केला संपूर्ण । जयजयकारें गर्जोन । हेंचि नमन श्रोत्यावक्त्यांसी अत्यादरें ॥ ९७ ॥ इति यो० निर्वाणप्रकरणं दशमं समाप्तम् ॥

## इति श्रीयोगवासिष्ठसारे निर्वाणप्रकरणं दशमं संपूर्णम् ॥

समाप्त.